श्री

# रामदास आणि रामदासी

भाग सत्ताविसावा

# भक्तमंजरीमाला

## खंड तिसरा

### अध्याय ६०

### — सोपानदेव आणि पीतांबर —

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जया जि सच्चिदानदा। परब्रह्मा आनंदकंदा। लीलाविग्रही स्वछंदा। स्वतसिद्ध परमात्मया ॥ १ ॥ सकळांसि आदिकारण। प्रकृति तुझि सृजति जाण। तो तू गणेश स्मरतां पूर्ण। विघ्नभंजन होतसे पै ॥ २ ॥ मनोरथाची वल्ली। सरस्वती वागफळा प्रसवली। जो अक्षरें असे व्यालि। स्थीति निपजली कूटस्थ ॥ ३ ॥ जीवाची करावया सोडवणा। म्हणुनि अवतरे सद्गुरुराणा। उत्तमपुरुषीं भेटि जाणा। होय दर्शना त्याचेनि ॥ ४ ॥ ऐसा स्वामि सिद्धेश्वर। जो का श्रीरामदासअवतार। ठेउनि मस्तकीं तेणें कर। केलें साचार कल्याण पै ॥ ५ ॥ तें कल्याण पदवी कैसि। अज्ञानतम सकळ नाशि। सद्गुरुपद मिरासी। जाहाली दासी वृत्ति ते ॥ ६ ॥ ते दास्यत्व हे चि आतां। करणें आवडलें सद्गुरुनाथा। वदविती स्वयें संतकथा। गोड अमृताहुनि पै ॥ ७ ॥ तरि अवधान देता पघळ। स्वात्मसुख उचंबळे। पापताप जाय समूळ। दैन्य पळे उठाउठि ॥ ८ ॥

साधुकथेहुन आन । थोर नसे काहिं च जाण । जेथें तिष्ठे नारायण । लोटांगण मोक्ष घालि ॥ ९ ॥ यालागीं आवडी कथा सर्वि । भक्तमजारे हे परिसावी । जेणें तुटे गंधागोवि । इच्छा पूर्वि श्रीभगवत ॥ १० ॥ श्रीसोपानदेवाचा अवतार । जाला असे महीवर । ते ऐका सविस्तर । सशय दूर करुनिया ॥ ११ ॥ निवृती आदी चौघे जण । यतीपासार पावले जनन । ते असंस्कार राहिले पूर्ण । कराया रक्षण वेद आज्ञा ॥ १२ ॥ ते भक्तवछला नारायणा । प्रशस्त न वाटे कदा मना । यालागीं अवतार घ्यावया आज्ञा । केली जाण श्रीविठलें ॥ १३ ॥ तये आज्ञे वदुनि शीरिं । जन्मले सत सर्वज्ञ चारि । ते कथा वर्णिलि वरि । निवृति दुसरी ज्ञानदेवाचि ॥ १४ ॥ आता सोपानदेवाचे अवतरण । कवणे ठाई जाले जाण । ते चि होईल समूल कथन । करा श्रवण निजप्रीति ॥१५॥ ब्रह्म कुमदळीचे तिरिं । क्षेत्र जाणा मथुरेश्वरि । भरद्वाजाचिये गोत्रीं । अवतार धरि विधि तेथें ॥ १६ ॥ आकारमात्री ऋग्वेद । हा तो मुळिचा अर्थ सिद्ध । यालागी वेदि त्याचि शुध । सोपान प्रसिध जन्मलेति ॥ १७ ॥ आणिक येथें दुजे कारण । विरचि अंश सोपान । स्वानंद-पुरि व्हावया अवतरण । जाणति पूर्ण सज्ञान ते ॥ १८ ॥ स्वानुभवें पाहातां देहि । गणपतिजवळ ब्रह्मदेव पाहि । ज्ञानि देखुन सर्वा ठाई । सदा ह्रदई ध्याति तया ॥ १९ ॥ पितामहसज्ञेसि । बाबजी ऐसे नामासि । धरिले जेणें निश्चयेसि । जगत्रयासि कळावया ॥ २० ॥ किंबहुना आणिक कारण । श्रोति ऐका देउनि मन । जीये काळि नामदेवानें । आरति जाण केलि पै ॥ २१ ॥ अठाविस युगें उभा विटेवरि । ऐसें वदला नामा वैखरि । तये वेळि संतचतुरी । केला निर्धारी प्रश्न देवा ॥ २२ ॥ म्हणति देवा तूं जीर्ण की नूतन । तेव्हां हासिनले श्रीभगवान । जवळि नामा भक्त पाहुन । अवलोकन केले पै ॥ २३ ॥ तेये सोपानदेव बोलति । जुनाट जुना हा श्रीपति । परि अठावीस युगें निश्चिति । पुंडलिकें भक्ति उभा असे ॥ २४ ॥

नामदेवाची उपासना । म्हणुनि तसे वर्णिले जाणा । बाप बाप म्हणे सोपाना । पंढरिराणा ते वेळे ॥ २५ ॥ जी जी म्हणति सकळ जन । टाळ्या पीटिति संत मिळोन । तेव्हां बावजी हे नामाभिधान । पावले सोपान भगवतमुखें ॥ २६ ॥ याळागि नाम निर्धारि । सोपानासि या अवतारि । बावजीपंत साचारि । नरनारी म्हणति पै ॥ २७ ॥ जयालागि मुर्तिमंत । अनुग्रह केला आदिनाथें । प्रत्यक्ष प्रघटोनि स्वानंदपुराते । देवाळयांत श्रीगणपतिचे ॥ २८ ॥ मग तेथें काम पाषाणें । वदर्कि जेवि घातले ळवण । नातरि जळ गारा दिसति भिन्न। परि अभिन्न सदा निरा ॥ २९ ॥ असो तें स्वसुख बोलों जातां । वाचा पावति तन्मयता । याळागीं न घडे वाच्यांशता । होय चित्ता विश्राति ॥ ३० ॥ पुढे विवाहादि कर्म जाला । सावित्रिनें निजपति वारिला । तो सोहळा वर्णावयाला । सहस्रमुखाला शक्ति कैंचि ॥ ३१ ॥ जेथें भगवान् जाले वन्हाडि । मुक्ति कारिति स्वयें कुरोंडि । राहि रुक्मिणी लवदसवडि । मिरवति परवडि मंडपीं त्या ॥ ३२ ॥ ऐसे परि करोनि लग्न । गृहस्ताश्रमी केले सोपान । बावजीबावा नामाभिधान । विश्व सदर्ते म्हणति जया ॥ ३३ ॥ त्रिगुणास तीन पुत्र । उत्पन्न जाहाले जेथें पवित्र । सदा ज्याचे वदे वगत्र । श्रीराममंत्र अहर्निशीं ॥ ३४ ॥ ऐसा समर्थ योगी तो बरवा । स्वात्मसुखाचा जो निजठेवा । जयाचे आवडि वासुदेवा । घेतसे सेवा रात्रंदिन ॥ ३५ ॥ नित्यनेम हरिपूजन । वैष्णवाचा सन्मान । येकादशिसि कीर्तन । उपोषण सर्वासि ॥ ३६ ॥ पचरत्ने भगवद्गीता । पठण करणें नित्य सर्वथा । अंतर्बाह्य परमात्मा । मनन अर्था हेचि पै ॥ ३७ ॥ मुळजीवा माझा दावावा । न्याय नीति ज्या स्वभावा । जगा उपकार करावा । तारि जिवा भक्तिनें ॥ ३८ ॥ कीर्तनाची बहु आवडि । श्रोतियाचा सशय फेडि । ज्ञानध्वजा उभविलि गुढि । रसपरवडि निरोपण ॥ ३९ ॥ कथारगीं उभे राहातां । अभग उंचस्वरें गातां । पुढें ठाव नि भक्तकथा । भागवतादि सकळिक ॥ ४० ॥ याचें काय कारण । तें

हि ऐका विचक्षण । या विधिमुखें समाधान । श्रुति अनुमोदन देताति ॥ ४१ ॥ भागवतधर्म जितुका । संपादिला पूर्ण तितुका । उभारिली कीर्तननौका । उतरी अनेका भवजळीं ॥ ४२ ॥ पंढरिसि जातां भले । देव सामोरे ज्या पातले । कीर्तनासि उभे केले । श्रीविठलें स्वभक्ता ॥४३॥ तये काळींचा विचार । वर्णन करितां होईल प्रसर । जिये कथेंत सारंगधर । गिरिजावरसहित पै ॥ ४४ ॥ प्रगट जाहाला जेव्हां हरि । समाधिस्त जाले नरनारी । अमर उतरले पंढरि । सभागजरि कोंदाटले ॥ ४५ ॥ नाहिं मान देहाचें । ऐसें माहात्म ज्या कथेचें । चित्त विराले स्वरूपीं साचे । काय वाचे वर्णूं ते ॥ ४६ ॥ असो ऐसे बहुत वेळा । चमत्कार पंढरिसि जाहाला । मोरेश्वरि अवतरला । सोपान जाला बावाजी तो ॥ ४७ ॥ कोणे येके दिनिं बावजीबावासि । आठवले मनिं जावे काशीसि । तव पाहिले विश्वेश्वरासि । स्वानंदपुरासि सकळ दैवते ॥ ४८ ॥ नाना सरिता पर्वे सर्व । मोरेश्वरीं देखिले वैभव । याலागि सुचवि पंढरिराव । स्वस्त राहावे या ठाईं ॥ ४९ ॥ मग आज्ञा वंदोनि तेथे चि । राहिली गुरुमाय अनाथाचि । धन्य कीर्ति त्या बावजीची । आवड साधुची बहु जया ॥ ५० ॥ सेखी ठेविला मोरेश्वरीं देह । तीं तो गोष्टि अपूर्व आहे । प्रत्यक्ष भगवान लवलाहे । पंढरिराय आले तेथें ॥ ५१ ॥ स्वमुखें घेऊनि प्राणज्योति । बावजीस मेळविले स्वरूपाप्रति । प्रगटला तेथें श्रीगणपति । विमानीं वर्षति देव सुमनें ॥ ५२ ॥ न वर्णवे तो निधनसोहळा । विश्वात्मा सोपान होऊन गेला । चौघडा तो सुरू जाहला । सर्वत्र ऐकिला अनुहतध्वनि ॥ ५३ ॥ असो ऐसे महादेव सोपान । तयाचा अवतार बावजी पूर्ण । जयाचे कीर्तन नारायण । करिति मनन अद्यापि ते ॥ ५४ ॥ नासिकाग्रि ठेऊन दृष्टि । उभा राहिला जगजेठि । निजध्यास तो चि निकटि । आठवि गोष्टि भक्ताच्या ॥ ५५ ॥ आणीक दुजी कथा येथें । आठविली ती ऐका श्रोते । दिगांबर व्हावया पढरि-नाथ । कारण कोणतें परिसा तें ॥ ५६ ॥ पीतांबरासि हेट जाहाला ।

जन्म घ्यावयाला भूमंडळाला । तये वेळीं केलि लीला । परमहंस जाला श्रीविठल ॥ ५७ ॥ तें कथन अतिगोड । पूर्वि जीविचें सकळ कोड । स्वात्मलाभ येथें उघड । भक्ति घडे सहजी त्या ॥ ५८ ॥ पीतांबर वदे देवा । वाटे मनीं जन्म घ्यावा । संतसंग करूनि बरवा । प्रताप गावा तुझा पै ॥ ५९ ॥ युगत्रे हा चि ध्यास । कधीं गाईन तव गुणास । नाना आख्यान कथा सुरस । भक्तिविलास आवडे मनीं ॥ ६० ॥ ऐसा विनवोनि रमावर । अवतार घरि पीतांबर । मग सहजी रुक्मिणी-वर । दिगांबर शोभले ॥ ६१ ॥ पीतांबर ह्मणे देवासि । पुन्हा आणावे पायापासि । कटिस्थान माझे मजसि । ऋषिकेशी द्यावें मज ॥ ६२ ॥ अवश्य वदता श्रीधर । निघता जाला पीतांबर । वासना होति कटिवर । त्रीत्व निर्धार तेणें पावला ॥ ६३ ॥ ॥ यं यं वापि स्मरन् भावान् । इति गीता ॥ जो जो मानसि धरितां हेत । तो तो तया जन्म प्राप्त । पीतांबराचि इछा चित्तांत । कटिवरि निश्चित देवाचे ॥ ६४ ॥ ऋणानबंधयोगें पाही । जाता जाहाला तये ठाईं । गुदस्थान घद्ध देहि । स्वस्थान गेहि पावला ॥ ६५ ॥ गणपति जयाचे दैवत । तये स्थळीं पीतांबरि येत । तो ऐका समूळ वृतांत । चतुर श्रोते पंडीत हो ॥ ६६ ॥ स्वानंदपुर मयुरेश्वर । ब्रह्मकुमंडली नदीतीर । जेथें सोपानदेवाचा अवतार । बाजजी साचार जाहाला तो ॥ ६७ ॥ तो हि ब्रह्मदेवाचा अंश । षडदळ ह्मणति ज्या योगेश । चतुर्दळी श्रीगणेश । ऐक्य विशेष उभय दोन्हि ॥ ६८ ॥ याळागिं उभयता भक्त शिरोमणी । जन्म पावले तये स्थानि । वर्णन करविति कोदंडपाणी । अध्याय ह्मणुनि येक हा ॥ ६९ ॥ असो दिगांबरदेव पंढरिचा । यदर्थि राहिला उभा साचा । अज्ञान वदति जैनाचा । समज तयाचा गौण पै ॥ ७० ॥ मूर्ख बोले नेणोनि । तो हि अर्थ करिती ज्ञानी । जे नव्हते कांहिं च ह्मणुनि । मूर्ति सुलक्षणी ते चि हे ॥७१॥ असो ऐसे अनेक अर्थ । श्रीपांडुरंगी सदा शोभत । तेथें मानव किति सांगत । शिणला अनंत कथन करितां ॥ ७२ ॥ वेद नेति नेति वदे ।

तेथें मानव मतिमंद । ज्ञानगर्वें वृथा स्फुंदे । सांडुनि पद निज आत्मता ॥ ७३ ॥ पाखांड जगीं स्थापुनी । भक्ती उडविती दैत्यांश मेदिनी । याकारणें साधु जन्मोनि । आविती भजनीं हरिच्या ॥ ७४ ॥ श्रीविठल महाभागवत । जैनकृति जे जे ह्मणत । ते ते श्रवण न करा सत्य । जया स्वहित करणें पै ॥ ७५ ॥ कटिवरि धरितां प्रीत । स्त्रीत्व जालें तेणें प्राप्त । सदाचारि माह्मण अनंत । ऋग्वेद शोभत जयालागीं ॥ ७६ ॥ ऋग्वेद स्थूळदेहाचा । यजुर्वेद तो सूक्ष्माचा । कारणदेह सामवेदाचा । अथर्वणाचा महाकारण ॥ ७७ ॥ वस्त्र स्थूळासि परिधान करणें । याळागिं जाहले तेथें चि जनन । धन्य अवतार पीतवसन । व्यास नारायण आंगिकारि ॥ ७८ ॥ सकुमार अतिसुंदर । हरिद्रागर्भासारिखें शरीर । नेत्र पाहातां चपळाकार । मनोहर सकळ जीव ॥ ७९ ॥ दिवसोंदिवस चढता । प्रिती वाटे मायताता । परि ते तन्मय सदा चिता । श्रीभगवंता स्मरे मनि ॥ ८० ॥ जन्मातरयोगेंकरून । मोरेश्वरि आर्पिळी जाण । उत्तम पाहुनि माह्मण । कन्यादान केले पै ॥ ८१ ॥ पुढें संसारि गुततां । नावडे ते पदरिनाथा । विलया धाडुनि तयेच्या कांता । वैराग्य चित्ता उपजविले ॥ ८२ ॥ मग अहोरात्र नामस्मरण । पीतांबरीचे रंगलें मदन । ह्मणे कधीं श्रीगुरुचरण । डोळा पाहिन मी आतां ॥ ८३ ॥ ऐसा लागतां तिजध्यास । सांगति तेव्हा पंढरिनिवास । अवतरले श्रीरामदास । तेचि उपदेश देति तुळा ॥ ८४ ॥ आज्ञापिता चक्रपाणी । आले नेत्रासी जीवें पाणी । मोजीतसे निशीदिनि । दिवस गणी युगासम ॥ ८५ ॥ तव तो दिवस प्राप्त जाहाला । सद्गुरुराज घरासि आला । सिधनाथ ह्मणति ज्याला । निजपदाचा मेळवी जो ॥ ८६ ॥ मग ते सुख कैसे रिति । कोण देईल याचे हातिं । पीतांवरि उभी होति । पडलि क्षीति पायावरि ॥ ८७ ॥ प्रेमाश्रुनें श्रीगुरुचरणा । आभीषेचिले असे जाणा । वाहुनि चित्त सुगंधसुमन । आर्पिलें त्रिगुणा बिल्वदळ ॥ ८८ ॥ तुळसीयुक्तापरिमळ । घातिली अखंड भक्तिमाळ । धुपदीप ते चि सोज्वळ ।

जाळिले निर्मळ अहंसोहं ॥ ८९ ॥ नानाविधपंकान । येकांतमतानिरंजन। ओवाळिला सच्चिदघन । आनंदानें श्रीगुरू ॥ ९० ॥ मंत्रपुष्प प्रदक्षणा । नमनविधी पुनःपुना । निरंजनासि प्रार्थना । वियोगे चरणा नसो पै ॥ ९१ ॥ ऐशापरि पीतांबरीनें । सद्गुरुचें करूनि अर्चन । स्वरूपोन्मुख करा ह्मणे । कर जोडून ठाकली उभी ॥ ९२ ॥ मग तेथें काय उशीर । श्रीसिद्धनाथ कृपेचे सागर । सन्मुख बैसउनि त्वरें । तारकमत्र उपदेशिला ॥ ९३ ॥ ते चि क्षणी निर्विकार । चिदाकाश चिदंबर । होउनि मीनला पीतांबर । सबाह्य सारे स्वरूप पैं ॥९४॥ जे जे पाहे पदार्थ डोळा । तो तो दिसे घनसावळा । दृश्यभास अवघा सरला । विठ्ठ जाहाला चराचर ॥ ९५ ॥ तया आत्मसुखा कोण वर्णी । थकला आहि अनंत वदनि । देहाचि सांडिजे ओवाळुनि । श्रीगुरुचरणीं निमग्नता ॥ ९६ ॥ धन्य धन्य ते सिद्धस्वामि । पीतांबरिसी मेळविले ब्रह्मीं । जीवित्व दवडुनि मुखधामी । शिउ नेहमीं वदती तया ॥ ९७ ॥ मग तयेनें श्रीगुरुसेवे । कायावाचामनोभावें । आयुष्य वेचिले असे सर्व । सतोपद्रवे समर्पोनि ॥९८॥ पंढरिचा बहुप्रेमा । अंतर न पडे कदा नेमा । पीतवसनें जे का रामा । ऋणी रामा केले तिनें ॥९९॥ संतमेळीं निर्लज । होउनि वंदि पदरज । आराधीला गरुडध्वज । शिउ साजे नाम जीला ॥ १०० ॥ संतभोजन आषाढीसी । करी प्रेमें पंढरीसी । मांगे हिंडे ऋषीकेशी । ह्मणे दासासि पडो नेंदी ॥१॥ ज्या ज्या समई जो जो काम । तो तो पुर्वी मेघ शाम । मोहित जाला जीचे प्रेमें । धन्य परम पीतांबर तो ॥ २ ॥ तये पीतांबरी शिउबाईनें । तिथें केलि समम जाण । पुन्हा येउनि सद्गुरुचरण । केले वंदन अत्यादरें ॥ ३ ॥ नानाविध काव्योक्ति । वदनि स्तविला श्रीपति । अखंड जीयेचि स्वरूपस्थीति । गुरूभक्ति केलि बहु ॥ ४ ॥ असो ऐसि पीतांबरि । जांहला अवतार मोरेश्वरी । उधरोनि नरनारी । चिदंबरीं मीनला जो ॥ ५ ॥ धन्य धन्य ते स्वानंदपुर । सोपानदेव आणी पीतांबर । जाहला उत्पन्न निर्धार । काय विस्तार वानु तो ॥ ६ ॥ कीर्तनघोष गीतापठण । भूतमात्रीं अन्नदान ।

ऐशा प्रकारें भक्त दोन । नादति जाण मोरेश्वरी ॥ ७ ॥ देव जियेने केला बराडि । शीउची त्या घुतसे लुगडि । बावजीबावाचि फार आवडि । केला गडि देव जेणें ॥ ८ ॥ कीर्तनरंगीं येकादशीस । प्रघट होति पंढरिनिवास । सद्गुरुनाथ श्रीसिध्येश । कीर्तनरस सेविति तो ॥ ९ ॥ तयाचे जवाळि मीं किंकर । पादरक्षा वागविणार । कथोचिष्ट ते अनुमात्र । श्रीगुरुयगेँ प्राप्त जाहले ॥११०॥ तेणें प्रसादें ज्ञानदिप्ति । उजळली हृदय काव्योक्ति । धन्य स्वामी सिध्यमूर्ति । सरवे ग्रंथीं केले पै ॥ ११ ॥ बावजीबावा सोपान अश । पीतांबर आख्यान द्वितीय सुरस । येक अध्याय हा विशेष । जाहला रस अद्भुत तो ॥ १२ ॥ श्रोतियाचि येथे राहिलि आशंका । तो हि विच्यार सावध ऐका । पीतांबर सांडुनि नग्न देखा । राहिला सखा फार दिन ॥ १३ ॥ ते कार्यकारण लिहिता । ग्रंथ नावरे सर्वथा । जिये वेळे पंढरिनाथा । दिगांबरता अवडलि ॥ १४ ॥ तये वेळीं पीतांबर । मारुतिपासि दिधले त्वरें । आपण उभा विटेवर । कटावरि कर ठेउनि ॥ १५ ॥ ते पीतवसन तो रामदास । पूजा करीत बहुत दिवस । मग तेणें धरीले जन्मास । स्वानदपुरास या अवतारें ॥ १६ ॥ स्वयें करूनि त्या उपदेश । मेळविले सस्वरूपास । याल्यागि श्रोति संशयास । करा नाश समूळ पै ॥ १७ ॥ युगायुगीं मी सद्गुरुसंगे । अवतारक्रिया विचरूं लागे । जा जा वेळे जे जे मागे । ते ते आगें पुर्वि लळा ॥ १८ ॥ सिद्धस्वामि दयासमुद्र । दाउनि तेणें निजात्मभद्र । राजारामी मुळिचे तंन । कथविति वग्रें कृपानिधि ॥ १९ ॥ मुक्ताबाईचा अवतार । मैनानामें जाहला थोर । तो कथा पुढे सिध्येश्वर । कृपासागर कथविति पै ॥ १२० ॥ श्रवण पठणें आत्माराम । नाशी सकळ त्रिविधश्राम । याल्यागि तेथें धरीजे प्रेम । उत्तमोत्तम चरित्र ते ॥ २१ ॥ भक्तमांजिरी-माळामय । श्रवणें चि पुरति मनोरथ । सोपान आणी पीतांबर कथे । जाहाला समाप्त अध्याय हा ॥ १२२ ॥

# अध्याय ६१

## —मुक्ताअवतार मैना—

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय आदि अव्यक्ता । परात्परा त्रिगुणरहिता । श्रीसद्गुरु सिद्धनाथा । सदा माथा तव पाईं ॥ १ ॥ जे जे याणि बोलूं जाता । त्याहुनि पर तूं स्वामि निश्चीत । वेद यानितां जाहाला अनंत । न लागे अंत कवणासी ॥ २ ॥ अनादी अव्यय विश्वंभरा । वादविसी चराचरा । तुमची लीळा जी दातारा । सिद्धेश्वरा न वर्णवे ॥ ३ ॥ सत्ता समर्थ विश्वा आंत । भरूनि राहिली वोतप्रुत । ते होय तरी च अवगत । वरदहस्त ठेविता शिरीं ॥ ४ ॥ पात्रापात्र नाहीं जेथें । दर्शनमात्रें स्वरूप प्राप्त । ऐसा स्वामि सद्गुरुनाथ । वदवि ग्रंथ भक्तमंजिरी ॥ ५ ॥ निवृत्तिज्ञानसोपानाचे । अवतार जाहाले पुन्हा साचे । कार्यकारण समूळ याचे । कथन नेमाचे करविलें पैं ॥ ६ ॥ आतां मुक्ताईचें चरित्र । वदविति माहाराज सिद्ध पवित्र । ते कथामृत सेविता श्रोते । आपतंत्र तुटे कैं ॥ ७ ॥ भक्तिज्ञानवैराग्य । प्राप्त होय श्रवण सौभाग्य । ब्रह्मरूप होईजे आंगें । तुटे संग द्वैताचा ॥ ८ ॥ श्रीमुक्ताई आदिशक्ति । समाधी घेतली झंग्यामारुति । जाउनि राहिली पर्वतीं । ग्राम निश्चिती भाशरीये ॥ ९ ॥ तेव्हां श्रीशंकर । करित आसतां योग प्रखर । तेथें पातला निर्धार । ऋषेश्वर श्रीनारद ॥ १० ॥ करोनीया गायन । त्यामाजी वर्णिले भगवतगुण । भागवत कथा संपूर्ण । सगुणनिर्गुणध्यान पैं ॥ ११ ॥ तेथें निवृत्तिज्ञानसोपान । कथिले मुक्ताई आख्यान । त्याचि ज्ञानभक्ति ऐकोन । डोलति जाण सदाशिव ॥ १२ ॥ मग ह्मणति नारदाप्रति । ती भेटेल केव्हां मूर्ती । तटस्त माजी नेत्रपाति । पाहावया सती मुक्ता ते ॥ १३ ॥ नारद येउनि पर्वतानिकट । स्तवन माडिलें असे चोखट । ह्मणे माते होई प्रगट । ब्रह्मनिष्ट आदिशक्ति ॥ १४ ॥ ऐकुनि नारदाचे वचन । मुक्ताई बोलति जाहाली

जाण । वदती स्वामी आगमन । ते कारण कोणते ॥ १५ ॥ जैसा मयुरावरि वोळला घन । किं निर्देवा प्राप्त धन । नातरि च्यातकालागुन। मिळाले जीवन तृपाकाळीं ॥ १६ ॥ ऐकुनि मुक्ताईचे वचन । प्रेमें गहिंवरे नारद पूर्ण । ह्मणे माते आजी तूं धन्य । तव ध्यान श्रीशंकरा ॥ १७ ॥ चाल आई आतां त्वरीत । जन्म घेउनी सुनिश्चीत । ताराया प्राणी समस्त । कृपावंते जगदंबे ॥ १८ ॥ येरू ह्मणे स्वामीराया । सर्व हृद्गत ठावे पाया । जेथें न्याहाळ तुह्मि सखया । तया ठाया येणें मज ॥ १९ ॥ नारद सांगती संकेत । अवतार घ्यावा त्वरीत । भेटावया वाट पाहात । उमाकांत अवळाही ॥ २० ॥ ऐसे सुचवीतां सर्वज्ञ । मुक्ता साधु माहामान्य । केले तयेनें अवतरणें । ते श्रवण करा तुह्मि ॥ २१ ॥ भारद्वाजगोत्राआंत । जनपंक्तीत माहाविख्यात । वंश तयानें सद्गुरूते । येक चित्तें समर्पिला ॥ २२ ॥ तयाचे पुत्रपौत्र । केवळ परमार्थाचे क्षेत्र । तया उदरीं सुपात्र । उत्तम कुमर जन्मला ॥२३॥ अंबाजीपंत येणें नावें । आंगीं तयाचे भक्तीभाव । तयाची सखी स्वानुभवें । वरी गौरव निजपतीसि ॥२४॥ ते पतिव्रता सखुबाई । केवळ सायोज्यता मुक्तिपाई । जन्मवीले पुत्रासी देहि । विनवोनि ठाईं स्वभ्रतारा ॥ २५ ॥ नंतर मुक्ता अवतार । जाहला असे साचार । मी नव्हे ह्मणोनि गोचर । मैना सुंदर नाम ठेविलें ॥ २६ ॥ नातरी ब्रह्म निर्गुण वन । तेथें सद्गुरु वसंत जाण । सहजी कोकिळा कुजति पूर्ण । सोहंस्फूर्ण मैना ते ॥२७॥ असो निर्विकल्पास्थिति । श्रोते चरित्रश्रवणार्थी । याळागीं आवरीलि मति । ऐका भक्ति हेचि आता ॥ २८ ॥ दिवसोदिवस वाढता । दुजा खेळ नसे सर्वथा । भजनरंगीं तत्वता । पंढरिनाथा आळविसे ॥२९॥ क्षण येक वैसे येकांतीं । कुंचो घेउनि मुखावरूनी । मनी आठवी भगन्मुर्ती । पूजा स्थिती ते सर्व ॥ ३० ॥ असो आतां इतर विच्यार । मैनाबाईसी पाहिला वर । साहावर्षे होता समग्र । लग्न साच्चार केले पै ॥ ३१ ॥ काश्यपगोत्रात ब्राह्मण । विद्याधनविनयसंपन्न । तयासी अर्पिले कन्यारत्न । मुहूर्त पाहून उत्तम तया ॥ ३२ ॥ विवाह संभ्रमें

जाहाला ॥ आदिण दिवशें ज्यामताला ॥ तो सोहळा वर्णितां भला । प्रसर ग्रंथाला होईल ॥ ३३ ॥ दाहा वर्षे भ्रतारसेवा । करूनि पुजीत आत्मदेवा । नंतर पुढें देहमावा । विसर्जी जीवा निजकांते ॥ ३४ ॥ पतीचा वियोग घडला । लोकीकी शोक बहु वाढला । त्यागू पाहाति प्राणाला ॥ बहु पेटला शोकासी ॥ ३५ ॥ तेव्हां सद्गुरु श्रीराम । जो का अखंड पूर्णकाम । मेरनि हाणे काय काम । ऐसीये परम शोकासि ॥३६॥ कृपेनें मनि कळवळला । तारकमंत्र उपदेशिला । तये काळीं स्वानुभवाला । मैनाईला काय उशीर ॥ ३७ ॥ आधीं च मुक्ताबाईचा अवतार । पश्चातापें तापले अंतर । श्रीगुरुकृपा तयावर । काय विच्यार मार्दणे तो ॥ ३८ ॥ अंतर्बाह्य स्वरूपस्थिति । उदय पावला ज्ञानगभस्ती । अज्ञानतम सरली राति । प्रज्वाळली ज्योती ते ॥ ३९ ॥ निर्विकल्पसमाधी । प्राप्त जाहाली तये संधी । प्रगटे कैंचा देहबुद्धी । आत्मसौख्यी परिपूर्ण ॥ ४० ॥ काष्ठवत जाहाले शरीर । बाविस दिवस चित्राकार । मग आणीले देहावर । श्रीगुरुवरें मैनाईसी ॥ ४१ ॥ परी ते मानस स्वानंदजळीं । होऊनि राहीले मासोळी । मूर्ती जवोनि ठेली बुबुळी । श्रीवनमाळी चराचर ॥ ४२ ॥ स्त्रीपुरुष विठ्ठलरुक्मिणी । हें चि दिसे जीयेचे नैनिं । दृश्यमात्र नये स्वप्नीं । चक्रपाणी सर्वा भूतीं ॥ ४३ ॥ नाहीं अनुमात्र रिते स्थान । पिंडब्रह्मांड सकळ चैतन्य । व्यतिरेक अन्वय जाणून । प्रासिले पूर्ण जडाजड ॥ ४४ ॥ असो ऐसी अनुभवस्थिती । मैनाबाईसी जाहली प्राप्ती । धन्य श्रीगुरुकृपामूर्ति । ज्ञानदीप्ती श्रीराम ॥ ४५ ॥ योगी रमती स्वरूपीं जया । म्हणुनी बोलीजे राम तया । नातरी निर्गुण निरामया । कैंची काया नामरूप ॥ ४६ ॥ परी ज्ञानविग्रह परमेश्वर । स्वभक्तालागीं धारे अवतार । सेर्वा ठाईचे निर्विकार । जळगार तयापरि ॥ ४७ ॥ आतां श्रीराम सद्गुरुनाथ । सांगतो आपुला संप्रदायपथ । ते ऐका सुनिश्चीत । नासी दुरीत क्षणार्धे ॥ ४८ ॥ आदिनारायणापासुन । पाराशर व्यास शुक आपण । योगींद्रामाजी निज पूर्ण । मुक्त सद्गु

ह्मणति ज्या ॥ ४९ ॥ तयापासुनी गौडपादाचार्य । जयासि ख्याति भुवनत्रय । तेथुनी पुढे शंकराचार्य । परम ध्याय जगद्गुरु ॥ ५० ॥ हस्तामळक सर्वोत्कर्ष । शंकरें उपदेशिला तो सत्शीष्य । जयाचा अद्भुतप्रकाश । ग्रंथ सरस हस्तामळक तो ॥ ५१ ॥ तयाचे तंत्रोटकाचार्ये । तयानें साधिले वार्तिककार्य । तेथुन प्राप्त ज्ञानसोय । नारायण आद्य आश्रमा ॥ ५२ ॥ पुढें चैतन्याश्रम । तेणें आनंदाचा हरिला श्रम । तयाचा शिष्य निष्काम । पूर्णब्रह्म श्रीराम पै ॥ ५३ ॥ अशी परंपरा सांगून । सद्गुरूनीं निववीले मन । तेणें होउनि उन्मन । मैना निमग्न जाहाली ते ॥५४॥ सर्वकाळ मुक्तस्थिती । कैचि तेथें दिवा राति । न लावी कदा नेत्रपाति । पाहे दीप्ति चहुभागीं ॥ ५५ ॥ खेचरी भूचरी चाचरी । पंचमुद्रा जीचे घरीं । होउनि राहिल्या कामारि । झाडिति द्वारीं आंगण पै ॥ ५६ ॥ अष्टांगयोग मूर्तिमंत । जियेजवळी असती राबत । पायधुळि माथा वंदीत । मोक्ष जेथें निज आर्ते ॥ ५७ ॥ ऐसी मैना मुक्ताबाई । अवतरलीसे क्षीति ठाई । जिचें ज्ञान गोरक्षसाई । वानिती नवाई स्वग्रंथें ॥ ५८ ॥ जया दर्शनार्थ अवतार । वाट पाहे तो शंकर । मग येउनि तयाचें पुर । वसविले साच्यार तयेनें ॥ ५९ ॥ श्रीसदाशिव जयपुरींत । भेटते जाहले आनंदभरीत । मैनाबाईसी झाळसाकात । आदर करित बहु तेव्हां ॥ ६० ॥ ह्मणति आता हें स्थळ सोडून । कोठें न जावे तुवा जाण । नित्य देउनि मज दर्शन । सुखसंपन्न करी जीवा ॥ ६१ ॥ आज्ञा वंदोनि शीरिं । राहिली जयपुरी माझारी । धन्य क्षेत्र ते जेजोरी । जडमुढा तारी मैना ते ॥ ६२ ॥ कोण्ही संसारिं गांजीले । त्रिविधतापें संतप्त जाहाले । तयासि कृपेनें निववि भले । मेळविले ब्रह्मपदा ॥६३॥ अतिथी आलीया द्वारीं । तो केवळ पाहे हरी । अन्नदानें नाना परि । तोषवी निर्धारीं परमप्रीति ॥ ६४ ॥ ऐशाप्रकारें जेजोरींत । मैनाबाई साधुसमर्थ । जाहली असे प्रख्यात । अवतार निश्चीत मुक्ताईचा ॥६५॥ जिचें जाहलिया दर्शन । तात्काळ होय समाधान । पापताप जाय

निघोन । पळे दैन्य उठाउठी ॥ ६६ ॥ ज्ञानेश्वरी आदि अध्यात्मग्रंथ । मैनाबाईसी त्या मुखोद्गत । संन्यासादि ऐकूं इच्छित । वदनें अर्थ जिचे पै ॥ ६७ ॥ महापंडीत आत्मविद । भेटिसी येती सदा प्रसिद्ध । बद्ध मुमुक्ष साधक सिद्ध । निवति शुद्ध आपणीं ज्या ॥ ६८ ॥ तव आपाढीयात्रा आली । मैना ती पंढरीसि चालिलि । तये वेळिचि लीळा भली । ऐका सकळीं श्रोतिं ते ॥ ६९ ॥ विणे टाळ पताका । मृदंग झल्लरि गर्जती देखा । शिष्यमंडळि अनेका । ज्ञाती प्रथका मिळाल्या त्या ॥ ७० ॥ करुणापर गाउनि अभंग । आळविती श्रीपांडुरग । मार्गीं चालतां गजर धींग । माजला रंग बहुत पै ॥ ७१ ॥ ठाईं ठाईं उभे राहावे । सगुणध्यान मनिं आठवावे । मग कैचा देहभाव । दिसे देव सर्वत्र ॥ ७२ ॥ प्रेमाश्रु नेत्रिं वाहति । धन्य ज्ञानवैराग्यभक्ति । मैनाईसी रूखमीणीपति । सावव करिति स्वमार्गे ॥ ७३ ॥ मग काहीं येक पंथ चालावा । पुन्हा व्यापि चैतन्यजीवा । मागुति आणुनि देह-भावा । चालवि वरथा पंथ हरी ॥ ७४ ॥ ऐशापरि क्रमोनि मार्ग । पंढरीसी आली ती निदेहभाग । मार्गे पुढें रमारंग । जिचे संगें क्रीड-तसे ॥ ७५ ॥ घेउनि पुंडलिकाचि भेटि । मैना राउळीं आली निकटीं । तव देखिला जगजेटी । समदृष्टी विटेवरी ॥ ७६ ॥ श्रीपाडु-रंगाचे भेटि होतां । चरणावरी मस्तक ठेवितां । वोढवोनि दोन्हि हाता । पोटसी भक्ता धरीतसे ॥ ७७ ॥ वरीचे वरी उचलोन । दीधले गाढ आलिंगन । कुरवाळित प्रीति करून । मनमोहन जानकिपति ॥ ७८ ॥ आनंदले रूखमीणीरमण । जेवि अधासि प्राप्त नैन । किं कृपणाचे सापडलें धन । परतले प्राण गतायुष्यी ॥ ७९ ॥ विठल स्फुंदस्फुंदों रडत । मैनाबाई नेत्र पुसीत । येरवरले देवभक्त । तो वृत्तांत कोण वर्णी ॥ ८० ॥ साकल्य जाहाले वर्तमाना । स्वमुखें पुसे पंढरीराणा । रूक्मादेवि आदि ललना । भेटति मैनास सान्या त्या ॥ ८१ ॥ भोज-नाचा आदर केला । देवें समाचार सर्व घेतला । ते सकळ वर्णावयाला । आनंद मनाला नावरे पै ॥ ८२ ॥ बहुत काळ वस्ति केली । मग

निरोप घ्यावया गेली । तेव्हां विठले आज्ञा केली । राहाविली मैनेसी ॥ ८३ तव इकडे श्रीशंकर । वाट पाहात अहोरात्र । लागले सदा मार्गी नेत्र । पंचवक्त्र उद्विग्न मनिं ॥ ८४ ॥ मग स्वर्गीं मल्लारि । जाते जाहाले पंढरपुरी । आलिंगोनि श्रीहारी । स्तविला कंसारी जगदात्मा ॥ ८५ ॥ विठो ह्मणे कैलासपति । सनाथ केले मजप्रति । आतां कीजे निरंतर वस्ती । जवळ निश्चितीं माझीये ॥ ८६ ॥ शिव ह्मणे माप देसी । तरी मी राहीन तुजपासी । देव वदे जे मानसीं । असेल इच्छेसी ते माग ॥ ८७ ॥ खंडोबा ह्मणे मुक्ताईस । राहाणें घडो जेजोरीस । तारील ते जडजीवास । माझीये क्षेत्रास शोभा पै ॥ ८८ ॥ विठल बोले काय मागीतले । माझे निजधन चि रथा हरिले । तरि मी आतां तुझी पाठले । सर्वकाळ न सोडी ॥ ८९ ॥ विठले शिव शीरीं वाहिला । तो अद्यापी तैसा चि राहिला । दुसरे रूप धरिता जाहला । जावया जेजोरिसि ॥ ९० ॥ भक्त जे जे अवतार धरीति । तयाचि जे विलासस्थीति । ते ते शोभे या भगवंति । रूक्मीणिपति श्रीविठ्ठला ॥ ९१ ॥ हरीहरा कैचा भेद । परी भक्तीचा हा जना बोध । धन्य धन्य ते संतवृंद । ज्याचा गोविंद सखा पै ॥ ९२ ॥ असो मुक्तामैना बरोबरी । घेउनि येता जेजोरी । विठल तेव्हां विनंती करी । मदनारीसि विनवोनि ॥ ९३ ॥ माझे मांदवळ राखावे । लेकुरासि साभाळावे । मानस हेचि पुरवावे । सदाशिवे मम जीवना ॥ ९४ ॥ निरोप घेवोनि तये वेळीं । वंदोनिया संतमंडळी । राहिले येवोनि स्वस्थळीं । आनंदमेळि देवभक्ता ॥ ९५ ॥ मग सर्वकाळ नवविधभजन । आराधीला जानकीजीवन । कीर्तनघोष पुराणश्रवण । गीतापठण निरंतर ॥ ९६ ॥ भूतमात्रि अन्न देउनि । मार्गासी लाविले बहुतप्राणी । प्रगटलि शक्ति मैनानाम्नि । आदिभवानि मुक्ता ते ॥ ९७ ॥ जिचे पाहतां सहजी पाय । कळिकाळासि सुटे भय । अज्ञानतम समूळ जाय । प्राप्त होये सायोज्यता ॥ ९८ ॥ ऐशा प्रकारें जेजोरीत । अवतरली मुक्ता जन तारित । मैनाबाई नाम शोभत । मीपण दवडीतता तत्काळीं

॥ ९९ ॥ स्वानंद हा चि तुरंग । तयावरि आत्मा म्हाळसारंग । द्वैत-खंडण कराया अभंग । धरी स्वर्मांगें खंडा पै ॥ १०० ॥ येकात्मतेचे आंगी वारे । घोळ वाजवी अनुहातगजरें । शुद्धसत्व गाळुनि बरे । गाठा त्वरें घातीला गळा ॥ १ ॥ वैराग्याचा शोभे पटा । भंडार लाविला निजललाटा । कोटंबा तो बोलीजे पोटा । रोटगा मोटा आत पै ॥२॥ त्यावरी भरीत उजळीलि दीवटी । आंतरबाह्य प्रभा मोठि । सद्गुरूकृपे सदा दृष्टी । तळी निकटी मरलीसे ॥ ३ ॥ द्वैताची करूनि वारी । मागीतसे सदा वारी । प्रसन्न जाहले देव मल्लारी । क्षेत्र जेजोरी धन्य ते ॥ ४ ॥ असो ऐसे उत्तमनगर । संतवृंदें वसति अपार । तये स्थळा नमस्कार । वैष्णववीर जेथें पै ॥ ५ ॥ मुक्ताबाईचा जो का अंश । साधु सर्वज्ञ मैना विशेष । म्हाळसाकांत केला यश । करोनि वास तये स्थानिं ॥ ६ ॥ निधनकाळिं जीये-साठी । सखेद जाले धूरजेठी । पंढरीनिवास आले भेटी । बोलति गोष्टी मैना ते ॥ ७ ॥ जवळ येउनि रूक्मीणीविलासी । ह्मणे कां बाई स्मरण करसी । येरू ह्मणे समाधीसी । कृपाराशि मेळविजे ॥८॥ मग तात्काळ पंढरीनाथें । प्राणज्योति घेतली मुखात । समाधी देउनि स्वहस्तें । केलें निवांत मैनेसी ॥ ९ ॥ जाहाला वाद्याचा येकचि गजर । अमर करिती जयजयकार । पूजेसी पातले शचीवर । चतुर्वक्त्र आदिकरूनि ॥ ११० ॥ नारदादि भागवत । मुक्तेसी त्या स्वपदीं स्थापित । जाहाली बद्धमुक्ता-तीत । नांदे सतत परब्रह्मीं ॥ ११ ॥ भक्तमंजरीमाळे सुमन । प्रेमरज्जूनें गुंफिले पूर्ण । धन्य धन्य ते सद्गुरुचरण । वदविति गुण संतलीला ॥ १२ ॥ सिद्धस्वामि कृपानिधी । राजारामी चेतवि बुधि । होउनि सहजीं प्रेमवृधी । काव्यसिधी परिपूर्ण ॥१३॥ पंढरीनिवास श्रीरघुवीर । कटावरी ठेऊ कर । तया कंठि शोभे हार । साधुवर तुळसी त्या ॥१४॥ ग्रंथरूपीणी हे माळा । अर्पण होतसे श्रीरामाळा । जो कां तोडी भव-भयाळा । देऊनि आपुला प्रेमा पै ॥ १५ ॥ याउपरी व्यासावतारकथा । वर्णीजेल त्या ज्योतिपंता । ते आख्यान श्रवण करितां । सकळ अर्था

पाविजे पै ॥ १६ ॥ भक्तमंजिरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । मुक्ता अवतार मैना संत । जाहाला समाप्त अध्याय हा ॥ ११७ ॥

---

## अध्याय ६२

### —ज्योतिपंत—

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्धनाथा । मायामळ त्रिगुणरहिता । अनादी सिद्ध आनंदभरिता । रुक्मीणिकांता तुज नमो ॥ १ ॥ स्फुरद्रूप जे स्फुरण । तयाचे साक्षी स्वामी आपण । जेवि प्रकाशविती कीर्णे । ऐक्यपणें रवबिंबी ॥ २ ॥ अज्ञान निरसावयासि । प्रयत्न नलगे ज्ञानासि । तिमिरा नाश करावयासि । आयुधे सर्वासी न लागती ॥ ३ ॥ तेवि सद्गुरुकृपा होता पाही । जडजीव होती विदेही । किटीसो भृंगी प्रगटता तेही । अनुभव घेई स्वात्मत्या ॥ ४ ॥ आत्मा पाहतां वृती विरे । वृतीसी वृतीत्व जेणे स्फुरे । सच्चिदानंदपद वावरे । जयाधारें अखंड ॥ ५ ॥ असो ऐसीया देवा समर्था । जानकी-वल्लभ आयोध्यानाथा । अनन्य चरणीं ठेविला माथा । वदवीं कथा भक्तचरित्रें ॥ ६ ॥ संतमंजिरीमाळिकेसी । ग्रहण कारितां तूं ऋषिकेशी । युगायुगीं जन्म धरीती । निजभक्तासी रक्षावया ॥ ७ ॥ तरी भक्तलीळे-प्रति । वदवा स्वामी सीतापति । व्यास अवतार जाहाला क्षिति । ते कथनोक्ति प्रिय तुम्हा ॥ ८ ॥ कारणकार्य आचरणेसी । बोलविता हृदयनिवासी । चेतविले बुद्धिसी । विनवणिसी परिसोनि ॥ ९ ॥ श्रवण करितां ते आख्यान । प्रगट होये निज आत्मज्ञान । इतर कामना सहजी पुर्ण । साधुस्तवन कार्यसीधि ॥ १० ॥ चिरंजीव असतां व्यासासि जन्म । घ्यावया कारण हे चि परम । गांजिली पृथ्वी थोर अधर्मे । लोपला धर्म सकळीक ॥ ११ ॥ ते कारण ऐकिजे आतां । कलि-यमाचा संवाद तत्वता । विस्तारेसी समूळकथा । जाहालें वृत्तांता सांगिजेल ॥१२॥ कृतत्रेतद्वापारामाझारी । शुचिसंत नरनारी । जाति वैकुंठा येकसरी ।

सदाचारी सकळिक ॥ १३ ॥ तेणें यमलोक पाळिला । नरकिये जन नाहींसा जाहाला । हे पाहुनि करतृत्व लीळा । बोलता जाहाला यमधर्म ॥ १४ ॥ तुमचे युग होतां प्राप्त । आमुचा लोक भरेल बहुत । प्राणि होतील अकर्मरत । असत्य योगेंकरूनि ॥ १५ ॥ यापरी दोघे अनुवादले । तो कलियुग सर्व चि निवाले । सूर्यतनयासी सुख वाटलें । परी वर्तले विपरीत पै ॥ १६ ॥ पातकाचा नाहीं लेश । जिकडे तिकडे नामघोष । पंढरीमाहात्म विशेष । सेविती रस भागवताचा ॥ १७ ॥ श्रीभागवत श्रवण करीत । अथवा विठ्ठलदर्शन घेत । तेणें जीवा मुक्ति प्राप्त । नाहीं दुरीत सर्वथा ॥ १८ ॥ तेव्हां संकेत गेला विघडोन । तेणें तळमळे यमाचें मन । ह्मणे केवळ आशा भंगली पूर्ण । काय ह्मणे करूं आतां ॥ १९ ॥ आशेची जाहाली निरास । अधिकार जाहला वोस । आतां कासया दंडपाश । वागउ करास वृथा मी ॥ २० ॥ कली ह्मणे कृतांतराया । खेद न करणें तुवा सखया । नास्तीक अपवादे जगा यया । दाउनिया भ्रष्ट करीतो ॥ २१ ॥ मग सज्ञानाचे मनाआंत । प्रवेशला कली निश्चीत । नास्तीक अपवाद स्थापीत । संतोषवित्त महिशारूढा ॥ २२ ॥ तेव्हां ह्मणती हे जैनकृति । भागवत श्रीविठ्ठलमूर्ति । ऐसे शिष्ट जगाप्रति । आपण बोधिती सर्वत्रा ॥ २३ ॥ तेणें बहुत खरवि जाहाले । तया संसर्गी बुडाले । यमाचे लोकासी आले । भरते दाटले भौमागी ॥ २४ ॥ अत्यंत पापसंचय जाहाला । सर्वत्र हाहाःकार उठिला । धर्मसेतूच मोडिला । बळावला मतवाद ॥ २५ ॥ तयेयोगे कलि मलीन होउन । करुणा भाकी दीनवदनें । ह्मणे केव्हढे दुराचरण । घडलें जाण मजलागीं ॥ २६ ॥ आतां करणें कैसी गति । शरण जावें कवणाप्रति । फवण दवडीउ अपकीर्ति । भ्रमली मति माझीये ॥ २७ ॥ ऐसा चिंतातुर बैसला । तो अकस्मात श्रीव्यास देखिला । जोडुनिया करकमळा । नमस्कारिला मनोभावें ॥ २८ ॥ ह्मणे स्वामी नारायणा । मज अंगीकारा वेगीं दीना । अभय देऊनिया जना । भागवतस्थापना करणें पै ॥ २९ ॥ आधींच निंद्य मी जगांत ।

कर्म आचरिलों परम अहीत । आतां उद्धरावा पतित । छपा निश्चीत करणें पै ॥ ३० ॥ तै व्यास बोलती कलीप्रती । अनुचित केलीरे दुर्वा वृति । निंदीले भागवत श्रीविठल मूर्ति । अपकीर्ति जाहाली ते ॥३१॥ तो इतिहास संपूर्ण । तुह्मी ऐका श्रोतेजन । कलीमळाते विध्वंसन । ज्ञानसंपन्न करीतसे ॥ ३२ ॥ पहा पां कोणे उपायें भूमीवरी । भागवत आलें जगदोद्धारीं । तयाची सांगतो परी । निजवैखरी यथोक्त ॥३३॥ सनकादीकीं विधीस । पुसीलें तत्वविच्यारास । या भवीं तरावयास । उपाय वीशेप कवण तो ॥ ३४ ॥ तयासी ब्रह्मदेव सांगत । मी पूर्वी तप तपलों बहुत । तै नारायण हंसरूपें बोधित । श्रीमागवतें मजलागीं ॥ ३५ ॥ ते भवगजविदारकेशरी । द्वैताची करी बोहरी । तो अनुभव सांगती श्रीहरी । निजवैखरी चतुःश्लोकें ॥ ३६ ॥ भीतीवांचून भगवंत-स्मरण । कदांपी न घडे कवणालागून । भीति तो द्वैती जाण । नेमीली पूर्ण असे पै ॥ ३७ ॥ विधी भवार्णवीं पाला । अहंभावें बुडों लागला । तेव्हां स्तुतीवाद गर्जीनला । श्रीहरीला आठवीतसे ॥ ३८ ॥ जय जय आदि अव्यया । परात्परा श्रीगुरूराया । नित्यनिर्गुण निरामया । दाखवीं पाया उवलाहीं ॥ ३९ ॥ करूणानिधी भक्तवत्सळा । निरसीं स्वामिया भयाला । नाहीं तरी वाया गेला । दास धाहावला मायाजीवनीं ॥ ४० ॥ ऐसा आक्रंदला विरंची जाण । गळीत जाहाला अभिमान । मग दिव्य रसायण । नारायणें भागवत दीधलें ॥ ४१ ॥ तेणें भवरोग गेला । विधी आरोग्यता पावला । तो मंत्र उपदेशीला । नारदाला ब्रह्मदेवें ॥ ४२ ॥ नारदापासीं भगवंत । राहीले तेव्हां आंतरगत । जगदोद्धार करणें हीत । राहीलें समस्त वाटलें ॥ ४३ ॥ श्रीहरीचें मनोगत । विश्व तरावें समस्त । तो पडला मध्येंच आवर्त । तेणें भागवत कोंडलें ॥ ४४ ॥ नारद कवणा न उपदेशी । अधिकारी च न दीसे तयाशीं । मग स्वयें नारायण जन्मासी । सत्यवतिकुशीं अवतरले ॥४५॥ अन्य पुराणें करून । परी न होये समाधान । तळमळ व्यासालागून । सुटली

जाण बहुत ॥ ४६ ॥ सरस्वतीतीरीं सखेद बैसले । ते नारदें व्यासा पाहीलें । तेव्हां बोलों आरंभिलें । अनुभव बोले निजरूपें ॥ ४७ ॥ जोवरी श्रीभागवतासी । वर्णीले नाहीं भक्तीरसासी । तव कदाकाळीं वृत्तीसी । समाधानासी न घडे पै ॥ ४८ ॥ तरी आतां भगवतगुण । भागवतासी प्राधान्य करून । गातां जाय सर्व क्षीण । प्रतिज्ञा जाण निश्चयें ॥ ४९ ॥ मग चतुःश्लोकी भागवत । श्रीनारद व्यासा उपदेशीत । तयांनीं अठरासहस्र लीलार्थ । पूर्णग्रंथ वाढविला ॥ ५० ॥ पाउनिया समाधान । वृत्तीसी स्थैर्य बाणलें पूर्ण । श्रीभागवत पाहून । जाहलें मन उन्मन पै ॥ ५१ ॥ तो रस वर्णावयासी । वाच्या बहुत शेषासी । परीं न वर्णवे तयासी । मानवासी मग काय ॥ ५२ ॥ असो ऐसीया सुखाप्रती । नारायण स्वयें अनुभविती । जगदोद्धारा शुकाप्रती । कृपायुक्ती कथीती पै ॥ ५३ ॥ पुत्र सगुण सज्ञान । महाज्ञ शुचि परीपूर्ण । हे जाणूनि श्रीव्यासभगवान । भागवत जाण सांगितलें ॥ ५४ ॥ शुकें पाहुनी ग्रंथासी । येकांतीं गेला मेरूशीखरासी । तेथें लाउनी समाधीसी । आत्मसुखासी रातले ॥ ५५ ॥ दृढसमाधी गुंतले । कारण जगाचें खोळंबले । भागवतार्थ देवें शापविले । विष्णुरात मले त्यालागी ॥ ५६ ॥ परीक्षीतीचा उधार । करूनि निमित्य हें चि थोर । प्राणी व्हावें भवपार । हा विच्यार सर्वेश्वरीं ॥ ५७ ॥ सौभद्रसुतासाठीं जाण । व्यानीं शुकाचें रिघोन । श्रीमत्तभागवतमहीमान । तारक पूर्ण पै जाहालें ॥ ५८ ॥ श्रीशुक परीक्षीतीसी । मुक्त करोनी साता दिवसीं । मेळविले सत्स्वरूपासी । आत्मस्थितीसी निजरूपें ॥ ५९ ॥ तो भागवत संप्रदाय चालिला । जगासी तारक सेतु जाहाला । तो कळीनें बळें चि भंगिला । अनर्थ जाहाला सर्वांची ॥ ६० ॥ तपा तापें कळी तापोन । आला श्रीव्यासासी शरण । तेव्हां स्वयें बादरायण पूर्ण । विच्यार पूर्ण करिती मानसीं ॥ ६१ ॥ जरी ग्यां व्यासरूपें करून । बोधावें या जगालागून । तरी लोभें व्याप्त सकळ जन ।

प्राशीलीं मनें पंचविशई ॥ ६२ ॥ ऐसें जाणुनी पाराशरसुतें। सत्यशीष्य जयमिनीसहीत। अवतार घेतला भूमंडळात। जग पुनीत करावया ॥ ६३ ॥ ते सविस्तर यथा निगुती। सित्व स्वामी वर्णविती। श्रवण करिता येकाग्रह्ची। तात्काळ मुक्ति घर रीघे ॥६४॥ बुधग्राम वदती जन। बुधासी जाहाले तेथेंचि जनन। फलटणदेश तो चि जाण। पवित्रस्थान धन्य तें ॥ ६५ ॥ गुरूभक्त पुण्यशीळ। देशलेखक तेथील। नाम जयाचें गोपाळ। वेद प्रांजळ अथर्वण तो ॥ ६६ ॥ तयाची भक्ति पाहून। अवतरले श्रीव्यास भगवान। ज्योतीनामाचें धारण करून। जन पावन करीती पै ॥ ६७ ॥ केवढी दया जीवावरी। मानवरूपालागीं धरी। आपुलें थोरपण दुरीं। केलें निरधारी नारायणें ॥ ६८ ॥ अंधारनिशी गडद काळोखें। तेणें न दीसे आत्मपंथ चोख। व्यासमूर्य प्रगटला देख। स्वरूप निकें ज्योत्स्नात्मकें ॥ ६९ ॥ बुधीप्रकाश दिवसोदिवस। तीव्रकीर्णप्रभाभासुरस। पावल्या वृत्ति विकास। ते तो विशेष अद्वयाब्जीनि ॥ ७० ॥ जाहले वय किशोर। विद्या आल्या समग्र। मतग्रंथादि समग्र। करी संस्कार पिता तो ॥ ७१ ॥ संसार कराश यथास्थित। जनकजननीचें मनोगत। यालागी आश्रम स्वीकारीत। ज्योतिपंत गृहस्थाचा ॥ ७२ ॥ रोजगारादि क्रमासी। निवविले करूनि सर्वासी। परी उदास मानसीं। आत्मरूपासी विनटावया ॥ ७३ ॥ अनुतापें तापलें मन। गेले काशीस निघून। भागीरथीचें करूनी स्नान। घातिलें आसन व्यासस्थळीं ॥ ७४ ॥ निश्चय जाणुनी अकस्मात। उतरले नारद गगनपथें। पुढें ठेउनी श्रीभागवत। जाहाले गुप्त तात्काळीं ॥ ७५ ॥ मग सखेद होउनी चित्तीं। ज्योतिनामे व्यासमूर्ति। अनन्यभावें वचनोक्ति। करूणा भाकीती प्रीतीनें ॥ ७६ ॥ जयजय स्वामि करुणालया। श्रीमहासुता सद्गुरुराया। मज अनाथा दाउनि पाया। निववीं काया व्यवळाही ॥ ७७ ॥ असतां आपण सर्वत्रगामी। विरह होतसे अंतरयामी। संतत जाहालों हृदयभूमीं। शांतवीं स्वामी दयाघना ॥ ७८ ॥ ऐसें वदतां चि ज्योति-

पंत । जो का अंश सत्यवतीसुत । नारदभगवान प्रगटले तेथें । दिधले भेटीते मागुती पुन्हा ॥ ७९ ॥ देहचतुष्टय निरसीतां जाण । येकात्मता बाणली खुण । अंतरबाह्य सोहंस्फूर्ण । ब्रह्म परिपूर्ण चिद्घन तें ॥ ८० ॥ चराचर जाहाले पंढरपुर । आत्मा तो चि रुक्मीणीवर । अनुहातध्वनि सदा गजर । घोष सुंदर नामाचा ॥ ८१ ॥ सत्रावी ते चंद्रभागा । ज्ञानतुर्या वाहे गंगा । देव आणीला कीर्तनरंगा । घाळिती पिंगा वैष्णव ते ॥ ८२ ॥ पुंडरीक भाव खरा । अटला जेथें दृश्य पसारा । जेथें तेथें विठल खरा । तिष्टे द्वारा इंद्रीयांचे ॥ ८३ ॥ उदया पावली चिन्मय ज्योति । नुरे चि तेथें दिवा राती । असो नारदस्वामींनी यथारीती । दाविली स्थीती ज्योतिपंता ॥ ८४ ॥ मग सप्रेमें हृदयगाभारा । बैसउनी श्रीगुरुवरा । अर्चन केलें निरधारा । षोडशोपच्यारा विधीयुक्त ॥ ८५ ॥ वारंवार नमन करितां । अभयकरू ठेविला माथां । देउनी मूळ भावगता । ज्योतिपंता कुरवाळीले ॥ ८६ ॥ स्मरसी तै होईन प्रगट । ऐसी वदोनी गुह्य गोष्ट । आपण निघोनि नारदें स्पष्ट । सेवीले वैकुंठ ऊर्ध्वगती ॥ ८७ ॥ मग सरूपानुभवी योगीराज । ज्योतिपंत श्रीमहाराज । कराथया जगाचें काज । काशीराज सोडीला ॥ ८८ ॥ नाना देश नानास्थानें । फिरती जीव कराया पावन । जेथें तेथें उत्छाहा पूर्ण । श्रीविठल स्थापन केले पै ॥ ८९ ॥ संगें पुस्तक महाभागवत । दिधले जे कां ब्रह्मसुतें । पठण करोनी तो चि ग्रंथ । करीती ग्रंथरूप जीवा ॥ ९० ॥ माजविला कीर्तनरंग । शिष्य बहुत ज्याच्यासंगे । करुणापर स्वयें अभंग । करुनी श्रीरंग आळविती पै ॥ ९१ ॥ ध्वजपताका धावें अनेक । मार्गीं चालता वाजती देख । गजरभरीत सानंदसुखें । पंथ अनेक विचरती पै ॥ ९२ ॥ ठाईं ठाईं महाभागवत । वाचिती स्वयें सागुनी अर्थ । धन्य म्हणती ज्योतिपंत । आनंद अद्भुत सकळ जीवा ॥ ९३ ॥ असंख्यप्राणी सहस्त्रावधी । सया सहजीं श्रवणसमाधीं । उघडली खाणी अनुभवनिधी । ज्ञानउदधि उचंबळला ॥ ९४ ॥ सप्ताहा करुनी असंख्यमही ।

भागवतपंथा लाविले देहीं । दाखविली जेणें सोई । नेणवे आहीं प्रताप ज्याचा ॥ ९५ ॥ जयमिनी शिष्य व्यासाचा । अवतार घेतला तेणें साचा । व्यासरूपें ज्योतिपंताचा । अनुग्रह नेमाचा होईल तयासी ॥ ९६ ॥ ती कथा परम पावन । पुढें वर्णोंटी असें जाण । श्रवण करितां कामना पूर्ण । भवभंजन करीतसे ॥ ९७ ॥ सिद्धकृपा राजारामीं । दास तयाचा जन्मोजन्मीं । जेणें प्रसादें हृदयभूमी । उगवली प्रेमीं तुळसी ते ॥ ९८ ॥ तयेची मंजिरी हे कोमळ । वाणीकरें गुंफीतो माळ । ग्रहण करीता श्रीगोपाळ । भक्तवत्सळ जगद्गुरु ॥ ९९ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । ज्योतिपंतसाधुचरित्राते । अध्याय होत प्रथम हा ॥ १०० ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय ६२

### — ज्योतिपंत —

[ पुढें चालू ]

॥ श्रीगणेशायनम ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिद्धराया । अखंड नमीजे तव पाया । दर्शनमात्रें निवाली काया । पावलो ठाया निजात्मपदीं ॥ १ ॥ तेथें काय स्तुतीस्तवन । परेसी मुरडले जेथें मन । जाणीव गेली हारपोन । समूळ गिळोन नेणेवेसी ॥ २ ॥ अवघा चि कोंदला श्रीराम । जेथें सरलां मायाभ्रम । येकात्मता वाणली खुण । पादपद्म धन्य तें ॥ ३ ॥ जेणें कृपें रजिवडे । त्रैलोक्य भरलें रूपडें । जेथें तेथें सन्मुख पुढें । तुटले निरडें द्वैताचें ॥ ४ ॥ सिद्धदयेची हे शिराणी । काय बोलीजे जड वाणी । विभक्तता दवडुनी । भक्तसुमनीं वदविती ते ॥ ५ ॥ श्रवण करीतां तये कथे । प्रत्यक्ष भेटे सीताकांत संतलीला जे जे गात । तया अनंत न विसवे ॥ ६ ॥ याकारणें सकळ श्रोतीं । अवधान द्यावें परमप्रीती । पूर्वाध्यायीं व्यासमूर्ती । प्रकटली

ज्योती ज्योतीरूपें ॥ ७ ॥ नारदें तया प्रत्यक्षता । दिधलें मूळ श्री-भागवता । अवलोकितां तया ग्रंथा । पंचम अवस्था वरिले तिनें ॥८॥ होउनी पूर्ण दिव्यज्ञान । जगदोद्धार करिती जाण । स्थळोस्थळीं उछाह मांडून । भागवत पठण सर्वदा ॥ ९ ॥ श्रीविठ्ठलरुक्मिणीच्या मूर्ती । गांवोगांवीं स्थापन करितां । जे जे प्राणी दृष्टीसी पडती । उपदेशीती तयासी ॥ १० ॥ श्रीभागवतसांप्रदाय । वाढविला बहुत पाहे । जगा दावीत अनुभवसोय । फिरतां ठाय असंख्य पै ॥ ११ ॥ वाईक्षेत्रासी येतां जाण । ज्योतिपंत श्रीभक्त पूर्ण । वर्तलें तें विचित्र महीमान । ऐकीजे सर्वज्ञ श्रोतीं तें ॥१२॥ जैयमिनी शिष्य व्यासाचा । अवतरला तो ब्रह्मनिष्ट साचा । श्रीगुरूसेवे छंद ज्याचा । सांगेन वाच्या ते कांहीं ॥१३॥ जया आवडी गुरुभक्तीची । अगाध प्रौढी तये कथेची । कृष्णातीरीं तनु नेमाची । धरली साचि तयें पुरूषें ॥ १४ ॥ वेदाध्यायी अति पवित्र । ब्राह्मण पाहुनी सत्पात्र । जयमिनी होउनी तयाचे पुत्र । केलें तंत्र परिसा तें ॥ १५ ॥ जन्मकाळीं जडवृत्ती । न पाहे न रडे निश्चितीं । जाड्यता धरुनी पडे क्षीती । नाम ठेविलें तें चि पै ॥ १६ ॥ धोंडा ह्मणुनी सकळजन । पाच्यारीती तयासी जाण । नसें चि कांहीं देहभान । अनुसंधान ज्या स्वरूपीं ॥ १७ ॥ हें पाहुनी तयाचा पिता । उपाय जाहाला बहुत करितां । परी नये चि आरोग्यता । फार ताता खेद मनीं ॥ १८ ॥ तव सिध्द पर्थे अकस्मात । पातला तेथें अवधूत । बाळालागीं प्रबोधीत । संकेतवचनेंकरूनी ॥ १९ ॥ तेणें येउनी देहावरी । स्तनपानादी रूदन करी । आनंद होउनी सर्वांतरीं । गुढ्या द्वारीं उभविल्या ॥ २० ॥ पुत्रोत्साह बहुत केला । दिवसोंदिवस वाढींनला । पुढें सहजीं व्रतबंध जाहला । विद्या झाल्या सकळही ॥ २१ ॥ असो ऐसा जैमीनी अंश । धोंडभटजी वाईंत विलसे । तेथें पातले श्रीव्यास । ज्योतिपंत व्यास वदती जन ॥ २२ ॥ नित्यनेमें कीर्तन करितां । भक्तवृंदें बहुत मिळती । तव तेथें ऐकुनी कीर्ति । धोंडभटमूर्ति ते दि आली ॥ २३ ॥ परस्परें होतां

भेटी । मग ते वर्णिजे काय गोष्टी । श्रीगुरुनी धरितां पोटीं । प्रेमवृष्टी होतसे पै ॥ २४ ॥ अष्टौभाव येउनी अंगीं । घरासी घेउनी गेले वेगीं । प्रार्थना करिती मुळींचे सङगीं । निजात्मरंगीं विचरावया ॥ २५ ॥ धोंडभटजि अनन्युति । ह्मणे स्वामिया स्वयंज्योती । निरसी माझी अज्ञानराती । कृपादीप्ती महाराजा ॥ २६ ॥ मग तात्काळीं ज्योतिपंतें । सांप्रदायक्रमें निरुतें । उपदेशिले धोंडभटजीतें । वरदहस्त ठेउनी शीरीं ॥ २७ ॥ मंत्र पडतां चि निजकर्णीं । उगवला तेथें ज्ञानतरणी । दृश्य चांदणे हरपोनी । निस्तेजपणीं मनचंद्रमा ॥ २८ ॥ अद्वयकमळे विकासलीं । निज्यात्मप्रभा पुंज्याळली । बोधबुद्धी होती विघडली । तिर्ये मीनली चक्रवाक्यें ॥ २९ ॥ इंद्रियेपांयरत स्वानंद-सुखें । स्वानंदस्वरूपस्थाना पावलीं देख । द्वैताद्वैत सरली अटक । गेलें काळोखें अज्ञान पै ॥ ३० ॥ शुध्यभूमी उत्तमकण । परस्परें मिळतां जाण । पिकासी तेथें काय उणे । कृपाजीवनवृष्टी होतां ॥३१॥ तेवि जैमीनी अंश धोंडभटशिष्य । ज्योतिपंत अवतार सद्गुरुव्यास । मग तयाच्या अनुभवास । सहस्रमुखास वर्णवेना ॥ ३२ ॥ जेथें शब्द चि हारपला । निःशब्द होउनी ठेला । अंतरबाह्य भरुनी उरला । आत्मा उदेला परीपूर्ण ॥ ३३ ॥ असो ऐशापरी धोंडभट । उपदेशिला ज्योतीनें स्पष्ट । महाभागवत दाउनि वाट । ब्रह्मनिष्ट पै केलें ॥ ३४ ॥ श्रीगुरुचे पदकमळीं । वृत्ति जयाची भ्रमरी जाहाली । आत्मस्थिति बाणुनी गेली । बोहरी केली विषयाची ॥ ३५ ॥ अंगीं भरूनी वैराग्य । प्रपंच्याचा केला त्याग । रात्रंदिवस सदा संग । न साह्य वियोग सद्गुरूचा ॥ ३६ ॥ मायबाप बहुतांपरी । वर्जितां नायके आत्मविच्यारी । अखंड हिंडे बरोबरी । वदे वैखरी गुरुनामें ॥ ३७ ॥ पाळखींत बैसतीं ज्योतीपंत । संगे धोंडभट तो धांवत । सदा सन्निध जोडुनी हात । देणें पदार्थ मागती त्या ॥ ३८ ॥ ध्वजपताका मिरवती । मार्गीं चाळतां भजन करिती । दुमदुमीली तेणें जगती । धन्य म्हणती ज्योतीपंत ॥ ३९ ॥ मार्गे पुढें शिष्यमेळा । मृदंग विणे वाजती

टाळा । आंगीं भरूनी प्रेमकळा । श्रीगोपाळा आठविती पै ॥ ४० ॥ ऐशाप्रकारें देशोदेश । ज्योतीरूप श्रीअवतार व्यास । भ्रमण करीती स्थापावयास । रुक्मीणीविलास भक्तवत्सला ॥ ४१ ॥ महाभागवत कीर्तन । जेथें तेथें घोष सघन । पाळागीं तें चि नामाभिधान । वदती जन सकळिक त्या ॥ ४२ ॥ ज्योतीपंत महाभागवत । नरनारी म्हणती समस्त । वंशपरंपरा विख्यात । किताव सत्य जाहाला पै ॥ ४३ ॥ असो घोंडभट सेवेठाई । निमग्न असती श्रीगुरूपाई । आज्ञापिती तया पाही । फिरावया मही ज्योतिरूपा ॥ ४४ ॥ म्हणती आत्मा जेजें करणें । तें तें तुवा आंगिकारणें । उपच्यार घडले सर्व येणें । गुरूदक्षणे दिधले तुवां ॥ ४५ ॥ ऐसें वदता घोंडभट । जैमिनीअवतार जो कां स्पष्ट । जोडुनिया करसंपुट । जाहाला निष्ट आज्ञोक्ती ॥ ४६ ॥ तात्काळीक करून नमन । श्रीगुरूव्रत केलें धारण । गांवोगावीं करीती स्थापन । रुक्मीणीरमण परमात्मा ॥ ४७ ॥ आणी श्रीमहाभागवत । ठाईं ठाईं सप्ताह करीत । ऐशापरी देश समस्त । फिरती समर्थ घोंडभटजी ॥ ४८ ॥ जेथें तेथें कीर्तनगजर । उपदेशीले नारीनर । मेळउनी द्रव्य अपार । श्रीगुरूवर आर्चियेला ॥ ४९ ॥ नाहीं देह्याची श्लाघ्यता । आंगीं जयाचे निस्पृहता । विद्वानापी कर्पती या अर्था । अनुभव चित्ता आणिला पै ॥ ५० ॥ स्थळोस्थळीं उत्छाहासी । लोक लाविले गुरूभक्तीसी । धन्य अवतार या भूमीसी । जैमीनीऋषी घोंडभट ॥ ५१ ॥ पंढरीचा बहुत प्रेमा । ऋणी केले सर्वोत्तमा । मागें पुढें देवी रुक्मा । सहीतरामा हिंडे हरी ॥ ५२ ॥ ऐसे शिष्य अपार । ज्योतिस्वरूपें बोधिले फार । सांत सत्‌शिष्य धुरंधर । फटके थोर घोंडभट हे ॥ ५३ ॥ कोणीं येके दिनीं ज्योतिपंत । व्यास अवतार महाभागवत । पंढरीसी निघाले यात्रेंत । भजन करीत अतिहर्षे ॥ ५४ ॥ नृत्य करीता सहितमंडळी । कोंदुनी गेलें नभ मंडळी । प्रघटले तेथें वनमाळी । प्रभा फांकली सर्वत्र ॥ ५५ ॥ येकसरा दाटले अष्टभाव । प्रत्यक्ष पाहीला सकळी देव । मग तें सुख अभिनव । काय वर्णवे जडवाचे ॥ ५६ ॥

प्रेमभरें आनंदेंमी । पातले ज्योती पंढरीसी । चोज करी ऋषिकेशी । रुक्मीणीसी सांगत ॥ ५७ ॥ मग शिष्यवृंदें सकळीक । ऐकवा ह्मणती भागवत निके । श्रीनारदें दिल्हे पुस्तक । ज्योत्यात्मक त्या पठण करीति ॥ ५८ ॥ तें वगत्रत्व ऐकता कानीं । सुखावले चक्रपाणी । नासिकाग्रीं दृष्टी ठेउनीं । करीती मनीं मनन तें ॥ ५९ ॥ सनकादिका संतवृंदीं । लागली सहजीं श्रवणसमाधी । पुष्पवृष्टी तये संधी । केली त्रिशुधी सुरवरानी ॥ ६० ॥ धन्य अवतार ज्योतीपंत । व्यास प्रत्यक्ष मूर्तिमंत । ऐसे वदती जन समस्त । शुकदत्तकपिलादि ॥६१॥ तृतीयप्रहरीं कीर्तनामी । उभे राहती ज्ञानराशी । तये वेळीं वैकुंठविलासी । परिवारासी सांगती पै ॥ ६२ ॥ नऊ लक्ष त्या गोपाळा । रुक्मीणीसी घातिला डोळा । ह्मणती संगे घेउनी अवळा । सहस्र सोळा यावे तुवा ॥ ६३ ॥ आजि श्रवणेंद्रियासी पारणें । सुचविलां ऐसें नारायणें । आले सकळ धाऊन । समाधी टाकून निरगुण पै ॥ ६४ ॥ मग ते कथेचा अद्भुतरंग । कीर्तनीं प्रत्यक्ष रमारंग । श्रोते वक्ते धन्य जग । गजर धींग होतसे पै ॥ ६५ ॥ ऐस्यापरी च्यातुरमास्य । श्रीपंढरींत केला वास । ज्योतीरूप अवतार व्यास । कीर्तनरस ज्याचा बहु ॥ ६६ ॥ घेउनी निरोप श्रीचा नंतर । आले ग्राम ज्या ह्मणती चिंचणेरे । धन्य स्थळ तें कृष्णातीर । निरगुणपुर सन्निध ज्या ॥ ६७ ॥ गृहस्थाश्रमें वर्ततां । पुत्र जाहाले उभयतां । रामलक्षुमण तत्वता । नामें सर्वथा ठेविलीं त्या ॥ ६८ ॥ ज्येष्टकुमर तो शुकापरी । ज्ञानसंपन्न वैराग्य भारी । अन्यभाषण न शिवे वैखरी । भागवतविच्यारी रसना वदे ॥६९॥ किंवा श्रीतुकयाचा अभंग । हे चि ज्याचे शद्ब सौभाग्य । प्रेमभरींत होउनी अंग । निःसंग होये कीर्तनीं तो ॥ ७० ॥ आनंदाचा येता हेलावा । हस्तावरी हस्त जेणें द्यावा । आठवितां वासुदेवा । देहभावा पडे विसरू ॥ ७१ ॥ ऐशापरी ब्रह्मनिष्ट । रामचंद्रनामें पुत्र ज्येष्ट । भाषा भागवत वदती स्पष्ट । ज्याचें मिष्ट भाषण पै ॥ ७२ ॥ तैसा चि दुसरा लक्ष्मणदाजी । देव जयानें केला

राजी । कीर्तन करितां आवड ताजी । भूमंडळा जो फिरणे त्या ॥ ७३ ॥ असो ऐसे दोन पुत्र । ज्योतिपंतासी जाहले पवित्र । ज्याचा सखा पद्मनेत्र । कीर्ती वगनुत्र वर्णू तया ॥ ७४ ॥ श्रीविष्णुमूर्ति कृष्णातीरीं । स्थापन करुनी चिंचणेरीं । वाचिती सदा निजवैखरी । भागवत श्रीहरीपुढें त्या ॥ ७५ ॥ अहोरात्र कीर्तनगजर । तोषविला लक्ष्मीवर । काव्यरचना मनोहर । भागवतविच्यार वर्णियेला ॥ ७६ ॥ गाता मुखींचे ज्या अभंग । प्रत्यक्ष भेटे श्रीपांडुरंग । पुनीत होये सकळजग । भवभंग सहजी तो ॥ ७७ ॥ लोकोद्धारा अनेक ग्रंथ । केले असती ज्योतीपंतें । व्यास अवतार महासमर्थ । जाहाला निश्चीत कलीमाजी ॥ ७८ ॥ जगदोद्धार करून । सेविते जाहले निर्गुणसदन । तये काळीं जगजीवन । सखेद पूर्ण जाहाले पै ॥ ७९ ॥ तेव्हां सनकादिक प्रार्थना करीत । किमर्थ स्वामी खेदभूत । देव म्हणे ज्योतीची निज ज्योत । आजि गुप्त पै जाहली ॥ ८० ॥ कैसा समारंभ केला । विठ्ठल घोष वाढविला । स्थानोस्थानीं उत्छाहाला । योजिले जगाला जेणें पै ॥ ८१ ॥ तयाचा खेद वाटे बहुत । पुन्हां ऐसी न भेटे मूर्त । वारंवार पंढरीनाथ । स्फुंदस्फुंदत बोलतसे ॥ ८२ ॥ माझ्या जीवींचा विसावा । जीव चि गेला शिवाचे गांवा । आतां मी न्याहाळीन केव्हां । व्याहसाधवा आपुल्या वत्सा ॥ ८३ ॥ देव ह्मणती मी दैवहीन । काय सांगू तुह्मालागून । कैसीं कैसी गुणनिधान । गेली सोडून मजलागी ॥ ८४ ॥ कृतायुगीं प्रल्हादासाठीं । निघालों मी कोरडेकाष्ठीं । हिरण्यकश्यपाचे पोटीं । फोडिला निकटी नखें घालुनी ॥ ८५ ॥ धृवाची भक्ति पाहून । अढळपदीं स्थापिला जाण । तया उपमन्यालागून । पयोदधी पूर्ण दिधला पै ॥ ८६ ॥ बळीनें देह चि अर्पिलें । रुक्मांगदें शरीर कांपविलें । वाळी सुग्रीवादि पडले । बहुत केलें कार्य माझें ॥ ८७ ॥ गुल्हकरावरी प्रिय मजसी । हात पसरी उचिष्टफळासी । ते हि गेली निजधामासी । काय तुह्मासी सांगू पै ॥ ८८ ॥ वानरवीर असंख्यात । नळनीळ-

लक्ष्मणभरत । ऋषिमंडळीं विख्यात । गेले महंत तपोनिधी ॥ ८९ ॥ अष्टनायका सोळासहस्र । सोडुनी गेल्या गौळणी पवित्र । गोपगाई पहातां विचित्र । गेले सर्वत्र मज टाकुनी ॥ ९० ॥ तयासाठीं मी नारायण । प्राणप्राणादी राहिलों नटोन । येक संवत्सर परीपूर्ण । धरीले जाण सकळ येश ॥ ९१ ॥ ते हि सर्व भक्त गेले । पांडवासी सख्य केलें । अर्जुनाचे घोडे धुतले । समरीं रक्षिले परोपरीं ॥ ९२ ॥ द्रौपदी-साठीं घांव घाली । दिवसरात्र नाहीं म्हणीतली । ऋषिमंडळी जेवविली । तृप्त केली अघमर्षणीं ॥ ९३ ॥ भीष्मद्रोणादि विदुर । सखे गेले थोर थोर । उधव आणि मज अक्रूर । निरंतर आठवितों ते ॥ ९४ ॥ आतां कोण कोण स्मरूं मनीं । फळी माझी गेली तान्हीं । आश्चर्य आणी मुकुंदमुनि । गेली सोडुनी मज वृथा ॥ ९५ ॥ पाहा पाहा निवृत्यादि वडीलवाळे । नामा माझे अतिस्नेहाळ । तयाच्या संगतीची बाळें । गुणवेल्हाळें गेली ती ॥ ९६ ॥ तुकया ते हि नाहीं घांवले । रामदासें वैराग्य वाढविलें । तया संगतीचे भले भले । बहुत गेले वैष्णव वीर ॥ ९७ ॥ आतां ही तरी याचायी । परी सोडुनी चालली अघवी । मज वियोगाची दुर्धर पदवी । शोभविली दैवीं काय करूं ॥ ९८ ॥ माझें मरण कोठें गेलें । मज वियोगें या नाडीलें । ऐसीया हंबरडोनी बोलें । श्रीविठ्ठल तेव्हां पै ॥ ९९ ॥ तयासी कपिलादि सिद्ध बुजा-विती । नारद बोधविती बहुतायुक्ती । परी साधुवियोगें कमळापति । आपुले चित्तीं सखेद ॥ १०० ॥ ऐसी गति जाहाली देवासी । मग कोण पुसे तेथें जगासी । मिळाली ज्योत ज्योतींसी । ज्ञान ज्ञेयासी जया-परी ॥ १०१ ॥ शके सत्राशे संवत्सर ।

मार्गशीर्ष वद्य त्रयोदशी जाण । सेविले निर्गुण ज्योतिपंतें ॥ २ ॥ पंढ-रीसी तये काळीं । देवद्वारें कपाटें लागलीं । येकप्रहरानतर उघडलीं । प्रसिद्ध पाहिलीं सर्वांनीं ॥ ३ ॥ पुढें सवें चि कांहीं दिवसें । जैमिनी अंश जो सत्तशीर्षे । धोंडभट कटके तेणे मुमुर्ईस । ठेविले देहास विरह करूनि ॥ ४ ॥ असो जोतिपंताचे पुत्र बाबा । भक्ति तयाची पहाता

अचंबा । संवस्थानाशी आणीली शोभा । प्रीती सांमा तया भजती ॥ ५ ॥ कीर्तनभजन अन्नदान । समाधींचे त्रिकाळपूजन । निरंतर जयाचें भागवत पठण । उत्साहा करणें प्रतिवर्षीं ॥ ६ ॥ पित्यासमान आचरण ज्याचें । वैराग्यनिष्ठा ज्ञान साचें । अर्थीं उन्मन केले मनाचें । सदा वाचे भागवत ॥ ७ ॥ गुरुभक्ति अचरोन । वैकुंठीं केलें प्रयाण । तये काळीं अद्भुत जाण । वर्तलें पूर्ण तें ऐका ॥ ८ ॥ समाधींचें करुनी अर्चन । घातिलें जेणें निर्वाण आसन । भागवत पुढें घेऊन । करीती मनन निज अर्थाचें ॥ ९ ॥ तव अकस्मात माहुलीहून । पातला तेणें येक ब्राह्मण । प्रश्न केला सांगा ह्मणे । मुख्य पूर्ण अर्थ तो ॥११०॥ रामचंद्रबावा ह्मणती आतां । अर्थ करीतो पाहा तत्वता । ऐसे सांगुनी अपूर्वता । केलें सर्वथा विचित्र पै ॥ ११ ॥ अटाहास्ये दीर्घस्वरे । नारायण श्रीगुरू करुनी उच्चार । नारायणरूप जाहाले त्वरें । सेविलें मंदिर निजवैकुंठ ॥ १२ ॥ ऐशा प्रकारें करुनी अर्थ । होउनी ठेले स्वरुपीं संत । रामचंद्रबावा धन्य संत । महाभागवत म्हणती ज्या ॥१३॥ ज्याचे चितेसी श्रीकृष्णेनें । प्रदक्षणा घातली जाण । च्यारीप्रहर जाहलें भजन । चितास्थान धन्य तें ॥१४॥ व्यास अवतार ज्योतिपंत । जाहाला प्रसिद्ध कलीयुगांत । थोर प्रसादिक जयाचे सुत । अवतार सत्य सुताचा ॥ १५ ॥ व्यासचरणीं प्रेमा भला । ह्मणुनी तेथें जन्म जाहाला । भागवतलीळा वर्णावयाला । हेतु जाहाला सहजी तो ॥ १६ ॥ असो सुताचा अंश तो रामचंद्रबावा । भक्तिसुखाचा केवळ गाभा । मिळुनी गेला चिदात्मनभा । भागवतगर्भा वर्णुनीं ॥ १७ ॥ ज्योतिपंत तो बादरायण । जैमिनीशिष्य धोंडभट पूर्ण । उभयऐक्य गुंफीलें सुमन ॥ उत्तमसुमन भक्तमंजीरी ॥ १८ ॥ रामदास अवतार स्वामी सिध्द । भुवनत्रई ज्याचें नाम प्रसिध्द । राजारामी तेणें-प्रसादें । ग्रंथ विपद होतसे पै ॥ १९ ॥ जानकीजीवनें राजणारी । पंढरीसी तो विटेवरी । घ्यावया माळिका हेंचि वरी । कर कटावरी तिष्ठतसे ॥ १२० ॥ शुक अवतार मुक्तनाथ । ती च कथा पुढें अद्भुत । राजारामी पदार्थी अनंत । ऐका श्रोते सकळही ॥ १२१ ॥ भक्त-

मंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । ज्योतिरूपसाधु आख्यानातें । अध्याय समाप्त दुसरा हा ॥ १२२ ॥ अध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ६३ ॥ एकून ओव्या ॥ २२२ ॥



## अध्याय ६४

### — श्रीशुकअवतार मुक्तनाथ चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ श्रीगणेशा ॥ ॐ नमो श्रीआदिमूर्ति । गुणतीता परज्योति । सहजस्वभाव ते प्रकृति । अभेद-युक्ति निजमाया ॥ १ ॥ सविता अगीं जैसी फीर्णें । कीर्णप्रभावें मृगजळ पाहणें । तेवि प्रकृति संभवणें । जाणती खूण योगी ते ॥ २ ॥ प्रकृतिपुरुष येणे नावें । गणेशसरस्वति नमन भावें । सद्गुरूरूपें ऐक्य व्हावें । अखंड रमावें श्रीरामपदीं ॥ ३ ॥ रमविता ह्मणुनी आत्माराम । हे चि उपासना आमुचा नेम । भक्तांकित पुरुषोत्तम । लीळा अगम्य जयाची ॥ ४ ॥ युगायुगीं जन्म घेणें । जगदोद्धार कराया जाण । संतरूपें नारायण । धर्मस्थापन करीतसे ॥ ५ ॥ सकळ मुक्तांमाजी मुगूटमणी । शुकयोगेंद्र जो का मुनि । प्रघट जाहाला इहीमेदिनी । ऐका करणी कथन ते ॥ ६ ॥ कळीमार्जी आत्मसाधन । समग्र लोपलें पै जाण । शब्दीकविच्यार जाहाला पूर्ण । वाच्याळ ज्ञान घरोघरीं ॥७॥ याळागी श्रीसाधुवर्यें । आगमन केलें गुरुरायें । जेवि परीक्षीतीच्या लवलाहे । आले कार्य जाणुनी ॥ ८ ॥ पाहू जातां जीव हा परिक्षीति । न कळे परीक्षा स्वरूप निश्चीती । सत दिवसात मरण पावती । परी स्थीती न कळे जीवा ॥ ९ ॥ आता असो हें बोलणें । अतरनिष्ट जाणतीं खूण । श्रोता वक्ता रघुनंदन । भक्तसुमनें वाहू त्या ॥ १० ॥ मुक्तनाथ नामें शुकमूर्ति । कृष्णातटाकीं जाहाली येती । सौंदर्यशरीरीं अद्भुत कांति । ब्रह्मांडजगतीं न समाये ॥११॥ दिगंबरदीक्षा जयाची । ती तो असे आनादिची । सर्वत्र चिन्हें अगीं साची । शृंग्यादि वाचे

वर्णीलीं तीं ॥१२॥ चतुर वेद साही शास्त्रें । पुराणादिग्रंथ विचित्र । आदि अंतीं सकळ तंत्र । विदित पवित्र त्यालागीं ॥ १३ ॥ वेदांताचा शिरोभाग । सिद्धांतरीं तेथें चि चांग । निजमूर्ति निर्गुणरंग । अवतरला सांग भूठाई ॥ १४ ॥ शांख्यादिका लक्षणातें । उत्पन्न करीता जो निश्चीत । संस्कृत आणि प्राकृत । भाषा अवगत सर्वत्र ज्या ॥ १५ ॥ सकळवर्णीं भिक्षा घ्यावी । नित्यमुक्त तो गोसावी । तयापुढें हे मानवी । ईछित जिवीं प्रश्न कराया ॥ १६ ॥ ह्मणती देश तुमचा ग्राम । सांगा तुमचा काय धर्म । राहावयाचा कोणचा धाम । वर्णाश्रम कोणता पैं ॥ १७ ॥ कोठें जाल येथुनी । अनाच्यार करीतां जनीं । सेवन करीता अन्नपाणी । सर्वत्रवर्णीं काय ह्मणुनी ॥ १८ ॥ आह्मी शास्त्री विद्वज्जन । अशंकेचें करा निर्शन । मंदन करू तरीच जाण । मुक्त ह्मणणें भग तुह्मा ॥ १९ ॥ ऐकोनि ऐसे जनोक्ति भाषण । केलें स्वामिनीं हास्यवदन । कृपेनें द्रवले अंतःकर्ण । बोलती जाण मुक्तनाथ ॥ २० ॥ ह्मणती आह्मासी मीतूंपणाचा । समंध नसे कदा साचा । वैखरी पश्यंति मध्यमेचा । स्पर्श परेचा नसे कधीं ॥ २१ ॥ स्थूलादिक देहव्यारी । अवस्था नाहीं मज निरधारी । अंतरबाह्य चराचरीं । व्यापूनि निरधारी मी आत्मा ॥ २२ ॥ विश्व तेजस आणि प्राज्ञ । प्रत्यगात्मा चौथा जाण । तयाहूनि मी विलक्षण । अनिर्वचनसरूप तें ॥ २३ ॥ अकार उकार मकार । अर्धमात्रा निर्विकार । ब्रह्माविष्णुरुद्रईश्वर । तयाचें हि सार साक्षित्व मज ॥ २४ ॥ रक्तश्वेतशामवर्णे । नीलसुनीळ विलक्षण । सर्वातीत जें अवर्ण । जाणती खूण योगी ते ॥ २५ ॥ पिंडब्रह्मांड जें जें दृश्य । तें तें समूळ मिथ्याभास । निद्रिस्तासी स्वप्न दिसे । अनेक भासे येक असतां ॥ २६ ॥ तरी येथें निद्रा हे चि जाणा । विसरोन गेला आपुलेपणा । मी देही ह्मणुनी वल्गना । धरी कल्पना भटसे चि ॥ २७ ॥ ज्याचेनी वेदा वेदपण । ब्राह्मणाचे जे ब्राह्मण्य । क्षेत्रियाचे प्रताप पूर्ण । तें मी चैतन्य

निज आत्मा ॥ २८ ॥ निजधन पहातां वैश्याचें । माहोनि शूद्रासी शूद्रत्व साचें । कारणकार्य सकळजगाचें । मी सर्वांचे चिदयोम ॥ २९ ॥ निर्गुण येकात्मतेच्या वनीं । आगमादि वृक्ष असती श्रृणि । कर्मविस्तीर्णशाला चुंबीत गगनीं । सुशीतळपर्णीं जयाच्या ॥ ३० ॥ उपासना हे चि पुष्प । फळज्ञान ते चि निष्पाप । तयाचा स्वाद अमूप । घनवटले स्वरूप अळुमाळु ॥ ३१ ॥ तयाचा रस चाखित । यया मनाते हिंडत । ऊर्ध्वचि पै सदा रमत । शुक सनाथ तेथीचे ॥ ३२ ॥ निर्धर्मआच्यार आमुचा । तुम्हा तो विच्यार ठाऊका कैचा । जेथें लेश नसे या द्रव्याचा । रसु साचा त्या निरगुणी ॥ ३३ ॥ ऐसे माहराज उपदेशीत । परि न कळे या भ्रामकाप्रति । कामीं सदा गुंतली वृत्ति । कोण स्थीति हे फळेना ॥ ३४ ॥ प्रत्यक्ष स्वामी शुकराज । सकळ निजाचें जें निज । भूमंडळीं ते ज्ञानबीज । प्रघटले सहज महाराज ॥ ३५ ॥ हिंडत हिंडत स्वईछा । करीत भवरोगाची चिकिछा । उदक्षीत स्वानंदपिछा । आले निरईछा काशीग्रामीं ॥ ३६ ॥ तेथें साधुवृंद स्वज्ञाती । पाहुनी उल्हास जाहला चित्तीं । कांहींकाळ स्थीरवृत्ति । करूनि क्षीतितळीं बैसले ॥ ३७ ॥ निरंजनाची आवडी । येकांतीं राहाणीयाची गोडी । घोंडीयाचे पैल्दरडी । स्वानंदपरवडी स्थीर जाहाले ॥ ३८ ॥ ग्रामस्थजन भाविक मंडळी । सामोरे गेले जोडुनी करांगुळी । यथामति चरणकमळीं । अनन्य केली प्रार्थना ॥ ३९ ॥ शुकदेव ह्मणती स्थळ बरवें । ग्रामांत येउनी काय करावे । मग तेथें चि गुंफा बांधुनी सर्वे । येती बरवे नरनारी ॥ ४० ॥ कांहीं वस्त्रें आणीलीं अपूर्व । टोपी मेखळादि गौरव । पदार्थ भक्षावया अभिनव । नानाव्याघव स्वामीते ॥ ४१ ॥ ते योगीराज काय पाहाती । ज्याची वैराग्यपूर्णसंपत्ति । क्षीरसमुद्रा कांजी अर्पीती । तेवि दिसती उपच्यार ॥ ४२ ॥ क्षणें करुनी अंगीकार । फेकुनी देती सकळ चिरें । भोजनाचा स्वादविच्यार । तेथें प्रकार कायसा पै ॥ ४३ ॥ जे हातानें पात्रांतील आणावें । जिव्हेनें तें ग्रहण करावें । कोण्ही जवळ असलीया

सांगावें । तेव्हां शिरावे त्या पदार्थी ॥ ४४ ॥ नित्यतृप्त योगेंद्र । उर्ध्वगती पक्षेंद्र । जडजीवाचें करीती भद्र । कृपासमुद्र हेळावळा ॥ ४५ ॥ तयातें हे जन अज्ञान । ईछित द्रव्यसंतान । स्वहीत आपुलें नेणोन । मागती जाण मळतें चि ॥ ४६ ॥ रात्रंदिवस करीती गळबा । ह्मणती कांहीं सांग बा । जेवि टाकुनी रसाळ आंबा । ईछीत जीवा अर्कफळे ॥ ४७ ॥ कोण्ही आपुली घेउनी ज्ञानें । ह्मणती आमुचे सांगा प्रश्न । खद्योत जैसा प्रकाशमान । तेज जाण रविला दावी ॥ ४८ ॥ मग ते सांगती कांहीं येक । जगमाषण अज्ञानिक । बोलती विषय कामिक । अभिमान आटक ज्यालागी ॥ ४९ ॥ ते नावडे शुकराया । उठोनी गेले आकाशपंथठाया । येरी लागली पळावया । ईछित पापा वेंदावया ॥ ५० ॥ योगगति ते कदा न कळे । परतले जन सहजी सकळ । कृष्णककुमतिसंगममेळ । तेथे प्रघटले श्रीस्वामी ॥ ५१ ॥ तव ते दिवसीं येकादशी । स्मश्रु करविती निरगुणविळासी । दृष्टी पडतां क्षेत्रस्थासी । तंडती तयासी कडोविकडीं ॥५२॥ मुक्तनाथें ऐकुनी श्रवणीं । हसिनला गदगदा वाणी । ह्मणती येकादशी प्रतिदिनीं । द्वैत मनीं नाहींचि ॥ ५३ ॥ हें न कळे त्या मर्कटा । करिते जाहाले सकळ चेष्टा । ज्याचा स्वरूपीं अखंड पैटा । दारवंटा वृत्ते त्याचे ॥ ५४ ॥ जें जें स्वामी ते करितील । तें तें शास्त्रें मानितील । कां जे जाहले अखील । त्याचेनि सकळ चराचर ॥ ५५ ॥ परी हा अद्वीतीय विच्यार । तयासी च शोभे साचार । येर कर्माचे किंकर । आहे शरीरमान तो ॥ ५६ ॥ हा शुक अवतार मुक्तनाथ । न धरा येथें कोणी भ्रांत । जगा दर्शनें उद्धरीत । अगम्यवृत्त जयाचें ॥ ५७ ॥ पूर्वी महीपतिमाधानें । कबीरासी वर्णीले शुक ह्मणून । तयासी तरी न ह्मणे कोण । शुक चि जाण सर्वत्र ॥ ५८ ॥ सिंपल्याचा विच्यार बोलीला । प्रसीद्ध चि ते हि लीला । परी तो अर्थ असे वेगळा । अंतरमुखाला कळे पै ॥ ५९ ॥ सिंपल्यांतील जे का मोती । दशवेद्वार तेथें ह्मणती । ही तो खुण गुरुपुत्र जाणती । न कळे गति इतर जीवा ॥ ६० ॥ तेथें चि

असे आत्मज्योति । जाणा बहिरी शुकमूर्ति । म्हणनी टेंडी सर्वत्र जगती। शुकाविण रिती काय आहे ॥ ६१ ॥ आतां कबीर म्हणजे वीर बावन्न । बावन्न जि पै ते वर्ण । अर्धमात्रा ते अवर्ण । तेथें चि जाण शुक आत्मा तो ॥ ६२ ॥ हो अंतरनिष्टाचा भापण । भ्रांता चरित्र वाटे जाण । येणें चि नाडीले बहु शहाणे । वारा म्हणून दृष्टि ते ॥६३॥ टटको च धरुनी प्रपंचनाळिका। सोडिनां म्हणे पडेन देखा । संशय वळावळा निका । विषयमुखा पाय रोवोनी ॥ ६४ ॥ नातरी अवघे शुकमूर्ति । परी आपणाते नेणती । कोण ज्ञानाची ते गति । बहिरसंगती दक्ष सदा ॥ ६५ ॥ भ्रम भावना येन्या जरी । साक्षात स्वरूप हा चि निरधारी । सशयाची वाढली थोरी । म्हणती हरी कोठें आहे ॥ ६६ ॥ कस्तुरी हरणापरी । हिंडतसे देशांतरीं । नेणे चि सर्वथा अंतरीं । मह्मांडभरी नारायण ॥ ६७ ॥ जवजव येतसे त्या सुगंधी । तव तव धावती मंदबुध्दी । माहात्म्य ऐकुनी त्रिशुद्धी । आत्मसिद्धी नेणती पै ॥ ६८ ॥ हृषीकेशाचिये भीतरी । प्रत्यक्ष असोनी श्रीहरी । मुकोनी गेले नरनारी। नाडीले सारी अभिमानें ॥ ६९ ॥ हे चि परीक्षा कळलिया जाण । परीक्षितिराजा तो चि जन । सप्त दिवसांत आहे मरण । सद्गुरू जाण शुकेंद्र तो ॥ ७० ॥ तरी ते कैसी श्रवणभक्ति । सांगिजेल ऐका सुनिश्चीती । सर्वांगाचे कान होती । तेचि पावती निजआत्मसुखा ॥ ७१ ॥ इंद्रियें सारीं मनाध्यन । तें मन चि श्रवणीं बैसल्या जाण । सर्वांगाचे ते चि कर्ण । होपे चैतन्य चित्ताचें ॥ ७२ ॥ मनन तरी कैसें करावें । जेवि कृपणें धन मोजावें । निजध्यास आळीपरी जीवें । साक्षात्कार पावे अनायासें ॥ ७३ ॥ मग शुकपण्या कायभेद । आत्माचि अवघा प्रसिध्द । स्वयंप्रकाश सच्चिदानंद । जाहाल्या निर्द्वंद दाही दिशा ॥ ७४ ॥ म्हणुनी सशास्त्राविणे कदा । न मिळे चि सर्वथा आत्मपदा । येणें आणीक ऐकता विषदा । आयुष्या अपदा नागवण पै ॥ ७५ ॥ आत्मबोध ठसावलीया निश्चून । दशा आलीया अंगासी सुलीन । मग जे होतील शब्द श्रवण । अर्थ संपन्न सहजी त्या ॥७६॥

ब्रह्मीचा चि अंश शद्ब । ब्रह्माचा चि असे तो निर्द्वंद । परी द्वैतसंगतीचा छंद । म्हणुनी शुध्द होणें आधीं ॥ ७७ ॥ मुक्त व्हावया हें चि वर्म । अध्यात्म विषईं पाहिजे नेम । शृद्गिगत चढतें प्रेम । स्वरूप निर्धर्म पावे तो ॥ ७८ ॥ सर्वथा श्रृंगारीक भाषण । जरी कंठीं आलीया प्राण । तरी बा मुमुक्षु येणें । कदा श्रवण करूं नये ॥ ७९ ॥ मग शुक्र जनीं वनीं । दिसो लागे सहजी नैनीं । वेगी करा सद्गुरु धनी । काळ जनीं ग्रासीतसे ॥ ८० ॥ मुक्त असोनी बध्द जाले । दाटोन विषई सकळ गुंतले । म्हणती आम्हा कोण सोडवील । नर्कांत पडेल यापासुनी ॥ ८१ ॥ जेवि व्याघ्राचे बाळक । नेणता श्वानांत गेलें कौतुकें । तयाचियासंगें भुंके । आपणा देख कुतरें म्हणवी ॥ ८२ ॥ तो तेथे अकल्पित व्याघ्र आला । तयावरीही सरसावला । भुंकतसे निजलीळा । आपुलेपणाला नेणोनी ॥ ८३ ॥ तैसे जाहाले या जीवाते । भुलोनी गेले सस्वरूपाते । स्वीकारोनी स्वप्नद्वैत । वाद घालित विवेचा ॥ ८४ ॥ ऐसें अज्ञान दवडावया । उदेला मुक्तनाथ चित्सुर्या । चेवउनी लाविले नित्यकार्या । आत्मत्वठाया विचरती ॥ ८५ ॥ धन्य धन्य ते सिध्दचरण । काय तेथें करावें स्तवन । वाणी च केली निंबलोण । ओवाळून देहभावा ॥ ८६ ॥ शुक्र अवतार मुक्तनाथ । जाहाला असे हा सिध्दांत । श्रोतेवक्ते सहजी पुनीत । कथा सत्य सर्वांसी ॥ ८७ ॥ रामदासस्वामी सद्गुरूनाथ । सिध्द महाराज तो चि समर्थ । प्रकट होउनी दासाहातें । चरीत्रसंत करवितसे ॥ ८८ ॥ पंढरीनिवास श्रीरघुपति । विठ्ठलनाम धरीले क्षीती । जाणुनी आराध्य आपुली मूर्ति । श्रीरघुपति अर्चितसे ॥ ८९ ॥ ययानंतर राजारामी । तुकाविप्रकथन वदविती स्वामी । सिध्द होउनी श्रोते तुम्ही । अंतरयामीं प्रेम धरा ॥ ९० ॥ भक्तमंजीरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । शुक्रअवतार मुक्तनाथ । चरीत्र समाप्त अध्याय हा ॥ ९१ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु: ॥

## अध्याय ६५

### — तुका विप्र चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीराममसमर्थ ॥ जय आदिसर्वेश्वरा । गुणतीत परात्परा । व्यापक तूं सर्वाधारा । सद्‌गुरुवरा सिध्यमूर्ति ॥ १ ॥ तूंचि स्वामिया गुणांचा ईश । याकारणें नाम तव गणेश । नातरी ठाईंचे अविनाश । परि विशेष लीला हे ॥ २ ॥ देवा तुमची पराशक्ति । ते चि माया सरस्वती । सकळ कळेची उत्पत्ति । पावले स्थीती चराचर ॥ ३ ॥ नमो ऐसीया विलासीया । सर्वोत्तमा निज आत्मया । सच्चिदानंद पदत्रया । नटसी ठाया आपण तूं ॥ ४ ॥ होसी देव आणि भक्त । गुरुशिष्य प्रेमभरीत । युगायुगीं संभवत । भक्त अद्भुत भोगावया ॥ ५ ॥ तया भक्ताविण पाहीं । गोमटें तुझा नसे कांहीं । याकारणें प्रगट होउनी ह्रदईं । वदवि ते ही भक्तमंजीरी ॥ ६ ॥ संतप्रियकर जानकीजीवना । हे चि प्रार्थना आणिजे मना । जन्मोजन्मीं साधुस्तवना । रमवी रसना चरीत्रगुणीं ॥७॥ पदरींनिवास भक्तवत्सळ । ईया विनवणीं सतोषले । सागती स्वमुखें भक्तमाळे । योळविति सकळ मुळिचे पै ॥ ८ ॥ तरी अवधान यावें श्रोतिये । येकाग्रता करुनि ह्रदय । श्रवणें चि लाहिजे स्वात्मकार्य । पाविजे अक्षयपदाप्रति ॥ ९ ॥ श्रीतुकाविप्रस्वामींची कथा । अत्यंत प्रिय जे भगवता । वर्णिजेल ते चि आतां । ठेउनी माथा सिध्यपदीं ॥ १० ॥ युगायुगीं देवासवें । अवतरला जो निजवैष्णव । अनुक्रमेंसी ते सर्व । सांगीजेल भाव गुरुकृपें ॥११॥ कृतायुगीं प्रल्हाद जाहाला । तेथें नारदें उपदेशीला । भागवतीं प्रसिध्य हे लीला । वर्णिला भला स्वानुभव ॥१२॥ त्रेतीं वाळीचा तो कुमर । अंगदनामें महावीर । मग बोधीले साचार । वायूसुतें श्रीमारूति ॥ १३ ॥ द्वापारीं तो उधव जाहला । यादववंशीं जन्मला । सर्वोत्तमें अनुग्रह केला । वर्णिलें तयाला व्यासानीं ॥ १४ ॥ कलिमध्यें तो चि उधव । भक्त जाहाला नामदेव । जयासंगें देवाधिदेव । जेविले भाव पाहुनी ॥ १५ ॥ विसोबाखेचर हा संत । जयालागी प्रबोधीत । भजनरंगीं

रंगलें चित्त । धन्य भक्त ते नामदेव ॥ १६ ॥ चरित्रें केलीं नानापरी । काय सांगूं ते वैखरीं । गाय उठली ये वना घरीं । स्मरतां हरी तात्काळ ॥ १७ ॥ सुवर्णाचें श्रीपंढरीक्षेत्र । छळकासी आणीलें अनुभवा पवित्र । परीसा भागवत विचित्र । बाळूचे स्वतंत्र परीस दाविले ॥ १८ ॥ गोरोबाचे फुटले हात । कीर्तनीं बाळ आले रांगत । पुष्पवृष्टी केली सत्य । जाहला अद्भुत आनंद तो ॥ १९ ॥ नामयाचे घरीं विपत्ति । हे जाणुनी रुक्मीणीपति । विठ्ठलशेटे होउनी जगती । गोणी लोटिती द्रव्याची ॥ २० ॥ परी तो निरक्तीचा पुतळा । द्रव्य लुटिलें ब्राह्मणाळा । ऐशा पाहतां अनेक लीला । वर्णियेल्या ग्रंथांतरीं ॥ २१ ॥ पाहा पा निवृत्यादि ज्ञानेश । तीर्थावळीचें करुनी मीस । समागमीं विशेष । प्रेमसुखास लाधलें पै ॥ २२ ॥ शतकोटी करुनी अभंग । भावें पुजावा पांडुरंग । हा ही संकल्प करीता चांग । पूर्वी श्रीरंग भक्तिबळें ॥ २३ ॥ ऐसा नामा प्रेमळ भारी । नाममाहात्म्य पृथ्वीवरी । प्रघटविले जेणें जीवोपकारी । कीर्ति थोरी पै याची ॥ २४ ॥ पुढें नामयाचा जाहाला तुका । हे तो प्रसिद्ध आहे लोका । ज्याचें वैराग्य पाहातां देखा । सनकादिका विस्मय मनीं ॥ २५ ॥ अगाध भक्ती वाढविली । भवार्णवीं नौका जाहाली । होउनी ठेला साउली । सर्वत्र निवाली नारीनर ॥ २६ ॥ सकळ साधूंचा जाहाला कळस । बोलणें खुंटले निःशेष । अनुभव आणीले अंगास । कांहीं तयास न राहीले ॥ २७ ॥ शतकोटी अभंगातील । करणें काव्य ते राहिले । ते हि स्तवन करुनी भलें । पूजिला विठल सर्वात्मा ॥ २८ ॥ सेवटीं पाहा केलें काय । विमानीं बैसविला जडदेह । जगा दाविलें प्रलय । तरुणोपाय नानापरी ॥ २९ ॥ लोक लाविले भावार्थासी । भजनमार्गे दाविला त्यासी । हळुहळु स्वरूपासी । पावावयासी येकसरा ॥ ३० ॥ सकळ लाहोनी कृतकृत्यता । जीव तारीले बहु तत्वतां । आपण निघोनी वैकुंठपंथा । चालिले सर्वथा तुकाराम ॥ ३१ ॥ उर्ध्वपंथें जातां जाण । अमरावतीचें देखिलें स्थान । तेथें पुरंधर येऊन । केलें नमन त्या

साधवा ॥ ३२ ॥ नानास्थळें मनोहर । दाविलीं अमृत सरोवरें । तेथें न रमे वैष्णवधीर । राजसि उपच्यार जाणुनी ॥ ३३ ॥ तुकोबा ह्मणती मानसीं । जरी राहावें वैकुंठासी । तरी पंढरीचें सुखासी । तुळणेसी न घडे तें ॥ ३४ ॥ मागे परतावयाचें व्याज । स्वकर्मे स्फुरले चिची सहज । तेव्हां विनवी देवराज । श्रीपादरज वंदोनी ॥ ३५ ॥ म्हणे मजला अनुग्रह द्यावा । मी कर्मभूमीसी जन्म घ्यावा । लोक समोह तारावा । सुकाळ करावा भक्तांचा ॥ ३६ ॥ मग तुका म्हणे देवेंद्रास । अवतार घेणे आहे आम्हास । तुजहि करूं उपदेश । राहिलें विशेष करणें ते ॥ ३७ ॥ मह्मयोनींत जन्म घेणें । सुकाळ शोभे तेणें गुणें । सिल्वांत मेदीं ऐसा पूर्ण । करावें प्रमाण त्या वाक्या ॥ ३८ ॥ आणि शतकोटी अभंगाची । बाकी फेडीली स्तवनाची । परी राहिली नेमाची । सळईची पंच्योचरी ते ॥ ३९ ॥ भजनतृप्ती नाहीं मन । कळाया जनीं ऐशी खूण । टाळ टाकिला विमानांतून । पाहिला नेनें सकळिक ॥ ४० ॥ हें काय ठाउकें इतरा । मागील संगती या पामरा । याळागी निर्णयो केला खरा । पूजीती बरा टाळ तो ॥ ४१ ॥ असो कृपामूर्ति सद्गुरुनाथ । बाबाजीचैतन्य जे प्रख्यात । तयाचा उपदेश जाहाला सत्य । स्वप्ना आंत तुकयासी ॥ ४२ ॥ तयेकाळीं पावशेर । मागितलें तूप गुरुवरें । ज्याप्रतेंसी येतां निर्धारें । राहिलें खरें देणें तें ॥ ४३ ॥ ऐसें सुरेशा सांगून । भूतळासी निघाले जाण । तेव्हां पवित्र आपुली खूण । दिधली पूर्ण देवराजें ॥ ४४ ॥ विलोमरेफसंगती । विप्रत्व आले वज्राप्रती । मग तुकाविप्र नामें जन्म वरीती । अवतार ख्यीती श्रीतुकोबा ॥ ४५ ॥ आतां कोणते स्थळीं कोण ग्राम । शाखा भेद आचरणधर्म । ते साकल्य ऐकीजे प्रेम । यथानुक्रमें अनुवादूं ॥ ४६ ॥ अंजनावती नामें नगरी । गोदावरीचे दक्षिणतिरीं । महावैष्णव निर्धारी । धन्य संसारीं गुरुभक्त ॥ ४७ ॥ ऋग्वेदशाखा आश्वलायन । विप्रनाथ नामें बाबाजीचैतन्य । अवतरला जो माहामान्य । श्रीयेकनाथपूर्णसांप्रदाई

॥ ४८ ॥ तयाची कन्या पुण्यराशी । अर्पिली ती रहिमतपुरीं द्विजासी । त्यापासाव जन्म तुकयासी । निश्चयेसीं सहजीं तो ॥ ४९ ॥ मातामह तो विप्रनाथ जाण । जन्मांतरीचा सद्गुरु पूर्ण । असो तयें कुळीं सचिद्-घन । घेतला जेणें अवतार ॥ ५० ॥ गर्भांत असतां जननीप्रति । भगवतभजनीं रंगली वृत्ति । सन्निध जियेचे श्रीरघुपति । दीवाराती हरिभजन ॥ ५१ ॥ नऊ मास होतां चि पूर्ण । प्रसवली सुपुत्र गुण-निधान । तुकाविप्र सकळजन । वदती जाण यालागी ॥ ५२ ॥ दिवसोंदिवस पाहतां बाळा । विचित्र दिसे प्रेमकळा । भजन करीतां वेळोवेळा । दिसे सावळा यालागीं ॥ ५३ ॥ नातरी जनासारीखे । माता वोळवी जरी कौतुकें । कदा न राहे देख । रुदन दुःखें करीतसे ॥ ५४ ॥ रामकृष्ण हरि गोविंद । हे चि सदा जननी वदे । तेणें पावोनी विषद । खेळत सिरघ असावे ते ॥ ५५ ॥ पुढें चि येक वर्षानी । अर्भकें केली असे करणी । श्रीपुंडलीक विठल ह्मणूनि । गर्जिनले वाणी प्रथमता ॥ ५६ ॥ मग निरंतर तो चि ध्यास । विठल विठल ह्मणत असे । दुजा खेळ आन नसे । रंगळें मानस भजनीं सदा ॥ ५७ ॥ ऐशापरी बाळ लीला । श्रीतुकाविप्र करीतां जाहाला । पुढें विप्रानें व्रतबंध केला । तो सोहळा अनोपम्य ॥ ५८ ॥ ऋणानबधे करून । पूर्वील कलत्र वरीलें तेणें । अपराध घडले मागे ह्मणे । करा उध्धरण या जन्मीं ॥ ५९ ॥ संतती संपत्ती नलगे कांहीं । तुमचेपाई । ऐसेप्रकारें विनविता पाही । सद्गुरु हृदई तुकाविप्र ॥ ६० ॥ अनुग्रह करुनी स्वर्कीयेसी । मेळविले सस्वरूपासी । निमग्न जाहाली ती सेवेसी । भोगी देहासी वैराग्य ॥ ६१ ॥ पुढें उभयता दोघे स्वईछें । तीर्थें करीती सकळ स्वस्थ । मुगुटी जयाचे मयूरपीछ । निरईछे तथा आठविती ॥ ६२ ॥ काय वर्णिजे तुकाविप्रा । ज्याचें भाषण जेवि क्षीप्रा । रास करीती सदा छप्रा । किंवा वृक्षातळवटीं ॥ ६३ ॥ जन्मांतराचे योगकरून । सद्गुरू लाधले ते चि पूर्ण । जे का बावाजी-चैतन्य । अवतार धन्य विप्रनाथ ॥ ६४ ॥ होतां जयाची निजभेटी ।

स्वरूपीं जडदृष्टी तात्काळ दृष्टी । हारपोनी गेली असतां सृष्टी । जगजेठी दिसतसे ॥ ६५ ॥ कर्णीं पडतां चि मंत्राक्षर । तुकाविप्र चढले त्रिकुट-शीखर । सहस्रदळीं होउनी स्थीर । सोहंविच्चार स्फुंदति पै ॥ ६६ ॥ शेवीं अहंसोहंभान । हेंहि विराले जेथें जाण । लागली समाधी स्वानंदघन । अनिर्वाच्य पूर्ण तें सुख ॥ ६७ ॥ नाहीं आठऊ देहाचा । परेसी मुरडल्या प्यारी वाच्या । घोट भरला ब्रह्मांडाचा । मीनली साचा स्वरूपावरी ॥ ६८ ॥ अनुभव अनुभवीं विराला । आत्मा सर्वत्र होउनी ठेला । तुकाविप्र उपदेशीला । सद्गुरू भेटला विप्रनाथ ॥ ६९ ॥ दिनत्रय निर्विकल्प । समाधी भोगीतो योगाधीप । आत्मशेजे लागली झोंप । उन्मनी दडपे पाय तयाचे ॥ ७० ॥ मग श्रीगुरूचीं युक्तिद्वारा । तुर्ये अवस्थेच्या नेहतां घरा । प्राण उतरोनी हृदयगाभारा । इंद्रिय शरीरा सचेतन ॥ ७१ ॥ परी स्वानंदडोहीं चुबकळलीं । सस्वरूपी जडोनी ठेली । माईक विषय सांडुनी गुरळी । राहाटती सरळी नित्यकर्म ॥ ७२ ॥ नेत्र पाहाती जो जो पदार्थ । तो तो दिसे पंढरीनाथ । शब्द पडती ते श्रवणातें । अर्थरूप ते सकळ पै ॥ ७३ ॥ रसना रंगली निजात्मरसें । न सेवी कदा द्वैतबाकस । जगत्र हेमी येक कस । भरला अविनाश जगदात्मा ॥ ७४ ॥ गंधासी गंधत्व जेथोनी । तोचि बैसला घ्राणासनीं । रोमरधी त्वके सदनीं । स्पर्शत्व स्पर्शनीं सर्वोत्तम ॥ ७५ ॥ टाकिला मानसें ज्या संकल्प । कैचा तेथें मग विकल्प । असो जडसमाधी सद्गुरूकृपें । तुकाविप्रे विसर्जिली ॥ ७६ ॥ इंद्रियबळ लाहोन । नवविधप्रकारें करीती भजन । मोहिला जेणें नारायण । सबाह्य जाण तिष्ठतसे ॥७७॥ मग पंढरीसी निघाले । तुकाविप्र समर्थ भले । तये वेळीं आडवे आले । श्रीविठ्ठल परमात्मा ॥७८॥ नारदादिक श्रीवनमाळी । हर्षे सांगती वाजउनी टाळी । ह्मणती तुकाराम भूमंडळीं । अवतरली संतमाये ॥७९॥ तरीं आता लागवेगीं । चला सामोरे तयालागी । ऐसें बोलोनी श्रीरंगी । स्वये वेगीं पाच्यारीले ॥८०॥ मग संतसमुदाव । सहित निघाले देव । ध्वजापताका गर्जती सर्व । घोष अपूर्व होतसे॥८१॥ गजर करीत

आनंदेसी । सामोरे पातले तुकाविप्रासी । नमस्कारीती तया स्थळासी । पवित्रभूमीसी यात्रेकरू ॥ ८२ ॥ देवभक्त मिळता मीळणी । तया सुखा कोण वर्णी । हर्ष न माये त्रिभुवनीं । गाती गाणीं स्वानंदें ॥ ८३ ॥ समारंमें गजर करीत । गेले पंढरीक्षेत्रांत । नमन करुनी पुंडलिकाते । राउळांत प्रवेशले ॥ ८४ ॥ तुकाविप्र गरूडपारीं । भजन करीतां प्रेमभरीं । तन्मय जाहाले भक्तविहारी । पाहाती अंबरीं देव सकळ ॥८५॥ विमानीं वैसुनी सुरेश । अवलोकितां पंढरीविलास । पातला सहजी भूमीस । कीर्तनरस सेवावया ॥ ८६ ॥ ती कथा अत्यंत चोख । पुढे वर्णिली असे देख । परिसोत सदा भाविक । नाशी दुःख सकळ ही ॥ ८७ ॥ श्रीरामदास अवतार भूमंडळासी । सद्गुरूसिध्द जो कृपाराशी । देहवृंदावन हृत्कोषी । स्थापीले तुळसी स्फुर्तीसी ते ॥ ८८ ॥ सिंच्यामृत वर्षतां जीवन । भक्तमंजीऱ्या दाटल्या पूर्ण । तयाची माळ करुनी जाण । होतसे अर्पण श्रीरघुवीरा ॥ ८९ ॥ प्रेमरज्जु घेउनी हातीं । गुंफीयेली वैखरी निगुती । पंढरीनिवासा परमप्रीती । राजारामीं युक्ती समर्पीली ॥ ९० ॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । तुकाविप्रआख्यानातें । अध्याय समाप्त जाहाला हा ॥ ९१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ शुभं भवतु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥



## अध्याय ६६

### — तुका विप्र चरित्र —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु पंढरीनिवासा । निजआत्मया रूक्मीणीविलासा । चराचरी उभा सरीसा । श्रीजगदीशा विटेवरी ॥ १ ॥ चिद्गगन ते पंढरपुर । सोहंध्वनि कीर्तनगजर । भावें भजती वैष्णववीर । गरूडपारीं विवेक तो ॥ २ ॥ माहाद्वारीं चौघडा ।

अनुहातनाद होतसे पुढां । अखंड वाहे भडभडा । ते चि धवपुडा प्रानोदक ॥ ३ ॥ चिन्मयवाळुवंटीं देख । स्वानुभव शोभे पुंडलीक । निरंतर होतसे सुख । कीर्तन घोख महास्थीतीं ॥ ४ ॥ द्वैतमयाची करितां वारी । नरदेहयात्रा जाहाली वरी । भवधाची जेथें नटला हरी । धींवसा परी पुजेचा तो ॥ ५ ॥ आतां पूज्यपुजकपण । हे तो नुरे कांहींच जाण । मानसीं आवडी तरीच पूर्ण । अर्चन करणें यथामति ॥ ६ ॥ याळागीं विनवणी जन्मोजन्मीं । हे चि श्रीगुरुपादपद्मीं । प्रघट होउनी अंतरयामीं । माळिके रागीं ग्रहण किजे ॥ ७ ॥ प्रार्थीतां ऐसा सिद्धेश्वर । स्फुरवी बुद्धिसी कथासार । तें चि ऐका श्रोते सारे । नारीनर आबाळवृधें ॥ ८ ॥ पूर्वीच्याई तुकाविप्र । स्वरूपीं रंगले सद्गुरूरूपें । पंढरीसी जातां वैकुंठाधीप । चतुर्भुजरूपें आडवे आले ॥ ९ ॥ हातीं धरुनी रूक्मीणीपति । घेउनी गेले राउळाप्रती । वर्णू जातां सरस्वती । तें मुखाप्रति अनोपम्य ॥ १० ॥ आतां श्रीगुरुभक्ति कराया । सुरेश अवतरला भूळाया । नमन करुनी सिद्धपाया । सांगितले तया ऐका तें ॥ ११ ॥ श्रीसोपानदेवाचें स्थान । सासवड नामें क्षेत्र पूर्ण । तेथीळ पवित्र ब्राह्मण । आश्वलायन ऋग्वेदी ॥ १२ ॥ पुरंधर ज्याचें उपनाम । पुरंधर पावला तेथें जन्म । पुण्यभूमी धन्यग्राम । विप्रोत्तम धन्य ते ॥ १३ ॥ मग तो देवेश पित्याने । तुकाविप्रासी केला अर्पण । पूर्वील संकेत जाणून । केलें पालन श्रीगुरुनीं ॥ १४ ॥ मृत्यूलोकीं पांडुरंग । नाम पावला शचिरंग । कां जे घडला स्वर्गी संग । भवभग तुकयाचा ॥ १५ ॥ पंढरीमाहात्म्य ऐकुनी । रंगली वृत्ति पांडुरंगस्मरणीं । अवतार घेतचों मेदिनी । नामाभिधानी त्या प्रासी ॥ १६ ॥ असो इंद्रांशमूर्तिने पाहतां तुका । वेधलें मानस चरणीं देखा । इछितसे अनुभव निका । शाश्वतसुख पावावया ॥ १७ ॥ तुकाविप्रस्वामिप्रती । हात जोडीले दोन्हीं निगुती । दंडायमान पडले क्षीतीं । नमन करीती साष्टांग ॥ १८ ॥ हाणे महाराजा दीनदयाळा । दूर करी या भवभयाला । नाहीं शक्ति तरावयाला । मायानदीला दुर्धर

हे ॥ १९ ॥ कामक्रोधादि जळचरें । गिळूं पाहती हा किंकर । तरी देउनी कृपाकर । काढी बाहेर तूं समर्था ॥ २० ॥ शिष्यमयूरकरुणाघना । भक्तचकोररोहिणीरमणा । द्वैततमारी सहस्रकीर्णा । हे चि चरणा विज्ञाती ॥ २१ ॥ प्रार्थीता ऐसें सत्शिष्य । पांडुरंगनामें इंद्रांश । संबोखोनी परमउल्हासें । वैसविले असे सन्मुख पै ॥ २२ ॥ शिष्यमुमुक्षुपूर्णचंद्रा । पाहुनी भरते कृपासमुद्रा । प्राप्त जाहाले तुकाविप्रा । अवतार इंद्रा उद्धरावया ॥ २३ ॥ सांप्रदायक्रमें ते चि क्षणीं । मंत्रोपदेश केला कर्णीं । संतोषोनी वरदपाणी । बापबाप वदनीं वदती पै ॥ २४ ॥ तैपासुनी सर्वत्र जन । बापु ऐसें वदती जाण । नातरी मुळींचे अभिधान । पाडुरंग पूर्ण नाम तया ॥ २५ ॥ असो सद्गुरुसमर्थ तुकाविप्रानी । उपदेशीला तो शिष्यचुडामणी । इंद्र अवतार जो मेदिनी । बापु मेदिनी धन्य तो ॥ २६ ॥ सर्वात्मतेचें भद्रासन । अमरपुरी ब्रह्मपूर्ण । जेथें उन्मत्त झुले वारण । स्वानंद जाण ऐरावतीं ॥ २७ ॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा । दया धृति शांति क्षमा । सुखानंदशा मुख्य परमा । ते चि रामा इंद्राइणी ॥ २८ ॥ इंद्रीय मेळींत देव । आत्माराम अमरराव । ज्ञान संपत्ति फळ वैभव । भोगी सदेव तें गुरुकृपें ॥ २९ ॥ बापुविप्र वदती जन । पांडुरंग ज्या नामाभिधान । स्वरूपास्थितीसी लाहोन । केलें अर्चन श्रीगुरूचें ॥ ३० ॥ मग जयानें सेवेठाई । वय वेचिलें असे पाही । वैराग्य धरीलें देही । भजन ह्रदई करीतसे ॥ ३१ ॥ परी जन्मांतरींचा स्वभाव पहिला । विषयविलास न सुटे अबळा । पूर्वील संबंधे विवाह जाहाला । सळक घडला उपच्यार ॥ ३२ ॥ निष्ठा पाहुनी श्रीगुरुनीं । स्फूर्तीसी प्रगट जाहाले वदनीं । सदा रंग ज्या कीर्तनीं । नामस्मरणीं धन्य तो ॥ ३३ ॥ पंढरीसी मठ केला । प्रगटविले सांप्रदायाला । भक्तिध्वज तेणे रोविला । पाहातां काळा भय सुटे ॥ ३४ ॥ ठाईं ठाईं उत्छाहासी । जना लाविले सन्मार्गासी । वाढविले गुरुभक्तीसी । लोकत्रयासी प्रसिध जो ॥ ३५ ॥ आषाढी आणि कार्तिकीचा । नेम साजिरा असंत त्याचा । ऋणी केला देव

साचा । पंढरीचा राणा पै ॥ ३६ ॥ चंद्रभागेचे तटीं । श्रीपुंडलीकाचे पृष्ठीं । कीर्तन करितां वाळवटीं । होये दाटी बहुसाल ॥ ३७ ॥ पौर्णिमेसी गोपाळकाला । होत असे त्या स्थळाला । दुर्लभ प्रसाद अमरादिकाला । इच्छिती काल्याला सकळ ते ॥ ३८ ॥ ऐसा प्रेमाचा पुतळा । वासुविप्र सत्शिष्य भला । देव चि जेणें वेडा केला । तिहेँ सावळा मार्गे पुढें ॥ ३९ ॥ आणीक ही शिष्य अपार । करीते जाहाले तुकाविप्र । भूमंडळामाजी पवित्र । मोक्षसत्र घातिले पै ॥ ४० ॥ श्रीकृष्णातीरामाझारी । तारगांव उत्तम नगरी । तयासन्निध वनबदरी । द्वैततमारी राहती तेथें ॥ ४१ ॥ श्रीपांडुरंगमूर्ति स्थापोन । करीती सदा अनुष्ठान । मुळींचा सहजीयोग पूर्ण । भगवद्भजन सर्वदा ॥ ४२ ॥ अष्टमासिद्धी लागती पाईं । वैराग्य विलसे ज्याचे देहीं । प्रतिष्ठेचा वास हृदईं । अनुमात्र पाही नसे सदा ॥ ४३ ॥ प्रतिष्ठा ते शुकरीविष्ठा । हे जाणवले जया शिष्टा । काय दाउनी इतर चेष्टा । नाहीं निष्ठा परमेश्वरीं ॥ ४४ ॥ घेउनी वरता सत वेश । देती जगासी उपदेश । कैचा अतरी ज्ञानलेश । सावकाश विषय भोगीती ॥ ४५ ॥ माळा मुद्रा जटाभार । मिरावीती आंगीं भगवीं चिरें । कीर्तन करीती घरोघर । राडापेरें मोंदावया ॥ ४६ ॥ नामविक्रयाचें पाप । न जाये तीर्थाचे नि बापें । जया होईल अनुताप । ब्रह्मस्वरूप तो पावे ॥ ४७ ॥ असो तुकाविप्रज्ञानराशी । दुजी उपमा नाहीं त्यासी । वैराग्य लागे पायासी । क्षमा दासी ज्याची पै ॥ ४८ ॥ भिक्षेचें पीठ आणावें । खडकावरी ते मेळावें । पानगे करुनी अर्पावें । वासुदेव सर्वाभूतीं ॥ ४९ ॥ अतिथी येतां स्वभावें । वाढुनी तया मग जेवावें । मीठ- शेंगादि पदार्थ देतां नावे । संतोषावे तयावरी ॥ ५० ॥ अनन्य लागत पायासी । नाममंत्र सांगती त्यासी । न वांछीती उपध्यायासी । स्वरू- पासी मेळविती ॥ ५१ ॥ नातरी इतर द्रव्यमोंदु । म्हणविती जगीं उगेचि साधु । शिष्या न भेटे कदा गोविंदु । सदा बद्धु विषईं

तो ॥ ५२ ॥ असो तुकाविप्र अवतार तुकयाचा । प्रसिद्ध जाहला असे साचा । तयासंगें वैकुंठीचा । पंढरीचा देव नाचे ॥ ५३ ॥ मवसिंधुपरी स्पष्ट । केली जेणें पायवाट । भक्तप्रेम वसविली पेठ । केली लूट नामाची ॥ ५४ ॥ तीर्थमीसें भ्रमण करीत । आले सासवड नगरांत । श्रीसोपानदेवसमाधीतें । नमन निरुतें केलें पै ॥ ५५ ॥ तेथें अद्वयवोवरीमाजी । तुकाविप्र राहिले सहजी । जीवोद्धारीं आवडी ताजी । मजनकाजीं प्रेमळ ते ॥ ५६ ॥ रात्रंदीवस कीर्तन गजर । दुमदुमिलें सासवड नगर । मक्तीसी लाविले नारीनर । निजात्मशिखर चढावया ॥ ५७ ॥ पुढें तुकाविप्रस्वामीचे मानसीं । आठवलें पूर्ण जावें काशीसी । स्नान करुनी भागीरथीसी । विश्वेश्वरासी पुजावें ॥ ५८ ॥ तव रात्रीं सोपानदेव सांगत । येथें भागीरथी आहे वाहत । काशीविश्वेश्वर तो वसत । ब्रह्मकुमंडली सतत पै ॥ ५९ ॥ ह्मणती जाणे जरी तुकया वाराणशीसी । तरी प्रदक्षणा करी ब्रह्मकुमंडळीसी । तेणें यात्रा सकळ तुजसी । निश्चयेंसी घडल्या पै ॥ ६० ॥ मग नमस्कारोनी सोपान । गाराडग्राम प्रवरेसी केलें गमन । चतुरमुख ब्रह्मा पुजोन । तत्काळ प्रदक्षणे आरंभिले ॥ ६१ ॥ नाना देव नाना स्थळें । नानातीर्थें निर्मळ जळें । उत्तरतीरी स्वयंभ सोज्वळ । शिवलिंग केवळ अपार ती ॥६२॥ सिद्ध स्थान बहुत जाण । न गणवति कवणा लागून । सोनगावीं संगमपूर्ण । पुण्य पावन नीरानदी ॥ ६३ ॥ सोनेश्वरसंगम प्रसिद्ध । लिंग तेथे असती विविध । प्रख्यात हाटकनामे भेद । आत्मविद बोलती त्या ॥६४॥ दक्षणतीरीं त्या मधुरेश्वर । नाभीस्थान वदती सुरनर । तेथील महीमेसी नाही पार । यात्रा फार तये स्थळा ॥६५॥ जयपुरीमाजी अखंड । अश्वारूढ मार्तंड । तोडी भेदाचे ब्रों बंड । विवेक प्रचंड शस्त्र हातीं ॥ ६६ ॥ शिवस्थान ते मल्लाद्भुत । दर्शनें जीव होती पुनीत । भ्रांति मनीं पाखांड येत । तया दंडीत निज तेजें ॥६७॥ असो कैलासनाथ तो जेजोरीचा । पुढे पुरंधर पाहिला साचा । नारायणरूप विग्रह जियेचा । भृतार्यचिचा अगाधमहिमा ॥ ६८ ॥ तेथून पाहा लिंगें बहुत । दक्षिण॰

तीरीं विलसत । चतुरमुखपर्वतीं समस्त । प्रदक्षणा होत साग पै ॥ ६९ ॥ ऐसी करुनी प्रदक्षणा । पुन्हां येउनी सोपानस्थाना । सर्वभूतीं अन्नदाना । समाराधना केली पै ॥ ७० ॥ नंतर आले स्वस्थळासीं । कृष्णातीरीं वदरीवनासी । भजन करीती दिवसनिशीं । सदा मानसीं पांडुरंग ॥ ७१ ॥ अभंग सव्वई पंच्योत्तरीचे । जे का राहिले पूर्वावतारांचे । तुकाविप्रें ते हि साचे । करुनी वाचे पुजिला हरी ॥७२॥ जे जे प्राणी दर्शना येती । अनुग्रह देउनी तयाप्रती । स्वरूपातें मेळविती । दाउनी भक्ति शुधपथ ॥ ७३ ॥ ऐसा क्रमितां वहुत काळ । साधुस्थानें पाहावया आठवलें । शिष्येसहीत दीनदयाळ । महाराज निघाले तुकाविप्र ते ॥ ७४ ॥ देहु आळंदी चिंचवड । प्रतिष्ठानक्षेत्र परमचोखडें । जेथे साक्षात्कार रोकडे । आले कोडे तये स्थळा ॥ ७५ ॥ येकनाथ केशरीनाथ । इत्यादिकाचे मठ जेथें । ठाई ठाई देवस्थानातें । अवलोकीत चालिले ॥७६॥ झालुगांग्राम गोविंदसुताराचें । धामणगाव त्या वोधल्याचें । वहुळनगर कूर्मदासाचे । देखीले साचे तुकयानीं ॥ ७७ ॥ गोराकुमार तेरेत । ते रे ब्रह्म ह्मणे जगातें । सावतामाळी होता जेथें । गेला तेथें निज आवडी ॥ ७८ ॥ भागानगरी केशवस्वामी । तेहि जाउनी पाहिली भूमी । शिवरामसमाधी कल्याणग्रामीं । तये धामीं गेले पै ॥ ७९ ॥ गुरुघरग्रामीं समाधी । वामनाची ज्या त्रिशुद्धी । नामलग्रामीं सप्रसिद्धी । गाणपत्य सिद्धी निरंजन ॥ ८० ॥ ब्रह्मनाळ परळी वडगांव । चाफळ त्रिपुटीं सद्भाव । निरगुणपुर वदतीं सर्व । तुक्यानुभव तेथें आले ॥ ८१ ॥ तव तये स्थळी श्रीरंगमूर्तिचा । उत्छाह होतसे समाधीचा । मेळा मिळाला संताचा । हर्ष तयाचा जाहला मना ॥८२॥ जोतिपंत मोरो पंडित । गुंडाजीबाबा थोर संत । बाबा पाध्ये माहासमर्थ । विठोबा संतचातुरमास्य ॥८३॥ चिदवर दीक्षित भटजी वोवा । बावाजीपंत वैराग्य ठेवा । भवानदास गाती देवा । आले तेधवा निगडीसी ॥ ८४ ॥ रंगनाथगोसावी राक्षनकर । लक्ष्मणनाथ वैष्णववीर । आदोबा काका माहा थोर । जो का अवतार आनंदाचा ॥ ८५ ॥ मच्छनाथ भुजगनाथ । शेक-

सुलतान जो प्रख्यात । फलटणांतील सदाशिवपंत । गोंदड बहुत रागीट तो ॥ ८६ ॥ श्रीरामदास अवतार प्रसिद्ध । जगत्रईं जो कां सिद्ध । इत्यादिक पूर्णसिद्ध । असंख्यवृंदें संतांचीं ॥ ८७ ॥ तुकाविप्र-स्वामीसी पाहुनी सकळीं । उचंबळला आनंद टाळी पिटिली । कीर्तनीं मूर्ति ते शोभविली । आज्ञापिली सर्वांनीं ॥ ८८ ॥ ह्मणती सारे तुकाविप्रा । श्रवणासी पाजी निरोपण क्षिप्रा । तुमचे कथेसी डुले सिप्रा । त्रिनेत्रादि आवड बहु ॥ ८९ ॥ ऐसें वदतां संतवृंदीं । नमोनी समस्तवैष्णवमांदीं । सन्निध श्रीरंगसमाधीं । तेचि संधि उभे ठाकले ॥ ९० ॥ मग तो कथेचा अद्भुतरंग । समाधींतुनी प्रघटला निजरंग । तयेवेळीं केला अभंग । होये भवभंग ऐकतां तो ॥ ९१ ॥

॥ अभंग ॥ श्रीतुकारामस्वामींचा ॥ ( मूळांतच अभंग दिलेला नाहीं. )

ऐशाप्रकारें अभंग करून । भावार्थ वर्णिला असे जाण । तये काळीं सकळ जन । जाहाले लीन परब्रह्मीं ॥ ९२ ॥ मग इतर गोष्टी कायसी । समाधी डोलली ते वेळेसी । आनंद जाहाला सुखराशी । पुष्पवृष्टीसी करीती ते ॥ ९३ ॥ मासामाजी मार्गशीर्षमास । विभूति वर्णिली जग-दीश । तयात हरिदीनीचा दिवस । मान्य सर्वांस कृष्णपक्ष ॥ ९४ ॥ तुकाविप्रें घ्यारीप्रहर । करूनी श्रीहरीपुढें जागर । वोवाळितां रुक्मीणी-वर । आरती स्वयंत्रे वंदुनी पै ॥ ९५ ॥ अद्यापी तो सांप्रदाय । चालविती शिष्य पाही । येकादशीस लवलाही । कीर्तन होये निगडीसी ॥९६॥ तेथुनी सन्निध कृष्णातीरीं । जे का विख्यात ब्रह्मपुरी । तये स्नानासी निर्धारीं । निघाले साचारी तुकाविप्र ॥९७॥ निर्गुणपुरीचा उत्छाह जाहाला । प्रार्थीयेले सकळसंताला । घेउनी गेले ब्रह्मपुरीला । माहीला काला तेथें पै ॥९८॥ दिनत्रई आनंदान । अहोरात्र कीर्तनभजन । दिंड्यापताकानिशाण । कोंदले गगन गजरे त्या ॥ ९९ ॥ जेवणारासी नाहीं गणती । जेथें सिध्दि स्वये राबती । अंनपूर्णा श्रीभगवती । तिष्टे शक्ति पाकशाळे ॥ १०० ॥ विणेमृदंग झणत्कारीती । ठाई ठाई नृत्य करीती । स्वर्गी-हुनी देव पाहाती । पंढरी ह्मणती दुजी हे ॥ १ ॥ ऐशापरी उत्छाह-

सोहाळा । येळअनसेशी गोपाळकाला । पूजन करुनी विष्णुपदाला । प्रसाद दिधला सकळांका ॥ २ ॥ महापुरींत उत्तम स्थळ । खडकावरी श्रीपाउलें । रमटळीं तीं पाहतां डोळे । सुरसोहाळे प्राप्त जीवा ॥ ३ ॥ कृष्णावतारीं श्रीभगवान । तये स्थानीं खेळले जाण । सहस्तें काला करून । धाटिला पूर्ण गोपाळां ॥ ४ ॥ ते हे जागा पवित्र रम्य । कृष्णातीरीं अगाध परम । तेथें राहती चित्सुखधाम । तुकाराम महाराज पै ॥ ५ ॥ ऐसे अनेक स्थळीं मठ करुनी । उद्धरीले जेणें प्राणी । शेवटीं केली अपूर्व करणी । गुरुचरणीं तनु ठेविली ॥ ६ ॥ ऐकतां ते सत निर्याण । जीव पावती सकळ कल्याण । तुका विप्र जगीं धन्य । जाहाला जाण अवतार ॥ ७ ॥ शिष्येसहीत आनंदेसी । निघाले महाराज पढरीसी । तये वेळीं सर्वत्रासी । भजन भीक्षेसी मागती पै ॥ ८ ॥ म्हणती आतां हें चि भेटी । आम्हांसी जाणे निजवैकुंठीं । ऐसी सांगुनी सकळा गोष्टी । उठाउठी निघाले ॥ ९ ॥ ध्वजापताका झळकती । मार्गीं चालतां भजन करीती । येते जाहले सत्वरगती । रुक्मीणीपतीसी भेटावया ॥ ११० ॥ सतासहीत पद्मनेत्र । आराधिला तुकाविप्र । भेटीसी आले सकळक्षेत्र । समाप्तीतंत्र ऐकुनी ॥ ११ ॥ आज्ञा मागतां देवासी । गहींवरले हृषीकेशी । सांगती स्वयें रुक्मीणीसी । पंढरीनिवासी सजळनेत्रें ॥ १२ ॥ म्हणे माझा विप्रतुका । सांडुनी मजला जातसे निका । लाचाउनी भक्तिसुखा । वियोग दुःखा देतसे की ॥ १३ ॥ मग पोटासीं धरुनी निजभक्ता । कुरवाळिलें प्रीतीनें तत्वता । म्हणती तुकाविप्रा काय आतां । उत्तीर्णता होऊं मी ॥ १४ ॥ सहा जन्में भक्ति केली । तयेची मज न बोलवे बोली । अनत जन्में मागीतली । तुवा बापा ॥ १५ ॥ माझी अनतपणाची शक्ति । वरीतां जाहालासी निजभक्ती । वियोगाची फार खंती । मजप्रति वाटतसे ॥ १६ ॥ तुकाविप्रें जोडुनी पाणी । विनविला शारंगपाणी । म्हणे लीलेसाठीं ज्ञानखाणी । वियोग मनीं न मानिजे ॥ १७ ॥

जाणें येणें तुझ्या पाईं । तरंग उदधीसी सोडीत नाहीं । श्रीगुरूसमाधी-सन्निध पाही । अर्पण पाईं तनु करणें ॥ १८ ॥ तुकाविप्र प्रार्थीता देंसें । निघाले संगे जगंनिवास । वाद्यें वाजती बहुवस । भजन होतसे प्रेमळ तें ॥ १९ ॥ शिष्यमंडळी समवेत । आले करमळेगांवात । तेथुनी पुढें चालतां पंथ । सित्धस्थानातें देखिले पैं ॥ १२० ॥ तया-स्थाना पाहून । चित्तासी जाहालें समाधान । उपवासिया मिष्टान्न । निरधना धन ज्यापरी ॥ २१ ॥ असो तुकाविप्र अंजनावतीसी । आले श्रीगुरुसमाधीपासी । तेथीळ सतोष बोलावयासी । वाच्या शेषासी थोडवया ॥ २२ ॥ मग येकाग्र अंतःकरण । समाधीचें केलें अर्चन । उभे ठाकले स्वयें आपण । कीर्तनासी जाण तुकाविप्र ॥ २३ ॥ आजन्म प्रभृति जें जें केलें । तें तें चरणी निवेदीलें । आरती कराया आरंभिले । श्रीविप्रनाथ भले स्वामीचे ॥ २४ ॥ करूनी गुरूदेवाची आरती । ते चि देह्याची समाप्ती । पचप्राण लाउनी ज्योती । सद्गुरुप्रति ओवा-ळिले ॥ २५ ॥ तुपाची वाटी देणें होती । ते देह्याप्रति कल्पिती । आयुष्य ते ची निश्चीती । आजाव युक्ति केले पैं ॥ २६ ॥ प्राणाची करूनी पंच्यारती । समर्पीली देह्यांती । ह्मणुनी जयानी कथेत आरति । जगप्रवृत्ति केलीच नाही ॥ २७ ॥ ऐसा समारंभ करून । ज्योतीसी निजज्योति मेळवून । सद्गुरुपदीं होउनी लीन । स्वरूप चिद्घनमय जाहाले ॥ २८ ॥ शालीवाहन शके सोळाशे । सवत्छर नाम आसे । अनुक्रम तिथी मास । निजधामास गेले पैं ॥ २९ ॥ गुरूदेवा परौता काहीं । मंत्र देव तीर्थ नाहीं । ती तिन्हीं येके ठाईं । नांदती पाहीं येकत्वें ॥ १३० ॥ गुरु तो चि देव जाण । तत्वाक्य मत्र पूर्ण । पादोदक तीर्थपान । करी पावन सकळिका ॥ ३१ ॥ ह्मणुनी सर्वस्वें लीन व्हावें । सद्गुरुराया शरण जावें । तेणें सकळसित्धी पावें । हा अनुभव प्रत्यक्ष ॥ ३२ ॥ महापापी मतिमद । परी स्वामी समर्थ सित्ध । देउनिया निजात्मपद । चरीत्र विषद वर्णविती ॥ ३३ ॥ सित्धरूपा राजारामीं । देहमान फौचि उर्मी । वृत्ति निमग्न सदा ब्रह्मीं ।

स्वप्न नेहमीं करीतसे ॥ १४ ॥ कानड्या रामराजाचा अवतार । कथन तयाचें होईल बरें । श्रोतावक्ता जानकीवर । अवधान सारें द्यावें तुम्ही ॥ १३५ ॥ भक्तमंजिरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरतो मनोरथ । तुकाविप्रस्वामी आख्यानातें । अध्याय समाप्त द्वितीय हा ॥ १३६ ॥ अध्याय ॥ २ ॥ ओव्या संख्या ॥ २२७ ॥ अनु० अ० ६६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ६७

## — कानडा रामराजा भास्करसंत चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जया जि सद्गुरूनाथा । मायामलत्रिगुणरहिता । अज अव्यय अनंता । सिद्धनाथा श्रीमूर्ति ॥ १ ॥ स्मरण करीता तुझे हेरंबा । सबाह्य होसी तूं चि स्वयंभा । पंचभूतादि करुनी नामा । व्यापिलें सांमा परीपूर्ण ॥ २ ॥ वागवरदे स्फुरद्रुपाणी । धन्य मायें तुझी करणी । जिव्हासनीं प्रगट होउनी । वदवीसी वाणी आत्मस्थिती ॥ ३ ॥ कृपासागरा सिद्धनाथा । अनन्य चरणीं ठेविला माथा । जगत्रई उदारदाता । नसे चि पाहतां अन्य तुजे ॥ ४ ॥ धन्य धन्य तीं श्रीपाउलें । पाहतां जीवित्व चि मावळलें । बोलावया नसे उरलें । भरून उरले हि चराचर ॥ ५ ॥ उत्तीर्णता न होये फदा । निरसीली आवघी द्वैतबाधा । मेळविले निजात्मपदा । ध्यानस्थ सदा केले पै ॥ ६ ॥ आतां कवणें गुणें करूं सेवा । पूजकपण हारविलें देवा । तूं चि जाहला स्वयंमेवा । श्रीराघवा सकळ कांहीं ॥ ७ ॥ रामांग्री व्यापकपण । अवघा चि भरला नारायण । पाहाते पाहाणें दर्शन । गेलें मिळून ठाईंच पै ॥ ८ ॥ तरी दयाळा येक मागणें । आवडे भले सेव्य सेवकपणें । तेणे चि अनुभवें स्वसुख जाण पूर्णे । वर्णीन गुण संतकथा ॥ ९ ॥ परीसोनिया मग विनवणी । बोलवी काय वरदपाणी । राहुनी सदा अंतःकर्णी । वेद-

दीन जनीं मानसीं ॥ १० ॥ श्रमय येतां श्रीस्वामीचें । बळ पावलें प्रेमाचें । गाऊं चरीत्र संतांचें । तें ऐकतांच पाप हरे ॥ ११ ॥ पूर्वी कानडा रामराजा परमभक्त । जाहला असे प्रख्यात । ते कथा सर्वांसी विदित । आहे निश्चीत ठाऊकी॥१२॥ आनागोंदोसी श्रीविठ्ठ । घेउनी गेला भक्तिबळें । भानुदासासी सूळीं दिले । पल्लव फुटले मग तया ॥ १३ ॥ असो तो वृत्तांत सर्वांसी ठाऊका । परी सांगणें कांहीं येक । साधुछळण जाहलें कौतुक । पंढरीनाईक मग आले ॥ १४ ॥ मग तया राजियाते । अनुताप जाहला निश्चीत । वृथा गांजिला भगवत्भक्त । पडला संतद्रोह पै ॥ १५ ॥ तो संकल्प राहीला मनीं । आराधीला चक्रपाणी । ह्मणे मी जन्म घेउनी । संतसेवनीं घालवीन काळ ॥ १६ ॥ साधुपरते नाहीं दैवत । संतचरणीं सकळ तीर्थे । दानें तपें नानाव्रतें । द्वारीं तिष्ठत साधूचे ॥ १७ ॥ संतकृपेवीण कदा । न मिळे चि सर्वथा आत्मपदा । अनेकसाधनें केलिया विपदा । जन्म आपदा न तुटे चि ॥ १८ ॥ साधुची येक भवार्णवीं नौका । इतर साधनीं चपटा धोका । संतपुजेवीण निश्चळसुखा । न पावे देखा प्राणी तो ॥ १९ ॥ संत कृपेचे सागर । संत वैराग्याचें विराट । संत शांतीचें माहेर । भक्तीचें थोर आयुष्य पै ॥ २० ॥ संत ज्ञानाचें जीवन । संत सुखाचें मंडण । संत हा चि नारायण । सत्य जाण त्रिवाच्या ॥ २१ ॥ असो संतसेवेच्यार्गी । अवतरलासे नृपयोगी । ते चरीत्र ऐकतां जगीं । आत्मरंगीं विनटे जिव ॥ २२ ॥ भानुदास स्मरणाचा अभ्यास । त्याचीं नामाचा धारण विलास । भास्करराव अभिधानास । ठेविलें विशेष मायबापें ॥ २३ ॥ देवा आणीले ह्मणुनी आणा । बोलती जगीं तया सर्वज्ञा । कर्मशुद्धकुळींब्राह्मणा । जन्मले जाणा तयाउदरीं ॥ २४ ॥ राजचिन्हें तीं सकळिक । नीती न्याय विच्यार विवेक । मंत्रीपणाचें प्रभुत्व निके । साजे चोख जयाअंगीं ॥ २५ ॥ स्वरूपसौंदर्य लावण्यगाभा । च्यातुर्य तेज फाकलो नभा । उदेला भास्कर निजआत्मप्रभा । प्रकाशशोभा ज्ञानाची ॥२६॥ दिवसोदिवस वाढता जाण । बुद्धी चढती जेविं चंद्रांशकीर्ण । मग

जाहाले व्रतबंधन । स्नानसंध्या अध्ययन अतिप्रीती ॥२७॥ ऋणानुबंधे करून । पुढें जाहलें रायाचें लग्न । बाह्य प्रपंच दाविती जगालागून । परमार्थी जाण अतिदक्ष ॥ २८ ॥ शांत्यादि लक्षण सुहास्य । भूतदयेची तरी मोतीवमूर्ते । मागील स्थीती शाल्वंकत । राजेंद्र सत्य अवतार ॥ २९ ॥ पूर्वी अनागोंदीमाजि राज्य करीत । चोरी जाहाली असे नगरात । तस्करासी धरुनी आणीती दूत । नृपनाथाजवळी ते ॥ ३० ॥ धानडाराजा सभास्थानीं । लोक सांगत आले गान्हाणीं । आज्ञा करावी आज्ञालागुनी । ताडण करूनी चोराचें ॥ ३१ ॥ महाराज ह्मणाति इकडे आणावे । तस्करासी दृष्टी पाहूं यावे । वाडीयांतचि ठेवावे । करू नये उपद्रव सर्वथा ॥ ३२ ॥ राजेश्री येउनी रागासी । जगाचिये मनोधारणासी । ह्मणती त्यावरि यासी । ठोंबन्यासी आंवट दही ॥३३॥ तस्कर बहु सुखावले । उत्तम अन्न भक्षुनी पुष्ट जाहले । काहीं काळें आणविले । सदरेस भले सामीनी ॥ ३४ ॥ अवलोकन करीती तया चोराप्रती । कृपाबळें फळवळे तो भूपति । ह्मणे याते सूज चढली निगुती । फुटेल निश्चिती हि घाण ॥ ३५ ॥ या ते ग्रामाबाहेर घालवावे । आज्ञापिले सेवका बरवें । ऐसे शीक्षिलें स्वभावें । तेचि पाहवे चिन्ह येथें ॥ ३६ ॥ ऐशा अनेक स्थीती । ग्रथांतरी वर्णील्या असती । या आख्याई सागणे प्रस्तुती । अवतार कृति ते सकळ ॥ ३७ ॥ ती गोष्टी सुंदर ऐका । आणा बैसले स्नानासीं देखा । तो बार काढीला हिंसक लोका । अत्यजे नेटका आम्रवागेंत ॥ ३८ ॥ आवोळिते टाकिले । अर्धांग ऐसे भिजविले । तैसेंचि ते निघाले । अरण्यांत मेले सत्वर ॥३९॥ नगरस्थजन मागे धावती । आणविले तया मातंगाप्रति । श्वापदाते सोडविती । आयुधें घेती हिरोनी ॥ ४० ॥ नतर सारीला स्नानविधी । ऐसा प्रभु तो कृपानिधि । जगा उद्धरावया विविधीं । नसे अवधी तयाते ॥ ४१ ॥ केव्हडा दयेचा प्रेमा । सर्वांभूतीं पाहती आत्मया- रामा । उलधिती द्वैताची सीमा । अभेद प्रेमा नादती ॥ ४२ ॥ आणीक ऐका दयेचें नवल । माळीयाते काम लाविले । तो पक्षीयाचे

कोठें देखिलें । ह्मणती स्थळ हे राहूं द्या ॥ ४३ ॥ हासती सकळजन । काम चि राहविले जाण । महाराज तो करूणाघन । काय वर्णन करूं मी ॥ ४४ ॥ ज्ञानेश्वरें अहिंसेचें रूप केलें । ते मूर्तिमंत अवतरले । मानवरूपें प्रगटले । दयेचें सोज्वळ निजरूप ॥ ४५ ॥ येवं अनेक लीळा । मति न पुरे त्याहावयाला । जेणें आत्मा ओळखीला । श्री-गुरूला शरण ते ॥ ४६ ॥ शुध्दउपासना श्रीराममक्ति । जन्मांतर योध रंगली वृत्ति । रामनवमी पुण्यतिथी । करणे प्रीतीं आवडीनें ॥ ४७ ॥ मेळउनी साधूंचा समाज । उत्छाहा करिती स्वानंदयोज । तो सोहाळा वर्णीतां आत्मसेजे । मानस माझे पहुडलें ॥ ४८ ॥ ग्रंथांतरीं केलें वर्णन । तदनुसार क्रम जाण । छत्रच्यामेरमकरे पूर्ण । चित्रें लेखन नानापरी ॥ ४९ ॥ रामायणज्ञानेश्वरीभागवत । जे जे आध्यात्म ग्रंथ । तयाचे अर्थ करी तो समर्थ । भास्करपंत अभिधान ॥ ५० ॥ हा रामराजा अनागोंदीचा । अवतरलासे पुन्हा साचा । विच्यार करावा चरित्राचा । प्रताप तयाचा अगाध पै ॥ ५१ ॥ हे जाणवले सकळ संता । भेटीसी पावले तया समर्था । देशोदेशीचें साधु ऐकता । आले सर्वथा त्या ठाईं ॥ ५२ ॥ करवीरक्षेत्रापासून । सार्ध युग्म योजन । बागणीग्राम बोलती जन । तेथें संतजन नांदे तो ॥ ५३ ॥ नगरासांनिध्य विश्रामबाग । बिल्वादीवृक्ष लाउनी सांग । स्थळ योजुनी निःसंग । संतसंग आरंभिला ॥ ५४ ॥ तापसी योगाभ्यासी पुरश्चरणी । विरक्त उदासीन येती कोणी । तयाचिये लागावे चरणीं । घ्यावे ठेउनी प्रीतीनें ॥ ५५ ॥ कोण्हीं कीर्तन कराया येती । सन्मानावें तया निगुती । पुर्वूनिया मनोरथी । करावी तृप्ति ईछित ते ॥ ५६ ॥ कितीयेक मागती वस्त्रें पात्रें । अलंकार भूषणें विचित्रें । आर्पण करूनि विचित्रे । संतोष क्षेत्रे करीति पै ॥ ५७ ॥ कैसाहि भेटो प्राणी । समाधानाचि करुनी जनीं । यथोक्त प्रजापाळणी । राम चि जनीं राजा तो ॥ ५८ ॥ परचक्र येता प्रांतासी । लोक पळोनी येती आश्रयासी । सांभाळूनी खंडणीसी । देती तयासी आपणचि ॥ ५९ ॥ संस्थानाचे माहापुरूप ।

येती दर्शन घ्यावयास । तयाचे पूर्ण करिता साहित्यास । मेरी विशेष पताका ॥ ६० ॥ वदता साधूची ऐकतां । आणावे तया सर्वांसी तत्वता । चैन न पडेचि सर्वथा । उद्विग्नता व्हावी पै ॥ ६१ ॥ कारकून माणसे घोडी । पाठवावी सीव्य करुनी गाडी । म्हणती मजला द्यावी जोडी । निझापना जोडी त्याहावी ते ॥ ६२ ॥ जागृतीं स्वप्नीं तोचि ध्यास । उसणत उठावे अतिहर्षे । आलिंगन द्यावे तयास । हेचि निःशेप वाटे पै ॥ ६३ ॥ मार्ग अवलोकन करीत बैसावे । विना वाजताचि तिकडे धावावे । वेशधारी असो पायास लागावे । चरण चाटावे तयाचे ॥६४॥ जेवि त्या गोविंदासुताराचें प्रेम । ह्यालुंगीचा भक्त तो निःसीम । तयापरी आवडीचा धर्म । दर्शनीं परम वहुवेड ॥ ६५ ॥ अध्यात्मवक्ता जो जो पुरुष । तया न विसंबत क्षणेक मानस । सर्व मावें होउनी दास । करावें दास्य सकळही ॥ ६६ ॥ उष्णकाळीं नानाउदकें । प्राशन करवावीं श्रोतांसी देख । वारा घालावा स्वअंगे कौतुकें । आनंदसुखें सर्वामूर्ती ॥ ६७ ॥ येकांतीच बैसावें । आत्मचिंतनीं मन ठेवावें । योगाभ्यास तो बरवे । विदित सर्व असतां पै ॥ ६८ ॥ चक्षूसी देखणी सिद्धमार्ग । तें तो ठाउके संपूर्ण सांग । मुद्रादिक प्राणायाम निःसंग । इत्यादिमार्ग अभ्यासिला ॥ ६९ ॥ ध्यानधारणा समाधी । सहजासहजी भोगी तो सुबुद्धी । क्रीडतसे स्वानंदनिधी । ज्ञानवृत्ती सहजी ते ॥ ७० ॥ ज्ञानेश्वरीचा निजमर्म सुरेख । करणें हा तो तयाचा हक्क । वेडाचि केला वैकुंठनायक । तिष्टे देख मार्गे पुढें ॥ ७१ ॥ वैकुंठ ह्मणजे कल्पना कुंठित । तेचि जाणावें वैकुंठ सत्य । स्वरूप सबाह्य कोंदत । आपण हारपत तद्रूपीं ॥ ७२ ॥ मग जें जें तेणें करावें । तें तें देवचि करी स्वभावें । या नांवें शुद्ध भाव । भक्ति सोऽहंव स्वरूप ते ॥ ७३ ॥ भक्त ह्मणउनी विभक्त राहाती । चावटी ज्ञान कथनी गाती । काय करुनी तयाची संगती । जया भगवंती नम्रवेशु ॥ ७४ ॥ काय गाउनी व्यर्थ तनाना । शिकले वाप्याळ ब्राह्मणपण्या । विसरोनी स्वरूपासी जाणा । विषय मरणा

गुंतले ॥ ७५ ॥ जो तो करी दुजिया बोध । ठाई न पाहे गुण गुण भेद । करी वटवट सगि विपद । भमे अंध स्वयेंचि तो ॥ ७६ ॥ अनपेक्षी तोचि अधिकारी । फेडी संसाराची बोहरी । चढला परमार्थाचे शिखरीं । निज आत्मविवरीं स्थिरावला ॥ ७७ ॥ जोवरी देहाची श्लाघ्यता । उपरती जव न होये चित्ता । काय तयाचे जाळावे थग्रुत्वा । प्रतिष्ठा अपवित्रा डिंढविडोळि ॥ ७८ ॥ नाहीं आशेचा जाहला क्षय । इंद्रियें अंकीत जयाचा देह । तयाते निजसुख होये । न घडे निश्चय त्रिवाचा ॥ ७९ ॥ देह नैश्वर्य ऐसा कळला । संसारदुःखा निपजला । तोचि अधिकारी येथे बोलीला । नातरी सगळा भ्रमचि तो ॥ ८० ॥ असो आतां हा प्रकारू । करा आपुलाला विच्यारू । भरवसा नसे साच्यारू । पळमात्र निमिष्याचा ॥ ८१ ॥ श्वास सुटला तो पुन्हा माघौता । स्थिर होईल हे तत्वता । हा निश्चयो नेणवे सर्वथा । सावध चित्ता होईजे ॥ ८२ ॥ आज उद्यां ह्मणता च्यारी । दिवस जातील निर्धारीं । वेगीं सद्गुरूचरण धरी । काळ शरीरीं ग्रासीतसे ॥ ८३ ॥ माहांन बहुत आयुष्याचे । मेले फार वैभवाचे । तूं तर पामर किंतुले साचे । नाम वाचे स्मरा वेगीं ॥८४॥ न लावीं आतां काळवेळ । सांडी विषयाची तळमळ । होउनिया निश्चळ । स्वरूप प्रांजळ धुंडाळी ॥ ८५ ॥ साधुसेवेविण कांहीं । स्वसुखाची तो प्राप्ति नाहीं । उपदेशीती शास्त्रें साही । घ्याई हृदईं आत्मत्व ॥ ८६ ॥ संतपूजनाचा महिमा । न सांगवेचि दुजी उपमा । ईछीतसे विष्णु विरंची उमा । आदिब्रह्माकरूनी ॥ ८७ ॥ साधु अर्चन जया घडलें । भाग्य तयाचें न जाय वर्णीलें । तेणेंचि येउनी सार्थक केलें । येरे गमाविलें नरजन्म ॥ ८८ ॥ नातरी ते पशु बरवे । पढत मूर्ख हे मानव । सांगता ऐकता तेचि करावें । दृष्टांत द्यावे कोण तया ॥ ८९ ॥ पाषाण उपमावा तरी गौण । हे पुन्हा धरीती अवगुण । निकट करी दगड पाषाण । सर्वदा आपण तैसाचि ॥ ९० ॥

कांहीं न पडे उपयोगी । व्यर्थ शिणविले माये जगीं । ते प्रेत असोनी सचेतनआगीं । शरण सारंगी न होती जे ॥ ९१ ॥ असो ते संत कृपेचें पात्र । आंणामंत्री परमपवित्र । चिदाकाशीं नक्षत्र । पुनर्वसु स्वतंत्र तयापरी ॥ ९२ ॥ कानडे म्हणजे जे न कळे । जे साध्य साधनातें नाकळे । जेथें वेदादिकी मौनता सोज्वळ । सेवियली सिध्यपदीं ॥ ९३ ॥ तोचि आत्मा रामराजा । कानडा म्हणती तयासी ओजा । अटल्या सहजी द्वैतपैजा । भास्कर भजा ज्ञानकीर्ण ॥ ९४ ॥ आंणा अणीले हे आनुभवा । तो सहजी मंत्री म्हणावा । पंचभूताचा मेळावा । सरला बरवा जये स्थळीं ॥ ९५ ॥ अंतरमुख जे असती । तया प्रवेशु येथीचे अर्थी । येरा संशयाची गुंथी । अहंकृति मच-वादें ॥ ९६ ॥ असो कानडा रामराजा । तो हा भास्करराव मंत्री ओजा । भजावया पंढरीराजा । अवतार सहजा मागौता ॥ ९७ ॥ ध्यानीं मनीं सदा पंढरी । राज्य करणें लोकाच्यारी । अखंडीत ज्याची वारी । वदे वैखरी गुरुनामें ॥ ९८ ॥ शेवटीं निर्याणसमय जाणुनी । पंढरीसी गेले प्रीती करूनी । लक्ष तुळसी वाहुनी । हरी अर्चनीं तोषविला ॥ ९९ ॥ तये काळीं श्रीभगवान् । गहिंवरले प्रेमें करून । देउनी गाढ अलींगन । स्फुंदती जाण पुनःपुन. ॥ १०० ॥ संतवृंदा सांगुनी निके । येउनी आपुले जन्मभूमीके । विठ्ठल ध्वनीं गर्जुनी सुखें । विसरजी सुखें देहभावा ॥ १ ॥ हें चरीत्र गाता ऐकतां । आवडता होये पंढरीनाथा । भक्तितत्व लागुनी हाता । सायोज्यता पाविजे पै ॥२ ॥ ग्रंथ करविता श्रीविठ्ठल । आवडती भक्त ज्या तुळसीदळें । संतमंजरी ध्यावया माळ । सिध्यचि गोपाळ तिष्ठतसे ॥ ३ ॥ उपासना श्रीरघुवीर । तोचि स्वामी हा विटेवर । यालागीं स्वामीसन्मुख अंजनीकुमर । वैष्णववीर जगद्गुरू ॥ ४ ॥ अवतार तयाचा प्रसिध्य । रामदास जाहले पुन्हा सिध्य । सापडतां तें निजपद । लाघला प्रसाद सहजी तो ॥ ५ ॥ आज्ञापिता कृपेकरून । ग्रंथमजीरी होतसे जाण । ऐसा महाराज दयाघन । दाविलें कल्याण माझे मज ॥ ६ ॥ अखंड

चरणीं ठेउनि शीर । अर्पीतसे हा सुमनहार । राजारामी श्रीगुरुवर । अनन्य विच्यार पूजियेला ॥ ७ ॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । रामराजा भास्करसंत । चरीत्र सकृत अध्याय हा ॥ १०८ ॥ अध्याय ॥ १ ॥ ओव्यासंख्या ॥ १०८ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीराधाकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ६८

## — विठोबादादा चातुर्मास्ये —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो श्रीनित्यानंदा । सचिदपदद्दात्या विपदा । येकी अनेक पदा । द्यावेसी छंदा तुचि पै ॥१॥ नानारूपें नटोनी अससी । परी अलिप्तपणें सर्वांसी । कांहीं उपाधी तुजसी । निश्चयेसी न बाधेचि ॥ २ ॥ सकळा नियंता । आज्ञा न मोडवे कृतांता । बाह्यदृष्टी पाहूं जाता । कवणा सर्वथा न दिससी ॥ ३ ॥ जय सद्गुरु सिध्यमूर्ति । परात्परा श्रीरघुपति । पुंडलीकास्तव पंढरीप्रति । राहसी भक्ति देखुनिया ॥ ४ ॥ युगत्रै कांहींयेक । जगदोध्दार केला देख । परी विषई गुंतले लोक । बुडती निःशंक मायाजळीं ॥ ५ ॥ यालागी स्वये दीनदयाळें । परमार्थाते आंगीकारीलें । परमहंसदिक्षे धरीले । वाढविलें भजन पै ॥ ६ ॥ समचरण कटी कर । उभे ठाकले जानकीवर । तिष्ठे पुढे अंजनीकुमर । पंढरपुर धंन्य ते ॥ ७ ॥ याचका आश्रम कर्मरहित । निष्कर्मपणें विराजीत । सोवळे ओवळे नसे तयाते । वेद वदत स्वयें पै ॥ ८ ॥ ह्मणुनी पांडुरंगी अद्वैतता । शोभती जाहाली पंढरीनाथा । पात्रापात्र नसे तत्वता । करीती कृतार्था कृपेनें ॥ ९ ॥ शुकसनकादिक चोखामेळा । समसाम्य श्रीगोपाळा । । पाहती डोळा सर्वत्र ॥१०॥ नामदेवें दुग्ध पाजावें । चोखामेळ्याग्रहीं जेवावें । परमहंस वासुदेव । जाहाले माधव पंढरीसी ॥ ११ ॥ राम भवतारीं श्रीवसिष्टें । उपदेशिलें

ब्रह्म गोमटें । द्वापारयुगीं संदीपन श्रेष्ट । तत्व घरीटें जें दाविलें ॥ १२ ॥ तयाचा ध्यावया निज अनुभव । समदृष्टी उभे राघव । नासीकाग्रीं ठेउनी भाव । करीती बरवे आत्मचिंतन ॥ १३ ॥ समचरण समहस्तें । ईडा पिंगला होती रियत । याचिसाठीं रुक्मीणी-कांत । खूण दावित निजभक्ता ॥ १४ ॥ तयाभक्ताच्या प्रेमळ गोष्टी । वर्णू जातां अनंत पोटीं । संतमंजरीमाळ कंठीं । शोभे निकटीं श्रीविठ्ठला ॥ १५ ॥ तयांतील मणी च्यातुर्मास्ये । विठोबादादा ह्मणती व्यास । जो कां अवतार भानुदास । चरीत्रास ऐकीजे त्या ॥ १६ ॥ अनागोंदीहुनी देव आणिला । हर्ष जाहाला संतमंडळा । विपत्ति घडली देहाला । उपकार केला निजवैष्णवे ॥ १७ ॥ तयासुखा नाहीं पार । संतोषलें पंढरपुर । साधु करीती जयजयकार । उल्हास थोर सकळीका ॥ १८ ॥ स्वर्गीहुनी सुमनवृष्टी । देवा आल्हाद न माय पोटीं । ह्मणती काळा वाळवंटी । याहीळ जगजेठि आला सर्वा ॥ १९ ॥ भक्तसमग्र मिळोन । करीती श्रीभानुदासाचें स्तवन । तो अमानित्वेंकरून । करी नमन सर्वांसी ॥ २० ॥ संतवृंदें करीती विचार । पळया जाहाला हा श्रीधर । सोडुनी पुंडलीकाचें द्वार । गेला साच्यार अनागोंदीसी ॥२१॥ आतां हे भक्त मिळतां । हा देव जाईल तत्वतां । यासी राखावें निश्चीता । नट नाठ्यता न कळे पै ॥ २२ ॥ हा मूळिहुनी नाटोपे कवणासी । आतां सावध राखा यासी । ऐसे वदता ऋषीकेशी । बोलती दासासी स्वलीळे ॥ २३ ॥ ऐका ह्मणे श्रीपांडुरग । तुह्मी बोलता हे चांग । परी माझा मनोधर्म सांग । ठाउका अव्यग आहे तुह्मा ॥ २४ ॥ जेथें जेथें कीर्तन होय । तेथें गाडी उडी जाय । तरी मी अखंड सोय । तुमची स्वयें राखीतसे ॥ २५ ॥ तुह्माजवळी हे असतां कां गा उगे भ्रमतां । कासया विच्यारीं पडतां । वाहता चिचा भ्रमेंचि ॥ २६ ॥ मग सकळसाधु भानुदासातें । विनवोनी सांगती गुह्यार्थ । तुह्मी आणिले देवातें । राखीजे निरुते आता पै ॥ २७ ॥ आज्ञा वंदोनी भक्तशिरो-मणी । मस्तक ठेविला समचरणीं । आरंभ केला कीर्तनपर्णी । ते वाणी

काय वदूं ॥ २८ ॥ भानुदासाचें कीर्तन । श्रवण करीती श्रीभगवान । तेथील वर्णुत्व वर्णी कोण । डोलती जाण नरनारी ॥ २९ ॥ बहुत-काळ ऐशापरी । कीर्तनीं तोषवी वैकुंठविहारी । धन्य धन्य ते पंढरी । नभ गजरीं कोंदलेसे ॥ ३० ॥ भानुदासें देहभाव अपुला । अवघा देवासी वाहीला । विठलें आपुलेपणाला । सर्वस्वाला अर्पीले ॥ ३१ ॥ मग निर्गुणस्वरूपीं लीन जाहले । परी कीर्तन पुरश्चरण तें राहीलें । भजनरंगी मन रंगलें । देहा धरीले पुन्हां पै ॥ ३२ ॥ नव्हे नवा तो भक्त । ह्मणुनी अनवैष्णवीं जन्म घेत । ऋग्वेदें ज्याला शोभत । धन्य होत माता पिता ॥ ३३ ॥ जयाचे देशीं साधु अवतरती । पवित्र भूमी तीं निश्चीतीं । मग तें कुळ पावन कितीं । वदतीं ग्रंथीं व्यासादिक ॥ ३४ ॥ असो विठलनामें भानुदासें । अवतार घेतला अनायासे । ध्यान पाहतां अति विलसे । चिन्हें देहास पूर्वील तीं ॥ ३५ ॥ ठेंगणी तुंदिल ती सावळी । मुर्ती प्रेमाची ओतिली । कीर्तनरंगीं शोभली । सर्वकाळीं अत्यादरें ॥ ३६ ॥ च्यातुर्मास्य व्रतासी । जेणे स्वीकारीले नेमेसी । वेड लाविलें देवासी । श्रीहरीसी हिंडवी मार्गे ॥ ३७ ॥ कीर्तन-रंग माजविला । श्रवणीं आल्हाद सर्वांला । देव तरी बराडी केला । प्रेमळ कथेला निजसुखें ॥३८॥ महाद्वाराहुनी पाहत । अथवा गरूडासी घाडीत । कीर्तनीं तो भाविक भक्त । करीत नृत्य पाहवयाला ॥ ३९ ॥ पांडुरंगासी कथेचें वेड । तयाविण कांहीं न लागे गोड । अवघे भक्ताचा पवाड । वानिती चोखड निजवदनें ॥ ४० ॥ तेव्हां बोले रखुमाबाई । तुह्मांसी देवा नावडे कांहीं । अखंड भक्ताचिये ठाईं । सर्व कांहीं प्रीतीनें देवा ॥ ४१ ॥ श्रीविठल बोलती प्रियेसी । मी उत्तीर्ण नोव्हे साधुसी । तयाचिये उपकारासी । न फेडवे मजसी कदा ही ॥ ४२ ॥ मी वृत्तिशून्य सर्वदा पाहीं । त्यांनीं वृत्ति अर्पिली माझीये ठाईं । ह्मणुनी वृत्तिवंत सदाही । जाहलों देही असे पै ॥ ४३ ॥ मन बुद्धीसी अंतःकर्ण । जीहीं मज समर्पिलें जाण । मिनलो घेउनी गुण । भक्ताचे पूर्ण निजांगें ॥ ४४ ॥ मज आचक्षु लोचन । गंध घ्यावया

दिधले प्राण । सर्वेंद्रियें करुनि दान । देवपण शोभविले ॥ ४५ ॥ निर्गुणासी केलें गुणवंत । ऐसे सख्य भाग्यवंत । तयाची कैसी विसरूं मात । सांग सत्य आतां तूं ॥ ४६ ॥ मज नाम रूपा आणीलें । शरीर वयेसी वेचिलें । तयाचा उपकार कवणीये बोलें । फेडूं स्नेहाळे सांग केवि ॥ ४७ ॥ जे कांहीं दास्य करावें । तें तयाचे योगें घडे आघवें । उतराई कैसेनि व्हावें । हे नाठवे कदा हि ॥ ४८ ॥ जे जे ते संत बोलत । त्या बोलासवे मी जात । परी ते गति हे निश्चित । चैतन्य चित्त तयाचें ॥ ४९ ॥ याकारणें भक्त दास्याविण । मज प्रिये प्रिय नाहीं आन । ही तुंबरी राखी खूण । टदईं पूर्ण आपुले ते ॥ ५० ॥ ऐसे बोलोनी रखुमाईसी । देव चालिले श्रवणासी । सवें घेउनी नारदशुकासी । कपील ऋषी आदीकरूनी ॥ ५१ ॥ तों कथेचा प्रेमा अद्भुत । क्षणे श्रोतावक्ता पंढरीनाथ । ऐसें बोलोनी निजभक्त । कीर्तन रंगांत उभा ठाके ॥ ५२ ॥ प्रथम उभे राहावे । श्रीपांडुरंगा आठवावे । स्मरतां चि उदी व्हावे । अष्टौभाव येकसरा ॥ ५३ ॥ कथेचिये अगोधर । क्षीण असावे शरीर । विठलस्मरण होतां मरें । प्रेम थोर आवेश पै ॥ ५४ ॥ यावत्कथा समाप्तीसी । स्फुरण व्हावें शरीरासी । दशा होये प्राप्त ऐसी । विठोबा दासासी मायबळे ॥ ५५ ॥ च्यातुर्मास्य व्रतासी धरीले । कीर्तन वृष्टीसी आरंभिलें । वग्वृत्वरसे तोपविले । वर्षोन्नले साधुमेघें ॥ ५६ ॥ भाविक मयोर नाचती । प्रेमच्यातक वरते पाहाती । केंव्हां होईल प्राप्ती । सर्व ईछिती वाक्योदक ॥ ५७ ॥ कीर्तनीं करताळिका वाजत । तेचि जळ पतन शब्द होत । साधुवृंदें गरजना करीत । नाद बहुत आकाशीं ॥ ५८ ॥ वर्त्ते दिव्य चामराकार । करभूषणें कंठहार । त्या विद्युल्लता मनोहर । चमकती फार ठाई ठाई ॥ ५९ ॥ ऐसी घंटा चातुर्मास्य परीयंत । नित्यानंदें वर्षत । वर्षाऋतु पंढरीनाथ । रूक्मीणीकांत होउनी ठेला ॥ ६० ॥ तेथें नाना आख्यानें गंगारूपें । प्रवाह चि नसे माप । श्रोते श्रवणसिंधु चिद्रुप । मीनले आप तया नदा ॥ ६१ ॥ ऐसे

कीर्तनरंगीं जाण । श्रवणीं केला नारायण । कथारसीं सकळजन । सुखी पूर्ण पै केले ॥ ६२ ॥ जडजि अज्ञानासी । विठ्ठलमंत्र देती त्यासी । नित्य जप जपावयासी । आदरेंसी सांगती नेम ॥ ६३ ॥ यथाशक्ति करून । भाविक मंत्र करीती पठण । ऐसें भजन पुरश्चरण । मांडिलें जेणें निज आवडी ॥६४॥ आपण अखंड नामस्मरण । करुनी लोकांसी सांगती जाण । कथा करविती श्रवण । नित्यनेमानें साधुमेळीं ॥ ६५ ॥ जे जे कीर्तनीं बैसत । तयासी समाधी प्राप्त । योगी जिये सांडीत । योग विचरत प्रयत्न बळें ॥ ६६ ॥ तें सुख सर्वत्र जना । कीर्तनीं प्राप्त होये जाणा । विषई मुमुक्ष सज्ञाना । वेधीले मना आवडे कथा ॥ ६७ ॥ ऐसा उभविला भक्तिध्वज । संतुष्ट केला लोकसमाज । विठोबादादा धन्य माहराज । अवतार विराजे भानुदासाचा ॥ ६८ ॥ निवउनी तेणें श्रीहरीसी । वर घेतला निश्चयेसी । भाउकाच्या कथेसी । धावयासी प्रेमरंग ॥ ६९ ॥ जयासी न कळे तालस्वरज्ञान । तेथें स्वयें उभे राहून । प्रसादिक रंग पूर्ण । धावा आपण निजरूपें ॥ ७० ॥ आवश्य ह्मणुनी रमाकांत । गळा मिठी मारीत । माझे प्रेम तूं निश्चीत । ऐसे वदत रूक्मीणीपति ॥ ७१ ॥ ईया पंढरीक्षेत्रांत । विठोबादादा साधु समर्थ । च्यातुर्मास्य ह्मणती ज्याते । वाणी पुनीत त्या वर्णीतां ॥ ७२ ॥ कोणी येके दिनीं आले मानसीं । जावें दर्शना ज्ञानेश्वरासी । तये वेळींचे समारंभासी । काय वाचेसी वदूं ते ॥७३॥ दिंड्यापताका-टाळमृदंग । विणे झल्लरी वाजती सांग । मार्गे पुढें श्रीरंग । अद्भुतरंग भजनाचा ॥ ७४ ॥ जेथें जेथें वस्तीसी राहवे । कीर्तन तेथें स्वयें करावें । सामोरे येती ग्रामस्थ भावें । करीती गौरव बहुत पै ॥ ७५ ॥ जो जो प्राणी दृष्टीसी पडे । तयासी सांगती भजन चोखडे । स्वसुख देती रोकडे । दवडीती साकडे भवाचें ॥७६॥ ऐशाप्रकारें आळंदीसी । विठोबादादा भजनविलासी । जवळ जातां निश्चयेसी । नमस्कार देवासी केला पै ॥ ७७ ॥ पादुकापासुनी भजन करीत । भजनकडाका-गजर होत । पुढें पातले क्षेत्रस्थ । नमन करीत परस्परें ॥ ७८ ॥

घेऊनी गेले राउळासी । अत्यादरें च्यातुर्मास्यासी । पाहुनी ज्ञानदेवसमाधीसी । आले मानसीं प्रेमभरतें ॥ ७९ ॥ मग कीर्तनासी आरंभ केला । अनिर्वाच्य तो तो सोहळा । जन पाहती सकळ डोळां । डोल जाहल समाधीसी ॥ ८० ॥ ज्ञानेश्वर स्वयें डोलती । ऐसी कथेची अद्भुत स्थिती । स्वर्गांहुनी देव पाहती । अमर धावती मृत्युलोकीं ॥ ८१ ॥ धिःकारुनी अमृतपान । विटास वाटती जैसें वमन । विठोबादादाचें ऐकुनी भजन । आले निघुन आळकापुरीं ॥ ८२ ॥ मग तो समाज काय वर्णावा । जेथें रंग नोव्हे शिवा । अमरपति सांडुनी वैभवा । आला बरवा व्यास्थळीं ॥ ८३ ॥ धन्य क्षेत्र ते आळंदी । मिळाली जेथें वैष्णवमांदी । कीर्तनसोहळा आत्मसौख्यीं । सहज समाधी श्रोतिय ॥ ८४ ॥ असो ऐसा कीर्तनयज्ञ । च्यातुर्मास्यें केला येणें । उत्कृष्ट जाहाले संतर्पण । अन्नदान सकळीकां ॥ ८५ ॥ अवतार जो कां भानुदासाचा । विठोबादादा स्वयें साचा । कथारंग अद्भुत ज्याचा । आवडता देवाचा प्रेमळ तो ॥ ८६ ॥ मग तेथुनी स्वछंदें । देहुक्षेत्रासी गेले आनंदें । देखुनी जागा निरद्वंद्वें । जेवि नद नदीसी भेटला ॥ ८७ ॥ माहेरासी कन्या आली । की प्रेमळें द्वारका पाहीली । विठोबादादासी गति जाहाली । देहुस्थळीं येकात्मता ॥ ८८ ॥ कांहीं दिवस करोनी वास । कीर्तनीं तोषविला पंढरीनिवास । नैवेद्य करुनी सर्वत्रास । भक्तिसुखास मेळविले ॥ ८९ ॥ चिंचवड देखुनी गणपतीचें । अर्चन केले मोरेश्वराचें । भजन करुनी नेमाचे । परतले साचे माघारे ॥ ९० ॥ पुणीयात येतां वस्तीसी । आरंभीले कीर्तनासी । अपूर्व वर्तलें तेथें निशी । तये गोष्टीसी श्रवण करा ॥ ९१ ॥ विठोबादादा चातुर्मास्ये । कीर्ती जयाची विशेष । पुण्यांतील माविक पुरूष । आले दर्शनास लवलाही ॥ ९२ ॥ अनन्य भावें प्रार्थून । कथे करविला प्रारंभ जाण । श्रोते मिळाले संपूर्ण । विद्वज्जन आबाळ वृध्दें ॥ ९३ ॥ रस्त्यांत जाहली बहुत दाटी । कीर्तन रंगासी यात्रा मोठी । दादा बोलती प्रेमळ गोष्टी । प्रिय धुरजेटी तो कथेंत उभा

॥ ९४ ॥ श्रोतियासी येकाग्रता । भक्तिरहस्य वहर मोठा । विघ्न जाहले तेथें तत्वता । आले अवचिता नानाफडणीस ॥ ९५ ॥ स्वारी जावया वाट नाहीं । तेव्हां विपरीत आणीले हृदई । ह्मणती कोण येथें पाही । आला महिशहरांत माझ्या ॥ ९६ ॥ मुळविले येणें लोक सारे । निद्रा टाकुनी करीती जागर । पाहणें आतां चमत्कार । साक्षात्कार कैसा तो ॥ ९७ ॥ उन्मत्त हत्तीं खुळावला । माहुता करवि तो आणविला । निष्ठूरपणें हुकुम केला । मारावयाला जन तेथील ॥ ९८ ॥ आधींच आर्विद मद्यपानी । आज्ञापीले त्यांत नानानीं । वारण सोडिला तत्क्षणीं । गर्दी कीर्तनीं केली से ॥ ९९ ॥ मग आरडा येक चि जाहाला । कथारस वितळोनि गेला । धीर न धरवे कवणाला । पळाले घराला नरनारी ॥ १०० ॥ विठोबादादा शीष्येसहित । स्वईछें आपण कीर्तन करीत । ज्याचा सखा पंढरीनाथ । नृत्य होत स्वानंदें ॥ १ ॥ तो माहुतानें हत्ती चिथविला । आंगावरी बावाचे घातिला । अद्भुत घडली तेथें लिला । ऐका मनाला येकाग्र करुनी ॥ २ ॥ नरहरीचरीत्र दादांनीं । आरंभीले सहजी निर्वाणीं । प्रघटले दैवत ते कीर्तनी । पाहिले नैनी त्या वारणें ॥ ३ ॥ नरसींव्ह देखता हत्ती त्याला । प्राणांतसमय त्या आला । नमन करूनी तेथें पडला । सांगत गेला माहुत माघारा ॥ ४ ॥ मग फडणीस जें कां नाना । अनुताप जाहला त्यांच्या मना । साष्टांग येउनी करी वंदना । जेणें स्तवना आरंभिलें ॥ ५ ॥ कृपासमुद्र विठोबादादा । तेथें रीघ कैचा क्रोधा । क्षमा करूनी अपराधा । आरती समपदा केली पै ॥ ६ ॥ ते चि वेळे शहरांतून । निघाले समर्थ भगवज्जन । जया साह्य रूक्मीणीरमण । तयासी विघ्न काय करी ॥ ७ ॥ असो ऐशापरी लीला अपार । भानुदासाचा तो अवतार । जाहाला असे पृथ्वीवर । वैष्णववीर चातुर्मरुपे ॥ ८ ॥ कीर्तनधर्म स्थापावया । हिंडते जाहले सकळठाया । नामभिक्षा घेउनीया । करीती भयापासुनी मुक्त ॥ ९ ॥ श्रीरामदासस्वामींचें स्थान । विसावले जेथें मन । तेथें राहून केलें कीर्तन । दादा धन्य विठोबा ते ॥ ११० ॥

धावडसी देखुनी दृष्टीं । मार्गेयरामाची घेतली भेटी । गोपाळनाथ समाधी त्रिपुटीं । पदली मिठी सानंदीं ॥ ११ ॥ चिंचणेन्यांत जोतिपंत । तयासी घेतले सांगातें । मावें वंदुनी श्रीरघुनाथ । कीर्तन तेथें केलें पै ॥ १२ ॥ महापुरीस विप्र तुका । भेटतां जाहाला प्रेमळ सखा । ठेउनी घेतले तयानीं देखा । जाहला निका हर्ष तो ॥ १३ ॥ मठांत कांहीं तेथें धान्य । साहित्य नसे कोणतें जाण । परस्परें करीती भाषण । संवाद पूर्ण ब्रह्मींचा ॥ १४ ॥ तव दीड प्रहर दिवस आला । स्वस्थ न पडे शिष्य मंडळा । विठोबादादासी प्रश्न केला । ह्मणती चला आरण्य सोडुनी ॥ १५ ॥ नैवेद्याचा आला समय । क्षुधिरत होऊं आतां पाहे । कोरडें भाषण काय । नाहीं सोय या वनांत ॥ १६ ॥ ऐसे शिष्य बोलती सर्व मंडळी । क्षुधानळें घाबरी जाहाली । विचित्र गोष्टी तेथें घडली । तये काळीं ऐकिजे पै ॥ १७ ॥ येकायेकीं आकस्मात । भाविकगृहस्थ आला तेथें । पाकसामुग्री घेउनी समस्त । तांबुल नेमस्त इत्यादि ॥ १८ ॥ मग दचकले शिष्य सारे । करीती तुकयासी नमस्कार । तुकारामाचा जो अवतार । जानकीवर जया जवळी ॥ १९ ॥ अष्टमासीद्धि लोळती पाईं । तेथें भोजनासी उणे काई । असो कीर्तन रात्रौंठाईं । केलें पाही प्रेमळें त्या ॥ १२० ॥ जोतिपंत व्यास अंश । विठोबादादा भानुदास । तुकाविप्र भक्तिकळस । संग विशेष संतत्रिवेणी ॥ २१ ॥ करुनी वास तेथें कांहीं । गेले वड-ग्रामासी पाही । जयरामसमाधी तये ठाई । वंदिली ते हि उभयसंतें ॥ २२ ॥ आनंदमुर्तीचे ब्रह्मनाळे । जातां तेथें निवाले डोळे । वृंदा-वनाचा जेथें डोल । येतसे डोल ब्रह्मसुखाचा ॥ २३ ॥ तये स्थळीं कीर्तनयज्ञ । दिनत्रय जाहाला जाण । मग निघाले मार्गानें । अभेद पूर्ण उभयमूर्ति ॥ २४ ॥ जोतिपंत ह्मणती विठोबादादासी । आपण जावें मिरजेसी । मी करविर अंबेचे पदरजासी । वंदुनी तमरजासी निवृत्ति । करीतो ॥ २५ ॥ नंतर येतो आपणाजवळी । दिनत्रई सायंकाळीं । कोल्हापुरासी निघुनी गेली । गुरुमाउली जोतिरूप ॥ २६ ॥ विठोबा-

दादा च्यातुर्मास्ये । अस्तमानी गेले मिरजेस । उभे ठाकले कीर्तनास । वात्सल्यरस काय पाहावा ॥ २७ ॥ ग्रामस्थप्रभु पटवर्धन । बहुत मिळाले विद्वजन । सभा जाहली उत्कृष्ट पूर्ण । असंख्य जन आले पै ॥ २८ ॥ सत्यभामेनें दान केलें । श्रीकृष्ण नारदासी दिधले । हें चरीत्र दादांनीं आरंभिलें । प्रेम खवळलें सहजी ते ॥ २९ ॥ पूर्णचंद्रमानस । उगवला भक्तिपूर्वेस । भरतें दाटलें आनंदास । च्यातुर्मास्यभक्तार्णवा ॥ १३० ॥ तो वामेंद्रिय पटवर्धनाचा । राहु पातला तेथें साचा । छळकबुधि बोले वाचा । चमत्कार कैचा दाखवा ह्मणे ॥ ३१ ॥ संतवेश धारण करून । मोदितसा मोळे जन । अत्यंत असता जड सुवर्ण । तुळसी-पर्ण काय तेथें ॥ ३२ ॥ पूर्वोक्त तरी मिथ्या कथन । कनक सर्वथा मोठे वजन । भक्तेचि करिती कथेंत वर्णन । काय ह्मणून ऐकावें ॥ ३३ ॥ ऐसे ऐकता प्रेमराशी । संच्यार जाहला आंगीं तयासी । म्हणती आतां चि पहा या वेळेसी । संशयासी ठेऊं नका ॥ ३४ ॥ भानुदासाचा अवतार । विठोबादादासंत थोर । ज्याचे कथेंत शारंगधर । प्रगट साचार रूक्मीणीपति ॥ ३५ ॥ सत्यभामेसारीखे घेउनी बुंध । बाळकृष्णमूर्ति आणविली कथेंत । तागडीत घालुनी वजनातें । करीती भक्तशिरोमणी ॥ ३६ ॥ सभा सर्वत्र पाहती नेत्रें । बहुत घातिले अलंकार । परी तुळनेसी न ये यादवेंद्र । मग तुळसी पत्र आणविले तें ॥ ३७ ॥ तें पिकले पान दादांनीं । स्वकरें घालिता उचलोनी । प्रगटली तेथे भक्तरूक्मीणी । चक्रपाणी तुळीला पै ॥ ३८ ॥ धन्य साधु च्यातुर्मास्ये । विठोबादादा ह्मणती ज्यास । द्वापारीचा भक्तिरस । दाविला सर्वास कलीमाजी ॥ ३९ ॥ ऐसें जे प्रेमळ संत । तयासी कलयुग नसे निश्चित । अखंडाकार स्वरूपीं स्थित । तिष्ठे भगवंत ज्यापासीं ॥ १४० ॥ छळक जाहले लज्यायमान । भाविकासी आनंद पूर्ण । कितिक वैराग्य धारणकरून । धरीले चरण दादाचे ॥ ४१ ॥ संशयराहु दुरविला । पर्वकाळ तो थोड्या फावला । कीर्तनतीर्थीं आंघोळिला । करीता जनाला दुरीत कैचे ॥ ४२ ॥ असो मगळार्ति करून । दादा

गेले बिराडासी जाण । प्रातःकाळीं उगवला दिन । गेले निघोन मार्गानें ॥ ४३ ॥ खळदुर्जन भेटती प्राणी । पावन करीती त्या दर्शनीं । ऐशापरी फिरोनी अवनी । पातले स्थानीं पंढरपुरा ॥ ४४ ॥ आराधोनी पंढरीनाथ । कीर्तनामाजि काळ सारीत । वर्णूं जातां लिळा अगणीत । धन्य संत श्रीविठलदादा ॥ ४५ ॥ च्यातुर्मास्य जयाचें व्रत । ऋणी केला श्रीअनंत । कीर्तनरंगीं देव नाचत । ऐसें समर्थ साधु ते ॥ ४६ ॥ शेवटी वर घेउनी आपण । केले वैकुंठीं प्रयाण । मानुदासाचा अवतार पूर्ण । कळला जाण सिध्यरूपें ॥ ४७ ॥ राजारामीं स्वतःसिध्य । पंढरीनिवास प्रगटे सिध्य । भक्तचरीत्रें स्वतसिध्य । करविता शुद्ध स्वयें पै ॥ ४८ ॥ दासोपंताचा अवतार जाहाला । तयाची पुढे वर्णीली लीळा । श्रवणमात्रें श्रोतियाला । सुख सर्वाला अभेद ते ॥ ४९ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । विठलसाधु अद्ययानातें । अध्याय समाप्त सकृत पै ॥ १५० ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ६८ ॥ ॥



## अध्याय ६९

### — भवानदास चारित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजि श्रीरामा । सकळ जीवांचिया विश्रामा । भक्तकामकल्पद्रमा । आत्मयारामा तुज नमो ॥ १ ॥ जय जय करुणासागरा । भक्तमेघांचिया दातारा । शिवपणें गोटल्या गारा । अनंत अपारा तुजमाजी ॥ २ ॥ जीविलक्षण तेथें जाहलें । अहंभावें निराळे पडले । ते सोहंवृत्ति मिळतां भले । ऐक्य घडलें सत्वरूपीं ॥ ३ ॥ पंचभूतचि उठले तरंग । परि त्यांनीं न सोडिले तुमचें अंग । लीला नाटकी श्रीरंग । विलास अभ्यंग पै तुझा ॥ ४ ॥ देवाविण वृत्ति पांगुळ । भूतें तरी जड सकळ । हा अवघा तुमचा चि खेळ । दिसे सकळ वोडंबरी ॥५॥ तुज येका अनेकत्व घडलें । परी येकपण नाही मोडलें । ऐसे असोनी भ्रमें नाडिले । वेडे

केले भ्रांतासी ॥ ६ ॥ जळीं मीना लागलीया तान्ह । तेथें त्यासा नोव्हे उदकपान । वरी उल्हाळ घेऊन करी प्राशन । मग समाधान तो पावे ॥ ७ ॥ तैसे या जीवासी घडले । ब्रह्मीं असोनी ब्रह्म हारपलें । ते सद्गुरुबोधें प्राप्त जाहालें । स्वये प्रघटले परब्रह्म ॥ ८ ॥ असो हा ब्रह्मप्रकार । ब्रह्ममय चि जगदाकार । संतकृपें आत्मविच्यार । ह्मणुनी सार साधुकथा ॥ ९ ॥ तया भक्ताविण देव विकळ । देवाविण भक्ता नसे स्थळ । यालागीं ते प्रेमळ । वैष्णव सकळ अवतरती ॥ १० ॥ वारंवार घेउनी जन्म । स्थापीती जनीं स्वात्मधर्म । येकतां तयाचें भक्तिकर्म । लाहिजे निष्कर्म अनुभवस्थिति ॥ ११ ॥ दासोपंतें अवतार धरिला । वर्णन होईल ते चि लिळा । सिध्यप्रसादें श्रोतियाला । नमन सर्वांला अनुक्रमें ॥ १२ ॥ वंदन करीतां अनन्य । केला श्रोतिये सुंदर प्रश्न । दासोपंत कोठील कोण । कार्यकारण सांगिजे पै ॥ १३ ॥ पाहुनी श्रोतियाचा आदर । वक्ता बोले जोडोनी कर । यथामति कथीतो विच्यार । वरदकर ठेउनी शीरीं ॥ १४ ॥ अंबेजोगाई सीधस्थळ । जेथें मातायोगेश्वरी वेल्हाळ । मुकुंदमुनि आदि सकळ । सिध्यी केवळ पावले ते ॥ १५ ॥ तये क्षेत्रीं दासोपंत । प्रपंचीं असोनी सदा विरक्त । अंतःकर्णी ज्याचा हेत । प्रत्यक्ष दत्त भेटावया ॥ १६ ॥ परी तपेविण दैवत । कैसें देईल दर्शनातें । ह्मणुनी तपश्चर्या आरंभीत । येकाग्रचित्तें करुनी ॥ १७ ॥ तेथें सुंदेटरहीमाझारी । द्वादशवर्षे अनुष्ठान करी । तीव्रतपाची देखोनी थोरी । दत्त श्रीहरी आले ते ॥ १८ ॥ कसोटी पाहावयाकारणें । विपरीत वेश धरीला जाण । परीवार संगे घेउन । पावले भगवान लवलाही ॥ १९ ॥ स्त्री येक आणि बाळक । हिसा शेळी कोंबडे देख । या समवेत सिध्दीनायक । दावित कौतुक वृक्षातळीं ॥ २० ॥ स्त्रियेसी वदे यवनभाषेकरून । क्षुधा लागली मज दारूण । वेगीं शेळी मुरगी मारून । पाक निर्माण करावा ॥ २१ ॥ मग तयेनें दोनच दगड मांडीले । वर ते हडिसी चढवीले । न बसे ह्मणुनि लाविले । चरण आपुले झडकरी ॥ २२ ॥ हे दुरोनि दासोपंतें पाहुनी ।

परम आश्चर्य केलें मनीं । तव तियेनें कोंवडे मारुनी । घातलें करांनीं हंडींत ॥ २३ ॥ तेणें लोटकें भरेना । पतीकडे पाहे लोचना । मग रेडा कापुनी भरला जाणा । तरी होईना पात्र पूर्ण ॥ २४ ॥ तेव्हां कोप हृदईं येऊन । स्त्रीबाळ वधीले तेणें । हंडीमाजी घाली आपण । रीतेपण मोडेना ॥ २५ ॥ नतर समोवता पाहू लागला । तव दृष्टीपुढें विप्र देखीला । दीर्घशब्दें ह्मणता जाहाला । ब्राह्मण घाला हंडींत ॥ २६ ॥ तयेसमईं द्विज भला । दासोपंत घाबरा जाहला । कृतांतवत यवन भासला । नमस्कार केला अतिमयें ॥ २७ ॥ धावत येउनी धरीले चरण । ह्मणे मी तुज अनन्यशरण । रक्षावा जि माझा प्राण । जीवदान करणें पै ॥ २८ ॥ ध्यानांत आणुनी अत्रिसुत । नानायुक्ती स्तवन करीत । तव तो कृपाळु श्रीदत्त । नामी ह्मणत निजदासा ॥ २९ ॥ दिव्यस्वरूप करूनी प्रघट । दासोपंतासी दिधली भेट । पर मूर्हि ह्मणता निकट । करसपुट जोडीले पै ॥ ३० ॥ दास वदे अनन्यमावें । आत्मस्वरूपीं म्यां विनटावें । सतत आपण जवळीं असावें । हे चि वरवें देणें पै ॥ ३१ ॥ ऐसी प्रार्थना करीतां जाण । दत्तात्रय जाहले प्रसन्न । स्वरूपान्मुख करूनी पूर्ण । द्वैतभान निरासिलें तें ॥ ३२ ॥ अहर्निशी राहुनी जवळ । चौपट खेळती स्वयें दयाळ । दत्तमहाराज भक्तवत्छळ । उध्दरीले दासोपंता ॥ ३३ ॥ निरंतर सांनिध्यता । दत्तात्रयाची निश्चींता । सारे संतात मान्यता । तेणें चित्ता अहङ्कृति आली ॥ ३४ ॥ ते हि येकनाथाची भेटि करऊन । निवारण केला अभिमान । अन्यग्रथीं वर्णीलें पूर्ण । येथें वर्णन संक्षेपें ॥ ३५ ॥ असो अमानित्व यावया आंगीं । पुन्हा अवतार जाहाला जगीं । आस्था राहीली भजनरंगीं । स्वात्मरंगीं क्रिडावया ॥ ३६ ॥ श्रीगंगेचिये तीरीं । अर्धयोजन पार्थापूरी । तेथें सद्विप्रघरीं जन्म धरी । चिन्हें सारी मागील तीं ॥ ३७ ॥ व्रतबधादि लग्नसोहळा । ब्राणानवर्षे सकळ जाहाला । भगानदास ह्मणति ज्याला । जो का पुतळा विरक्तीचा ॥ ३८ ॥ श्रीगुरुदर्शनीं उतावेळ । अंत कर्ण वेधुनी सकळ । दत्तात्रयाचें ध्यान मळे ।

मन मोहिलें तेथें पै ॥ ३९ ॥ रात्रंदिवस तोचि ध्यास । धन्य भक्त तो भवानदास । ज्याचा सखा वैकुंठविलास । अनन्यास नसे दुरी ॥४०॥ ब्रह्मचर्य दाउनी व्रत । प्रघट जाहले श्रीदत्त । दर्शन देउनी केले कृतार्थ । मंत्र श्रवणांत सांगुनी ॥ ४१ ॥ पूर्वी दासासी बहुत कशीलें । तप तपोनी शरीर पाळलें । या अवतारीं फळासी आलें । कृपेनें द्रवले श्रीस्वामि ॥ ४२ ॥ मग तो विच्यार काय वर्णावा । भवानदास जाणले स्वरूपानुभवा । शिवाचा तो आश्चर्यठेवा । काय जीवा वदवे तें ॥४३॥ सविकल्प निर्विकल्प । प्राप्त जया समाधीपढप । प्रपंच जाहाला परमार्थरूप । गेला संकल्प विकल्पेंसी ॥ ४४ ॥ ज्ञानोत्तर भागीं प्रेमलक्षणा । मुक्ति वरील भक्ती जाणा । श्रीगुरूकृपें आत्मधना । योगीराणा पावला तो ॥ ४५ ॥ नाम ज्याचें भवानदास । विभक्ति योगें तो हा दास । भक्ति जयाची आंदणी असे । किती तयास वर्णावे ॥ ४६ ॥ पंढरीसी अति आवडी । जात असावे उघडसवडी । देव केला जेणें गडी । उभविली गुढी आनंदाची ॥ ४७ ॥ सावडे अभंग मार्गी गातां । प्रेम भरे ज्याचे चित्ता । नृत्य करीत जावें तत्वता । हृदई दत्ता आठवोनी ॥ ४८ ॥ श्रीपांडुरंग पाहतां दृष्टीं । देवें घातिली गळा मिठी । उभयता बोलती गुह्य गोष्टी । होतसे वृष्टी प्रेमाश्रुंची ॥ ४९ ॥ ते ग्रंथीं उघड काय वदावें । वैष्णव जाणती तें वैभव । जेथें नुरे भिन्न भाव । स्वानुभव परीपूर्ण ॥ ५० ॥ धन्य भक्त भवानदास । कीर्तनीं तोषविला पंढरीनिवास । कांहीं दिवस करूनी वास । सेविती रस प्रेमसुखाचा ॥ ५१ ॥ तव तेथें श्रीगुरुसमर्थ । रामदास अवतार सिध्दनाथ । आले असतां पंढरींत । संगें बहुत शिष्यमंडळी ॥ ५२ ॥ परस्परें होतां दर्शन । न करवे तो आल्हाद वर्णन । भवानदास आणि सिध्देश पूर्ण । अभिन्नपणे विळसती पै ॥ ५३ ॥ दीपीं दीप येकवटकतां । अद्वयप्रभा सहजी पाहतां । कीं हरीहराची येकात्मता । तैसें सर्वथा जाहलें पै ॥ ५४ ॥ मग तो संवाद उभयतांचा । च्यार घटिका होतसे साचा । तया जवळी मी किंकर ठाईंचा । पादुका तयाच्या वागविणार

॥ ५५ ॥ तो पदरज होता हृदईं स्पर्श । स्फुरण जाहाले ग्रंथास । धन्य स्वामी श्रीसिध्देश । संतस्तवनास योजीले पै ॥ ५६ ॥ असो रामदास अवतार सिध्देश्वर । दासोपतअंश भवानदास थोर । उभयसंगमीं प्रेमनिर । आला पुर स्नेहसरीते ॥ ५७ ॥ तेथें विकारवृक्ष तीरीचे । उन्मळुनी गेले समूळ साचे । डोहो भरले स्वानंदाचें । चैतन्याचे तळरती मीन ॥ ५८ ॥ शांति क्षमा वैराग्य । जळचरें तीं क्रीडती सांग । भवानदास विचरती आगे । सिध्दनाथसंगें निवाले ॥ ५९ ॥ मग श्रीपांडुरंगार्चन करून । साष्टांग वंदीले समचरण । नानायुक्त अभंगस्तवन । करूणाघन तोषविला ॥ ६० ॥ उभा सन्मुख जोडुनी कर । नेत्रीं सुटले प्रेम पाझर । सदगद होउनी कृपाकर । मागे सत्वर निरोपासी ॥ ६१ ॥ भक्तवत्छळ रुक्मीणीरमण । गहिंवरोनी बोले वचन । तुमचा वियोग होतां क्षण । युगासमान मज वाटे ॥ ६२ ॥ सिध्दनाथ माझा मुख्यप्राण । भवानदास याचे न सोडी चरण । पावसी शुध्दसमाधान । सचिदघन स्वरूप पै ॥ ६३ ॥ वारंवार येउनी येथें । भेटत असावें मजला त्वरीत । ऐसें वदुनी पंढरीनाथ । निजहस्तें कुरवाळिले ॥ ६४ ॥ मग सख्य घेउनी श्रीक्षेत्र । वंदन करूनी सर्वांसी पवित्र । भवानदास सजलनेत्र । वाचे मंत्र जपती हरी ॥ ६५ ॥ हरी अंश जो वानर वेश । तो चि अवतार रामदास । ते हि पावले ते वेळेस । श्रीसिध्देश ह्मणती ज्या ॥ ६६ ॥ भगवान सांगती तयाला । भगवानदासासी तुज निरविला । देउनी सगतीचा सोहाळा । निववी तयाला कृपाबळें ॥ ६७ ॥ शीरीं वदोनी श्रीआज्ञा । नमन करुनी मागुती जाणा । निघाले तेथुनी स्वस्थाना । पंढरीराणा स्मरूनी मनीं ॥ ६८ ॥ भवानदास आणि रामदास । भजनीं निमग्न सावकाश । मागे पुढे जगन्निवास । फिरती जगास तारावया ॥ ६९ ॥ मालेगांवासी भ्रमण करीत । आले सहजी उभयतां संत । अवरसिंग जाधव जेथें । अति सत्वस्थ शूद्र तो ॥ ७० ॥ भगवानदासाचा वडिलार्जित । ऋणानुबंधि झराटा निश्चीत । ठेउनी घेतले सहजीं तेथें । आपुले स्वहीत

जाणावया ॥ ७१ ॥ भक्ति पाहुनी तयाची । वृत्ती द्रवली भगवान-दासाची । संगती देउनी नेमाची । वस्ती साची केली पैं ॥ ७२ ॥ भगवत्भक्त ऐकुनी वार्ता । भेटीसी येती बहु तत्वतां । तयाकारणे करविती कथा । लाविती पंथा भक्तीचे ॥ ७३ ॥ अहोरात्र कीर्तन-भजन । माळेगाव दुमदुमिलें पूर्ण । शिवरात्रिचा उत्छाहा जाण । जीवरात्र निघुनी गेली ॥७४॥ सिध्दनाथ स्वामीचे मठासी । वारंवार जावें बारामतीसी । घेउनी यावें आदरेसी । असावे सेवेशी तत्पर पैं ॥ ७५ ॥ पंढरीसी भजन करीत । जात असावें जेणें सतत । भवानदास धन्य संत । दासोपंत अवतरला ॥ ७६ ॥ दत्तात्रयाचें ज्या दर्शन । निरतर होतसे मापण । अमानित्व आंगीं पूर्ण । न जाणे जन तया पुरूषा ॥ ७७ ॥ कुळवधू लपवी अवयवातें । भवानदासाचे तेवि व्रत । प्रपंचिक दिसावे सर्वांतें । जाणती संत आत्मवेत्ते ॥ ७८ ॥ नानातीर्थें नानास्थानें । हिंडुनी केलें जग पावन । दासोपंताचा अंश पूर्ण । जाहलें दर्शन मज दीना ॥ ७९ ॥ श्रीसिध्दकृपें पूर्व संकेत । वोळखुनी ते सहजी निश्चीत । वर्णायिले आख्यानातें । सद्गुरूनाथ समर्थ पैं ॥ ८० ॥ यानंतर चिदंबरकथा । कथन करवितील स्वामी तत्वता । श्रोतीं असावे सादरता । साह्य मंथा श्रीरघुवीर ॥ ८१ ॥ पुंडरीकाची पाहुनी भक्ति । विटेवरी तो सीतापति । मंजरीमाळा तयाप्रति । अनन्युक्ति अर्पीतसे ॥ ८२ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । भवानदासचरीत्रातें । अध्याय समाप्त सत्तर पैं ॥ ८३ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनुक्रमें अ० ॥ ६९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥

---

## अध्याय ७०

### — चिदंबर दीक्षित चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरूपांडुरंगा । सिध्वेश्वरा भवभंगा । निज आत्मया अभंगा । निःसंगा सिध्दमूर्ति ॥ १ ॥

जय जया आदि निरंजना । निर्गुण निरामय आत्मस्मरणा । अज अव्यय रघुनंदना । ज्यानकीजीवना स्वयज्योति ॥ २ ॥ आत्मप्रकाश-दिनकरा । ज्ञानाज्ञानविकारा । दिनरजनीसी आधारा । रमावरा तू चि पै ॥ ३ ॥ सकळजीवींचा चाळक । अलिप्तपणें वससी देख । वर्णावया तें कौतुक । सहस्रमुखें मौनावलों ॥ ४ ॥ स्थूळसूक्ष्मकारण । चौथें जें माहाकारण । तयासी तू अधिष्ठान । व्यापकपणें श्रीमूर्ति ॥ ५ ॥ ऐसें काहीं वेदूं जातां । राहसी तू बोधापर्ता । तरी भावें चरणीं माथा । ठेवणें तत्वता हें चि भले ॥ ६ ॥ श्रीपाडुरंगा कंठीं माळ । भक्तचरी-ताची सुढाळ । ती पाहतां कळीकाळ । भय केवळ कापतसे ॥ ७ ॥ तयेचे अष्टोत्तरशत अध्यायमणी । संतचरित्रें पवित्र जनीं । चिदबर त्यातील चुडामणी । अवतार मेदिनीं विश्वामित्राचा ॥ ८ ॥ कथा तयाची आतिगोड । उघडी मुक्तीचे कवाड । द्वैतसंशय समूळ उडे । ह्मातां चडे भक्ति पै ॥ ९ ॥ जेवि चवथा भागवत । पुडरीकनामें शोभत । ज्या तर्पे श्रीभगवंत । पढरीत तिष्ठतसे ॥ १० ॥ तैसा सप्तऋषीमाजी चवथा । विश्वामित्रमुनि पाहातां । यज्ञरक्षणार्थ श्रीरघुनाथा । माघे तत्वतां हिंडवितसे ॥ ११ ॥ तपसिंधु जो का आगळा । भूगोल करणार दुजा सगळा । तो महाराज पृथ्वीतळा । घेता जाहला अवतार ॥ १२ ॥ जन्म घ्यावया हे चि कारण । भूतमात्रासी द्यावें अन्न । जगदोध्दार करावा पूर्ण । भगवद्भजन वाढवावें ॥ १३ ॥ पूर्वी वसिष्टें विश्वामित्रासी । उटज्यांत दिधले भोजनासी । जेवविले सैन्येंसी । साहित्यासी नसतां पै ॥ १४ ॥ कामधेनु प्रत्यक्ष जेथें । सर्व सिध्दि वसती तेथें । हे देखुनी राजीयातें । खिन्न चित्त पै जाहलें ॥ १५ ॥ सकळ राज्य करुनी त्याग । तपश्चर्या केली चांग । ऋषित्व पावोनि तेणें आंग । सामर्थ्य सौभाग्य ते आले ॥ १६ ॥ हे कथा बहुतथोरी । पुराणीं वर्णीली व्यासवक्त्रीं । भारतामाजी नानापरी । वर्णीली सारी यथोक्त ॥ १७ ॥ येथें सक्षेप काहीं सांगणें । अवतार हेतु कार्य कारण । भूत भविष्य करवितां कथन । श्रीरघुनदन समर्थ

जो ॥ १८ ॥ विश्वामित्र तपोराशी । निरंतर हेत त्या मानसीं । अन्नदान करावयासी । युगत्रयासी शोधिलें ॥ १९ ॥ अतृप्त जन न दिसे त्याला । म्हणुनी कलीनें देह धरीला । प्रसन्न करूनी अन्नपूर्णेला । आरंभिला भोजनयज्ञ ॥२०॥ यजुर्वेदांत गाधिजमुनि । अवतरण केलें सहजीं अवनी । प्रथमशाखा कण्व जनीं । धन्य जननी ता पिता ॥ २१ ॥ प्रत्यक्ष स्वामी श्रीविश्वामित्र । जन्मले यशीं तें कुळ पवित्र । मग मायबाप तयाचे गोत्र । काय वक्त्र वर्णूं तें ॥ २२ ॥ शिवउपासना कुळाचित । आकाशवृत्तिते वर्तत । चिदंबराळागी ध्यात । अद्वैत परात्पर जे ॥ २३ ॥ तपाच्या ध्यासें पाही । चिदंबर नाम ठेविलें देहीं । दीक्षा सपाय कर्म ते हि । आले प्रवाहीं पूर्वबोधें ॥ २४ ॥ सूर्याआंगी तेजसपत्ति । की सोमाठाईं अमृतकांति । यज्ञ कराया तैसी प्रीती । अवतार क्षीतीं चिदंबर त्या ॥ २५ ॥ तपश्चर्येचा प्राचीन अभ्यास । स्नानसंध्येचा नित्य उल्हास । भूतदयेनें केला वास । धरली कास निज आवडी ॥ २६ ॥ विश्वामित्र असता नाम । पूर्वी घडला द्वेष परम । याळागी प्राकृत घेउनी जन्म । आरंभिला धर्म संतोष भूतीं ॥ २७ ॥ अष्टमासिद्धी ज्याच्या दासी । होउनी राहिल्या चरणापाशीं । मैत्रि सदा भूतमात्रासी । चिदंबर ऋषि धन्य तो ॥ २८ ॥ सर्वांहीं वचन मानावें । त्याप्रांनीं शकती मुख्घावें । माहात्मसर्प मानती मार्वे । दुराई स्वभावें ब्याची पै ॥२९॥ अभिज्ञ मनीचे सर्वे सागती । अवतार समर्थ गाधीजमूर्ति । त्यारी मोक्ष पाई कोळती । दर्शनीं तारीती जडजीवा ॥ ३० ॥ मूढज्ञातीं पश्वादिक । आज्ञा मानिती निःशक । विश्वामित्रत्व जेणें निकें । दाविलें कौतुक भूठाईं ॥ ३१ ॥ प्रवृत्ति निवृत्ति दोघी जणी । भार्या शोभती सुलक्षणी । आपुलें यश स्वच्छ करूनी धरणी । शोभवी जनीं अन्नदानें ॥ ३२ ॥ तीर्थमीसें हिंडुनी अवनी । मेळविती स्वरूपीं प्राणी । भक्तिज्ञान स्थापोनी । लाविली भजनीं नरनारी ॥ ३३ ॥ खळ दुर्जन अज्ञान । छळक वादी भेटता जाण । देती मनीचे सांगून । नम्रवचन गौरवनी ॥ ३४ ॥ अज्ञानवेष्टीत मानव । तयासी कैचा निर्मळभाव ।

इच्छीती द्रव्य स्वभाव । धान्य पैव यावया ॥ ३५ ॥ पुत्र कळत्र मान्यता । हे चि आवडे जना सर्वथा । तयाचे पुरविती अर्था । भक्तिपंथा लावोनी ॥ ३६ ॥ ऐसें स्वामि चिदंबर । विश्वामित्राचा अवतार । जयाचा सखा गिरिज्यावर । प्रिय साचार पांडुरंग ॥ ३७ ॥ आषाढी कार्तिकीसी । निरंतर जावें पंढरीसी । श्रीविठ्ठल जयापासीं । अहर्निसी तिष्ठतसे ॥ ३८ ॥ चिदंबरानीं करीतां ध्यान । पुढें भगवान समचरण । माविकासी होत दर्शन । उत्साहा पूर्ण रात्रंदिन ॥ ३९ ॥ पंढरीसमान जेथें राहावें । तये स्थळी भजनभाव । मोहिला तेणे देवाधिदेव । वासुदेव परमात्मा ॥ ४० ॥ ठाईठाई अन्नछत्रें । घातिलीं तेणें चिदंबरें । समारंभ तो पाहावया थोर । उतरले सुरवर भूतळीं ॥ ४१ ॥ शिवादिक यमवरुण । पातले स्वयें शचिरमण । मंडप देखोनि विस्तीर्ण । सामर्जन करीती गंगा ॥ ४२ ॥ ती मूर्तिमंत तीर्थें प्रघट होऊन । कुंभ भरुनी आणिती जीवन । वाढिती अमर जेथें अन्न । जेविती ब्राह्मण असंख्य पै ॥ ४३ ॥ स्थळोस्थळीं ऐसा प्रकार । धन्य संत तो चिदंबर । संतुष्ट केले द्विजवर । जीव अपार तृप्त केले ॥४४॥ घृत सरलें ह्मणोनी सागता । आश्चर्यकृति ज्याची तत्वता । ते ऐकिजे सुंदरगाथा । श्रवण करीता हर्ष मना ॥ ४५ ॥ दाहासहस्त्रांची पंगती । भोजना बैसले विप्र निश्चीती । तूप सरलें ह्मणउनी सुचाविती । स्वामीप्रति शिष्य सकळ ॥ ४६ ॥ तये काळीं चिदंबरमुनि । अपूर्व केली तेणें करणी । श्रीगंगेसी प्रार्थुनी । जोडीले पाणि अनन्य ॥ ४७ ॥ ह्मणे माते उसने तूप । सत्वरतत यावे अमूप । तृतीयप्रहरीं घाऊं माप । भरविले आप ऐसें वदोनी ॥ ४८ ॥ आज्ञा वंदुनी तेव्हां शीरीं । शिष्य-मेळीं भरल्या घागरी । वाढू जातां त्या अवसरीं । द्विजवरीं सेविलें घृत ॥ ४९ ॥ जेवणार तृप्त जाहले । द्रोणात तूप तैसेंचि उरलें । ब्राह्मणांसी देती तांबूल । बोळविले दक्षणा देउनी ॥ ५० ॥ तव तिसरेप्रहरा सत्शिष्यानें । अन्न पाठविले सावकारानें । दाटी जाहली भरलें आंगण । सागतां जन धं.स्व मीते ॥५१॥ निस्पृहाचा तो राणा । चिदंबरदिक्षीत योगी

जाणा । खुणाविती शिष्यासी जाणा । अर्पिजे जीवनामाजीं पै ॥ ५२ ॥
नदींत घोतिलें तूप सारें । पाहती डोळा नारीनर । ऐसे अनेक चमत्कार । प्रसक्ष अवतार ऋषींचा ॥ ५३ ॥ अमित्रत्व द्वंदरीती ।
निरदाळीली जेणें मति । मित्रधर्म स्थापिला प्रीतीं । वचन मानीती
चराचर ॥५४॥ नातरी अज्ञानतम । नाश कराया निजनेम । चिदंबरीं
उरलें प्रेम । मित्र परम स्वयंज्योति ॥ ५५ ॥ याचलागी नाम चिदंबरस्वामी । जीवा करीतसे निष्कर्मी । शिव ऋषी स्वात्मधर्मी । ईहभूमीं
प्रघटले ॥५६॥ जयाचें तेज शुद्ध आचरण । स्नानसंध्या ब्राह्मणभोजन ।
गाईत्रीजपपुरश्चरण । नित्यभजन सायंकाळीं ॥ ५८ ॥ तेणें उज्वळीत
दाहीदिशा । द्वैततम हारपली निशा । विश्वामित्र चिदंबरवेशा । पातला
सविता बोधपूर्वे ॥ ५८ ॥ अध्यायनशाला निर्मुनी चांग । ऋग्वेदु
सामगायन स्वांगे । मंत्रशास्त्र अथर्वण सांग । पढवी अव्यंग द्विजा
सकळां ॥ ५९ ॥ चिदंबरऋषीचे करिता स्मरण । सारस्वत प्रघटे
ह्रदईं पूर्ण । मतिमंद असतां कोण्हीं ब्राह्मण । वेदाध्ययन प्राप्त तया
॥ ६० ॥ क्षेत्रीवैश्यशूद्रजाति । चिदंबर स्मरतां पावन होती । चित्स्वरूप
ते निश्चीती । ज्ञानी जाणती चिदात्मसुखा ॥ ६१ ॥ आणीक ऐका
श्रोते नवल । चिदंबरकथा अतिप्रेमळ । काशींत होता ब्राह्मण दुर्बळ ।
आच्यार निर्मळ जयाचा ॥ ६२ ॥ द्विजाचे त्या अशक्त शरीर । मनीं
आठवला सहजीं विच्यार । स्नान घालावें जान्हवीतीरें । श्रीरामेश्वर
पाहावा ॥ ६३ ॥ भागीरथीची भरली कावडी । अभिषेक करावा
जाउनी आवडीं । निघोनी आला कृष्णाथडी । घडोघडीं हरी
स्मरतां ॥ ६४ ॥ तव रेतीं तेथें बहुत । ऐसें सांगतां पांथस्थ ।
ब्राह्मण जाह्ला चिंताग्रस्त । ह्मणे अशक्त शरीर माझें ॥ ६५ ॥
रेतीं न सोसवे देहाला । कैसा रामेश्वर देखेन डोळा । श्रीगंगेचें अर्पीन
जळा । संकल्प केला होता मनीं ॥ ६६ ॥ सद्विप्र तो ऐशापरी ।
उद्विग्न जाहाला बहु अंतरीं । तो भक्तराज कैवारी । नसे दुरीं निजभक्ता
॥ ६७ ॥ रात्रौ येउनी स्वप्नात । दर्शन दिधलें श्रीरघुनाथें । ह्मणे

मजला आणि चिदंबराते । नसे द्वैत कदा तें ॥ ६८ ॥ यज्ञरक्षणार्थ विश्वामित्रें । नेलें जेव्हां सुपवित्रें । तयेसमई ऐक्यता विचित्र । घडली स्वतंत्र परस्परें ॥ ६९ ॥ तो हा अवतार चिदंबर । मानवरूपें गाधी-कुमर । तयाचें दर्शन घेउनी त्वरें । गंगानिर अर्पिजे ॥ ७० ॥ रुद्र आवर्तन करुनी तया । मस्तक ठेवी त्या निजपाया । तेणें पावसी कृतकार्या । नको संशया धरणें तें ॥ ७१ ॥ दृष्टांत होता ऐशाप्रकारें । संतोषला तो द्विजवर । स्वामी होते चिदंबर । गेला सत्वकर तया ठाई ॥ ७२ ॥ निवेदन केला जाहाला वृतांत । अनन्यभावें सद्गद चित्तें । आश्चिर्य करिती जन समस्त । सांगे दृष्टांत विप्र सकळा ॥ ७३ ॥ मग तात्काळ त्या ब्राह्मणें । पूजा साहित्य आणिलें जाण । धूपदीपगंध-सुमनें । नैवेद्य पूर्ण दक्षणादि ॥ ७४ ॥ ह्मणे स्वामि क्षणेक आपण । स्वस्थ बैसावें घालुनी आसन । मस्तकीं धरीतों पात्र पूर्ण । अभिषेक करणें गंगोदकाचा ॥ ७५ ॥ विश्वामित्रत्व लक्षण आंगीं । मनोभंग न करणें जगीं । सुप्रसन्न सदा योगी । येकांत जागी बैसलेति ॥ ७६ ॥ ब्राह्मणानें करूनि स्नान । आरंभिलें श्रीअर्चन । येकाग्रभक्ति अंतःकर्ण । वेदोक्त पूर्ण यथाविधी ॥ ७७ ॥ शिवपुजा करिती शैव । विष्णूसी पूजिती निज वैष्णव । अभिषेक करीतां तेंचि भावें । जाहले अपूर्व तें ऐका ॥ ७८ ॥ श्वेतबंध श्रीरामेश्वर । तैसें जाहले चिदंबर । अभिषेकपात्र धरीतां करें । शाळुंखा सुंदर लिंग पै ॥ ७९ ॥ यथासांग जाहली पूजा । अर्पियेला नैवेद्य योजा । मंत्रपुष्प ह्मणता द्विजा । ध्वनी सहजा अनोपम्य ॥८०॥ प्रदक्षणा नमस्कार । नृत्यभजन होतसे गजर । स्थिती तो पावला द्विजेंद्र । भाग्य थोर तयाचें ॥ ८१ ॥ च्यार घटिकापरीयंत । समाधी-सुख ब्राह्मण भोगीत । नंतर माघारें परतलें चित्त । पुढें दिसत चिदंबरस्वामी ॥ ८२ ॥ देवभक्तासी भेद नाहीं । ऐसें वदती शास्त्रें साही । चिदंबररामेश्वर ऐक्य पाही । दाविलें ठाई तया द्विजा ॥ ८३ ॥ असो ऐशा लीळा किती । वर्णितां न पुरे लिहिता मति । विश्वामित्र

अवतार जाहाला क्षीति । चिदंबर निश्चितीं नाम जया ॥ ८४ ॥ करो-
निया जगदोध्दार । सेविलें जेणें चिदंबर । जीर्ण होतां देह अंबर ।
अर्पिलें खरें पृथ्वीलिंगा ॥ ८५ ॥ श्रीगुरु सिध्दस्वामीकृपें । प्रगटला
हृदईं स्वात्मदीप । शुध्दभाव खरें माप । मोजीतां अमूप संतगुण ॥८६॥
राजारामीं अर्पण सुमन । ग्रंथरूपी चिदंबर आख्यान । जगन्नाथरावसाधु
पूर्ण । पुढें वर्णन ते चि पै ॥ ८७ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि
पुरती मनोरथ । चिदंबरदीक्षित आख्यानातें । अध्याय समाप्त येक हा
॥ ८८ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अ० अ० ७० ॥

## अध्याय ७१

### — जगन्नाथराय लीला —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजया श्रीरघुनाथा ।
द्वापारीं तूं कृष्ण तत्वता । पंढरीसी प्रस्तुत पाहातां । राहसी
तत्वता भक्तमेळीं ॥ १ ॥ मत्स्यादिक अवतारक्रम । धरीले तुवा
आत्मयारामें । मुख्य कारण भक्तिप्रेम । स्थापन धर्म करावया
॥ २ ॥ सृष्टीचिया अधबीजा । तूं चि येक सद्गुरूराजा । ऐक्यीं ऐक्य
बोजा । दाविसी चोजा निजकृपें ॥ ३ ॥ जें जें कांहीं भासलें असे ।
तितुकें स्वामीया तुजवरी दिसे । जाणिवेचे लाविलें पिसें । समरसे येकत्व
पै ॥ ४ ॥ परी आमुचा दृढभाव । मी सेवक तूं देव । धीःग ते
बुध्दीची जाणीव । स्वयंमेव तूं चि होणें ॥ ५ ॥ येकत्वीं पाहता शून्य-
भाव । कवणासी मग बोलावें । आनंदा कैसीनी जाणावें । भजनीं
क्रीडावें कैसेपरी ॥ ६ ॥ तरी देणें हें चि आतां । पंढरीराया सिध्दनाथा ।
वदवी आपुल्या संतकथा । असंतता करुनी दुरी ॥ ७ ॥ भक्ताविण
तुह्मा देवा । नावडे कांहीं दुजें केशवा । ह्मणुनी ईछी संतसेवा । छंद
पुरवा युगायुगीं ॥ ८ ॥ ज्ञानी भक्त तुमचे सकळ । सर्वांहुनी मी
लडीवाळ । यास्तव जननी लाड पाळ । असरसी स्नेहाळ विठाबाई ॥९॥
भक्तिप्रिय रुक्मीणीरमण । संतोषके स्तुतिवचनें । जगन्नाथराय आख्यान ।

करवी कथन पवित्र तें ॥ १० ॥ श्रवण पठण नारायण । सकळकामना करी पूर्ण । साधुकथा परमपावन । निर्विघ्नपद पाविजे ॥ ११ ॥ पृथ्वी-पति यवनेश्वर । राजस्थान तें त्या हस्तनापुर । तयाजवळी उत्तम नर । असती चतुर श्रेष्ट पै ॥ १२ ॥ अकबरनामें यवनाधीप । खानखा दिवाण सद्रूप । गंधर्व अंश तो चिद्रूप । तानसेन भूप गायकाचा ॥ १३ ॥ बिरबलमंत्री अतिचतुर । गंगकवि धुरंधर । पंडितराय जगन्नाथ गंभीर । वैष्णववीर आत्मवेत्ता ॥ १४ ॥ हीं पंचरत्नें निकट असती । पाळवी सत्काळ तो नृपति । यश श्रीऔदार्यकीर्ती । वसे संपत्ति सकळ तेथें ॥ १५ ॥ त्यांत जगन्नाथरायचरीत्र । लोकपावन परमपवित्र । जान्हवीनें तया सुपात्र । केलें स्वतंत्र येकरूप ॥ १६ ॥ तें कथा सांगीन थोडी । नित्यनूतन जीची गोडी । श्रवणें अघ उतरंडि । ते चि घडी खचोनि जाती ॥ १७ ॥ यजुर्वेदी तो ब्राह्मण । योगभ्रष्ट मूळीचा पूर्ण । पूर्वीसंस्कारेंकरून । जालें मन दृढ विषई ॥ १८ ॥ यवनीचा संग घडला । निंद्यत्वडाग शरीरा लागला । आत्मनिष्ट परी तो भला । भजे हरीला निजप्रेमें ॥ १९ ॥ रात्रंदिन स्वरूपस्थीती । न कळे जना त्याची रीती । संतसाधु ते जाणती । नमन करीती त्या पंडीता ॥२०॥ विनटला तो स्वात्मधर्में । न शिवे तया कोणतें कर्म । बहिर्मुख नेणती धर्म । आत्माराम स्वयें चि ते ॥ २१ ॥ असो जगन्नाथरामपंडीत । माहाधीर भगवतभक्त । जयाजवळी हरी तिष्ठत । कैचें द्वैत त्यापासी ॥ २२ ॥ सांडुनी सर्व लोकेपणा । स्वइच्छा वर्ते योगीराणा । पंढरीसी जावें करीत भजना । सहित ललना यवनी ते ॥ २३ ॥ महाभागवत पुराण । श्रीपुढें करावें कीर्तन । कंठमाधुर्य सुंदर जाण । डोलती भगवान विटेवरी ॥ २४ ॥ पातशाहा जवळी येउनी पुन्हा । यावें तया निजदर्शना । तयाचें करुनी समाधाना । तीर्थाटणा हिंडावें ॥ २५ ॥ क्षेत्रें शहरें पुरें पटण । पाहिलीं समग्र साधुस्थानें । शेवटीं गेले काशीस जाण । वंदिले ब्राह्मण समस्त ॥ २६ ॥ करूनी तेथें विप्रसभा । जगन्नाथपंडित ठाकला उभा । निवेदन केलें

कृतांतगर्भी । निर्वाणशोभा भाषण तें ॥ २७ ॥ यवनीसंगास्तव प्राय-
श्चित्त । इच्छित सर्वांला जोडोनी हात । पश्चात्ताप ज्या हृदयांत । घातिला
प्रणिपात साष्टांगें ॥ २८ ॥ तयें काळीं क्षेत्रस्थ सारे । सांगती रायजीस
न सुचे विच्यारें । देहपाताविण दुसरें । प्रायश्चित्त खरें नसे पै ॥२९॥
शोधुनी पहतां सकळ ग्रंथ । हा चि येक घडला मतितार्थ । यवनीसी
होतां ब्राह्मण रत । शुध्यता केंचि ते ॥३०॥ महास्मशान क्षेत्र काशी ।
शिष्टमुखें आज्ञा ऐसी । तयेवेळीं विस्मय मानसीं । पंडितासी जगन्नाथा
॥३१॥ नमन करुनी सभेसी सकळा । अंतःकर्णी सद्गद जाला । आतां
मान्य शिरसा मळा । ऐसा वदला प्रेमळ तो ॥ ३२ ॥ जगन्नाथराय
त्या स्त्रियेसहित । भागीरथीतीरासी आले निश्चीत । समागमें बहुक्षेत्रस्थ ।
भजन करीत स्वानंदें ॥ ३३ ॥ ह्मणे माते विश्वजननी । महा अघातें
क्षाळणी । महिमा फार शास्त्रींपुराणीं । व्यास वदनीं वदला तुझा ॥३४॥
जरी हा दोषी नुध्दरीतां । अपकीर्ति जाईल दिगांता । शरण आलों
पतित आतां । सावध तत्वता राही पैं ॥ ३५ ॥ तुवा पापें भक्षीलीं
बहुत । मी त्यापेक्षा अजीर्ण दिसत । दाखविसी जरी प्रचित । तरी
सत्य वाटे ब्रीद ॥ ३६ ॥ बरा सदृढ बांधी परीकर । आजी मिळणे
तुजसमोर । ऐसें बोलोनी तो वीर । स्तवितो नर पैं जाहाला ॥ ३७ ॥
गंगेपासुनि पाईंर्‍या शत । बैसले तेथें जगन्नाथ । सुरनदी ते असे वाढत ।
प्रतिश्लोकांत येक पाहिरी ॥३८॥ आश्चिर्य पाहतीं जन डोळा । ब्रह्मवृंद ते
बहुमेळा । पंढीत तीरीं असे बैसला । वर्णीतां सोहळा अद्वितीय तो ॥३९॥
लवणापरी जगन्नाथ । गंगा सिंधु हेलावत । शतश्लोक होतां समाप्त ।
तोय निश्चीत द्विज जाहला ॥ ४० ॥ सुरवरें केली पुष्पवृष्टी । पाहाती
*नारद धुरंजेटी । जाहाली सहजीं आनंदवृष्टीं । नवल गोष्टी अगाध पैं*
॥ ४१ ॥ ते गंगालहरी जगत्रयांत । शंभर श्लोक सर्वां
विदित । जगन्नाथराय धन्य पंडित । महासंत ज्ञानराशी ॥ ४२ ॥
गंगालहरी जे का ह्मणती । ते ते नर पवित्र होती । महापातकी
उध्दरती । भगवंतीं प्रवेश तया ॥ ४३ ॥ उदकरूप यवनी

सहीत । जाहले जगन्नाथरामपडीत । परी राहिला मनीं हेत । ब्राम्हणांत विचरावया ॥ ४४ ॥ वेणेंयोगें विप्रगृहीं । जगन्नाथ जन्मले पाहीं । धन्य माप ते आई । अवतार हृदईं साधुचा ॥ ४५ ॥ विश्वनाथनाम ठेविलें । पूर्वसंस्कारें लग्न जाहलें । चतुर्वेद अभ्यासिले । यज्ञ केले बहुत पै ॥ ४६ ॥ तेणे स्फुंद वृत्तिसी आला । समाधान न पडे त्याला । मान्यतेला कंटाळला । विश्वनाथ मला दीक्षित तो ॥ ४७ ॥ ह्मणे आता सद्गुरूविणे । धिःग सर्वथा आपुलें जिणें । हिंडता जाहला साधु-ठिकाणें । करी प्रश्न सर्वांसी ॥ ४८ ॥ गीर्वाणभाषापांडित्य आंगीं । अहंकृति दुर न होये वेगी । आत्मसुख न पावे जगीं । शिणला योगी विश्वनाथ ॥ ४९ ॥ शेवटीं येउनी जान्हवीतीरा । संकल्प केला मनींचा खरा । देहपात करावा हाचि बरा । करी विच्यारा सदृढ पै ॥ ५० ॥ तव पूर्वपुण्य उदया आले । अैकावे ते श्रोती सकळ । दत्तात्रय श्री प्रगट जाहले । भाग्य सुफळ त्या द्विजाचें ॥५१॥ फकिराचा वेष धरून । बैसले तेथें श्रीभगवान । दुरुनी करीती अवलोकन । मुमुक्षब्राह्मण तयांप्रति ॥५२॥ देहत्याग करावा आतां । तो हाक मारिती विप्रनाथा । ह्मणाति कां बा प्राणासी मुकता । ज्ञानी असतां पढीत पै ॥ ५३ ॥ मग विश्वनाथ दीक्षित येणें । सांगितले वर्तमान । अंत कर्ण देखुनी प्रसन्न । आला आपण स्वयें जवळी ॥ ५४ ॥ फकीर बोलती तयासी । व्यर्थ कां बा जीव देसी । तुझा आत्मा तूचि असती । सोडी भ्रमासी यावेळा ॥५५॥ यज्ञादिक कर्म गहन । केला उगाचि व्यर्थ शीण । नाना तपें तीर्थाटन । करीसी भाषण गीर्वाण तें ॥५६॥ देव हृदईं प्रत्यक्ष असतां । कासया जगीं उगेच भ्रमतां । उलट दृष्टी जरी पहाता । आत्मा पहातां तूंचि पै ॥ ५७ ॥ ऐशापरी श्रीदत्तें । विप्र बोधिला समाधिस्थ । कृपें न होतां शक्तिपात । सुख तयाते जाहले बहू ॥ ५८ ॥ दत्तात्रयजगद्गुरू । मस्तकीं स्पर्शितां दिव्यकर । स्वरूपीं मिळाला द्विजवर । जेवि ध्रुरू अचळ तो ॥५९॥ गुरुकृपेचें सौभाग्य । कोण वर्णी तयाचें भाग्य । सुलीन दशेचें वैराग्य । लाधलें अभग स्वच्छ तया ॥ ६० ॥ जहदाजहर लक्षण ।

आपोआप सच्चिदघन । आनंदीं आनंद विराला पूर्ण । विराले स्फूर्ण चिदाकाशीं ॥ ६१ ॥ असो ऐसी अनुभवस्थिती । वर्णू जातां पुरे वृत्ति तूर्यस्थ होणें लागे ग्रंथीं । उन्मनी हातीं धरीतसे पै ॥ ६२ ॥ श्रीदत्तात्रयाचे दर्शनें । विश्वनाथ दीक्षीता वाणली खूण । समाधी ते जीरदन । केले पूजन यथोक्त ॥ ६३ ॥ फकीरवेषें अनुग्रह केला । तो चि वेश अवलंबिला । जमानशा अभिधानाला । ठेवितां जाहाला दत्त स्वयें ॥ ६४ ॥ मग स्वच्छंदें वर्तत अखंड । तोडीत अभिमानाचें बंड । अज्ञानतमनाशनी प्रचंड । उदेला प्रौढ संतभानु ॥ ६५ ॥ जमालशा जो तयाप्रति । जे जे कोणी शरण येती । काम त्याचे सकळ पुरती । अनुभव प्राप्ति होय ॥ ६६ ॥ हिंदुमार्गी वर्तणें । शिष्य ज्याचे ज्ञानी ब्राह्मण । उद्धरिले असंख्यजन । जगीं धन्य तो साधु ॥ ६७ ॥ सकळांमध्ये वरीष्ट । सत्‌शिष्य जो कां श्रेष्ठ । नांव तयाचें जनभट । अनुभवनिष्ट प्रेमळ तो ॥ ६८ ॥ गुरुभक्ति तयापासी । होउनी राहीली हृदयनिवासी । काव्यशक्ति आंदणी दासी । वसे जिव्हेसी सरस्वती ॥ ६९ ॥ जमालशाची मुरीद जनभट । आरंभीं नाम ज्याचें स्पष्ट । अनेक पदें केली मिष्ट । म्हणती निकट नरनारी ॥ ७० ॥ पांडुरंगीं दृढ प्रेमा । ऋणी केला मेघःशामा । शोभे शिष्य जनभटनामा । अगाधप्रेमा किर्तनीया ॥ ७१ ॥ ऐसे शिष्य ज्याचे अपार । जमालशा तो धन्य फकीर । आराधिला श्रीगुरूवर । जगदोध्दार केला पै ॥ ७२ ॥ भक्तिप्रिय रुक्मिणीविलासी । भेटती सदा जमालशासी । निरंतर येतां यात्रेसी । गोष्टी देवासीं बोलतसे ॥ ७३ ॥ हें चरीत्र गाती ऐकती । तया न विसंबे सीतापति । प्रेम ज्याचें सदा संतीं । तेथें मुक्तिभक्ति त्या ॥ ७४ ॥ कळिकाळ जोडुनी हात । यम तया शरणांगत । साधुस्मरणें जीवन्मुक्त । जेथे ग्रंथ साधुचा ॥ ७५ ॥ श्रीगुरुसमर्थ सिधस्वामी । प्रघटले स्वयें राजारामीं । स्मरतां पावन तया नामीं । प्रेम तुळसी हृदयभूमी । लाविली नेमी तेणें करें ॥ ७६ ॥ कृपोदक वर्षतां तया । बहुत आल्या भक्तमंजोर्‍या । माळ ते चि

गुंफोनिया । पंढरीराया अर्पितसे ॥ ७७ ॥ पुढें चरित्र कचेश्वराचें । बोलविती श्रीगुरू याचें । तेणें संकट हरे जीवाचे । प्राप्त साचे अक्षई पद ॥ ७८ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । जगन्नाथ राय बोलिले । अध्याय सफल होतसे पै ॥ ७९ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अ० अ० ॥ ७१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ७२

### — कचेश्वर साधु चरित्र —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो सद्गुरू श्रीपांडुरंगा । भक्तकैवारीया भवभंगा । सिध्दस्वरूपा अभंगा । संतसंगा राहासी तूं ॥ १ ॥ धन्य धन्य ते दिंडिरवन । नारदक्षेत्र पुण्यपावन । संतमेळा दाटी पूर्ण । रात्रंदिन भजन पै ॥ २ ॥ समचरण हरी उमा । पीतांबराची झळके प्रभा । अनोपम्य ते स्वरूपगाभा । दाटली शोभा पंढरीये ॥ ३ ॥ अनेक उपच्यार महापूजा । नित्य होतसे पंढरीराजा । तयामध्यें अधोक्षजा । प्रिती सहजा तुळसीची ॥ ४ ॥ बहुप्रकारें केलें अर्चन । नसतां येक तुळसी जाण । असंतुष्ट नारायण । व्यास वदनें सांगतसे ॥ ५ ॥ तुळसीपत्र येक वाहता । उपच्यार पावले सर्व तत्वतां । ऐसी आवडी जगन्नाथा । प्रिय सर्वथा नाहीं दुजें ॥ ६ ॥ तरी ते भक्तिस्वरूप तुळसी । भक्तिमंजीऱ्या आल्या तयेसी । प्रेमकरें घेउनी हरीसी । प्रेयसमरसी अर्पितसे ॥ ७ ॥ कचेश्वरसाधु आत्मनिष्ठ । चरित्र तयाचें अतिमिष्ट । श्रवण करीता संशय नष्ट । टळे अरीष्ट भवविधा ॥ ८ ॥ श्रीकृष्णवेण्यासंगमी । संस्थान समाधी पुण्यभूमी । प्रतिसंवत्सरीं उत्छाहा नेहमी । फाल्गुननामी मासांत पै ॥ ९ ॥ श्रीपांडुरंगाचा प्रिय भक्त । जगदोधारी प्रेमळ संत । ऐका तयाचा पूर्व वृत्तांत । करी सनाथ श्रवण पठणें ॥ १० ॥ रामेश्वर नामें ब्राह्मण । कर्मनिष्ठ होता जाण । भाषा बोले सदा गीर्वाण । शूद्रभाषण ना आईक्ये ॥ ११ ॥ स्नानसंध्या त्रिकाळ । च्यारी वेद म्हणे प्रांजळ । भगवत्स्मरणीं घालवी काळ ।

अत्यंत सोवळें ज्याचें पै ॥१२॥ पंढरीसी जावें भजन करीत । साधुस्थानें पहावीं समस्त । आमेरेचा भगवत्‌भक्त । महाभागवत प्रेमळ तो ॥१३॥ तयाची कथा अन्य ग्रंथीं । कविवरें वर्णिली निश्चितीं । येथें सांगणें प्रस्तुती । घेतला मागुती अवतार तो ॥ १४ ॥ रामेश्वरभटजी तीर्थें करीत । चालिले असती सहजस्थितीतें । तो मार्गीं वर्तलें अद्भुत । धन्य संतचरित्र पै ॥ १५ ॥ अनघडशाहानामें फकीर । सिध्दी ज्यापासी निरंतर । भेटला वाटेसी साध्यार । विहिरींत त्वरें स्नान करीता ॥ १६ ॥ रामेश्वरभटजी नित्यापरी । उदयासी येतां तमारी । शिष्यासहीत त्या अवसरीं । उतरले झडकरी जळ पाहुनी ॥ १७ ॥ तो अनघडशाहाफकीर तेथें । नाहत होता स्वस्थचित्तें । रामेश्वरभटजी बुडी मारीत । बाहेर निघत उदकांतुनी ॥ १८ ॥ फकीरानें त्या हात झाडीता । शितोडा आला अंगावरता । क्रोध येउनी सहजीं चित्ता । शिवी तत्वता दिधली तया ॥ १९ ॥ हें देखुनी त्या यवनासी । राग आला फार मानसीं । तेथें सिध्दी तिष्ठे ज्यापासीं । वचनासरसी झुगारीली ॥ २० ॥ वाग्बाण व्राहटीला । निष्ठुरशब्दें ब्राह्मण ताडिला । उडिया मारी ऐसा भला । नको जळाला सोडूं तूं ॥ २१ ॥ ऐसें फकीर बोलतां जाण । विप्रदेहीं उठीला अग्न । बाहीर निघतां उदकांतून । जाती प्राण द्विजाचे ॥२२॥ अभिषेक करीती शिवावरी । शिष्ये केली तैसेपरी । जळपात्रें घेउनी करीं । उदक शीरीं घालिती सर्व ॥२३॥ ऐशाप्रकारें सोशीत क्लेशा । पाहिले जाउनी श्रीज्ञानेशा । स्तविता भावें त्या जगदीशा । पावली निशा सहजीं ते ॥२४॥ रात्रौ येउनी स्वप्नांत । ज्ञानेश्वर सांगती त्या द्विजातें । जाउनी उदईक देहूतें । तुकोबातें शरण रीघावें ॥ २५ ॥ तेणें होईल शरीरीं स्वस्थ । सोडिजे त्वरें अभिमानातें । वह्या बुडविल्या साध्या हस्तें । प्रायश्चित्त तयाचें हे ॥ २६ ॥ असो ती कथा सर्वांसी ठाउक । येथें सागणे कांहीं येक । प्राकृत अभंग नावडे देख । संस्कृत निके द्विज तो वदे ॥ २७ ॥ छळिले होते तुकोबाप्रति । सद्भक्त असतां छंद चित्ति । वह्या बुडउनी पाहिली प्रचिती ।

अहङ्कार्ति कर्मांची ॥ २८ ॥ असो तुकयाचें घेतां दर्शन । शरीरीं जाहलें समाधान । तप्तता गेली सकळ पूर्ण । पावला ब्राह्मण सुख देहीं ॥ २९ ॥ तो अनघडशाहा पुन्हां भेटला । शाप दिधला स्वसिधीला । हे कथा ठाऊक सर्वांला । विस्तार केला नाहीं बहु ॥ ३० ॥ असो भीमातीरीं तो भगवत्भक्त । द्विजोदरीं जन्मला सत्य । भजनाठाईं ज्याचा हेत । देह धरीत वैदिककुळीं ॥ ३१ ॥ रोटकनामे नगरीं जाणा । सिधेश्वरभटजी योगीराणा । पतिव्रता ते तयाची ललना । भक्तनिधाना जन्मवित ॥ ३२ ॥ अग्रगण्य तो वैष्णववीर । नांव ठेविलें कचेश्वर । गुरुकृपेविण जन्मले नर । कचे साचार ते चि पै ॥ ३३ ॥ तयासी तारक जो कां योगी । म्हणोनी नाम कचेश्वर जगीं । विनटला तो कीर्तनरंगीं । वैराग्य आंगीं धगधगीत ॥ ३४ ॥ वेदाभ्यास मुळींचा पहिला । पूर्वसंस्कारें विवाह जाहला । देह झिजवी सत्कर्माला । अतिथीला पुजीतसे ॥ ३५ ॥ कृष्णभटजी साक्षात्कारी । सद्गुरू केले ते निर्धारी । अहोरात्र सेवा करी । वदे वैखरी हरीनाम ॥ ३६ ॥ अठरा अध्याय भगवत्गीता । नित्य वाचावी सर्वथा । आणुनिया घरीं संता । अर्चन तत्वता करी प्रीती ॥ ३७ ॥ विखारीये द्विजवर । विष घातले त्या निरधार । तेणें होतां तप्त शरीर । केलें उपच्यार बहुत पै ॥ ३८ ॥ तरी ते नोहे परीहार । शीरोळीस गेले कचेश्वर । तेथें होतां हरीजागर । पढरपूरकर करविती कथा ॥ ३९ ॥ सहजी वदले कीर्तनरंगीं । तुकोबाचे गातां अभंगीं । कामना पुरति सकळ जगीं । नुरे आंगीं विषबाधा ॥ ४० ॥ ऐसें ऐकुनी हर्ष जाहाला । कचेश्वरभटजी संत त्याला । स्नानसंध्या करूनि निघाला । देहूक्षेत्राला अति त्वरें ॥ ४१ ॥ आवाजीबावापासीं जाण । अभंग घेतले मागून । शतावधी पाठ करून । करीती कीर्तन प्रेमळ ते ॥ ४२ ॥ तेणें गेली विषबाधा । शरीर स्वस्थ जाहलें सदा । प्राप्त जाहाली वैराग्यसंपदा । भगवत्पदा मीनला जो ॥ ४३ ॥ प्रत्यही नित्य करी कथा । कचेश्वरभटजी आत्मवेत्ता । आवड जयाची पंढरीनाथा । विष्टे तत्वता जयाजवळी ॥ ४४ ॥

हें सकळ वर्तमान । कळलें तयाचे पित्यासी जाण । सिद्धभट त्या अभिधान । रागीट ब्राह्मण बहुत तो ॥ ४५ ॥ ह्मणती वैदीकमार्ग बुडविला । कैसा शुद्रासंगें नाचों लागला । वंशचंद्रासी कळंक लागला । राहु ग्रासिला कर्मसूर्या ॥ ४६ ॥ ऐशाप्रकारें बहुत बोलोन । वडीलीं सांडिला आव्हेरून । घालविला घरांतून । हातीं धरून स्नुषासुत ॥ ४७ ॥ जैसा आनंदमूर्तिस्वामिचा पिता । जमदाग्नी दुसरा सर्वथा । सिद्धभटजी तेंवि पाहतां । नावरे चित्ता क्रोध तया ॥ ४८ ॥ असो कचेश्वर साधुनीं मानुनीं हर्ष । कथा करीति सावकाश । सखा जयाचा जानकीनिवास । काय तयास उणें पै ॥ ४९ ॥ देहप्रारब्धें अनयत्नें । मिळत असावें सहजीं पवित्र । घातिलें तेणें मुक्तिसत्र । स्वतंत्र करीती जीवा ॥ ५० ॥ क्रियाशुद्ध भक्त ह्मती । ज्याचे दर्शनें पावन होती । नाममंत्र तया सांगती । मुक्त करीती कृपादृष्टीं ॥ ५१ ॥ मागील जन्मींची राहिली कथा । ते श्रोतीं ऐकीजे आतां । अनघडशा फकीर बोलता । जाहाली सतता देहासी ॥ ५२ ॥ तुकोबाचे दर्शनानें । घड जाला रामेश्वरब्राह्मण । हें जाणून त्या फकिरानें । सिद्धीस जाण शापिलें पै ॥ ५३ ॥ ह्मणे मद्वचन त्वां मोडीलें । तुकपादर्शनीं द्विजा सोडीलें । शरीर त्याचें थंड केलें । शूद्रत्व भलें पावसी तूं ॥ ५४ ॥ भूतळामाजी होउनी दासी । मिरवसी तूं स्वकर्मासी । ऐसें वदला तमोरासी । ते वेळेसी अनघडशाहा ॥ ५५ ॥ ती दासी मोहिलाघरीं । पिरूनामें जन्म धरी । तपोबळें नृपासी करी । जोड मरी ऐका ते ॥ ५६ ॥ करावा तयेचा उधार । अवतरले ते रामेश्वर । नाम धरूनि कचेश्वर । महीवर फिरती पै ॥ ५७ ॥ कोणो-त्यारें करावया । अवतार करणें संता ईया । मग आपणाकरीता आति धाया । अवश्य तया तारणें की ॥ ५८ ॥ तव श्रोतीं केला प्रश्न । ह्मणती इतिहास सांगा पूर्ण । विरूपाईसी प्राप्त कोण । राज्यकारण कैसें तें ॥ ५९ ॥ कैसें भेटले कचेश्वर । केलें तयेसी भवपार । विप्यारीत निजआदरें । जोडुनी कर वदे वक्ता ॥ ६० ॥ शिवाजीराजा सातारी-

यांत । तयाचा सुत संभाजी विख्यात । दिल्लीपति त्या जिंकित । जवळी आणवीत दुताहातीं ॥ ६१ ॥ शूर अत्यंत गंभीर । हे जाणुनी यवनेश्वर । संभाजीचा पुत्र शाहुनृपवर । पिता कुमर अभ्यासीले ॥६२॥ दिल्लीपति संभाजीस । सांगता जाहला तेवेळेस । यवन होसी जरी निःशेष । स्वराज्यास तरी भोगी ॥६३॥ तो ह्मणे तूं आपुले कन्येसी । जरी मजला समर्पिसी । तरीं मी यवनधर्मासी । निश्चयेसीं आगिकारी ॥ ६४ ॥ ऐसें वचन बोलता । क्रोध आला यवनचिचा । तो ह्मणे काढा आतां । नेत्रासी तत्वता याचे पै ॥ ६५ ॥ माझे कन्येचा अभिलाष । तरी याचा करा नाश । तात्काळ दुष्ट राज्यास । केले अव त्या ॥ ६६ ॥ बळें नेत्रासी काढता जाण । गेले रायाचे तेव्हां प्राण । यवनकन्येनें दहन । संस्कार पूर्ण करविला ॥ ६७ ॥ आपुला पुत्र मानून । केले शाहूचें पाळण । स्वपित्यासी सांगून । दक्षणसंस्थान दिधले तें ॥ ६८ ॥ भेट करीते वेळेसी । न दाखवी राज्यस्त्रियेसी । दुर्बुधि यवनतियेसी । अभिलाशी ह्मणुनीया ॥ ६९ ॥ मग दासी विरू होती । ती दाविली यवनाप्रति । आशीर्वाद दोघा निश्चीतीं । अधीकार प्रिति दिधला यवनें ॥ ७० ॥ ह्मणे राज्य करा दक्षणदेशीं । स्वधर्में पाळावें भूमीसी । आज्ञा होतां साताऱ्यासी । समारंभेसी आले ते ॥ ७१ ॥ सप्तऋषीस्थानाते । ताराबाई राज्य करीत । सैन्य मेळउनी समस्त । प्रजा पाळीत स्वधर्मरीतीं ॥ ७२ ॥ पुत्र आला पाहून । आनंद जाहला तारेसी पूर्ण । दुजी तारा ते चिद्घन । करी स्मरण पावन पै ॥ ७३ ॥ तये स्थानीं सहजीं फिरत । साताऱ्यासी आले फकिरेश्वरसंत । विरूबाईसी दर्शन देत । पूर्वसंकेतेकरून ॥ ७४ ॥ सद्गुरू तो पडतां दृष्टी । येकविरेसी आनद पोटीं । चरणीं घातली दृढमिठी । करी वृष्टी प्रेमाश्रूची ॥ ७५ ॥ विनयभावें नम्रवचनें । दंडवत घाली स्वामीसी जाण । ह्मणे मजला करा पावन । मागील नमून अपराध ॥ ७६ ॥ फकीरवाक्यें दिधला ताप । दासी जाहले तया कोपें । आतां दाखउनी निजरूप । दाविजे दीप स्वानंदाचा ॥ ७७ ॥

माझे सिथिल्य समूळ गेलें । शूद्रत्वदेह प्राप्त जाहलें । ते तो विदित आहेचि पहिले । बोलु केतुले स्वामीया ॥ ७८ ॥ सर्वसाक्षी कचेश्वर । रामेश्वरभटजीचा अवतार । चहुयुगींचे जन्मांतर सांगता विस्तार होईल कथे ॥ ७९ ॥ आश्वासुनी विरूदासी । जी का प्रिय शाङ्गराजासी । अनुग्रह देउनी तिजसी । स्वरूपसिध्धीसी मेळविलें ॥ ८० ॥ मग तो आनंद किती वर्णावा । विरूनी गेला द्वैत हेवा । विरूंसी लाघला आत्मठेवा । जीवशिवा ऐक्य जाहले ॥ ८१ ॥ विरूनी जातां गार जेवि । स्वये निरमुळी चेतवी । विरू जाहली चित्कळा देवीं । दैवत्व विमवी सहज देशा ॥ ८२ ॥ असो विरूचा विराला देहभाव । प्राप्त जियेला स्वसुखराणीव । अर्चिला तयेनें देवाधिदेव । श्रीगुरूराव कचेश्वर तो ॥ ८३ ॥ मनाचिये चौरंगीं जाण । बैसवितसे प्रिवीकरून । अनेक सुगंधतैल चर्चून । घातिलें स्नान निर्गंधासी ॥८४॥ त्रिगुणाचें आचमन जाहले । अनंगाचें अंग पुसीलें । चिदांबर ते वसन पिवळे । नेसविलें पीतांबर ॥ ८५ ॥ अष्टधाप्रकृति येक होत । टीळक रेखीला अष्टगंघोक्त । पुष्पें अर्पिलीं अद्भुत । मघमघीत परिमळ तो ॥ ८६ ॥ सुमनाची करूनि माळा । सुमनें घातिली श्रीगुरूगळा । अहंतेचा धूप जाहला । वासनेला जाळिलें पै ॥ ८७ ॥ चिन्मयाचा अखंड दीप । षड्रसाचा नैवेद्य अमूप । षड्विकार ते चिद्रूप । दाविती सकळ स्वानंदें ॥ ८८ ॥ ऐसीये भोजनतृप्ती । सहज चि सरली पुनरावृत्ति । गुरूप्रसाद तो सेविती । न घडे प्राप्ती बहिर्मुखा ॥ ८९ ॥ त्रयोदशगुणीं तांबुलातें । अर्पियेले भक्तिमुक्तितें । दक्षणातें दक्ष भजनातें । ज्ञानस्फुदातें चिरउनि ॥ ९० ॥ येकात्मता सहजी स्तोत्र । जे जे शब्द निघती वगत्रें । प्रदक्षणा गमन पवित्र । नमन स्वतंत्र अखंड पै ॥ ९१ ॥ जेथें पूज्यपूजकपण । विरोनी गेले उदकीं लवण । विरूबाई विरली पूर्ण । स्वानंदजीवन त्यामाजीं ॥ ९२ ॥ श्रीगुरूसवे बेचुनी वय । आठवितसे सदा पाय । आठवनाठव जेथें जाय । जाहली आकाय काय अमुनीं ॥ ९३ ॥ धन्य माक्ति विरूबाई ।

विनटली ते भक्तिठाई । अग्रहार अर्पिली पाही । संस्थान तेही करावया ॥ ९४ ॥ दक्षणक्षेत्र श्रीमाहुली । समाधिस्थान तये स्थळीं । जगदोद्धारा अवतरली । संतमाउली कचेश्वर ॥ ९५ ॥ संतचरित्र हें ऐकतां गातां । पाविजे ईछित सकळ अर्था । करविता स्वयें ईयाग्रंथा । सिद्धनाथा वंदन तया ॥ ९६ ॥ सिद्ध चि समर्थ अंतर्यामीं । निरंतर वसे राजारामीं । निरसोनी गेली द्वैतउर्मी । भीनली रामी निजवृत्ति ॥ ९७ ॥ सदानंदस्वामीची पुढें कथा । श्रीपांडुरंग वर्णविता । सीतारमण तो सर्वथा । उपास्य तत्वतां आमुचें पैं ॥ ९८ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । कचेश्वरसाधु आख्यानातें । अध्याय समाप्त जाहला हा ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ अनु० ॥ अध्याय० ॥ ७२ ॥ ५ ॥

## अध्याय ७३

### — सदानंद आख्यान —

- ॥ श्रीगणेशायनम. ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो सद्गुरुस्थितीदायका । सकळजगप्रकाशका । निरामय नि प्रपंचका । पंढरीनायका श्रीमूर्ति ॥ १ ॥ सत्यस्वरूपा साक्षीभूता । अगम्य अगोचर अनंता । अप्रमेया अखीलसत्ता । रुक्मीणीकांता तुझी च पैं ॥२॥ महाब्धि तूं निराकार । प्रवृत्ती निवृत्ति दोन्ही तीर । जगालागी पैलपार । कृपाभरें पावविसी ॥३॥ निजभ्रम हा चि आवर्त । जीवसहतरंग येत । मायाप्रवाहीं वाहत । गेले अनंत मन्वादि ॥ ४ ॥ अहंकारखडकीं आपटोन । शरीरें जाहली भिन्नभिन्न । चौऱ्यांसी लक्ष प्रमाण । योनी निर्माण जाहालया त्या ॥ ५ ॥ केवढा प्रवाहा सबळ । ब्रह्मादीक वाहाती प्रबळ । त्रैलोक्याची खळखळ । करळती सकळ नेणोनी ॥ ६ ॥ कवण मेथुनी सोडविता । तुजाविण पंढरीनाथा । अनन्यचरणीं ठेवितां माथा । त्रा सर्वथा करसी तूं ॥ ७ ॥ जे जे कोणी शरण गेले । ते ते भवजळपार जाहले ।

निवृत्तितीराला पावविले । कासेसी भले लाउनी ॥ ८ ॥ वारंवार हे चि आर्ता । विनवणी पाईं सिध्दनाथा । होउनिया स्वयें त्राता । निरसीं सर्वथा द्वैतभय ॥ ९ ॥ श्रीगुरू येक चि कर्णधार । उत्तरावया पैलपार । तयासी करूनी नमस्कार । मंजीरी आधार भक्तलीळा ॥ १० ॥ वदविता आणि वक्ता । तो चि स्फुरण स्फुरविता । तयाचे कृपें हे कथा । प्रसवे भावार्था निजवैखरी ॥ ११ ॥ रामानंद महासंत । काशीक्षेत्रात जे का होत । कबीर जयाचा शरणांगत । साधु विख्यात भूमंडळीं ॥ १२ ॥ जगदोद्धारार्थ तेणें स्वामी । अवतार घेतला ईहिभूमी । प्रिती जयाची सदा नामीं । सदानंद्व नामी ते शोभले ॥ १३ ॥ निर्गुण-स्वरूपीं असतां निमग्न । यश गावया ईछी मन । पूर्वाश्रमीं नामाभिदान । वदाति जन येशवंत जया ॥ १४ ॥ विद्यावंत धनवंत । कळावंत मान्यवंत । तया नातुडे भगवंत । येशवंत धन्य जगीं ॥ १५ ॥ भगवंतयेश जे का गाती । ते चि थोर या त्रिजगतीं । काय पढोनी सकळ व्यूत्पत्ती । न चुके विपती गर्भवास ॥ १६ ॥ असो भगवंत येश मुर्तिमंत । जगदोत्धारा अवतार घेत । येशवंतराव ते निश्चीत । छत्तेवडात जन्म तया ॥ १७ ॥ रामानंदाचा अवतार । जाहला प्रसित्ध महीवर । धन्य तयाची मातापितरें । दृष्टांत न पुरे द्यावया ॥ १८ ॥ ज्या ज्या देशीं साधु वसती । पवित्रभूमीं ते निश्चीती । मग कुळपावन किती । नाही क्षीती उपमा तया ॥ १९ ॥ गर्भस्थ असता जननी कुक्षी । नामस्मरण रात्रंदिशीं । निद्रा जागतां मातेसी । तरी गर्भासी राममजन ॥ २० ॥ ऐशापरी नऊमास । नवविधभक्ति आंगीं सुरस । वरते पूर्ण नऊ दिवस । प्रसवली योगेश ते चितकळा ॥ २१ ॥ पिंड-

जेणें प्रेमें । प्राप्त जाहले सहजी धर्म । अध्ययनक्रम सकळ विद्या ॥ २५ ॥ च्यातुर्यकळा सर्व आंगीं । वेदशास्त्र निपुण योगी । लोकरील्या संसार जगीं । आले विभागीं करणे ते ॥ २६ ॥ पाटखी-पदस्थ ज्याचा पिता । उणे प्रपंचीं नसे तत्वता । परी अंतरीं वैराग्य सर्वथा । नाशिवंता जाणुनी मनीं ॥ २७ ॥ जन्मांतरीचें ज्ञान पूर्ण । युगायुगीचा निजभक्त जाण । दाल्भ्यऋषि भागवतनिधान । हरी जेणें तोषविला ॥ २८ ॥ तो चि महाराज रामानंद । जगीं विख्यात जो कां प्रसिध्द । अवतार घेतला तेणें शुध्द । सदानंद नाम जया ॥ २९ ॥ विरक्तीचा बोतिवपूतळा । चतुर्थाश्रम धारण केला । तूर्यस्थ करी सर्व जगाला । अवस्थात्रयाला निरसुनी ॥ ३० ॥ चतुर्थ ज्याची सहजस्थीती । गुणातीत जे वर्तती । सदानंदी रंगली वृत्ति । धन्य जगतीं सदानंद ॥ ३१ ॥ करूनिया तीर्थें सारीं । उध्दरीती नरनारी । खळ दुर्जन असो भारी । दर्शनें अंतरीं अनुताप ॥ ३२ ॥ कमाउ-पर्वतीं कांहीं दिवस । केला तेथें सहजी वास । पूर्वाश्रमीं त्या वेळेस । चमत्कारास केलें पै ॥ ३३ ॥ संक्षेपें तें कांहीं कथन । ऐकिजे श्रोते प्रीतीकरून । सकाम निःकाम असो जन । ते करी पावन संतलीळा ॥ ३४ ॥ ब्रह्मानंदस्वामी ह्मसवडात । चैन न पडे कदा तयाते । ह्मणती आणावे यशवंतरायाते । मातोश्रीते सुचविती पै ॥ ३५ ॥ कमाउपाहडात जाऊन । घरासी आणीले बहुयुक्तीनें । खसदनीं करूनि भजन । राहीले जाण च्यारीमास ॥ ३६ ॥ आउबाई बहीण च्याची । अनुगृहीत ती असे साचि । तनु त्यागिली तिनें नेमाची । भगवंताची स्मृति करूनि ॥ ३७ ॥ ह्मसवड सिध्दाचे देऊळांत । यशवंतराव आपा होते । मातोश्री गेली सांगत । पावली मूल अऊ ह्मणून ॥ ३८ ॥ न विच्यारीता आपा तुह्मा । आऊ गेली वैकुंठधामा । ऐसें ऐकुनी दाटला प्रेमा । नेत्रपद्मा जळ वाहे ॥ ३९ ॥ तातडीनें येउनी घरासी । हाक मारीली आऊनाईसी । नवल जाहले यासमयासी । उठली त्वरसी निद्रिस्तापरी ॥ ४० ॥ आपा ह्मणती

होता कोठें । सांगे तेव्हां आऊ चोखट । पाई ठेउनी मस्तक स्पष्ट । वदे मिष्ट जाहली ते ॥ ४१ ॥ गेले असता मी वैकुंठीं । सनकादिकांच्या जाहल्या भेटी । प्रत्यक्ष पाहीला श्रीजगजेठि । तव हांक मोठी मारली तुह्मी ॥ ४२ ॥ तो शब्द सान्यांनीं ऐकिला । जावें ह्मणती भूमंडळाला । न विच्यारीता श्रीगुरूला । या स्थळाला येणें का ॥ ४३ ॥ ऐसे सांगुनी समस्तांनीं । आज्ञा केली जावया मेदिनीं । मग उतरले ततक्षणीं । ठेविलें चरणीं मस्तक हे ॥ ४४ ॥ येकमास परीयंत । आऊ राहिली मृत्युलोकात । नित्य करणें कीर्तनाते । भजे गुरूतें सर्वभावें ॥ ४५ ॥ पुढें सवे चि तीस दिवसांनीं । माता पावली निर्गुणसदनीं । आऊबाईसी पंधरावें दिनीं । आज्ञा श्रीगुरूनीं दिधली ते ॥ ४६ ॥ ठेउनी श्रीगुरूपदकमळा । विसर्जिली जडतनूला । आपण मिळाली चिद्गगनाला । प्रवेश केला वैकुंठभुवनीं ॥४७॥ वाल्मीकक्षेत्रासी येउनी आपण । सन्यास घेतला येशवंतरायानें । सदानंद ज्या ह्मणती जन । अवतार पूर्ण रामानंदाचा ॥४८॥ भागीरथीतटाकीं वास केला । परी मनीं हेतु राहिला । उदकरूपीं विष्णु शोभला । तयातीराला राहवें ह्मणुनी ॥४९॥ विष्णुतनु प्रत्यक्ष कृष्णा । ऐसें सांगे व्यास पुराणा । रामानंदीं अंत:कर्णा । कराया स्नाना संकल्प तो ॥ ५० ॥ किंबहुना पंढरी । काशीहुनीं राहिली दुरी । ह्मणउनी जन्मले म्हसवडनगरीं । केली वारी बहुतदिन ॥ ५१ ॥ सकल्पविकल्पारहित । सन्यास ज्याचा सुशोभीत । होउनी राहिले सर्वगत । द्वैतनिरद्वैतरहित पैं ॥ ५२ ॥ परी जना व्हावणें भक्ति । साधु आगीं सहजस्थीति । सूर्याआगीं जैसी दीप्ती । संत रीती तैसी ते ॥ ५३ ॥ जन्म मरणाचा घेउनी घोट । वर्तती जेवि दग्धपट । हे तो जाणती आत्मनिष्ट । न कळे स्पष्ट इतर जना ॥ ५४ ॥ सदानंदस्वामि धन्य । स्मरणें चि करी जग पावन । रामानंदयति पूर्ण । अवतरला जन तारावया ॥ ५५ ॥ रामनामीं ज्याची प्रीती । रामउपासक ते निश्चितीं । कबिरादिका शिष्य गती । श्रीरघुपति भजती जे ॥ ५६ ॥ जन्मांतरीचा आभ्यास । रामनामीं

भक्ति विशेष । सदानंदीं तें उपास्य । प्रेमसमरस निजनामीं ॥ ५७ ॥
रामजयंतिउत्साहांत । रोवटी ठेविले जडतनूते । जळसमाधी सदानंदाचें ।
श्रीकृष्णेंत शोभलीसे ॥ ५८ ॥ असो तें कथन पुढें सांगणें । सांप्रत
ऐकिजे स्वामी आचरण । अहर्निशीं निरसमजन । क्षेत्र धन्य वाल्मीक
पै ॥ ५९ ॥ द्वादशवर्षे बाळव्यांत । सदानंदा वास्तव्य तेथें । सदानंद
देती जनातें । दैन्यातें करुनी दूरी ॥ ६० ॥ परावेक्षामापणवर्तणें ।
विदेहस्थिती ज्याची पूर्ण । कोणी केलीया हास्य रुदन । तैसें चि करणें
आपणें तें ॥ ६१ ॥ हरसींगनामें रजपूत । मृत्य पावला बाळव्यांत ।
कांहीं दिवस जाहले त्यातें । तयाची स्त्री येत मार्गानें ॥ ६२ ॥
येकायेकीं हुंदका आला । रुदन करी तये वेळा । स्वामीसी सांगे
हरीसींग मेला । कैसें तुम्हाला कळलें नाहीं ॥६३॥ नानापरी करी विलाप ।
पायावरी घातली झडप । दुःखाश्रु ते भये आप । हृदय सकृप स्वामींचें
॥ ६४ ॥ आपण हि तैसें चि रुदन करीती । मार्गी लोक सकळ
पाहती । मनीं विपरीतभावना धरीती । जन वदती परस्परें ॥ ६५ ॥
ह्मणती लोभ स्वामीहृदईं । राहिलासे अद्युनीं पाही । वास्तव्य होतें
जयागृहीं । आले ते हि देशलेखक ॥ ६६ ॥ छळकबुद्धि प्रश्न केला ।
सांगती स्वमुखें श्रीस्वामीला । पूर्वाश्रमींचा पुत्र मेला । खरें वार्तेला ऐकिलें
म्हणुनी ॥ ६७ ॥ नारायण वदुनी स्वस्थचित्तें । बोलते जाहले देश-
पाड्यातें । मृत्युलोक हा निश्चित । काय विपरीत अधीक ते ॥ ६८ ॥
स्वामिवाक्य ऐकुनी कर्णीं । अनुताप पावला देशकुळकर्णी । सदृढ
मिठी घालुनी चरणीं । करुणा वचनीं भाकितसे ॥ ६९ ॥ ह्मणे महा-
राज गुरुमाउली । मिथ्यावाणी माझी वदली । छळकवृत्ति आंगीकारीली
परीक्षा भली करावया ॥ ७० ॥ बोधिती तया सदानंद । तुमचें कर्म
तुह्मांसी सिध्द । भावना तैसी फळ शुध्द । स्वयें निर्द्वंद असो आह्मी
॥ ७१ ॥ विनोद होता सत्पुरुषाचा । क्षोभला हुताश तेथें साचा ।
वाडा जळाला देशपाड्याचा । जागा स्वामीचा वेगळा करुनी ॥ ७२ ॥
विराट खोलींत ज्या स्वामींचें । स्थळ राहिलें तें नेमाचें । भस्म जाहलें

हवेलीचें । आश्चर्य वाचे बोलती जन ॥ ७३ ॥ आपुला अपराध क्षमी ईश्वर । संतछळण नावडे तिळभर । भक्तवत्छळ रमावर । ब्रीद तोडर गर्जतसे ॥ ७४ ॥ असो वाल्मीकक्षेत्रीं सदानंद । द्वादशवर्षे राहिले शुध्द । तेथुनी प्रयाण केले प्रसिध्द । आले आत्मविद अष्टयासीं ॥७५॥ अष्टधाप्रकृति निरसावया । वास्तव्य केलें तया ठाया । जग व्यउनी स्वात्मकार्या । निरसीती माया कृपादृष्टीं ॥ ७६ ॥ कोशावरीते जाऊन । नित्य करावे कृष्णास्नान । वेदघोष पुराणश्रवण । भगवत्मनन निरंतर ॥ ७७ ॥ जे ते येती दर्शनासीं । निश्चय

महालक्ष्मीसी । तेथें जावया स्वामीसी । आठवळे मानसीं सहजों तें ॥ ९० ॥ पूर्वजन्मीं काशीक्षेत्रांत । वास जाहला असे बहुत । दक्षण-वाराणसी अद्भुत । व्यास गर्जत पुराणीं ॥९१॥ याळागीं स्वामी सदानंद । रामानंद अवतार प्रसिद्ध । करवीरांत राहती सिद्ध । जन विविध तारावया ॥९२॥ तेथुनी पुढें पराशर क्षेत्र । पराशरऋषी जेथें पवित्र । तेथें जाउनी मोक्षसत्र । घाळिति स्वतंत्र सदानंदें ॥ ९३ ॥ दाई ह्मणुनी तयेस्थळीं । ब्राह्मणस्त्री होती भळी । उपोषण करीत बैसळी । आत्म-मेळी मिळावया ॥ ९४ ॥ आराधुनी रघुनंदन । अतस्य करीतसे ध्यान । तयेसी जाहळे रात्रौ स्वप्न । करीती पावन सदानंद ॥ ९५ ॥ अवतार पूर्ण रामानंदाचा । संशय हरीळ तुझा साचा । दृष्टांत होता पहाटेचा । आळा दीनाचा साहाकारी ॥ ९६ ॥ जन्ममरण दवडुनी खेद । बाईसी दिधळा सदानंद । धन्य महाराज सदानंद । स्मरती नंद-किशोर वदनीं ॥ ९७ ॥ पराशर मुनींचे गुन्हेत जातां । भेटी जाहल्या परस्परें तत्वतां । तो संवाद ग्रथीं ळिहितां । नये सर्वथा उघड पै ॥ ९८ ॥ पराशर आणि दाल्भ्य । अभेदरूप मुळींचें ऐक्य । रामानंद तो चि स्व येक्य । पुन्हा होय सदानंद ॥ ९९ ॥ सदानंदी रंगविती । सदानंद समर्थमूर्ति । देहीच असतां विदेहस्थीती । धन्य जगती योगीराज ॥ १०० ॥ कोणी येके दिनीं शैत्यकाळीं । योगासनीं गुरुमाउळी । समाधिस्थ होती जाहळी । स्थीरावळी वृत्ति ते ॥ १ ॥ *ब्रह्मरंध्रीं ळीन होता । पातळी तेथें उन्मनी अवस्था । शेगडी पुढें जळत* असता । वर्तळे पहातां अपूर्व पै ॥ २ ॥ विंगळ उडोनी ळाकडाचा । माडीवरी पडळा साचा । मांस जळता गंधीचा । वास खोळीच्या बाहेर आळा ॥ ३ ॥ उघडुनी पाहता द्वार शिष्यानीं । तो जंघेवरी आहे अग्नी । समाधीस्थ स्वामी आसनीं । अळक्ष नैनीं मुद्रा ते ॥ ४ ॥ च्यार घटिकानंतर । सदानंद आळे देहावर । सांगती तेव्हा नारीनरा । पोळळें शरीर ह्मणुनी ॥ ५ ॥ स्फुलिंग काढुनी मग टाकिळा । ऐसा समर्थ योगी भळा । निर्विकल्प समाधीळा । अखंड ज्याळा वर्तणें पै ॥६॥

काहीं तूर्या काहीं उन्मनी। जगदोध्दार विचरे जनीं । नातरी ते सदा ध्यानीं । आत्मचिंतनीं सदानंद ॥७॥ पनाळ्यावरी शूद्रभार्या । भक्तामाजी लक्ष्मी आर्या । अनन्यभावें नमितां पाया । यतिवर्यो आली दया ॥ ८ ॥ तात्काळ करुनी दृष्टीपात । केली क्रियेसी त्या समाधीस्थ । मेळउनी निजस्वरूपाते । भक्तिसदनाते नादविली ॥ ९ ॥ पहाता अनेक ऐसे प्राणी । उत्धरीले जेणें मेदिनी । सदानंद अवतार जनीं । प्रेमखाणी यतिराज ॥ ११० ॥ भ्रमण करीत पुन्हां अध्यासी । येते जाहले स्वानदराशी । राहिले तेथें चित्सुखविलासी । दिवानिशी भजना ते ॥ ११ ॥ पुण्यवान तेथील नर । करविलें सहजीं विष्णुमंदिर । येकादशीस हरीजागर । च्यारीप्रहर सतत पै ॥ १२ ॥ घरोघरीं वाचिती ग्रंथ । कीर्तन करीती येउनी संत । पंढरीतुल्य ते क्षेत्र निश्चित । जेथें होत हरीचर्च्या ॥ १३ ॥ सदानद सर्वांठाईं । दुःख क्लेश तेथें नाहीं । अवतार जाहला प्रत्यक्ष मही । सदा पाईं वंदन तया ॥ १४ ॥ शेवटीं निजतनु आपुली । जेणें कृष्णेसी समर्पिली । देववृंदें तेव्हां पातली । विमानें दाटलीं गगनीं ते ॥ १५ ॥ शके सत्राशेतेवीस । शुत्ध अष्टमी मधुमास । रामजयंतिउत्छाहा विलसे । समाधीदिवस पुण्यतिथी ॥ १६ ॥ रामजन्मकाळीं दुसरे दिनीं । सत्‌शिष्य गेले तये स्थानीं । तो मस्तकहीन कृष्णाजीवनीं । देखीली नैनी समाधी ते ॥ १७ ॥ ध्यान करीत बैसला मेळा । तो आकाशध्वनी तेथें जाहला । रुंडमाळेसी मस्तक योजीला । श्रीशिवाला प्रिय म्हणुनी ॥ १८ ॥ पूर्वावतारीं रामानंद । काशीक्षेत्रांत राहती सित्ध । विश्वेश्वरदैवत प्रसित्ध । आवड शुत्ध त्या साधुची ॥ १९ ॥ सदानंद तो हा स्वामी । कृष्णातीरासीं अवतार भूमी । देह अर्पिता निजनेमीं । अतर्यामीं हर्ष त्यांस ॥ १२० ॥ रुंडमाळेसी ते गुंफोनी शीर । शोभता जाहला गीरीजावर । धन्य महाराज येतेश्वर । वैष्णववीर कलीमाजीं ॥२१॥ ऐसी होता आकाशवाणी । संतोषले सर्वत्र मनीं । पूजन करूनी समस्तांनी । आले निघोनी ग्रामांत ॥ २२ ॥ श्रीविष्णूचीं तनु कृष्णा । तया हृदईं सदाशिव जाणा । रुडमाळेंत पंच-

वदना । योजिले निधाना सदानंदा ॥ २३ ॥ त्रिंबकवाडी ते स्थळ बरवें । जेथें कृष्णेंत निरंतर शिव । सदानंदीं ज्या राणीव । समाधीठाव योगीराजा ॥ २४ ॥ त्रिगुणातीत त्रिंबकवाडी । शुद्धसत्वभक्ति गाढी । सुकृत पदरीं ज्या गाठोडी । जाती आवडी स्नानासी तेथें ॥ २५ ॥ सच्चिदपद होतां आईक्य । सदानंद सहजी ठाव । त्रिपदार्चे शोधन होये । समाधी देख त्या त्रिंबकवाडी ॥ २६ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । त्रिपुटी जाहाली तेथें क्षीण । त्रिंबकवाडी तें चि जाण । समाधीस्थान सदानंदीं ॥ २७ ॥ जें जें बोलूं ते त्रिपुटी । त्रिंबकवाडी ते गोमटी । पादुका तेथीळ पाहातां दृष्टी । वास वैकुंठीं होये जीवा ॥ २८ ॥ भूत-प्रेतसमंधबाधा । टळुनी जाय सकळ आपदा । प्राप्त होये आत्मसंपदा । इतर सदा सहजीं सुख ॥ २९ ॥ उत्छाहा होतसे प्रतिवर्षी । दुर्लभ प्रसाद तो देवासी । कीर्तन ललित त्या स्थळासी । दर्शनासी यात्रा बहु ॥ १३० ॥ सिध्दरूपें समचरणी । भक्तमंजरी काढिली सुमनीं । राजारामीं अंतःकर्णी । आनंद मनीं सदा तो ॥ ३१ ॥ पुढें ब्रह्मानंद स्वामीयाचें । लेखनचरित्र होईल सार्चे । पठण श्रवण कल्याण जनाचें । रुक्मीणीचें जीवन करी ॥ ३२ ॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । सदानंदआख्यानातें । अध्याय समाप्त परीपूर्ण हा ॥ ३३ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनुक्र० अध्या० ॥ ७३ ॥ समा० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पण-मस्तु ॥ श्रीराधाकृष्णार्पणमस्तु ॥ शुभमवतु ॥

## अध्याय ७४

### — ब्रह्मानंद चारित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सकळाधारा । सर्व कारण सिध्देश्वरा । आदि प्रकृति माहेरा । श्रीरघुविरा आत्मरूपा ॥ १ ॥ तूंचीपण शेवटीं । जें जीवाशिवाचें भाडवल । तेथें द्वैत पारूषलें । साक्षी होईल तूर्यस्थ ॥ २ ॥ सर्व धर्माचा निजधर्म ।

परी ह्मणविती निर्धर्म । अनुभवाचें हें चि वर्म । जाणण्या परम बीज तें ॥ ३ ॥ बीज वृक्षा आदि अंतीं । बीजें वृक्षाची उत्पत्ति । शाखा-पल्लवस्थिती । सर्व निश्चीती बीजापोटीं ॥ ४ ॥ पोट पाठ ह्मणणें जरी । ते हि धर्म शरीरीं । निर्धर्म ते अशरीरीं । वर्तती वरी पंचभूतें ॥ ५ ॥ वर्तणें हा हि धर्म घडला । निर्धर्म कैसा बोलिला । लिहिता या शब्दाला । शंका मनाला वाटतसे ॥ ६ ॥ शंका तरी दुर्जीया पावसी । अद्वैती गति कैसी । अनुभवें चि समरसी । ते वाचेसी बोलतां नये ॥ ७ ॥ याल्लागीं वेदें मौन धरीलें । साहीशास्त्रासी ठक पडले । पुराणासी मग केतुलें । वर्णवें मळे गुरुरूप ॥ ८ ॥ तेथें मानव वदे काई । सनकादिक वीस्मित पाही । सहस्त्र मुखाचा थकला अहि । न पुरे शाई सिंधूची ॥ ९ ॥ उड्डाण करीता गरूडास । न सरे कदा तें आकाश । चिलीट फीरे सावकाश । काय तयास गती ते ॥ १० ॥ तरी काय तेणें न उडावें । जाहलें तैसें मज स्वभावें । यथामति स्तवितों भावें । अवधान द्यावें संतजनीं ॥ ११ ॥ स्तव्य आणि स्तविता । तूं चि येक आत्मा आईता । अहङ्कृति कासया आता । जेवि सविता परिपूर्ण ॥ १२ ॥ सूर्यप्रकाशें सूर्या पाहणें । श्रीगुरुराया तेवि स्तवन । निजरूपें होतसे स्फुरण । ते चि वर्णन करीतसे ॥ १३ ॥ समचरणीं ठेविलें शीर । श्रोतावक्ता जानकीवर । जो कां तिष्ठे विटेवर । भक्तिप्रियकर परमात्मा ॥ १४ ॥ वामनस्वामी वैष्णव आगळा । वर्णीले मागें ह्या चरीत्राला । अवतार तेणें पुन्हा घेतला । ते लीळा अनोपम्य ॥ १५ ॥ जन्म घ्यावया हेतु कारण । तें ऐका सविस्तर जाण । बहुत फिरला साधुस्थान । पंढीत वामनसंत तो ॥ १६ ॥ अनुग्रह इछित हिंडला । चित्पचीचा स्फुंद मनाला । प्रशस्त न वाटे कोठें त्याला । शेवटीं आला मळ्याचळीं ॥ १७ ॥ कर्दळीवनांत येऊन । बैसलासे सचिंत जाण । सचिदपदाचा अर्थ करून । आनंद पूर्ण पाहीतसे ॥ १८ ॥ अनिर्वाच्य तो ब्रह्मानंद । चित्पाचिवळें न होये सिध । तये काळीं वामन प्रसिद्ध । योजिली सिध आत्मदत्ता ॥ १९ ॥ ह्मणे हा

देह अनाधिकारी । कीं गुरुत्व बुडाले सृष्टीवरी । उभा राहुनी पर्वत-शीखरीं । तनुपात करी अनुतापें ॥ २० ॥ यतिरूपें ते वेळीं । प्रकट जाहाले श्रीवनमाळी । वामनासी भेटी दिधली । निवारण केली अहंकृति ॥ २१ ॥ मंत्रोपदेश करुनी कर्णीं । अघटीत दावीली स्वागीनीं करणी । सर्व आत्मता अंतःकरणीं । बाणली जनीं स्वरूपस्थीति ॥ २२ ॥ ब्रह्मानंदीं रंगुनी मन । समाधीस्थ जाहले वामन । यति-स्वरूप श्रीभगवान । करीतो ध्यान तयाचें ॥ २३ ॥ पुढें लीळा जी जी जाहली । ती तो सकळ मार्गे वर्णिली । अळिन्यायगति घडली । वृत्ति गुंतली गुरुरूपीं ॥ २४ ॥ मागुती धरनी जेणें देह । संन्यास घरीला वामनें पाहे । ते कथा अद्भुत आहे । ऐकतां होये आत्मस्थिती ॥ २५ ॥ विषयानंद टाकून । ब्रह्मानंद इछिला पूर्ण । ते चि प्राप्त नामा-भिधान । धन्य अवतार वामन तो ॥ २६ ॥ ब्रह्मानंद तो चि स्वामी । देह धरीला म्हसवडग्रामी । गणेश ह्मणती पूर्वाश्रमीं । गोत्र धर्मी विश्वामित्र ॥ २७ ॥ विद्यावाद सांगून । अमित्रत्व घडलें जाण । यालागीं केलें अवतरण । विश्वामित्र पूर्ण कुलामार्जी ॥ २८ ॥ द्विजगणाचा जो कां ईश । पंडीत ब्राह्मण विशेष । येतद्विषई वामनास । या अवतारास गणेश वदती ॥ २९ ॥ विद्यामद निरसोन । गृहस्थकुळीं केलें जनन । देशलेखक वृत्ति पूर्ण । पाहतां नमन सकळ वैदिका ॥ ३० ॥ नम्र होउनी सर्वांभूतीं । पंढरीची वारी करीती । दिवारात्र भजन चित्तीं । कीर्तनीं प्रीती बहुत पै ॥ ३१ ॥ ब्रह्मचर्यादि गृहस्थाश्रम । प्राप्त जाहाला सर्वही क्रम । प्रज्योत्पादन सहजीं धर्म । लाधले नेम सकळ पै ॥ ३२ ॥ गीरीबाई स्त्रीयेसी । वामनें छळिले पतिव्रतेसी । या जन्मीं तये कुसी । जन्मथी साधुसी निजलीळे ॥ ३३ ॥ वस्त्रें अळंकार देऊन । केलें तयेचें समाधान । कृष्णातीरासी येऊन । घेतला आपण चतुर्थाश्रम ॥ ३४ ॥ तेथे श्रोतीं प्रश्न केला । कोण साधु उदरीं आला । सांगणे कांहीं त्या कथेला । इतिहास पहिला जन्मांतर ॥ ३५ ॥ संत जनाचा पाहुनी आदर । वक्ता बोले जोडुनी कर । लक्ष्मण जो का शेषावतार । तेणें महीवर

जन्म धरीला ॥३६॥ नाम तयाचें आनंदमूर्ति । आराधिला श्रीरघुपति । ब्रह्मनाळीं समाधीं डुलवी । जन पाहाती प्रत्यक्ष डोळां ॥ ३७ ॥ रघुनाथस्वामीचे सेवेठाईं । प्रीति जयाची उत्कृष्ट पाही । समाधीस्थ होता देही । न पुरे हृदई भक्तिसुख ॥ ३८ ॥ चरणसंपुष्ट स्वामीचे । अर्चन करावे तयाचें । प्रेमवळें ज्या जोड्याचें । पुस्तक गीतेचें जाहलेसे ॥ ३९ ॥ ते कथा सविस्तर । वर्णीली पूर्वीं साचार । प्रस्तुत घेतला अवतार । तो विच्चार सांगणें पै ॥ ४० ॥ समाधीस्थ होता आनंदमूर्ति । वामनस्वामी तेथें येती । परस्परें सुखिची प्रीती । संवाद करीती उभयता ॥ ४१ ॥ ह्मणती श्रीगुरुसेवा अनुष्ठान । समाप्त नाहीं केलें अझून । तो मधीच आयुष्यदिन । अस्तमाना जातसे कीं ॥ ४२ ॥ तरी आता कांहीं दिवसा । देह धराया मनीं भिवसा । काय करावें निर्गुणवासा । भजनविलासा न सरे प्रीति ॥ ४३ ॥ वामन महाराज वे हि वदती । अधीक सुख सत्संगतीं । वाळवटीं च्यारी मुक्ति । स्वयें लोळती पंढरीये ॥ ४४ ॥ मजलागीं येणें जन्म । नाहीं तृती श्रीगुरु प्रेमें । काय करावें निर्गुणधाम । माहात्म्य परम कीर्तनाचें ॥ ४५ ॥ असो तो संकेत होताचि पहिला । याळागीं तेथें अवतार धरीला । आनंदमूर्ति जन्मासी आला । नाम तयाचें अदोबा ॥ ४६ ॥ शेषाकृति मस्तकीं फणा । भाषण मृदु असत जाणा । वेदशास्त्र आणि पुराणा । केले अध्ययना सहजीं ते ॥ ४७ ॥ श्रीरघुनाथस्वामीचें वृंदावन । तेथें राहिले कुटुंबसहीत येऊन । सेवा धर्म अनुष्ठान । वाचिती पुराण प्रत्यही ॥ ४८ ॥ जगत्रयाचा श्रीराम पिता । लक्ष्मण काका तो निर्धीता । आनंदमूर्ति ते चि पाहता । ह्मणुनी तत्त्वता काका ह्मणती ॥ ४९ ॥ अंदोबाका प्रह्लपातनाम । श्रीरघुनाथीं ज्याचें प्रेम । आराधीला मेघ शाम । ब्रह्मनाळग्राम सेविले पै ॥ ५० ॥ पूर्वीं भक्तियोगेंकरून । जोड्याची गीता जाहली जाण । कीर्ती फाकली बहु तेणें । गेले निघोन अमानित ॥५१॥ तें लक्षण यावया आर्गी । जन्म धरीला पुन्हा जगीं । सकळ विद्या असोनी आर्गी । वरीले उगवगी अमानित्व

॥ ५२ ॥ पंढरीसी जातां पाही । विचित्र घर्तले ऐका तें हि । लुटिले तस्करें विप्रास देहीं । उरले कांहीं नसे जवळ ॥ ५३ ॥ अन्हीक सारोनी दोन प्रहरा । आले द्विजाचिये घरा । तव तो ब्राह्मण उमा द्वारा । वैश्वदेव वरा करूनी ॥ ५४ ॥ अतिथी मार्ग पाहत । तव ते आले काका तेथें । जीर्णवस्त्र नेसले होते । मळीण दिसत तयासीं ॥५५॥ कृष्णागरूचंदन काळा । परी सुगंध त्याचा आगळा । कस्तुरी अधीक परिमळा । अज्ञानाला न कळे ते ॥ ५६ ॥ तैसा स्वामी आनंदकाका । न कळे तया मूर्खकाका । ह्मणती येरे सोनारलोका । आहेसी भुका वाटतसे ॥ ५७ ॥ गोठ्यांत दुरून घातले पाणी । पात्र दिधले अन्न मरूनि । काका जेविले प्रीति करूनि । शेण लाउनी पात्र काढिले ॥ ५८ ॥ मागाहुनी शिष्य येतां । समजले त्या मग गृहस्था । अनुताप होउनी चित्ता । ठेविला माथा आनंदचरणीं ॥ ५९ ॥ ह्मणती ब्राह्मण आपण असतां । सोनार वदलों तुह्मां समर्था । वेगळें पात्र वाढीलें न कळतां । अपराध सर्वथा घडला मज ॥ ६० ॥ आनंदमूर्तीचा तो अवतार । अमानित्व अंगीं सार । बोधीला तो द्विजवर । आपण सर्वत्र ह्मणुनी ॥ ६१ ॥ मी च आत्मा सकळ हृदईं । सोनार कैसा नव्हे पाहीं । ऐसें सांगतां विप्रपाईं । करी देहीं साष्टांग नमन ॥६२ ॥ कृपाकर ठेउनी शीरीं । पावन केला त्या अवसरीं । ऐसे महाराज काका निर्धारीं । लक्षण शरीरीं अमानित्व ॥ ६३ ॥ समाधीची करुनी सेवा । उध्दरीले बहुत जीवा । आश्रम घेउनी चतुर्थ बरवा । देहभावा अर्पिलें पै ॥ ६४ ॥ निर्याणसमईं श्रीगुरुचरण । मानसोक्त करुनी पूजन । उंचस्वरें राम स्मरून । केलें विसर्जन शरीरासी ॥ ६५ ॥ तो उत्छाह वर्णितां सोहोळा । तादात्म्य होये निजमनाला । ब्रह्मनाळी देह ठेविला । लाविले तनुला गुरुपाईं ॥ ६६ ॥ वृंदावनासानिध्य । समाधिस्थ श्री-आनंद । काय वर्णू तो आनंद । ब्रह्मानंद ज्याचा पिता ॥ ६७ ॥ पूर्वाश्रमीं ऐसा पुत्र । जन्मविला जेणें पवित्र । श्रोते वदती पुढें तंत्र ।

सांगिजे चरीत्र अनुक्रमें ॥ ६८ ॥ ब्रह्मानंद जो कां यति । वामन अवतार तो निश्चीती । तें कथन राहिलें चित्तीं । ऐकावा प्रीतीं बहुत पै ॥ ६९ ॥ वंदन करुनी श्रोतिया । मस्तक ठेविला श्रीगुरुपाया । तेणें कथा प्रसवे हृदया । सिध्दया परीपूर्ण ॥७०॥ ब्रह्मानंदमहाराज । आष्टे ग्रामीं आले सहज । देखीलें तेथें यतिद्विज । सदानंद अज अविनाश ॥ ७१ ॥ दत्तात्रयासी शुकदर्शन । कीं याज्ञवल्क्या कपीलभेटी जाण । किंबहुना हरीहर पूर्ण । दिसती अभिन्न उभयतां ॥ ७२ ॥ मग तो आनंद उभयतांचा । वर्णवेना त्रैवाचा । अनुभव विराला परेचा । अतर्क्यठाईंचा उल्हास ॥ ७३ ॥ रात्रंदिवस अद्वैत । भाषण होतसे वेदांत । जेथें उघड सिध्दांत । श्रोते ऐकत चतुर्विध ते ॥ ७४ ॥ ते च्यारी कोण ह्मणाल । बध्द मुमुक्षु साधक भले । सिध्दहृदया येतसे डोल । ऐकता प्रांजळ भाषण पै ॥ ७५ ॥ उघड समाधी आबालवृध्दा । गेली टलुनी भवबाधा । प्राणी लाधले निजसंवादा । ब्रह्मानंदा रंगले ते ॥ ७६ ॥ सदानंद नांदे तेथें । दुःखदैन्य जाले परते । आत्मचर्चा होतसे जेथें । तिष्टे भगवंत त्या ग्रामीं ॥ ७७ ॥ ब्रह्मानंद सदानंद । थोर संत जगीं प्रसिध्द । उध्दरीले जन शुध्द । सदा गोविंद ज्यापासीं ॥ ७८ ॥ जितके ग्रंथ वामनाचे । ब्रह्मानंदासी मुखोद्गत साचे । जेवि स्तोत्र ह्मणती वाचे । पठण तयाचें तैसें तें ॥ ७९ ॥ वामनस्वामीचा सांप्रदाई । काशींत असे सद्विप पाही । नारायणनाम तया देहीं । संशय हृदई तया आला ॥ ८० ॥ निवारण न होये कोठें तेन्हां । आराधीले वासुदेवा । ब्रह्माक्षराचा अर्थ बरवा । यावा अनुभवा ह्मणुनी ॥ ८१ ॥ भजन करुनी तये निशी । भगवत्गीता घेतली उशासी । निद्रा केली सचित मानसीं । श्रीहरीसी स्मरुनी मनीं ॥ ८२ ॥ दीनदयाळ पंढरीराणा । स्वप्नीं सांगे त्या ब्राह्मणा । वामन अवतार जाहाला जाणा । घ्यावें दर्शना तयाचें ॥ ८३ ॥ ब्रह्मानंद नामें करून । कृष्णातीरीं प्रसिध्द जाण । ब्रह्माक्षराचा अर्थ करून । देतील वामन तुझे गुरु ॥ ८४ ॥ ऐसा होतां चि दृष्टांत । द्विजासी तेन्हां संतोष बहुत ।

तात्काळ निघोनी धरीला पंथ । आला त्वरीत कृष्णातीरा ॥ ८५ ॥ ब्रह्मानंद पाहुनी दृष्टीं । पायावरी घातिली मिठी । आनंद जाला फार पोटीं । गळे दृष्टी प्रेमाश्रूनें ॥ ८६ ॥ अभिषेक करुनी गुरुपादलिंगा । सुमनशब्दें पूजिलें अभंगा । कोण वर्णी तयाचे भाग्या । लाधला सौभाग्या ज्ञानाचिये ॥ ८७ ॥ ओंकाराचा जाणुनी अर्थ । ब्रह्माकार जालें चित्त । ब्रह्मानंद धन्य संत । वामन निर्धांत अवतार जो ॥ ८८ ॥ ब्राह्मणासी देउनी आज्ञा । पाठविला आपुले सदना । ऐसा समर्थ यतिराणा । ब्रह्मानंद जाणा ब्रह्मनिष्ट ॥ ८९ ॥ अंतर बाह्य ब्रह्मानंद । दर्शनीं प्राप्त सर्वानंद । वचन ज्याचें बहुत शुध । करी आल्हाद खळदुर्जना ॥ ९० ॥ भिल्लाटकक्षेत्रीं मजला भेटी । होतां जाहाली तुष्टीपुष्टी । सांगितल्या सूक्ष्मगोष्टी । केली वृष्टि आनंदाची ॥ ९१ ॥ जन्मांतरींचो जाणुनी खूण । यथामति होतसे स्तवन । सिद्धकृपाप्रसाद पूर्ण । रमलें मन राजारामीं ॥ ९२ ॥ धन्य स्वामी यतेश्वर । वामनाचा जो अवतार । ब्रह्मानंद साधु थोर । ब्रह्माकार करी जीवा ॥ ९३ ॥ पंढरीचा प्रेमा मोठा । निघोनी जावे वैकुंठा । कीर्तन ऐकुनी वाळुवंटा । यावे मठा यतीचे ॥ ९४ ॥ तेथें जावें श्रीभगवंतें । करीत असावा निजयेकांत । स्वामी येता राउळांत । पंढरीनाथ समागमें ॥ ९५ ॥ राहीरुक्मीणी वेल्हाळा । वदन करीती यतिपदाला । देती आणुनी स्वयें फराळा । येकादशीला अमृतफळें ॥ ९६ ॥ रंगशीळेवरी भजन । ब्रह्मानंद करीती जाण । हास्य करीती जगजीवन । रुक्मीणीरमण पांडुरंग ॥ ९७ ॥ ब्रह्मानंदीं आनंदभक्ति । मोहिला तेणें वैकुंठपति । निरंतर रमापति । मागें धावती भक्ताच्या ॥ ९८ ॥ जें जें भक्तें मनीं धरावे । तें तें करी स्वयें केशव । दासांकित सीताधव । श्रीराघव दयाघन ॥ ९९ ॥ ब्रह्मनाळक्षेत्रीं श्रीकृष्णेंत । शेवटीं अर्पिले निजदेहाते । ब्रह्मानंद साधुसमर्थ । समाधीस्थ जाहले पै ॥ १०० ॥ गाता ऐकतां चरीत्र हें । पूनीत सहजी लोकत्रय । इछितफळ प्राप्त होय । आत्मसोय सिद्धकृपें ॥ १ ॥ पुढें दत्तात्रयाचे निविध अवतार । ते चि कथा वर्णिली सार ।

श्रोतीं श्रवण करीतां आदरें । तात्काळ सरे त्रिविधबाधा ॥ २ ॥
सिधदया परीपूर्ण । राजारामीं प्रसन्न होणें । तेणें ग्रंथ होतसे ज्ञाण ।
कार्यकारणसहीत पै ॥ ३ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती
मनोरथ । ब्रह्मानंदचरीत्रातें । जाहला समास अध्याय हा ॥ १०४ ॥
अध्याय ॥ १ ॥ समास ॥ अनु० अध्या० ॥७४॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥
॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ श्रीराधाकृष्णार्पणमस्तु ॥
॥ शुभंभवतु ॥

## अध्याय ७५

### — श्रीदत्तात्रय चरित्र — विष्णु अंश —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु अपरमिता । सिधस्वरूप
पढरीनाथा । दत्तात्रय तू चि पहातां । नमन समर्था समचरणीं ॥ १ ॥
तूर्या देवीते रुक्मीणी । सत्यभामा विलासीनी । मीपणाते लक्षी मनीं ।
लक्ष्मीजननी निजस्फुरण ॥ २ ॥ ऐक्यपणें सदा राही । जवळी विलसे
ते राही । अष्टनायका प्रकृति देही । होता विदेही येकामता ॥ ३ ॥
अनुभवसुखाचें राउळ । सहस्रदळीं श्रीगोपाळ । भक्तिप्रेम जें प्रांजळ ।
विट सोज्वळ ते चि पै ॥ ४ ॥ आनंदाचा पूर्ण गाभा । पहाता नेत्रीं
विठ्ठल उभा । फाकली ते ज्ञानप्रभा । व्यापुनी नभा निजचैतन्य ॥ ५ ॥
विवेक वैराग्य गरूड हनुमा । जोडुनी विष्ठती हस्तपद्मा । नादानुसंधान नित्य
नेमा । वाहे गंगा ते सत्राशी ॥ ६ ॥ नामदेवाची पहिली पाहिरी । श्रवण-
साधन द्वितीय निर्धारीं । उल्लंघन करावा महाद्वारीं । नउप्रकारीं सोपान ॥७॥
वामसव्य योवन्या दोनी । भजन होतसे सोहंध्वनी । चौघडा व्याजे
निशीदिनीं । भरला गगनीं दशनाद ॥ ८ ॥ ठाईं ठाईं कीर्तनसोहाळा ।
षड्दळचतुर्दळदशदळा । द्वादशदळीं नाचती वाळा । भूमीनिर्मळा हृदय
तें ॥ ९ ॥ सोळाजणी षोडशदळीं । ईडापिंगळा मारुतीवळी । कीर्तन
होतसे तयाजवळी । गरूडस्थळीं पाहती जन ॥ १० ॥ सहस्रदळी
पुंडरीक । सद्गुरूरूप न तें चि निकें । तेथें वाहे अमृतोदक । भीमा

ऐक्य महानदीं ॥ ११ ॥ गोनामईद्रीयाचे । गोपाळपुर सन्निध साचे । महात्म्य थोर पद्मावतीचें । जवळी व्यासाचें पीठ तें ॥ १२ ॥ काळत्रै नव्हे रद । क्षेत्र शुध्द ते नारद । जेथे प्रत्यक्ष वसे नारद । कीर्तन आनंद सदा पै ॥ १३ ॥ देवत्रै मिळुनी मूर्ति । दत्तात्रय तो चि निश्चितीं । आकार उकार मकार ज्योती । योगी जाणती निजात्मता ॥ १४ ॥ तो आत्मा परेहुनी पर । अर्धमात्रा विटेवर ! बिंदु पूर्ण रुक्मिणीवर । नमस्कार अनन्य तया ॥ १५ ॥ औठमात्रा अठठ हस्त । अंतरबाह्य त्या पंढरीनाथ । तो चि स्वामी सिध्द समर्थ । वदती अनंत संतटीळा ॥ १६ ॥ श्रीदत्तात्रय स्वयें चि आपण । संतस्वरूप केलें अवतरण । त्रिविधप्रकार देह धरून । त्रिविध जन पावन कराया ॥ १७ ॥ ते कथा अतिप्रेमळ । नाशी अघतमाते सकळ । भक्तमंजीरी होतसे माळ। तयासी सोज्वळ पदक हें ॥ १८ ॥ अत्रिभार्या प्रतिव्रता । तयाउदरीं येणें दत्ता । ते वर्णिले अन्य ग्रंथ। संक्षेपता येथें पै ॥ १९ ॥ पातिव्रत्य पाहावें ह्मणून । स्वयें आले श्रीभगवान । कमलासन उमारमण । करीती छळण निजलीळे ॥ २० ॥ अतिथीवेश धरुनी द्वारीं । आरोळी दिधली दीर्घस्वरीं । नग्न होउनी तूं सुंदरी । भीक्षा नरी घाल ह्मणती ॥ २१ ॥ नातरी जातो माघारे । अडचण घातिता सर्वेश्वरें । उदक घेउनी स्वकरें । टाकिले त्यांवर आंगावरते ॥ २२ ॥ होउनी बाळ ते चि क्षणीं । तिन्हीं देव खेळती आंगणीं । तात्काळ उचलोनी लाविले स्तनीं । निजविले नेउनी पाळण्यांत ॥ २३ ॥ लक्ष्मी सावित्रि उमा येतां । दिधले पति त्यांचि तत्वता । ती आहे विस्तीर्ण कथा । धन्य पतिव्रता अनसुया ॥ २४ ॥ वर माग ह्मणतां देवांनीं । सती बोले तेव्हां वचनीं । पुत्र व्हावें तिघांनीं । नाहीं मनीं आणीक ईछा ॥ २५ ॥ अवश्य ह्मणुनी तये काळीं । मस्तकें दृढ पाई ठेविलीं । नम्रवचनें गौरविली । अनसूया भली सती ते ॥ २६ ॥ ईछा पूर्ण करावया । अवतार घेतला तेणे हृदया । ब्रह्माविष्णुरुद्र तया । त्रिविध काया येक धरीली ॥ २७ ॥ तो जगद्गुरू श्रीदत्त । तिहीदेवांचा अवतार निश्चित ।

साहा भुजा ज्या विलसत । आयुधें शोभतीं निजहस्ती ॥ २८ ॥ दंड कमंडलु अक्षयाचा । शंखचक्र त्या विष्णूचा । त्रिशूळ डमरू तयाचा । सदाशिवाचा अनुपम्य ॥ २९ ॥ ईयापरी त्रिगुणात्मक । दत्तात्रयाचा अवतार चोख । जगदोध्दारा विचरे देख । स्थानें अनेक सहजस्थीती ॥ ३० ॥ काशीक्षेत्रीं करीती स्नान । करवीरांत भिक्षा घेणें । माहुरांत जाउन निद्रिस्थ होणें । बहुत फिरणें उशाचें पै ॥ ३१ ॥ स्वईछागमनी योगीराज । स्मरण होतां प्रगटे सहज । जगदोध्दारार्थ तो महाराज । कळवळला अज अविनाश ॥३२॥ प्रत्यक्षता भूमंडळीं । मानवी काया अवलंबिली । त्रिविधमूर्ति स्वयें जाहली । गुरुमाउली श्री दत्त ॥ ३३ ॥ श्रीपादश्रीवल्लभ । अंश तो चि पद्मनाभ । विरंचि पूर्ण तो स्वयंभ । अनुभव गर्भ आनंद बावा ॥ ३४ ॥ अष्टे ग्रामांत होता वास । उन्मत्तदशा आंगीं विलसे । बहुत भोगितां विलास । जगीं विशेष कीर्ति पै ॥ ३५ ॥ सदाशिवाचें स्वरूप जाण । अज तयाचें नामाभिधान । महादेव क्षेत्रीं वास पूर्ण । पिशाचस्थीतीनें महायोगी ॥ ३६ ॥ रूपासी करुनी तेणें प्राकट । सभ्या राहे तेथें चि निकट । जनरहित वर्तणें स्पष्ट । अनुभवनिष्ठ परम साधु ॥ ३७ ॥ ऐशाप्रकारें दत्तात्रय । त्रिविधरूपें नटले स्वयें । त्रिविधजन तारीताहे । दोषत्रय दुरी करीती ॥ ३८ ॥ बाळउन्मत्त पिशाच्यस्थीती । अवतारत्रै आंगीं विलसती । ऐकतां ते कथनोक्ती । पावन होती लोकत्रय ॥ ३९ ॥ श्रीदत्तात्रयाचें विष्णुस्वरूप । श्रीपादश्रीवल्लभ सरूप । चरीत्र तयाचें असे अमूप । नाहीं माप तयासी ॥ ४० ॥ तें चि कांहीं यथामति । वर्णिजेल प्रथम भक्ति । अवधान द्यावें तुह्मी संतीं । हे विज्ञाप्ति सकळींची ॥ ४१ ॥ सविस्तरकथा गुरुचरीत्रांत । वर्णिल्या असती बहुत । सारांश कथन असे येथें । सप्रेम श्रोते ऐकिजे तें ॥ ४२ ॥ पीठापूर पूर्वदिशे । उत्तमनगर तें विशेष । पुण्यपावन तो देश । जन्मले योगेश तेथें पै ॥ ४३ ॥ आपस्तंभशाखी ब्राह्मण भला । अत्रिऋषि तो जन्मासी आला । आपळे नाम जगती तयाला । सुमति अबळा त्या

जयाची ॥ ४४ ॥ दत्तात्रय पूर्वी उदरीं । अवतार धरीला भवतमारी । तृप्ति नाहीं परी अंतरीं । लीळा वरी ते पहावया ॥ ४५ ॥ याल्यागी पतिव्रता ते सती । तनु परी अनसूया मूर्ति । जीची अखंड असे सुमति । म्हणुनी सुमति नाम तया ॥ ४६ ॥ स्त्रीपुरुष उभयतां ऐसी । अनसूया तो अत्रिऋषि । जाणुनी तयाचे जन्मांतरासी । अवतार कुशीं त्या जाहला ॥४७॥ गर्भस्थ होण्यापूर्वी चिन्ह । वर्तले तें करा श्रवण । सत्व पहावया आले भगवान । होता दिन तो श्राद्धाचा ॥ ४८ ॥ अतिथीचा घेउनी वेश । द्वारीं उभे श्रीजगदीश । अन्न माते देशी आम्हांस । ईप्सित मानस तरी पावसी ॥ ४९ ॥ ऐसें बोलतां सुमति-माता । ती तो मुळिची अनसूया निश्चीता । विच्यार करुनी तये चित्ता । अन्न सर्वथा दिधले तया ॥ ५० ॥ संतोषोनी सित्वपुरुष । मागं म्हणता त्या सुमतीस । बोलिला वदनें माता ऐसे । तया वचनास खरें करा ॥ ५१ ॥ मनोरथ हा सुमतीनें । करीता निवेदन जाले प्रसन्न । प्रवेशले गर्भी पूर्ण । दत्तात्रय आपण जगद्गुरू ॥ ५२ ॥ नवविध-भक्ति ते नऊ मास । पूर्ण होतां नऊ दिवस । प्रसवली पुत्र अविनाश । तया सुखास न वर्णवे ॥ ५३ ॥ नाम ठेविले श्रीपादश्रीवल्लभ । ज्याचें दर्शन योगिया दुर्लभ । भक्तिवलें जाला सुलभ । पद्मनाभ जो कां हरी ॥ ५४ ॥ हरी जीवाचे ताप सकळ । दत्तस्वरूप श्रीगोपाळ । व्रतबंध होतां चि निघते जाहले । तीर्थे प्रांजळ करावया ॥ ५५ ॥ श्रीपादश्रीवल्लभ नाम घेतां । लक्ष्मी देत भाविका समस्ता । पुरवी मनींचे सकळ अर्था । तया दत्ता किती वानूं ॥ ५६ ॥ असो तीर्थासी जातां स्वामी । माता दुःखित अंतर्यामीं । म्हणे कंठावें कैसें आम्ही । व्यर्थ धर्मी जन्मोनी ॥५७॥ पुत्र द्वय आणीक असोनी । तेहि मुके बहिर जनीं । आपण अवतार घेउनी । जातसा टाकोनी आम्हा दीना ॥ ५८ ॥ करुणा भाकितां ऐसी जननी । अघटित केली तेव्हां करणी । पुत्रासी तत्काळ फुटली वाणी । ऐकुनी कानीं येतसे दुजा ॥ ५९ ॥ धनधान्यकनकसमृद्धि । प्रगट केली तेथें सिद्धी । श्रीपाद-

श्रीवल्लभ दयानिधी । नसे अवधी तयासी ॥ ६० ॥ सुमतीनें पाहुनी नवल । आत्मसुखाचा येतसे डोल । सुपुत्रासी कुरवाळिले । उतरीले निंबलोण ॥ ६१ ॥ ह्मणत होते तुजला मानव । परी तूं पाहतां प्रत्यक्ष देव । आश्चर्यकृति केले लाघव । दिधले वैभव अक्षे तें ॥ ६२ ॥ संतोष पावोनी सुमति जननी । नमन कराया धावलीं चरणीं । तये काळीं जोडुनी पाणि । वरदपाणी वंदन करीती ॥ ६३ ॥ स्मरण करीतां प्रघट होईन । देउनी मायेसी ऐसें वचन । श्रीपादस्वरूप श्रीभगवान । जाती आपण निघोन पै ॥ ६४ ॥ तीर्थावळीचे करुनी मीस । उध्दरीती जडजीवास । ठाईं ठाईं कीर्ती विशेष । धन्य योगेश अवतार जो ॥ ६४ ॥ कुरवपुरासी सहजगती । श्रीपादमहाराज स्वये येती । शिष्य-मंडळी बहु निश्चीती । भजन करीती प्रेमळ पै ॥ ६० ॥ कोहीं दिवस करीतां वास । नवल वर्तले त्या स्थळास । ऐकतां हरती सकळदोष । करीती नाश पापाचा ॥ ६७ ॥ कोणी येक रजक तेथें । कुरवपुरीं असे राहत । योगभ्रष्ट होतां निश्चीत । आले मना तयाचें ॥६८॥ ह्मणे श्रीपाद-स्वामी महासमर्थ । पुरवील माझे जीवींचें मनोरथ तरी आतां नित्य तयाते दंडवत करीत जावें ॥६९॥ ऐसा विच्यार करुनी चिचीं । आरंभीली तेणें युक्ति । श्रीस्वामी स्नानासी येती । गंगेत शिरती आंघोळिये ॥ ७० ॥ तये काळीं लक्षुनी संधी । मावें नमावा दयानिधी । ऐसें नित्य घडतां प्रसिध्दी । कृपाउदधी उचंबळला ॥ ७१ ॥ येक संवत्छर परीयंत । अत्रुटित घडले व्रत । श्रीपाद अवतार दत्त । प्रसन्न होत तयावरी ॥ ७२ ॥ नित्यापरी तो दंडवत करीतां । कृपा आली स्वामीचे चित्ता । माग रे ह्मणती रजका आतां । पुरवितों अर्था सकळ पै ॥ ७३ ॥ तव तेथें पर्वकाळीं । यात्रा गंगेसी होती आली । पातशाची स्वारी पातली । सेना सगळी घेउनी ॥ ७४ ॥ स्त्रियेसहीत सपरीवारे । करीती स्नान नारीनर । पृथ्वीपति तो यवन थोर । करी निर्धार जळक्रीडा ॥ ७५ ॥ पाहुनी रजके तो विळास । वेधले तेथें त्याचें मानस । ह्मणे आहा गरीबास । वैभव असे कोठुनी ॥ ७६ ॥ श्रीस्वामीचीं प्रसन्नवेळ ।

रजक क्रीडा देखुनी भुलले । सुखशाश्वत मागू विसरले । मन गुंतले दृढ विषई ॥ ७७ ॥ म्हणे महाराज सागू काय । जाणतसा सकळ हृदय । ऐसें वदुनी धरीले पाय । श्रीपाद सदय स्वामीचे ॥ ७८ ॥ समजुनी मानस त्या रजकाचें । श्रीगुरू बोलवी प्रसन्नताचे । पद भोगी पातशाहाचे । विषय मनीचे पूर्ण करी ॥ ७९ ॥ तये समई तो रजकज्ञाति । अनन्य येतसे काकुळती । भेटी द्यावी मजला अंती । असावी स्मृति पूर्वील हे ॥ ८० ॥ प्रार्थना करीता श्रीगुरुराया । अवश्य ह्मणति परीट तया । मग तो रजक मरूनिया । जन्मला यया पातशाहाउदरी ॥ ८१ ॥ प्राप्त होउनी ऐश्वर्य सकळ । विषय मनीचे पूर्ण जाहले । शरीरासी वार्धिक्य आलें । सहजीं आले स्नानाती तेथें ॥ ८२ ॥ श्रीपादस्वामी श्रीदत्तअंश । आले असती माध्यानिकास । पाहिला तेथें यवनाधीश । बोलती तयास पूर्व सुचना ॥ ८३ ॥ कारे रजका अद्यापिवरी । गुतुनी राहिलासी विषयकुहरी । सावध होई त्वरे अंतरीं । स्मरण करी मागील ते ॥ ८४ ॥ ऐकतां सारे विस्मय करिती । पातशा पावला प्राचीन स्मृति । डोई ठेविली पायावरुती । लाधला मुक्ति गुरुकृपें ॥ ८५ ॥ ऐसें प्राणी अनेक पाहतां । उद्धरीले जेणें तत्वता । काय वर्णू तया दत्ता । श्रीगुरुनाथा श्रीपादा ॥ ८६ ॥ मग शरीरजीर्णवस्त्र । त्यागुनी नवें घेतलें पवित्र । होतें तेव्हां मघानक्षत्र । मास स्वतंत्र आश्विन पै ॥ ८७ ॥ कृष्णपक्ष उत्तमतिथी । विष्णुव्रत द्वादशी आईती । समाधीस्थ विष्णुमूर्ति । श्रीपाद ह्मणती ज्यालागी ॥ ८८ ॥ कुरवपुरीं त्या श्रीपाददत्त । अदृश्य जाहले निजलीलें ते । पुन्हा देह धरीं मागुते । तें श्रोते ऐका तुह्मी ॥ ८९ ॥ गुप्त प्रघट व्हावया । काय उशीर दत्तात्रया । अनुसृत त्याची सर्वा माया । ते असुनिया तुर्यासखी ॥ ९० ॥ अर्धमात्रा तयास ह्मणती । परावाच्या जें का चवथी । ओंकारातें जे का प्रसवती । देवता निश्चिती ते चि त्रय ॥ ९१ ॥ आकारउकारमकार । ब्रह्माविष्णु आणि रूद्र । दत्तात्रय तोचि निर्धार । जाणती खरे आत्मवेत्ते ॥ ९२ ॥ रजोगुण तो ब्रह्मयाचा ।

ऋग्वेद स्थूळदेह- त्याचा । यजुर्वेद सूक्ष्माचा । जन्म विष्णूचा त्यामाजी ॥ ९३ ॥ कारणदेहीं वसे रुद्र । सामवेदगायन थोर । तिन्हीं देव याप्रकारें । अवतार श्रीदत्ताचे ॥ ९४ ॥ असो विष्णु अवतार श्रीदत्त । जन्मले पुन्हा कारंजेनगरांत । उत्तरदेशीं ब्राह्मण समर्थ । विद्वान अत्यंत चतुर्वेदी ॥ ९५ ॥ शाखा थोर माध्यंदिनी । वाजसेनी ह्मणती जनीं । नामाभिधान सुलक्षणी । घेती वदनीं तृतीय आचमन ॥ ९६ ॥ जनविख्यात विप्रोत्तम । माधव ऐसें जयाचें नाम । भगवंताचें तें निजधाम । ह्मणुनी धामें सर्व ह्मणती ॥ ९७ ॥ याळागी यजुर्वेदांत । जन्मले फार साधु समर्थ । ज्ञानेश्वरादि आत्मवेत्ते । असंख्य संत कळींत पै ॥ ९८ ॥ याज्ञवल्क्यादि ऋषि मळे । जेणें सूर्यासी उभे केले । भगवत्गीतेंत भगवान वदले । बोलिले तत्धाम ह्मणुनी ॥ ९९ ॥ उपनिषदीं हा चि विच्यार । बृहदारण्यांत स्वरूपनिर्धार । जाणती ते ज्ञानी थोर । भमले इतर निंदा करिती ॥ १०० ॥ वेदनिंदा ज्याचे वदनीं । शुद्ध नव्हे त्याची जननी । चंद्रसूर्य जव गगनीं । नर्कपतनीं पडे तो ॥ १ ॥ सर्वत्र ब्राह्मण चतुर्वेदी । अधिकार नेणोनी दुर्बुध्दी । हस्तस्वराचे देता संधी । खदखदी हासती पै ॥ २ ॥ चारीवेदांसी हस्तस्वर । वर्णभेद्र परस्परें । वेदपुरुष परात्पर । नमस्कार तयासी ॥ ३ ॥ देवतात्रय तो चि दत्त । यजुर्वेदांत जन्म घेत । येकाग्रता असो चित्तें । तया कथे स्वामीच्या ॥ ४ ॥ उपजतां चि येकायेकी । ॐकार उच्चार केला मुखीं । आश्चर्य जाहलें सर्वलोकीं । जाहले सुखी भगवज्जन ॥ ५ ॥ जे जे करणार पुढें लीळा । वर्णन केले पत्रिकेला । दत्तमहाराज तो अवतरला । वेदपुरुष मळा तो चि पै ॥ ६ ॥ तेथें ज्ञानासी उणें केंचें । शब्दास सारूनी लक्ष साचे । बोलत नाहीं याळागी वाचे । धरीले साचें मौन पै ॥ ७ ॥ मातापिता चिंता करीती । नानाउपायसाधनें रीती । ब्राह्मण कराचा कैसा ह्मणती । पडली भ्रांति सर्वांसी ॥ ८ ॥ व्रतबंधकाळीं सांगता मंत्र । न करीती वैखरीउच्चार । सूक्ष्मध्वनि परात्पर । स्मरे कुमर तो अवतारी ॥ ९ ॥ आंबा तयाची निजमाता । माधव ब्राह्मण तो पिता ।

प्रशस्त न वाटे तया चित्ता । ह्मणती आता काय करावें ॥ ११० ॥
तव तो उपाध्याय सांगे जननीसी । भिक्षा घाला ब्राह्मणासी । मगळवाद्यें वाजती सरसी । घालिती स्वामींसी भीक्षाळ पै ॥ ११ ॥
या भिक्षेच्या योगेकरून । वेदशास्त्रें अठरा पुराणें । करीं बापा वेगीं पठण । आसीर्वाद पूर्ण देतसे हा ॥ १२ ॥ आधीं च अवतार श्रीदत्ताचा । तयात आसीर्वाद निजमातेचा । प्रताप पाहणें मग तयाचा । चहूंवेदांचा स्वामी तो ॥ १३ ॥ आरंभिले तात्काळ वेद । ऋग्वेजुसाम प्रसिद्ध । अथर्वण चवथा शुद्ध । घडघडात सिद्ध ह्मणतसे ॥ १४ ॥ साही शास्त्रें अठरा पुराणें । करीतसे स्वयें महाराज पठण । दत्तात्रय श्रीभगवान । चकित ब्राह्मण सारे पै ॥ १५ ॥ दचकली ती मातापितरें । ह्मणती प्रत्यक्ष हा अवतार । नव्हे सर्वथा प्राकृत नर । ह्मणू पुत्र व्यर्थ आह्मीं ॥ १६ ॥ ऐशापरी नवळ करीती । जनक जननी संतोष चित्तीं । तीर्थाटणासी आज्ञा घेती । श्रीदत्तमूर्ति योगी ते ॥ १७ ॥ ऐकुनी अंबा माधव पिता । करुणा भाकिती गुरूसमर्था । उपेक्षू नको स्वामीदत्ता । कोण त्राता आह्मा जनीं ॥ १८ ॥ प्रार्थना करीता माये ताते । येक वर्ष राहिले तेथें । देउनी संतत संपति ते । आज्ञा घेत जावया पै ॥ १९ ॥ आल्हाद पावोनि ते उभयता । कुर्वाळिती निजसुता । चरणावरी ठेविला माथा । सांगती तत्वता अवेसी ॥ १२० ॥ जे जे काळीं कराल स्मरण । ते ते समई देईन दर्शन । याप्रकारें संतोषे करून । गेले आपण बदरीवना ॥ २१ ॥ वास करुनी अरण्यांत । सूर्य आराधना केली बहुत । तेथुनी प्रगटले काशींत । आनंद शिष्यातें त्या दर्शनीं ॥ २२ ॥ कृष्ण सरस्वती सन्याशी । नमन करून साष्टांग तयासी । घेतले चतुर्थ आश्रमासी । अवतार पुरुषी श्रीदत्तें ॥ २३ ॥ चतुर्थ अवस्थेमाजी सदा रत । जो का स्वामी श्रीदत्त । सन्यास घेणें काय तेथें । परी वेद आज्ञेत मान देती ॥ २४ ॥ असो नरसिंहसरस्वती श्रीगुरुनीं । नाम ठेविलें आवडीकरुनी । काहीं दिवस सेवोक्त राहुनी । माहासमशानीं वास केला ॥ २५ ॥ कृष्णसर-

र्सैर्तीची घेउनी आज्ञा । जादोत्धारार्थ फीरती जाणा । करुनी मेरूसी प्रदक्षणा । देखीले स्थाना समानुषी ॥२६॥ दक्षणउत्तरमानस करुनी । अफळखोपिसी आळे कैवल्यदानीं । तेथें चौसष्ट योगीनी । लागल्या चरणीं स्वामीच्या ॥ २७ ॥ औदुंबरवृक्ष कृष्णेंत । वर दिधले झाडासी बहुत । तेथें औदुंबर असत । वास तेथें श्रीदत्ताचा ॥ २८ ॥ अनेकक्षेत्रें अनेक स्थानें । नृसींहसरस्वतीनें केली पावन । ठाईं ठाईं व्यापक पूर्ण । प्रगटती जाण स्थळोस्थळीं ॥ २९ ॥ गळितकुष्ट दूर केलें । वंध्येशी पुत्र प्राप्त जाहले । वाझाह्मैशी दुभती पुष्फळ । पल्लव फुटले शुष्ककाष्ठा ॥ १३० ॥ केलें जनाचें दरीद्र दूर । भूतें पिशाच पळती त्वरें । दर्शनमात्रें कामना पुरे । साधु थोर नृसींव्हसरस्वती ॥ ३१ ॥ श्रीपंढरीभूवैकुंठा । जात्रया ज्याचा प्रेमा मोठा । ऋणी केले श्रीवैकुंठा । नैवेद्य मटमटा खातसे हरी ॥ ३२ ॥ नरसींहसरस्वती । आणि रुक्मीणीपति । उभयतास्वरूप येक निश्चिती । आलिंगनस्थीती परस्परें ॥ ३३ ॥ अनंतविच्यार अनंन लिळा । मति न पुरे स्याहावयाला । दत्तश्रीगुरू अवतरला । ह्मणती ज्याला नृसींव्हसरस्वती ॥ ३४ ॥ विष्णुस्वरूप हा जगद्गुरू । स्मार्थ गगनींचा ध्रुवळधुरु । प्रिय जयासी अति शंकरू । भीष्म प्रियकरू ह्मणुनी ॥ ३५ ॥ गुरुचरित्रीं विस्तार । वर्णिली आहे ग्रंथ थोर । ह्मणुनी येथें सक्षेपविच्यार । सारांश प्रकार कथियेला॥३६॥ पंचगंगेचें संगमी । समाधीस्थ जाहले स्वामी । धन्य जागा ते भूमी । पंढरी नेमी दुसरी ते ॥३७॥ कथा पुराण वेदाध्ययन । अहोरात्र होतसे भजन । नित्य यात्रा घेती दर्शन । नैवेद्य पूर्ण निरंतर ॥ ३८ ॥ प्रदक्षणा गुरुचरित्रपठणें । सिद्ध कामना तात्काळ जाण । माविकासी प्रत्यक्ष दर्शन । स्वप्न होणें सर्वांसी ॥ ३९ ॥ पुण्यतिथी माघमास । कृष्णपक्षप्रतिपदेस । सवत्छर बहुधान्य असे । तेव्हा कन्येस बृहस्पती ॥ ४० ॥ उत्तरायण उत्तमगती । अनोचय नसे तया निश्चिती । शैशिऋतु मागीरथी । कृष्णप्रति आलीसे ॥ ४१ ॥ कृष्णपक्ष कृष्णातीरीं । कृष्णसरस्वती स्मरुनी अंतरीं । कृष्णस्वरूप निर्धारी । भृगुवारी समाधी ते

॥४२॥ दत्तात्रयाचा अवतार । नरसिंव्हसरस्वती योगेश्वर । देह ठेवितां वर्तले बरें । उंचस्वरें नारायण ह्मणतां ॥ ४३ ॥ नारायण जाहले स्वयें प्रघट । चतुर्भुजानी कवळिले निकट । बोलती मजला वाटती कष्ट । अवतार स्पष्ट आणिक धरा ॥ ४४ ॥ राहिला उत्धार करावा । श्रीस्वामिदत्तसाधवा । नरसिंव्हसरस्वतिगुरुदेवा । हेतु पुरवा ह्मणती विठल ॥४५॥ पंढरीनिवास ऐसें वदतां । अवश्य ह्मणुनी सद्गदाचेचा । गुप्तस्थीती संवाद होतां । जाहली तत्वता समाधी ते ॥ ४६ ॥ मग कांहींकाळानंतर जाणा । जन्म घेतला तृतीय पुन्हा । अवतरआसे योगराणा । तया कथना ऐकीजे पै ॥ ४७ ॥ नारायणनाम स्मरतां अंतीं । त्याची नामाची जाहाली प्राप्ती । नारायणस्वामी व्यास ह्मणती । नृसिंव्हसरस्वति ते जाणा ॥ ४८ ॥ श्रीविष्णुस्वरूप श्रीदत्तात्रय । अवतार तयाचा हा तृतीय । नारायणस्वामीयतिवर्य । जेवि सूर्य दुजा पै ॥ ४९ ॥ तपोतेज सौंदर्य अधीक । धगधगीत जैसा पावक । करुणामृत जेवि शशाक । बोधार्क स्वयंज्योती ॥ १५० ॥ आच्यारविच्यार कर्मी प्रीती । वेदाध्ययन शास्त्रसंपत्ति । संशय आलीया पाडिता चित्तीं । तात्काळ फेडीती श्रीस्वामी ॥ ५१ ॥ अनुमवाची तो वोतिव मूर्त । कृपादृष्टी लोका तारीत । प्रत्यक्ष अवतार श्रीदत्त । ब्रह्मस्थीतींते काय पाहणें ॥ ५२ ॥ बत्धमुमुक्षसाधकसित्ध । दर्शना येती सकळ सित्ध । अधिकारपरत्वें करिती बोध । तोडिती बध भवाचा ॥५३॥ तीर्थमीसें नवखंडपृथ्वी । फिरले स्वयें जगद्गुरुगोसावी । पुरवोनी जनाची कामना बरवी । ब्रह्मानुभवी प्राप्त केले ॥ ५४ ॥ भजनीं लाउनी नारीनर । केली तयाची कार्यें समग्र । धन्य महाराज यतिवर । आत्रिकुमर अवतार जो ॥ ५५ ॥ पंढरीची बहुत भक्ति । नारायणस्वामीसी रुक्मिणीपति । कीर्तन कराया उभे करीती । सुरवर पाहती स्वर्गींहुनी ॥ ५६ ॥ तें यातुत्व केतुलें वर्णावें । श्रवण करीती देवाधिदेव । भजनकडाकाध्वनि अपूर्व । गगनीं गंधर्व चकित पै ॥ ५७ ॥ दश अवतार श्रीहरीचे । भजन केलें स्तवन साचें । गंगा कृष्णा यमुनेची । स्तुति तीर्थांची

प्रेमळ ॥ ५८ ॥ ते भजनपर काव्यस्तवन । नारायणस्वामींचे ह्मणता जाण । कामना होतसे सकळ पूर्ण । घडे दर्शन भाविका ॥ ५९ ॥ गुरुचरीत्री वर्णिले जैसें । वर्तणे स्वामींचे शुध्द तैसें । नारायणस्वामी श्रीदत्त अंश । पडती सर्वांस दृष्टांत जनीं ॥ १६० ॥ गिरीकंदरीं राहणें ज्याचें । येकांतीं बैसणें मौन वाचें । मन परीक्षुनी द्विजाचें । घेणें त्याचे भिक्षेसी ॥ ६१ ॥ ब्राह्मणभोजनें ठाईं ठाईं । करावयाचे आवडी ह्रदईं । जना लावोनी आत्म सोई । मिळाले पाहीं परमही ॥ ६२ ॥ पूर्णीस्थान पंचगंगेचे । संगमीं जे कां प्रसिध्द साचें । स्थापन जेथें पादुकेचें । तेथें देहाचे विसर्जन पैं ॥ ६३ ॥ तया स्वामींसारीखी पूजा । नारायणस्वामींची होतसे सहजा । काय वर्णूं श्रीगुरुराजा । अधोक्षजा श्रीदत्ता ॥ ६४ ॥ नरसिंहसरस्वती नारायणस्वामी । येकरूप विलसे संगमीं । पुण्यजागा ते भूमी । जेथें नेहमीं समारंभ ॥६५॥ ब्राह्मणभोजन पुराणकीर्तन । स्थळो-स्थळीं होतसे भजन । गुरुचरित्र करीती पठण । सप्ताहा पूर्ण निरंतर ॥ ६६ ॥ श्रीकरवीरक्षेत्रांत । महालक्ष्मी असे नांदत । नारायणस्वामीचें स्थान तेथें । ऐकिजे वेदांत पर्यायकरुनी ॥ ६७ ॥ ईडापिंगळा शुषुम्ना । त्रिविध नाडी प्रसिध्द जाणा । देहदेवालय पहाता मना । करीती ध्याना योगी ते ॥ ६८ ॥ डावेकडील निज वोवरी । ईडा नाडी ते निर्धारीं । चंद्रमौळी लिंग चतुरीं । अमृतकुसर्ध श्रीदत्त ॥ ६९ ॥ नारायणस्वामींचें तेथें स्थान । उत्छाहा होतसे नित्य पूर्ण । कृतामृतश्रवेंकरून । जीव सनातन होती पैं ॥ १७० ॥ सव्यमार्गी नाडी पिंगळा । दत्तसमाधी सूर्यस्थळा । मध्यमा वास अंबिकेला । शुशुम्नानाडीला सहस्त्रदळीं ॥ ७१ ॥ ईयाप्रकारीं त्रिविधरूप । तिन्ही नाडीं ब्रह्मस्वरूप । सर्वाभूतीं अजपाजप । ज्ञानदीप श्रीकरविरीं ॥ ७२ ॥ याळागी डावे वोवरींत । नारायणस्वामींचे लिंग वसत । दक्षणमार्गी आसन शोभत । अत्रिसुत जगद्रूपें ॥ ७३ ॥ वामसव्य दोन्ही भाग । दत्तात्रय विचरे आंगें । दोहींकडे उत्छाहा सांग । होती अव्यंग कोल्हापुरीं ॥ ७४ ॥ मध्यस्थ तूर्या महालक्ष्मी । मीपणा छळीता ज्ञानलक्ष्मी । पिंडब्रह्मांड प्राप्तुनी

ट्मीं । परब्रह्मीं ऐक्यता ते ॥ ७५ ॥ असो वेदांत सिध्दांत । नारायणस्वामी अवतारदत्त । स्थान जयाचें करवीरांत । दर्शनीं कृतार्थ करीती तया ॥ ७६ ॥ कथाभाग पुढें साचा । विरंचीअंश दत्तात्रयाचा । श्रीगुरुरूपें वदेल वाचा । जेथें मनाचा अति सौरस ॥ ७७ ॥ सिध्दसमर्थ दयाघन । भूतभविष्य करविती कथन । राजारामी वृत्ति लीन । संतस्तवन अगाध पैं ॥ ७८ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । दत्तअवतार विष्णुरूपातें । अध्याय समाप्त येक दा ॥१७९॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अ० ॥७५॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥



## अध्याय ७६

### — श्रीदत्त ब्रह्मांश चरित्र —

श्रीरामसमर्थ ॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिध्दरघुविरा । पंढरीनिवासा रुक्मिणीवरा । दत्तात्रय अत्रिकुमरा । जगदोध्दारा श्रीमूर्ति ॥ १ ॥ त्रिगुण अवतार स्वयें धरीसी । त्रिविधजन निववीसी । न कळे पार वेदांसी । अतर्क्य शास्त्रांसी रूप तुझें ॥ २ ॥ अठरा पुराणें मांदावळी । आत्मस्थीती बोलता मळी । तें चि ध्यान भूमंडळीं । तनु धरीली त्रिविध पैं ॥ ३ ॥ मागें विष्णुस्वरूप श्रीदत्त । त्रिविध अवतार वर्णिले तुतें । आता ब्रह्मदेवांशस्तवनातें । होई प्रगटार्थ बुध्दीसी ॥ ४ ॥ बुध्दीचे ते निश्चयरूप । जाहला स्वामी प्रजाधीप । श्रीगुरूठाईंचे सरूप । लाविला दीप चिन्मयाचा ॥ ५ ॥ तें ऐकावया कथन दत्त । समूळ करावें अवधान दत्त । तेणें पाविजे ब्रह्मपदातें । हरी आपदातें स्वयें हरी ॥ ६ ॥ विधाता जो कमळासन । दत्तात्रय स्वरूप श्रीभगवान । त्रिविध देह धरिले तयानें । ते आख्यान अद्भुत पैं ॥ ७ ॥ ऋग्वेद तो स्थूळाचा । तेथें अंश ब्रह्मियाचा । याळागीं त्या वेदाचा । देह साचा वरीला पैं ॥ ८ ॥ बाळउन्मत्तपिशाच । अंगी तिनीं संताचे । विष्णुरूप दत्ताचे । बाल्यस्थितीचें वर्णन केलें ॥ ९ ॥

आतां उन्मत्तदशा विराजीत । चतुर्वदनी श्रीदत्त । मूर्त्त वदनीं नाहीं स्मरत । तया लाबित निजभजनीं ॥ १० ॥ ऐसा महाराज दत्तात्रय । ब्रह्माविष्णुरूपत्रय । प्रघटे स्वये श्रीगुरुवर्य । धरा होये दक्षणदिशा ॥ ११ ॥ क्षीरसमुद्रीं नारायण । नाभीकमळीं चतुराननं । सागरीं वास त्याचा ह्मणून । नामाभिधान तेंचि तया ॥ १२ ॥ प्राकृत जनांसी दरयात । भेटले योगेश ते दत्त । दर्याजीबावा समस्त । याळागीं ह्मणत निज आवडी ॥ १३ ॥ नातरी श्रीगुरुराया । नामरूप कैचि काया । दऱ्यात मूर्ति देखुनिया । नाम तया दऱ्या ठेविले ॥ १४ ॥ आवघी स्वरूपें श्रीदत्त । परमात्मा तो पचभूत । तेथें दर्या केवि नसत । नाम शोभत असो तया ॥ १५ ॥ ते दर्यारूप श्रीभगवान । पृथ्वीचीं तीर्थे करून । सहजी करीती जग पावन । आले आपण आष्ट्यासी ॥ १६ ॥ आष्टक्षेत्रात अष्ट लिंगें । स्थापिमेळी सीतारंगे । तेथें आले ते अभंग । भवभंग दर्याजी ॥ १७ ॥ उन्मत्तस्थीती वर्तणें ज्याचें । आचरण न कळे जना साचें । सदा भजन परेवाचे । स्वरूपाचें स्मरण तें ॥ १८ ॥ विस्मरण ते जीवदशा । नाहीं च कधीं त्या योगेशा । धारण करीती मळीन वेशा । हृदयकाशा शुध्द परी ॥ १९ ॥ कार्शावर फासया तेथें । आकाशपरते स्वयेचि आईते । दर्यास्वामी अवतार दत्त । पंचभूतांत खेळती पै ॥ २० ॥ गुप्तरूपें पंढरीसी । जात असावे नेमेसीं । राउळात श्रीदेवासी । विठ्ठलासी आलिंगन द्यावें ॥ २१ ॥ सन्मुख उभे राहुनी । भजन करीतां हास्य वदनीं । माळ घावी भगवतानी । प्रिती करुनी तये भक्ता ॥ २२ ॥ असो दर्यामहाराज पंढरीराज । येक स्वरूप निजतेज । येकात्मता भावण सहज । अति गूज न वर्णवे ॥ २३ ॥ जगविद्यात किर्ती होतां । नामदेव तया अवतार दत्ता । देह धरिला दुसरा मागुता । ते कथा

जो अनादि । आत्मसिद्धी त्यामाजी ॥ २६ ॥ सौंदर्यरूप लावण्यगाभा । जो स्वयापुर्ण विचरे नभा । जेथें तेथें पाहतां उभा । लिहा अथवा ते वर्णिती ॥ २७ ॥ पराप्रेक्षा साम भोजन । वस्त्र अळंकार अंगी भूषण । नातरी सदा नग्न । उन्मत्त पाहणें भयंकर तें ॥ २८ ॥ मार्गामध्ये उमे रहावे । उन्मादहस्ती परी स्वभावे । जाणारासी तू या मध्ये । याचे हाणावे हाळ गे ॥ २९ ॥ येकायेकी स्त्रीयेचे स्तन । धरुनी करावे दुग्ध प्राशन । कुमारीका असो यौवन । यध्या पूर्ण असली तरी ॥ ३० ॥ मारुती म्हणुनी रस्त्यांत । नमन करुनी भळवे वधूते । स्तनपान करावे निरुते । धन्य सुकृत ती माता ॥ ३१ ॥ आनदीबाबाची अद्भुतकीर्ती । गांवा गाई दुग्ध देती । स्मरण करीता प्रगट होती । जाहला जगती अवतार ॥ ३२ ॥ ब्राह्मणभोजन नवसाचे । असदय होतसे जाल्यांत साचे । ढीग पडती मीठाईचे । कोण तयाचे गणित करी ॥ ३३ ॥ इच्छेस वाटेल तें खावें । स्वामीनीं तिकडे न पाहावे । नित्य तृप्त आनदी राव । पूर्ण वैभव जयाचें ॥ ३४ ॥ पाटीलबाबा सींदे यानीं । बगला बांधिला तये स्थानीं । ठाईठाई आसनें करुनी । बैठका निर्मोनी ठेवियेल्या ॥ ३५ ॥ मचक डोल्हारे परोपरी । मैसावयासी निर्मिली कुसरी । काळवांते नाचती मनोहारी । नरनारी दर्शन घेती ॥ ३६ ॥ नानाप्रकारीचे करीती नवस । आनदीबाबा धन्य पुरुष । जो का पूर्ण दत्त अंश । करीती विलास स्थळोस्थळीं ॥ ३७ ॥ कठी रुद्राक्ष्या माळा । कोणे दिवसीं तुळसी गळा । पीतांबर नेसे पिवळा । कोणे वेळा दिगांबरु ॥ ३८ ॥ कोणे समई करड्यावरी । मचकीं शयन कोणे अवसरीं । स्नानसध्या दिवसभरी । नातरी निदिस्थ ॥ ३९ ॥ कोणी कीर्तन करीती पुढे । पुराण सांगती वाडेकोडें । पाठ करणें तयाकडे । दिसावे बेंडे सर्वांसी ॥ ४० ॥ जाळने नगरांत रामजयती । आरभिले उत्छाहाप्रति । दशमी दिवसीं छबीना करीती । तेथें येती आनदीबाबा ॥ ४१ ॥ विद्वज्जनाची सभा मोठी । आनंद जाहाला तया पोटी । बैसविले लोडानिकटी । पाहतां दृष्टी

ताजीम दिल्ही ॥ ४२ ॥ कांहीं वेळ कथाश्रवण । आनंदीबावा करीती आण । निद्रा येतां केले शयन । करुनी स्मरण गोसाव्याकडे ॥ ४३ ॥ कंठितासी प्रारंभ जाहला । चौघडा स्वामीचा वाजूं लागला । आमसोजे लागला डोळा । कोण तयाला जागृत करी ॥ ४४ ॥ धारा सुटोनी अकस्मात । दीप मशाला जाहल्या शांत । आरती होउनी सहजी स्वरीत । क्षीरापत वाटीली पै ॥ ४५ ॥ अभ्र येउनी अंधार पडला । जाजम बांधवा गोळा केल्या । तळघरांत नेउनी टाकील्या । त्यांत सापडला आनंदीबावा ॥ ४६ ॥ लोक सारे शोध करीती । पाटीलबावा खेद चित्तीं । तंव दुसरे वर्षी रामजयंती । जाजम काढीती तळघरांतील ॥ ४७ ॥ सुरळी उलगडतां अकस्मात । आनंदीबावा त्यांत होते । आले किंवा नाहीं खळित । ऐसे विस्मारीत बोहेर निघाले ॥ ४८ ॥ विस्मय पावोनी नारीनर । केला स्वामीसी नमस्कार । वाटीलीं नगरांत साखर । योगेश्वर प्रगटले ते ॥ ४९ ॥ ऐसे महाराज आनंदीबावा । दत्तात्रयाचा अवतार बरवा । उत्धरावया जडजीवा । जन्म साधवा घ्या येणें ॥ ५० ॥ ब्राह्मण असंख्य जेवीत असावे । जोडा घालून त्यांत हिंडावें । ब्रह्मरूप देवाधिदेव । द्वैतभाव कैचा तया ॥ ५१ ॥ सर्व सोवळ्या त्रिमूर्ति । ब्रह्मदेवांश दत्तविभूति । ब्राह्मण स्वस्थ सारे जेविती । स्पर्श मानिती ब्रह्मरूप ॥ ५२ ॥ तशांत संशय कोणी आणिला ।

तपातें । ध्यान शोभत वैराग्याचें ॥ ५८ ॥ प्रदक्षणेचें वाटेवरी । बैसती तेथें भवतमारी । वाधली वरती सुंदर छपरी । वाटती पळिमरी दहिवाद्या ॥ ५९ ॥ मस्तकीं शोभती पिंगट जटा । तुंदिल तेजस्वी पुरूप मोठा । अमानुषी करणें चेष्टा । कोण श्रेष्ठा त्या जाणें ॥ ६० ॥ श्रीविठ्ठमूर्तीसी राउळांत । अळंकार पूजा केली समस्त । असोनी आपण छपरींत । सांगावें ते जना सकळा ॥ ६१ ॥ भजन सुस्वर पुढें व्हावें । अष्टौ उत्पन्न होती भाव । प्रेम आगीं ज्याचें यावें । निरंतर देव ज्यापासी ॥ ६२ ॥ अनुभवसिद्ध अखंड वाणी । सदा मुद्रा वसे नैनीं । तूर्यासखी विलासीनीं । भोगिती उन्मनी योगिराज ॥ ६३ ॥ बाळाराम तो वैरागी । निरईछ विषय वीतरागी । गुप्त प्रगट होती जगीं । मोक्षविभागी ते जाणती ॥ ६४ ॥ महादेवांत तो दत्त । कमंडलु घट जवळी निश्चित । दही त्यातील न सरे । असंख्य यात्रेंत वाटतां पै ॥ ६५ ॥ साहाय्यार महिने होउनी गुप्त । पुन्हा छपरींत असावे निदीस्थ । माहात्म तर्कज्ञ होती चकित । करीती पद्धीत आश्चर्य मनीं ॥ ६६ ॥ श्रीपांडुरंगाचे वामभागीं । भजन होतसे तयेजागीं । चमत्कार बहुत जगीं । पावती वेगीं नवसाते ॥ ६७ ॥ बयरागीमेळा अपरमित । तये स्थानीं यात्रा भरत । बाळाराम साधु समर्थ । पंढरीनाथ अभेद तो ॥ ६८ ॥ याप्रकारें अवतारत्रय । महादेवांश दत्तात्रय । धारण केलें श्रीगुरुवर्य । प्रसन्न हृदय जगदोद्धारा ॥ ६९ ॥ स्मशानवासी श्रीभगवान । दत्तात्रय स्वरूप जो का जाण। पिशाच्च स्थीती सहज पूर्ण । प्रगटले आपण तीन रूपें ॥७०॥ ते कथा अत्यंत गोड । पुढील अध्याईं वर्णीं उघड । जेणें मनींचा संशय उडे । वैराग्य जडे भक्तीसी ॥ ७१ ॥ सिद्ध प्रसाद होतां शीरीं । सरस्वती राहीली वैखरी । राजारामीं कैची उरी । रावणारी तो हृदयस्थ ॥ ७२ ॥ काव्य करता करविता । आत्माराम स्वयें चि आईता । देह बुध्दी कासया वृथा । सिद्धनाथा नमन तया ॥ ७३ ॥ अंतर्यामीं तो चि सीद्ध । मंजीरी तया अर्पण प्रसीद्ध । श्रोता वक्ता दत्त शुद्ध । तुरे भेद सत

स्तवनीं ॥७४॥ भक्तमंजीरी माळा ग्रंथ। श्रवणें चि पुरती मनोरथ। ब्रह्मदेवांश त्रिविधदत्त। आख्यान समाप्त अध्याय हा ॥ ७५ ॥ अ० १ ॥ समाप्त ॥ अनु० अ० ॥ ७६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभमवतु ॥

---

## अध्याय ७७

### — श्रीदत्तशिवांश आख्यान —

॥ श्रीगणेशायनमः ॥श्रीरामसमर्थ॥ जय सद्गुरु त्रिलोचना। सित्यरूप त्रिपुरमर्दना। त्रिगुणात्मका त्रिताप हरणा। त्रिकाळध्याना त्रिमूर्ति ॥ १ ॥ देहत्रया त्रिविधमात्रा। अकार उकार मकार पवित्रा। त्रिविध अवस्था स्वतंत्रा। त्रिविधमत्रा त्रिशूळ पार्थी ॥ २ ॥ त्रैलोक्य वद्या वेदत्रया। गुणतीता दत्तात्रया। पंढरीशा तूंचि सखया। देवत्रया त्रिविध स्थीती ॥ ३ ॥ ब्रह्माविष्णु रुद्र तिनी। त्रिविधकाया धरीसी जनीं। त्रिविध दोष जाळोनि। विभूति चर्चूनी ते शोमसी ॥ ४ ॥ पदत्रयाचा तूंचि दाता। त्रय विद्या देशी सर्वथा। अनेक विच्यार त्रिपुटी पाहाता। नुरे तत्वता पाहतेंपण ॥५॥ ऐसा स्वामी श्रीसित्येश। जो का मार्तंड वौशावतंस। भक्तकाजा पढरीस। उमा सर्वेश जगद्गुरु ॥६॥ ठेउनी माथा त्या समचरणीं। भक्त मंजीरी वाहूं सुमनीं। श्रोती अवधान देतां जनीं। जाती पळोनी त्रिविधबाधा ॥ ७ ॥ काईक वाचिक मानसिक। पापक्षय तात्काळिक। संतचरीत्र पुण्यकारक। होये तारक जडजीवा ॥ ८ ॥ पूर्वाध्याई ब्रह्मदेवांश दत्ताचे। अवतार वर्णिले त्रिविध साचे। आता ऐका शिवांशाचें। पुरुषत्रयाचें जन्मकथन ॥ ९ ॥ श्रीमहादेवक्षेत्रीं। योगी उत्पन्न जाहाला धरत्री। आजानबाहु पद्मनेत्री। सुंदरगात्री दिगांबरू ॥ १० ॥ चिताभस्म सर्वांगाळा। शोमती गळा रूद्रमाळा। आज्या नाम ह्मणती ज्याळा। तो प्रगटला येकायेकी ॥ ११ ॥ सामवेदांत उत्पन्ना। अति सौंदर्य ज्याचें पाहातां। तारुण्य न सरे कदा सर्वथा। काय दत्ता

तया वर्णू ॥ १२ ॥ श्रीगुपर्वती अरण्यांत । रात्रंदिवस भ्रमण करीत । शेख पाब्राची अकस्मात । प्रगट गुप्त होत पै ॥ १३ ॥ विद्याचतुर जगा दिसावे । परी अवरी ध्यातुर्य सर्व । दत्तात्रय श्रीदेवाधिदेव । वैराग्य वैभव शोभतसे ॥ १४ ॥ स्थीती उन्मनी अवस्था । केव्हां तूर्या बोलणे वेदार्था । पठण करणे श्रीगुरुगीता । उच्चार भागवता पुराणादि ॥ १५ ॥ नातरीं उगेच आप आपणाते । बोलत असावे संज्ञार्थे । उत्तर पडता ते श्रवणाते । महारूपाते पावती जीव ॥ १६ ॥ अज अविनाश आत्मस्थीती । आज्याबा दर्शनी देती । आज्या नाम विलसे जगती । करीती स्तुति पावन जन ॥ १७ ॥ श्रीदत्तात्रयाचा जो अवतार । स्मरण होता भेटे त्वरें । नवस अर्पिता कामना पुरे । पावे सत्वर दीनदयाळु ॥ १८ ॥ मर्जी कदा न साफ-डावी । निरपृहस्वरूप उगवला रवि । दर्शनी अंधार अज्ञान उडवी । प्रकाश करवी ज्ञानकीर्ति ॥ १९ ॥ कासारज्ञाति येक प्राणी । हिंडे मागे रात्रंदिनी । ह्मणे मजला उपदेश देउनी । आत्मादानी तारावे ॥ २० ॥ तेव्हां आज्यास्वामी सर्वेश्वरें । परीक्षीला तो कासार । ते ऐका सविस्तर । कथा पवित्र साधूची ॥ २१ ॥ तळ्याठाई महादेवक्षेत्रीं । नेला कासार अर्धरात्रीं । उडी टाकावया वगत्रीं । आज्ञा पवित्रीं केली तया ॥ २२ ॥ ऐशाप्रकारें कसोनी पाहातां । निरधार न होये तया तत्वता । भय पावोनी पळाला मागुता । प्रसन्नता व्यर्थ दवडीली ॥ २३ ॥ मग श्रीगुरुरायें आज्या यानीं । प्रवेश केला तया जीवनीं । अदृश्य जाहले तत्क्षणीं । पाहिले नैनो त्या कासारें ॥ २४ ॥ शोक करीत ग्रामांत आला । आज्यास्वामि ह्मणे बुडाला । सातवेदिवशीं प्रदोषवेळा । बाहिर निघाले तळ्यातुनी ॥ २५ ॥ पाहतां अपूर्व सर्वा वाटले । कासारानें घरीही पावले । आजपुरपे खिडकांविले । नाहीं ऐकिलें वचन ह्मणुनी ॥ २६ ॥ जववरी लोभ देहाचा । परमार्थ तया नरा कैचा । शिष्य जाहला दोदिवसांचा । मंत्र गुरूचा घेतला पै ॥ २७ ॥ न सुटे विषयतटा पूरे । तया कोठुनी साक्षात्कार । वैराग्य नाही तिळभर । वरचिवर

करीती भक्ति ॥ २८ ॥ असो तया कासाराते । अंतरले निजहित । सांगुनिया साधनपथ । जाले गुप्त आपण पैं ॥ २९ ॥ लौकिकीं वादतां कांहीं प्रतिष्ठा । नावडे तया आज्ञा श्रेष्ठा । देह धरीला काळा मोठा । लाविली विष्टा आंगासी ॥ ३० ॥ पिशाचपरी नागवा । हिंडता जाला गावोगावा । काय वर्णिजे तया शिवा । आनंद बरवा होय दर्शनीं ॥ ३१ ॥ जगद्गुरू तो दत्तात्रय । जो का अज अव्यय । अनेक प्रकारें धरणार काय । असोनी अकाय वायुरूप ॥ ३२ ॥ सदा आनंदी पूर्ण स्थीती । खेळुनी खेळ अलिप्त मुर्ती । सदानंद तया ह्मणती । आनंद व्यक्ति हास्यवदनी ॥ ३३ ॥ जनीं वनीं भ्रमण करीत । कडेगांवासी आली मूर्त । तेथें केले अत्याद्भुत । ऐकतां दुरीत जाय दुरी ॥ ३४ ॥ वेडसर पिशाचवृत्ति । परी जग तया मानीती । सिव्ध पुरूष ऐसे ह्मणती । दर्शन घेती सदानंदाचें ॥ ३५ ॥ प्रतिनिधी आदि करून । शोध करीती ज्याचा जाण । शिबिका धाडीती आणावया पूर्ण । हुडकिती अरण्य गिरीकंदरी ॥ ३६ ॥ भाग्योदय असेल ज्याचा । लाभ तयासी दर्शनाचा । अवतार पूर्ण श्रीदत्ताचा । अंश शिवाचा अघोरतपी ॥ ३७ ॥ अघोरक्रिया स्वभाव आंगीं । भूतें पिशाच्च ज्याचे संगी । स्मशानवासी तो वीतरागी । प्रगटला जगीं प्रतापसूर्य ॥ ३८ ॥ कडेगांवकर भागीरथीबाई । प्रेमळ भाविक असे पाहीं । वर्तमान ऐकुनी लवलाही । जाहली ह्रदई सद्गद पै ॥ ३९ ॥ सिव्ध करुनी पाठली लाक । औषध जवळ पाठविली देख । अंतरसाक्षी सिव्धकुळदीपक । बैसले निके सीबीकेंत ॥ ४० ॥ कडेगावात येतांच योगी । आनद जाला सर्वांलागी । अभ्यंग करवुनी तया आंगी । बैसवी चौरंगी भागीरथी ते ॥ ४१ ॥ उत्तमप्रकारें घालुनी स्नान । पीतांबर करविला परीधान । चर्चियेला सुगंधचंदन । घातिल्या सुमनमाळा त्या ॥ ४२ ॥ अक्षता बुका परीमळपुष्पे । धूप

शाल पीतांबर पीवळा । भूईयासी दिधला ततक्षणीं ॥ ४४ ॥ फेकुनी दिल्हीं सकळ चिर । आपण ठाईंचा दिगंबर । सदानंद योगेश्वर । निघती बाहिर वाड्यांतुनी ॥ ४५ ॥ तव तेथे तस्कराचा । मुगुटमणी बाप्पा साचा । बेरड तो असे ज्ञातीचा । खोडा तयाच्या पायांत ॥ ४६ ॥ स्वामीची पडतां तयावरी दृष्टी । बंधन तुटे उठाउठी । अद्भुत करणी केली गोमटी । धन्य सृष्टी अवतार तो ॥ ४७ ॥ तेथे यात्रा बहुत मिळतां । नावडे तया निस्पृहसंता । गुप्त जाहले स्वामी सर्वथा । प्रगटले तत्वतां महादेवीं ॥ ४८ ॥ नामरूप ते आछादून । तृतीया स्वरूप धरीले जाण । ऐसे महाराज करुणाघन । अत्रिनंदन योगीराज ॥ ४९ ॥ समुद्रवलयांकित मही । भ्रमण करीति जेका पाहीं । दर्शन देती ठाईं ठाईं । सार्वभौम देही शोभे जया ॥ ५० ॥ सकळमहीचा स्वामी दत्त । लोकत्रयांत विराजीत । तृतियनाम शोभे तयाते । महिपति वदत जन आवडीं ॥ ५१ ॥ विशाळस्मितीं मुद्रा शांभवी । न कळे ज्याची क्रीया दरवी । विष्ठा आंगीसीं तेणें माखावी । दुर्गंधि नसावी हे लिळा ॥ ५२ ॥ भयंकर दृष्टी कृपा अंतरी । दर्शनमात्रे जीवा तारी । उद्भवला तो महादेव शीखरीं । नरनारी पाहती तया ॥ ५३ ॥ जगनिंद्य आचरण ज्याचे । ज्ञानतरी वेदांतींचे । अनुभव शब्द करणे वाचे । कोण तयाचें स्वरूप वर्णी ॥ ५४ ॥ कोणे येके दिनी शंख हाती । दीर्घस्वरें वाजविती । सर्प घेउनी गळा घालिती । लाविली विभूति सर्वांगा ॥ ५५ ॥ महादेवाच्या लिंगावरी । बैसले ते योगेश्वर । प्रत्यक्ष दिसे गिरिज्यावर । याघ्रांबर वसन पै ॥ ५६ ॥ जन पाहुनी चाकित जाहले । ब्राह्मण सहजीं तेथे मिळाले । वंदन करीता लिंग पाहिले । दिसो लागले सर्वांसी ॥ ५७ ॥ आणिक मागुती तो महिपति । योगेश्वर दत्तमूर्ति । जाली नेत्रांसी गोचर विभूति । पया लागती नरनारी ॥ ५८ ॥ सह्याद्रीचें डोंगरांत । निघुनी गेले अकस्मात । तेथे वर्तले अपूर्व योते । तयेकपे ऐका त्वरित ॥ ५९ ॥ जाळींत होता व्याघ्र

बैसला । तयासी जेणे बोळाविला । दुरकी फोडुनी वाघ आला । योगी बैसला तयावरी ॥ ६० ॥ घोडे फेरीता तयारीती । व्याघ्रासी स्वामी पळविती । नाम शोभे तया महीपति । आज्ञा मानिती श्वापदें सों ॥ ६१ ॥ आपाढींचे यात्रेंत । येकायेकी प्रगटले दत्त । पुंडरीकाचे देउळावरते । महापुरांत बैसले पै ॥ ६२ ॥ यात्रेंत ह्मणती कोण पुरूप । शिखर कवळुनि बैसलासे । नमन करीतां करी हास्य । पाहती विलास पढरीचा ॥ ६३ ॥ देउळामध्ये मध्यरात्रीं । बहुती देखिला जया नेत्रीं । गुप्तरूपें विचरे क्षेत्रीं । काय वक्त्री वर्णिजे तया ॥ ६४ ॥ धन्य धन्य ते दत्तस्वरूप । स्तवन करीतां शेष धापे । सहस्र मुखांचे शीणले पाप । लिला अमूप स्वामीची ॥ ६५ ॥ वैश्य भला कोणीयेक । दृष्टांत जाहाला तयासी देख । पाठी धावे तो निःशख । इछित सुख शाश्वत पै ॥ ६६ ॥ तयास हि कासारासारीखे । उडी टाकाया सांगितले निके । मरणापरते कोणतें दुःख । भय निशक पावला तो ॥ ६७ ॥ गुरु आज्ञा उलंघीता । काय तयासी ज्ञानवार्ता । मुकला सहजी स्वहिता । नये हाता स्वात्मसुख ॥ ६८ ॥ पडला व्यवसाय आवर्ती । तेथें जाली द्रव्यप्राप्ती । समाधान तेणें चित्ती । न घडे स्तीती व्यर्थ दर्शन ॥ ६९ ॥ निष्ठा धरीता संतचरणी । मोक्ष घरीं वाहे पाणी । सिध्दी त्यांची दासी आंदणी । केलीया धणी श्रीगुरू पै ॥ ७० ॥ प्रत्यक्षता सध्या पाही । शालीवान शके पचावन्नाठाई । महादेवक्षेत्री योगी विदेही । विचरे मही महिपतिनामे ॥ ७१ ॥ पुढें अनेक करणार लीळा । मति न पुरे त्याह्मवयाला । दत्तात्रयाचा अवतार जाहला । शिवांश भला योगी तो ॥ ७२ ॥ पुढे चरीत्र कृष्णाजीयावाचें । श्रीगुरू सिध्द वर्णयितील वाचे । श्रवणपठणें कार्य जगाचें । करी साचे श्रीविठल ॥ ७३ ॥ भक्तमार्जोरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । शिवांशत्रय अवताराते । आध्याय समाप्त परीपूर्ण हा ॥ ७४ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनु० अध्या० ॥ ७७ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभमभवतु ॥

---

## अध्याय ७८

## —कृष्णाजी बाबा चरित्र—

|| श्रीगणेशायनमः || श्रीरामसमर्थ || जय सद्गुरू लक्ष्मीरमणा | आत्मयारामा परिपूर्णा | अहंब्रह्म निजस्फूर्णा | ते चि ललना अर्धअंकी || १ || जाणीव प्रासुनी उरले शेष | तयावरी तूं श्रीजगदीश | निद्रा करीसी सावकाश | पाय चुरीतसे आदि शक्ति || २ || विवेकवैराग्य गरूडमारूति | निरंतर जवळी सदा तिष्ठती | च्यारीवेद भाट गर्जती | स्तवन करीती ब्रह्मरूपाचें || ३ || सनत्सनंदन बोधविच्यार | धरीती लक्षांश छत्रच्यामर | जयविजय क्षर अक्षर | रक्षीती द्वार अहं सोहं || ४ || तत्वमेळा तेतीस कोटी | देवतागण शोभती निकटीं | कल्पना कुंठीत वैकुंठीं | आत्मा जगजेठी श्रीविष्णु || ५ || त्रिगुणातीत आद्यस्वरूप | गुणप्रसव तेथुनी दीप | तो चि ब्रह्मा प्रजाधिप | आपी आप करी रचना || ६ || तयापासाव पंचवदन | पंचभूतांसी मूळ कारण | पिंड ब्रह्मांड जाहले पूर्ण | असता निर्गुण निर्विकार || ७ || ऐसा स्वामी वैकुंठनायक | श्रीसिध्देश रविकुलटीळक | पंढरीसी अलौकिक | मुलला सुखें भक्तीसी || ८ || निजभक्ताचें पाहुनी प्रेम | वास्तव्य केलें भेवःशार्मे | कटीवरी ठेउनी करपद्म | आत्माराम उभे सदा || ९ || सताविण नावडे काई | भूवैकुंठ केले पाही | निरंतर कथा जिये ठाई | आणिक नाही प्रिय दुजे || १० || यालागी साधुचरीत्रकथन | भक्तमंजीरी करीतो अर्पण | दत्तात्रयाची कथा पूर्ण | मागे जाण निरोपिली || ११ || त्रिविध अवतार त्रिगुणात्मक | वर्णिलें आख्यान तेचि चोख | आता ऐकिजे सुरेख | कथानक अतिगुह्य || १२ || वदविता आणि वक्ता | नमन तया सिध्दनाथा | जयाचे कृपे हे कथा | निजस्फिटार्थी स्फुरवितसे || १३ || विसोबाखेचर प्रसिध्द भक्त | जो का नामदेवा उपदेशीत | तयाचे मानसी बहु हेत | भागवत कथा वर्णावया || १४ || वाणी काहीं नसे शुध्द | परी अंतरी निर्द्वंद | हरीगुण गाते विपद | ऐसा छंद ज्या

मनीं ॥ १५ ॥ अध्यात्माचा अनुभव । तरी गुरू जयाचा ज्ञानदेव । सर्वभूतीं राणीव । ऐक्यभाव सहजस्थीती ॥ १६ ॥ पूर्वाभ्यास खीस्तीचा असे । चाटेपणा जगीं विलसे । मम अवतरण होये अनायासें । यजुर्वेदास सावकारगृहीं ॥ १७ ॥ माध्यंदिनीशाखे जाण । विसोबाखेचर मुळींचे ब्राह्मण । त्याचे वेदी पुन्हा जनन । पावले जाण भक्तराज ॥ १८ ॥ अमरक्षेत्राचिये जवळ । नागनाथ स्थान परम मंगळ । डोरीग्राम ते प्रांजळ । जन्मले स्नेहाळ कृष्णनामें ॥ १९ ॥ गर्भीच असतां मातेसी डोहाळे । कथा श्रवण करी सकळ । विदेहस्थिती सर्व काळ । ज्ञान प्रांजळ बोले सतीं ॥ २० ॥ बाल्यदशेंत खेळताना । गोपाळकाला करी जाणा । विसोबाखेचर योगीराणा । ठेविले कृष्णा त्या नामें ॥ २१ ॥ सातवे वर्षी मौंजीबंधन । केलनाविद्या अभ्यासन । जाहलिया लग्न करून । संसारांत पूर्ण गोविले ॥ २२ ॥ प्रपंच्यामाजीं उदीम करावा । प्राप्त होईल त्यांत काळ सारावा । नित्य नेमें हरी भजावा । आनंद धरवा सदा हृदईं ॥ २३ ॥ आषाढी कार्तिकी नेमेंसी । वारीशी जावें पंढरीसी । चाळीस वर्षे ऐसी । जाहलीं यात्रेसी सप्रेमें ॥२४॥ मग पंढरीनाथ सांगे कृष्णाजीस । तूं येतां जातां भागलास । आतां राहे पंढरीस । च्यातुर्मास्य माझीये जवळी ॥२५॥ ते आज्ञा वंदुनी शीरीं । वास केला पंढरपुरीं । कथापुराण श्रवण करी । नमस्कारी भूतमात्री ॥२६॥ रंगशीळेवरी भजन । प्रातःकाळीं करावें जाण । काकडआरती भगवत्पूजन । अन्नदान करणें तें ॥ २७ ॥ सायुज्य कवणा न कळावें । अमानित्व तेणें असावें । कीर्तनी दुरी बैसावें । पाया पडावें दीनोक्ति ॥ २८ ॥ तेव्हां सांगे रूक्मीणिपति । तुझे बोल मज आवडती । तरी कथा ऐकवी प्रीती । विठ्ठलप्रति संतांचे ॥ २९ ॥ कृष्णाजी ह्मणती देवास । मजला ज्ञान कैचें कथेस । परी तूं बोलविता जगन्निवास । होईं बुधींस प्रगट पै ॥ ३० ॥ भगवत् इच्छा जाणून । करावया लागले कीर्तन । शुद्ध अभंग ह्मणून । सांगती पूर्ण निजगोष्टी ॥ ३१ ॥ कोठें स्वरज्ञान नसे । साह्याचा तरी अभाव दिसे । परी प्रेमळ कथारस । डोलवितसे पांडुरंगा

॥ ३२ ॥ गरूडपारी करीतां कथा । तेथें गर्दवळा होये वाढतां । पुंडरीका जवळी आता । असे सर्वथा दाटी ते ॥ ३३ ॥ निवांत करावें कीर्तन । म्हणुनी विनविला राधिकारमण । तयानी दाविलें स्थान । दक्षण हनुमान तयाजवळी ॥ ३४ ॥ जागा मुख्यप्राणाजवळी । कृष्णाजी बावासी सांगितली । धावोनी येतो वनमाळी । घेउना मडळी सनकादिक ॥ ३५ ॥ साबद्या कथा सागत । भाविकचरीत्र वर्णित । तेणें सुखें सतोषत । प्रेमभरतें पांडुरगीं ॥ ३६ ॥ भाविक जन नवस करीती । पेढे शर्करा कथेत वाटिती । पताका जळाचीं प्रचिती । येतसे निश्चीती तात्काळ ॥ ३७ ॥ रोगीयाचा रोग जावा । भूतसमध सहजी पळावा । भवबाधा नुरे जीवा । इतर हेवा कायसा तो ॥ ३८ ॥ जिये कथेत सारंगपाणी । कोण तेथील महिमा वाणी । भक्तांची हे शीराणी । योजिले स्तवनी गुरूरायें ॥ ३९ ॥ भगवत्भक्तांच्या कथा । प्रेमें आवडती पढरीनाथा । श्रवणकरत्याच्या मनोरथा । पूर्ण करीता श्रीविठल ॥ ४० ॥ सहा पुत्र कृष्णाजीबावास । देता जाहला श्रीनिवास । ते हि भगवत्भक्त विशेष । कीर्तनास करीती पै ॥ ४१ ॥ च्यातुर्मास राहुनी पंढरींत । कीर्तनीं ऋणी केला भगवत । आठ महीने बदरीग्रामांत । भजनात निमग्न पै ॥ ४२ ॥ जे जे प्राणी शरण येत । विठलमंत्र त्या उपदेशीत । भाविकपणे वर्तत । सर्वकाळ ॥ ४३ ॥ देह अवसान समई जाण । विनविला जेणे नारायण । म्हणे कष्टविले तुजलागून । कार्यकारण देहयोगे ॥ ४४ ॥ तरी आता कृपानिधि । मज नसावी वियोगबुध्दी । तेव्हां पांडुरगब्रह्मउदधी । बोले त्रिशुध्दी निजभक्ता ॥ ४५ ॥ तू माझा परम आवडता । नामपाशीं जाळासी वोधिता । तरी सद्व्या वेव्हारवार्ता । नाहीं सर्वथा तुजलागी ॥ ४६ ॥ जे जे अमती मनोरथ । ते ते पुरती समस्त । तुझी स्तुति जे करीत । ते आप्त पै माझे ॥ ४७ ॥ तयासी चिंता नाहीं । अखड सुखाचे वसती ठाईं । हे माझी भाष्य घेईं । सत्य पाही त्रिवाच्या ॥ ४८ ॥ ऐसें बोलानो श्रीहरी । कृष्णाजी बैसविला गरूडावरी । नेला वैकुंठा-

भीतरी । विसोबा अवतारी पूर्णभक्त ॥ ४९ ॥ तयाचे वर्णितां चरित्र । पापी होती तेचि पवित्र । सतलीळा विचित्र । स्वतत्रपद पाविजे ॥५०॥ सिध्दस्वामी राजारामी । प्रगट वसे अतरयामी । तेणे शुध्द हृदयभूमी । लगवली नेहर्मी प्रेमतुळसी ॥ ५१ ॥ वर्षितां तयेसी कृपाजळ । भक्त-मंजीऱ्या आल्या कोमळ । करूनिया तयांची माळ । होतसे प्राजळ अर्पण हरी ॥५२॥ पुढील अध्याई कथा सुदर । पुडलीकाचा अवतार । तें कथन अत्यतसार । परिसोत चतुरश्रोते पै ॥ ५३ ॥ भक्तमंजीरी-मालाग्रथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । कृष्णार्जाबावाचरीत्राते । अध्याय समाप्त जाहला हा ॥ ५४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १ ॥ ॥ समाप्त ॥ अनु० अ० ॥ ७८ ॥ शुभमवतु ॥

---

## अध्याय ७९

### — जळोजी बावा —

॥ श्रीगणेशायनम ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरूपांडुरगा । कैलासवासी मस्तकी लिंगा । तुर्यापार्वति अर्धांगा । वाहे गगा सत्रावी ॥ १ ॥ पंचदेही पचवदने । पचभूते शोभती नैन । पचमात्रातीत भूषण । पचातन योगीराजु ॥ २ ॥ त्रिगुणात्मक त्रिशूळ हातीं । डमरू वाजे अनुहाति । दश दिशा दशहस्ती । विराजती दश देवता ॥ ३ ॥ अहकृति ज्ञानाग्नीन । जाळुनी भस्म केलें चर्चन । विवेक साचे नदी-वाहन । तत्वगण भूतमेळा ॥ ४ ॥ वामसव्यनाडीवरी । षडानन ते विग्नारी । साजीरे ध्यान उभयकुमरी । बोध विघ्यारी ते जाणा ॥ ५ ॥ ऐसा स्वामी त्रिपुरारी । जो का विलसे सर्व शरीरीं । पिंडब्रह्मांड कैलासगीरी । तो पदरी शोभतसे ॥ ६ ॥ श्रीविठ्ठलाचे मस्तकीं । सांब असती अलौकिकी । याचें कारण ऐकतां लोकी । होती सुखी देवभक्त ॥ ७ ॥ तें कथन सक्षेपद्वारे । निवेदन करणें हृदद सार । उमा ठाकल्या रुक्मीणीवर । ता निर्धार वर्णिजे पै ॥ ८ ॥ फोणी येके दिवशी वैकुठीं । देवभक्तांची जाहली दाटी । परस्परें बोलवां

गोष्टी । प्रेमवृष्टि होतसे ॥ ९ ॥ भक्त ह्मणती आज्ञाकारणें । अवतार लागती तुह्मा घेणे । तरी अधीक आमुचें वजन । आणिले निरगुण रूपासी आह्मी ॥ १० ॥ श्रीभगवान इंदिरावर । हास्यवदनें वदती प्रकार । काय प्रौढी तुमची थोर । वजन फार आमुचें तें ॥ ११ ॥ ऐसा वेवाद होतां । म्हणे पातला वेर्ये तत्वता । केवळ प्रलय पाहतां । जाऊं आता दिंडीर्वना ॥ १२ ॥ ते नारदक्षेत्र उत्तम । नारद मेळविती यात्रा परम । देवभक्तांसी तुळितां प्रेमें । सांपडे धर्म सहजीं तें ॥ १३ ॥ हरी भक्तांचें साधन । निघाले वैकुंठ सोडून । श्रीपंढरीसी येऊन । आरंभिले वजन पै ॥ १४ ॥ गणगंधर्व यक्षकिंन्नर । आठ्यांऐंशी सहस्र ऋषीश्वर । तयाचे शिष्य अपार । वैष्णववीर असंख्य पै ॥ १५ ॥ अठरा पद्म वानरगण । तयांत मुख्य अंजनीनंदन । नऊ लक्ष गोपाळ पूर्ण । भागवतजन चतुर्युगींचे ॥ १६ ॥ ऐसे नारदें मेळविले । वजन करावयासी आरंभिले । विष्णुहृदईं प्रवेशले । देवसकळ मिळुनी ॥ १७ ॥ चव दाविता चवथा । वेखरीचा भाग आईता । सरसाविला पुढे पाहतां । पुंडरीक तत्वता श्रीभागवत ॥ १८ ॥ भक्तमेळीं तया चतुर्थी । येकवटले तूर्यस्थीं । तराजु धरीली व्यासें हातीं । ताजया स्थिति अहं सोहं ऐसें ॥ १९ ॥ ते पाहती प्रकर्ण । देवभक्तांचें होतसे वजन । पारडें बैसले खाली पूर्ण । भक्तनिधान पुंडरीकाचे ॥ २० ॥ भगवंताचे वजन थोडें । वरते चालिलें तेणें पारडें । तेव्हां पासंग घातिले जाड । महादेव प्रौढ याचलागी ॥ २१ ॥ तरी ते नये बरोबर । काय देव मग ते इतर । भार घालिती रुक्मीणीवर । कटीवर कर ठेऊनी ॥ २२ ॥ अनंत ब्रह्मांडें रोमरंध्री । भार न पडे अद्यापीवरी । अठावीस युगें जाहली तरी । वजन पडरी होतसे ते ॥ २३ ॥ भगवतभक्तांचें वजन फार । धन्य धन्य तो चमत्कार । पुंडरीक भक्त थोर । रूक्मीणीवर जयाजवळी ॥ २४ ॥ संतवृंदांचा तो नायक । नाम जयासी पुंडरीक । अवतरले स्वकौतुक । ऐका निके ते सर्व ॥ २५ ॥ भगवान ह्मणती तेरा भागवत । जन्मले ते साधु समस्त । चवदावा तूं

निजभक्त । समाधीस्थ केवि पा ॥ २६ ॥ श्रीमारुती चिरंजीव असता । जन्म घेतला तेणें तत्वतां । यास्तव देह धरुनी मागुता । द्यावी सर्वथा आज्ञा भेटी ॥ २७ ॥ व्यासादिक अवतरले । मज येऊनी आलिंगन दिधले । तूं तरी मजला उभे केले । भाक्ति येळे करुनी ॥ २८ ॥ पुंडरीक भक्तराया । वाह्मा स्फुरती भेटावया । विसर्जून ध्यान तया । धरी बा काया संतशीरोमणी ॥ २९ ॥ ऐशाप्रकारें प्रेमभरीत । बोळता स्वये पंढरीनाथ । श्रीपुंडरीक अवतार घेत । ते आख्यान अद्भुत पै ॥ ३० ॥ पुंडरीक कमळाचें नाम । तेंचि हातीं देवाचें पद्म । विराटस्वरूपी वर्णिले परम । क्षेत्रिय धाम कर जाण ॥ ३१ ॥ मुखामाजी ब्राह्मण । उरू वैश्य ते जाण । पायापाशीं शूद्रवर्ण । ऐसी पूर्ण मूर्ति ते ॥ ३२ ॥ असो हस्तामाजी इंद्र देवता । इंद्रांश राजे सकळ तत्वता । प्रथुराजाने सर्वथा । प्रार्थुनी भगवंता वर घेतला ॥ ३३ ॥ अयुत कर्ण मागितले । भागवतीं हे कथा रसाळ । पुंडरीक तो प्रांजळ । अवतार सोज्वळ चुडामणी ॥ ३४ ॥ पंढरीसी वाळवटी । कीर्तन हाती भीमातटीं । दहासहस्र कर्णपुटीं । लीळा गामटी करी श्रवण ॥ ३५ ॥ प्रथुराजाचा अवतार । पुंडरीक साधु थोर । क्षेत्रिय कुळ शस्त्रधर । वर्णिला विध्यार सहजस्थीती ॥ ३६ ॥ असो ते फरशपाणीह्मातीत । पुंडरीक पुन्हा जन्म धरीत । लिंग जयाचे असे जळांत । चंद्रभागेत अतिनिकटीं ॥ ३७ ॥ यास्तव ह्मणती तया भक्ता । जळोजीवाचा भजनवेत्ता । जळराशी भीमा सरीता । तये राहता तो योगी ॥ ३८ ॥ पुंडलिक ते कमळ । जळ तयासी अलुमाळ । नामाभिधान ते प्रांजळ । जळुजा सकळ ह्मणती पै ॥ ३९ ॥ जीवन सर्वत्र संतांचें । नामाभिधान शोभे साचे । जया साठीं वैकुंठीचें । दैवत नेमाचे उभे सदा ॥ ४० ॥ गर्भी असता मायेसी डोहाळे । भजन करावे प्राजळ । ध्यानस्थ वैसे सर्वकाळ । समाधी प्रबळ जननीसी ॥ ४१ ॥ श्रवण कीर्तन विष्णुस्मरण । पादसेवन अर्चन वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । नवविध पूर्ण नवमास ॥ ४२ ॥ प्रसुतसमई येकायेकीं । विठ्ठलस्मरण

फेर्के मुखीं । न रुदन करीं कदा लोकीं । सदा सुखी निजमक्त ॥४३॥ शुकाच्यार्य गर्भी सावध । पुंडरीकमुनि तेवि सिद्ध । जळोजी नामें ठेविलें शुद्ध । निर्मळ प्रसिद्ध करीति जना ॥ ४४ ॥ वैराग्य जयाचें पाहुनी शिवें । आश्चर्य मानिलें उमाधवें । बापुडे इतर काय जीव । इंद्रवैभव वमन जया ॥ ४५ ॥ सात घरें मागुनी भिक्षा । नैवेद्य करावा श्रीकमलाक्षा । अतितीव्र ज्याची दीक्षा । नाहीं अपेक्षा सदान्नाची ॥ ४६ ॥ शुद्ध भाकरी आणि भाजी । जळोजीवावा तयासी राजी । नित्य भजनीं आवड ताजी । सतांत गाजी तो जाणा ॥ ४७ ॥ उत्तर रात्रीं करुनीं स्नान । गरूडपारीं करावें भजन । विटेवरी श्रीभगवान । डोलती पूर्ण आनंदें ॥ ४८ ॥ शुकादिक तये भजना । नित्य बैसती कराया श्रवणा । सनकसनंदन वामदेव जाणा । समाधीस्थपणा टाकिती पै ॥ ४९ ॥ श्रीदत्तात्रय कपीलमुनि । याज्ञवल्की मुगुटमणी । ब्रह्मनिष्ठ तया भजनीं । येती निघुनी वैकुंठीं ॥५०॥ गंगायमुनासरस्वती । कृष्णावेण्याभागीरथी । तीर्थमेळा सरीतापति । प्रगट बैसती सकळ नद्या ॥ ५१ ॥ धन्यधन्य साधु समर्थ । पुंडरीकाचा अवतार सत्य । जळोजी नाम तया शोमत । प्रेम बहुत लोकत्रई ॥५२॥ न पाहतां जळोजीसी । वेडा होये हृषीकेशी । विष्यारावे रुक्मीणीसी । देखिलें तयासी तुवां काय ॥ ५३ ॥ गरूड हनुमत सदा मागे । वेडाचे केला श्रीरंग । जळोजीचें धन्य भाग्य । देव अंगे शोधीतसे ॥ ५४ ॥ क्षणेक तया न विसमावें । आसनीं शयनीं जवळी असावें । जिकडे जिकडे तेणें पहावें । आपण दिसावे सर्वत्र ॥ ५५ ॥ जागृती स्वप्नी सुषुप्तींत । तिष्ठे सन्निध रूक्मीणीकांत । अंत कर्ण मन बुद्धींत । अहंकार चित्त व्यापीयेलें ॥ ५६ ॥ ऐसा संतचुडामणी । पदरीं शोभे लेणें करुनी । देवाजवळी निशीदिनीं । गुप्तपणीं राहणें तया ॥ ५७ ॥ भगवद्गीतेंत भगवंतें । सांगितलें अर्जुनाते । तें लक्षण अमानित्व । आंगीं विलसत जळुजीच्या ॥ ५८ ॥ जीर्ण चिंध्या ते वल्कलें । कथा प्रावर्ण धारण केलें । ऊर्णवस्त्र पाई बांधीलें । वेष्टण भले धरण कमठा

॥ ५९ ॥ मस्तकीं टोप तैसा चि । जेवि मूर्ति दुसरी शुकाची । कोमळ प्रभा सूर्याची । लावण्याची मूस बोलिली ॥ ६० ॥ बाजीराव पेशवे प्रधान । आले पढरीसी करीत भजन । संतासी वाटिती अपार धन । अनुक्रमानें सर्वांसी ॥ ६१ ॥ ब्राह्मण बडवे अशक्त प्राणी । अंध पंगु मुके जनीं । अन्न वस्त्रें द्रव्य देउनी । संतोष मनीं केला तया ॥ ६२ ॥ जलुजी साधु राहिला । ऐकुनी कीर्तीसी तन्मय जाहला । सुवर्णमुद्रा आणावयाला । सेवकाला आज्ञा केली ॥ ६३ ॥ दोन पराता मोहरा भरुनी । वस्त्रें अलंकार घेतले प्रीतिनें । धूपदीपगंध सुमनें । आले निघून अर्पावया ॥ ६४ ॥ तव महाराज वैराग्यनिधी । जलुजी समर्थ स्वानंदउदधि । ध्यानधारणा करुनी समाधी । निरूपाधि बैसलेती ॥ ६५ ॥ तेथें आला रावबाजी । तया संतासी करी अर्जी । अटाहस्ये स्तुती गर्जी । आणिले बाजी त्या योगीया ॥ ६६ ॥ देहावरी येता जाण । पुढें देखिले बहुत सुवर्ण । चिळस आली साधूसी पूर्ण । भासलें वमन श्वानाचें ॥ ६७ ॥ जळोजी बोलती बाजीराया । येथें आलासी विघ्न कराया । उचल घेउनी नको वाया । नको छाया तुझी आम्हा ॥ ६८ ॥ धन कामीनी विष्टेपरी । ऐसा निश्चय ज्या अंतरीं । साधुश्रेष्ठ तो पंढरी । नाम निरधारी जळोजी तया ॥ ६९ ॥ धिक्कारुनी बाजीरायासी । बैसले ध्यानस्थ आपण मानसीं । संत ह्मणावे तयासी । नाहीं तयासी क्षोभ मनीं ॥ ७० ॥ इतर करुनी काय साधन । जव न तुटे विषय जाण । व्यर्थ तयाचें शाहणपण । जळो ज्ञान वैराग्य तें ॥ ७१ ॥ डोई बोडोनी संन्यास घेती । मिष्टान्नाची इच्छा करीती । कोणी नग्न दिगंबर राहती । अभिलाष चित्तीं द्रव्याचा ॥ ७२ ॥ ब्रह्मचर्य दाउनी मत । दासीजवळी निद्रा करीत । भगवे घेउनी ओंगा धरते । सावकारी करीत घरोघरीं ॥ ७३ ॥ कोणी घेउनी वेष संताचा । करीती विक्रय नामाचा । नसो कदा संग त्याचा । घेती कथेचा पैका जे ॥ ७४ ॥ नसता ब्रह्म स्वानुभव । उपदेश देउनी गोंविती जीव । जन्मांतरींचे ते दानव । दुःखार्णव प्राप्त तया ॥ ७५ ॥

आपण बुडोनी जग बुडविती । संतपणा जनीं मिरविती । दांभीकपण दाउनी रफीती । पुढे फजीती सहजी ते ॥ ७६ ॥ असो अज्ञानाचें सकळकर्म । तेणें नातुडे आत्माराम । धन्य धन्य ते साधु परम । वैराग्य निसीम ज्या सांगीं ॥ ७७ ॥ वैराग्याश्चुनी नाहीं ज्ञान । ऐसें बोलिले श्रीभगवान । श्रोतीं मानूं नये शीण । व्यास वचनें ठाईं ठाईं ॥ ७८ ॥ जयासी आपुलें स्वहित करणें । तेणे आचरावे खरेंपण । सर्वसाक्षी नारायण । सकळ जाणे जीवांचें तो ॥ ७९ ॥ असो सकळ साधुचा । मुगुटमणी जळुजी साचा । अवतार जो पुंडरीकाचा । पंढरीचा कळस पै ॥ ८० ॥ जीर पडले दुर्गमविच्यारीं । सुहडपायें जना तारीं । ह्मणुनी ह्मणती तया सुतारी । भवभय वारी कृपादृष्टी ॥ ८१ ॥ ऊर्ध्व-मूळ अधो शाखा । छेदन कराया तयाचें देखा । ज्ञातीं सुतार इहि लोका । तोही रखा निजशस्त्रें ॥ ८२ ॥ राजाप्रथूचा जो अवतार । पुंडरीका विठ्ठलवर । क्षेत्रिकुळ तदांश विच्यार । ज्ञाति सुतार ईहिजन्मीं ॥ ८३ ॥ जव्हात लोंगशालुका । षट्भागेत स्थान देखा । तें चि नाम धरुनी निका । विचरे सखा देवाचा ॥ ८४ ॥ ठाईं ठाईं चमत्कार । उद्धरीले नारीनर । दृष्टांत जनीं अपार । पुंडरीक अवतार म्हणुनी ॥ ८५ ॥ समाधीस्थ होतेसमईं । विचित्र वर्तलें ऐका तें हि । सांगितलें सर्वांस पाहीं । शेषशाई तयानीं ॥ ८६ ॥ माझा पुंडरीक जळलिंग । समाधीस्थ होणार तदईक चांग । सांहिस्य घेउनी सकळीं सांग । असावे अभ्यंग सर्वत्री ॥ ८७ ॥ आज्ञा होता श्रीची ऐसी । निद्रा न लगे कवणा निशी । निजध्यास क्षेत्रस्थासी । द्विजवरासी साधुजना ॥ ८८ ॥ तव प्रातःकाळसमय आला । निघाला सकळ संतमेळा । गुफेजवळी तो पातला । देखिले डोळा बद्ध कपाटें ॥ ८९ ॥ करोळ्या देती आटाहास्य । नमस्कार घालिती कितेक पुरुष । समाधी ते जाहली असे । जडदेहास विसर्जिलें ॥ ९० ॥ मग तेथें म्हणतो कवण । उघडीले द्वार त्या क्षणें । समाधीस्थ जळुजी पूर्ण । पडलीं सुमनें आंगावरी ॥ ९१ ॥ तो विच्यार किती

वर्णावा । मिळाला तेथे संतमेळा ठेवा । गडबड जाहली सदाशिवा । रमाधवा प्रेमभरतें ॥ ९२ ॥ नारद विणा वाजवीत । आले तेथें ऋषी समस्त । उंचस्वरे भजन होत । नृत्य करीत वैष्णव ते ॥ ९३ ॥ टाळ-मृदंग कासपात्रे । चिपळ्याटीपऱ्या वाजती पवित्र । पुजा करीती चतुर्वर्गत्र । तुळसीपत्रें त्या संताचीं ॥ ९४ ॥ अनेक प्रकारें पुष्पमाळा । घातल्या त्या जळुजीगळा । सर्वत्रांनीं बुका उधळिला । सुगधें भरलें नभमंडळ ॥ ९५ ॥ स्वहस्तें भूदेवानीं । विमान स्कंधीं धारण करुनी । चालीले तया भक्तालागुनी । चक्रपाणि सखेद ॥ ९६ ॥ पुंडरीकाजवळ जळोजी आणीता । अपूर्व जाहलें ऐका तत्वता । पर्जन्य कोठें पडला नसता । आली सरीता उचंबळोनी ॥ ९७ ॥ विदिरीचा पाट बांधोनी आणीती । तैसी जाली येथें गती । चंद्रभागेसी आनंद चित्तीं । आली वरती भेटावया ॥ ९८ ॥ द्वारशहात अलीकडे । सरसावली भीमा पुढें । भक्तासी तया प्रीतीपाडें । स्नान रोकडे घातले पै ॥ ९९ ॥ मोघ माघारा जाऊन । उदक प्रवाह चालीला पूर्ण । स्वर्गीहुनी वर्षली सुमनें । पाहिलीं सुमनें सुष्टुजनें ॥ १०० ॥ पुंडरींका सन्निध सन्मुख । जळामध्ये जळुजी प्रमुख । समाधीस्थान करविलें चोख । अलौकिक पांडुरंगें ॥ १ ॥ पुडरीक अवतार जाणून । पुंडरीका निकटी समाधी जाण । रचिली प्रेमे नारायणें । पाहातां वाचन सुखावती ॥ २ ॥ दशाहा पूर्ण तेथें सदा । कीर्तन भजन स्नान सध्या । माध्यानीसी तीर्थवृंदा । येणें शुध्या स्नानासी त्या ॥ ३ ॥ पुंडरीकापासी नित्य । लोकत्रयीची येती तीर्थ । भूवैकुंठ पंढरी ते । जळुजी समर्थ तेथें साधु ॥ ४ ॥ पुढें गोपाळसम्प्रदायाचें वर्णन । अपूर्व ऐका तें चि कथन । श्रोतावक्ता रघुनंदन । दयाघन सिध्देश तो ॥ ५ ॥ सिधच उमा दशवदनारी । अर्धमात्रा विटेवरी । अठटहस्तदेवा पंढरी । सुदर्शनावरी शोभतसे ॥ ६ ॥ कुदर्शन द्वैतभाव । दवडिला तेणें श्रीगुरुदेव । संत-स्तवन प्राप्त वैभव । दैन्य सर्व गेले पै ॥ ७ ॥ राजारामी भक्तमंजीरी । अर्पण होतसे समपदावरी । विषमता कैंचि उरी । भटला हरी भक्तपणें

॥ ८ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । नळोजी-संतआख्यानातें । अध्याय सफळ जाहला हा ॥ १०९ ॥ शुभंभवतु ॥ भनु० अध्या० ॥ ७९ ॥ समाप्त ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ८०

### — गोपाळसखाआख्यान —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू अप्रमेया । सिध्दस्वरूप निर्गुणालया । ज्ञानाब्धितें राहसी आत्मया । मूळमाया लक्ष्मी ते ॥१॥ जाणीवनेणीवरहित । शेषशयन तें चि शोभत । वरी भगवान समाधीस्थ । पाय चुरीत स्फुरद्रुपीणी ॥ २ ॥ नाभीकमळीं विराजमान । चतुर्वदन ब्रह्मा आपण । च्यारीवाचा तयापासून । सृष्टी पूर्ण चराचर ॥ ३ ॥ तयासृष्टीमाजी पाही । नवखंडपृथ्वी रचिली ते हि । दाहावे खंड काशीठाई । देती ग्वाही व्यासादिक ॥ ४ ॥ असो ईयाविलक्षण । भूवैकुंठ केलें निर्माण । प्रत्यक्ष उभे रमारमण । समचरण विटेवरी ॥ ५ ॥ सत्यलोक वैकुंठ कैलास । तेहि स्थानें पाहातां निःशेष । परी नये तुळणेस । पंढरीस वजन करीतां ॥ ६ ॥ श्रीवैकुंठ आणि भूवैकुंठ । नारदें तुळीली दोनी स्पष्ट । वजन अधीक म्हणुनी श्रेष्ट । पंढरी निकट खाली राहिली ॥ ७ ॥ थोडकें वजन त्या वैकुंठाचें । यास्तव गेले वरतें साचे । माहात्म्य फार भूवैकुंठाचे । गर्जे वाचे व्यास पुराणीं ॥ ८ ॥ असो ऐसें पंढरीक्षेत्र । भूवैकुंठ अतिपवित्र । तेथे उभा पद्मनेत्र । मोक्षसत्र घालुनी पै ॥ ९ ॥ नारदपंठी कीर्तनमहीमा । अहोरात्र भजनप्रेमा । नाहींच जेथें अज्ञान अमा । नित्यपौर्णिमा भक्तीची ॥ १० ॥ बाळगण ते गोपाळ यानी । देव धरीले भगवंतानीं । देवाजवळी निशीदिनीं । भजनानुष्ठानीं निमग्न पै ॥ ११ ॥ ऐसे पाहुनी नारदभगवान । अवतरले स्वयें आपण । ते लिळा अत्यंतगहन । करीतां श्रवण दोष जाती ॥ १२ ॥

ऋग्वेदांत कृष्णातीरीं । साह्यिकुळीं देह धरी । उपजतांच वैराग्य शरीरीं । वदे वैखरी हरीनाम ॥ १३ ॥ निरंतर कीर्तन करून । गोपाळ सखा केला जेणें । तेंचि प्राप्त नामाभिधान । वदती जन गोपाळसखा ॥ १४ ॥ संच्चार करूनी पृथ्वीवरी । तीर्थे केली विधियुक्त सारीं । आले साधु ते पंढरी । पातले हरी त्या सामोरे ॥ १५ ॥ भेट होतां देवभक्तांची । सरीता भरली आनंदाची । विदेहस्थीती नेमाची । उभयतांची परस्परें ॥ १६ ॥ तें सुख वर्णूं जातां । मना होत उन्मनी अवस्था । प्रेमाश्रु चालिले तत्वता । आलिंगन होता जुरे भेदु ॥ १७ ॥ दीपीं दीप येकवटले । कीं हरी हरासी मिळुनी ठेले । लवण समुद्री विराले । तैसें जाले येकत्वता ॥ १८ ॥ गोपाळकृष्ण श्रीपंढरीरमण । गोपाळसंतासी दिधलें आलिंगन । माझ्या सख्या म्हणून । घेतली हातानें ओवाळला ॥ १९ ॥ यास्तव नामें त्या गोपाळसखा । नारद देवाचा पूर्णसखा । तो अवतार जाहाला देखा । लाधला सुखा भजनाचे ॥ २० ॥ देवें येकांत तयासी केला । म्हणती राही निरंतर जवळा । वियोग होता क्षणेक । चैन मनाला न पडे पै ॥ २१ ॥ कलीमध्ये भजनापरौते । नाहीं आला दुसरे आवडतें । ते तो तुझें सदा व्रत । म्हणुनी तिष्ठत या ठाईं ॥ २२ ॥ तरी आतां अतीनिकट । राउळांत राहीं सख्या स्पष्ट । भजन करी मनिष्ट । याहवी वरीष्ट उपासना ॥ २३ ॥ कोणी वेदांत पाहून । वाद घालिती वाचाळपणें । कोणी तीर्थे हिंडून । अभिमान वळावला ॥ २४ ॥ कितेक हिंडती वेषधारी । ग्रंथ वाचिती नानापरी । उपदेश करूनी नरनारी । पढती अघोरी ज्ञानाविण ॥ २५ ॥ कोणी नसता अंगी बळ । विषय न तुटतां योगांत शिरले । कित्तेक मांत्रिक जाले । ते अंतरले निजहिता ॥ २६ ॥ नाना दैवतें उपासीती । नानासाधना वरपड होती ॥ तयासी केवि मंत्रप्राप्ती । मजप्रति ते विसरले ॥ २७ ॥ असो येका भजनाविणें । नातुडे तया भी भगवान । ते सख्या तुजपासी जाण । जालों स्वाधीन सदा पै ॥ २८ ॥ युगायुगी फिरतो मार्गे । हे

तो ठाउके तुजला सांग । ऐसे बोलती रुक्मीणिरंग । अतरंग निज-
भक्ता ॥ २९ ॥ नारदअंश गोपाळसखा । आज्ञा वदुनी श्रीची देखा ।
स्नान करूनी भीमोदका । केलें आन्हीका सकळ पै ॥ ३० ॥ पूजन
करुनी पांडुरंगाचे । दक्ष ओवरींत आले साचे । उभे ठाकले नेमाचे ।
गर्जती वाचे भगवत्गुण ॥ ३१ ॥ विणा शोभे स्कदावरी । चिपळ्या
घेतल्या दुसरे करीं । पाई घागऱ्या म्नोहरी । बांधील्या झडकरी ते
वेळा ॥ ३२ ॥ आंगीं मेखळा विराजमान । कौपिन साजे मुळींची
पूर्ण । सेंदी मोकळी विलसे जाण । नृत्य जेणें आरंभीला ॥ ३३ ॥
विटेवरी जैसी मूर्ति । नारद अंश तेचि विभूति । गोपाळसखा व्यास
ह्मणती । अवतार क्षीती तो जाणा ॥ ३४ ॥ स्वरूप सुंदर श्यामवर्ण ।
अजानबाहु आकर्णनैन । नारदासारीखे प्रत्यक्ष ध्यान । जगजीवना वश्य
तया ॥ ३५ ॥ भजनासी नित्य उभे राहातां । दीर्घस्वरें अभंग गाता ।
प्रेमाश्रु गळती तत्वता । विदेही अवस्था होय तया ॥ ३६ ॥
करुणापर अभंग सुस्वर । गर्जना करी तो वैष्णववीर । तेणे देवासी
प्रेम भरे । प्रगटे सत्वर भजन रंगी ॥ ३७ ॥ तया भजना पाहून ।
खळासी पाझर सुटती जाण । शिव समाधी टाकून । येतसे जाण
पंढरपुरा ॥ ३८ ॥ शुकादीक ब्रह्मवेत्ते । तेहि तल्लीन होती जेथें ।
गोपाळसखा ऐसा समर्थ । जाहला संत कलीमाजी ॥ ३९ ॥
पंढरपुरासी तेणें शोभा । हरी विठ्ठल जेथें उभा । राउळांत संतसभा
दाटली प्रभा त्या भजनाची ॥ ४० ॥ अष्टांग योगसाधन । भजनापुढें
त्या दिसे गौण । वेडा चि केला नारायण । हिंडे जाण मागें पै ॥ ४१ ॥
प्रदक्षणेसी जातां गोपाळसखा । मागें पुढें गोपाळसखा । जो कां गोकुळीं
गोपाळसखा । गोपाळ सखा तो केला ॥ ४२ ॥ गोनाम इंद्रियपाळक ।
जगदात्मा विठल देख । त्याचलें वयाचें सख्य । याच्लागी निके नाम
तें चि ॥ ४३ ॥ श्री नारदाचा अवतार । गोपाळसखा नाम सुंदर ।
अत्यत ज्याचा भजनगजर । पंढरपूर दुमदुमील ॥ ४४ ॥ अनुभवाचा
मुगूटमणी । भजनीं देव केला ऋणी । मस्तक ठेवितां तया चरणीं ।

मुक्त प्राणी होती पै ॥ ४५ ॥ जे जे जयाची कामना । ते ते पुरवी योगीराणा । सहज घेतां त्या दर्शना । कराया भजना इछा होये ॥ ४६ ॥ कैसा हि असो प्राणी । भक्ति उत्पन्न होये दर्शनीं । अवतार पूर्ण जो मेदीनी । द्वितीय जनीं तो भागवत ॥ ४७ ॥ अपरमित शिष्य ज्याचे । ते हि अंश पूर्ण संताचे । भजनरंगीं देव नाचे । वैभव वाचे किती वदूं ॥ ४८ ॥ गोपाळसख्याचे स्मरण करीतां । दुर होती भवभय-व्यथा । इतर व्याधी नुरे सर्वथा । सकळ दुरीता होये नाश ॥ ४९ ॥ वैराग्य जयापासी । पाईकी करी अहिर्निसी । ज्ञानाची तो केवळ राशी । स्थान भक्तीसी हृदय ज्याचे ॥ ५० ॥ मात्राची तो वोतीवमूर्त । जवळी सदा पंढरीनाथ । लोकत्रै जो विख्यात । साधु समर्थ कल्युगीं ॥ ५१ ॥ भजननिष्ट प्रेमळ मूर्ति । नारद अवतार जाहला क्षिती । गोपाळसखा व्यास ह्मणती । भगवत्‌विभूति ते जाणा ॥ ५२ ॥ प्रयाणकाळीं प्राण ज्योती । मुखांत घेतील रुक्मीणिपती । हें स्तोत्र जे वाचिती । प्रिय होती ते हरीहरा ॥ ५३ ॥ नारद संताचें मंडण । त्रैलोक्यांत जयाचें गमन । भजनरूपी अवतार पूर्ण । वर्णिला जाण श्रीगुरूकृपें ॥ ५४ ॥ पुढे प्रल्हादाचा अंश । आख्यान जयाचें अतिसुरस । वर्णन करविति श्रीसिध्देश । रामदास अवतार जो ॥ ५५ ॥ कृपादृष्टी करून । दाविले डोळा निजकल्याण । भूतभविष्य संत अवतर्णे । कळे पूर्ण तेणेंयोगें ॥ ५६ ॥ समर्थ दयेची निजप्रौढी । साधुलिळा प्राप्त जोडी । जगत्रयाचा संसार फेडी । उभवी गूढी आनंदाची ॥ ५७ ॥ अवधान देतां येकाग्रभक्ती । सकळसुखें मोक्षगती । ऐसा वर ईया ग्रंथीं । सीतापति देता जाहाला ॥ ५८ ॥ सिध्द उमा जगजेठी । भक्तमाळिका तयाकंठीं । राजारामीं आवडी मोठी । पुजा गोमटी घेतसे पै ॥ ५९ ॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । गोपाळ आख्यान चरीत्राते । सखारामसंत-कृपा अध्याय समाप्त हा ॥ ६० ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अध्या० ॥ ८० ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ८१

### — प्रल्हाद साधुचरित्र —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरू सिंव्हनरहरी । प्रगट होसी स्तंभे शरीरीं । हिरण्यकश्यपू अहितकारी । तया विदारी विवेकनखें ॥ १ ॥ प्रकर्षे करुनी आल्हाद । तो चि भक्त निज-प्रल्हाद । दैत्यापासुनी त्या विपेद । रक्षिला प्रसीध्द स्वामिया ॥ २ ॥ इंद्रियगण देवता । मुक्त केल्या तुवा अनंता । इद्रादिदेव स्तुती करिता । नव्हे शांतता क्रोधासी ॥ ३ ॥ ब्रह्मदेवरजांशमेळी । सन्मुख तये अमरमंडळी । रुद्रपीणिव्हमी भली । तेही परतली मागें पैं ॥ ४ ॥ अतीउग्र पाहतां स्वरूपतेज । मागे सरकला शब्दांशसमाज । पिंडब्रह्मांड कारणबीज । अव्यय अज पूरूप तो ॥ ५ ॥ प्रणवाचे पैलीकडे । जे का ब्रह्म निजरोकडे । अंतर बाह्य ते चोखडे । भक्त गाढे सुलभ तया ॥ ६ ॥ अनुमत तो प्रल्हाद । निर्भय जवळीं येतां शुध्द । प्रसन्नवदनें तो मुकुंद । आलिंगन सिध्द दिधलें तया ॥ ७ ॥ देहचतुष्टय निरसिता सार । होये तेथें चतुर्थ अवतार । चहुवेदासी न कळे पार । तो विच्यार नरसिंव्ह पैं ॥ ८ ॥ सिंव्हावलोकन मागे पाहणे । तोचि नरदेही नरसिंव्ह पूर्ण । इतर नर पशुसमान । आपण कोण न पाहती जे ॥ ९ ॥ मी तो कोण हे पाहतां । लक्ष्मी सन्निध ते तत्वता । देहबुध्दि दारीद्र्यथा । दवडी सर्वथा तो नरहरी ॥ १० ॥ भक्तप्रिय श्रीभगवान । म्हणुनी विभक्त नसावे पूर्ण । आत्माराम सच्चिदघन । भरुनी गगन उरला असे ॥ ११ ॥ लोकत्रै तो आल्हाद । मूर्तिमंत श्रीप्रल्हाद । आदिकरुनी भक्तवृंद । आवडती शुध्द ज्याचलागी ॥ १२ ॥ यास्तव देव पंढरीसी । तिष्ठतो सदा अहर्निशीं । भेटावया समस्तांसी । ठेविले कटीसी कर जेणें ॥ १३ ॥ निरंतर बाह्या उभारुनी । विटेवरी चक्रपाणी । आलिंगन देती भक्तालागुनी । अंतःकर्णी प्रीति बहु ॥ १४ ॥ याच्यालागी तया साधुची । अभंगण्य भागवताची । वर्णन करणें कथा साचि । जे देवाची हृदयस्थ खूण ॥ १५ ॥ ऐकतां ते निजगहिवर ।

सकळ जिवाची कामना पुरें । प्रल्हादभक्त धुरीण थोर । तयाचें चरित्र पवित्र पै ॥ १६ ॥ शंडामर्क तो पंतोजी । प्रल्हादसंगती भक्ति सहजी । करुनी तेणें देवाशीं अर्जी । जन्मला सहजी भक्तमेळीं ॥ १७ ॥ कथन दोघांचें या अध्याईं । बोलवितसे विठाबाई । शंडामर्क प्रथम पाही । भूठाई जनन तयाचें ॥ १८ ॥ विद्याव्यवहारी ह्मणून । वैश्यकुळीं जन्म धारण । मल्हापावाणी ह्मणति जन । परी तो जाण आत्मनिष्ठ ॥ १९ ॥ येकविध उपासना । पंढरीची केली जाणा । छंद दुसरा नाहीं मना । करी कीर्तना अति आवडी ॥ २० ॥ वारी सतत पंढरीची । नेमेंकरुनी केली साचि । रात्रंदिवस भजनाची । ज्ञानेश्वरीची प्रीती बहु ॥ २१ ॥ वारकरी केले फार । मार्गीं चालतां भजनगजर । ध्यानींमनीं रुक्मिणीवर । नेणे विच्यार दुजा पै ॥ २२ ॥ याप्रकारें आयुष्य आपलें । पांडुरंगीं समर्पिलें । ह्मणि केला श्रीविठ्ठल । भक्तिबळेंकरुनी ॥ २३ ॥ हिरण्यकश्यपुदैत्याची । सगे पातक घडले साचें । छळण करविलें हरीभक्ताचें । घेतलें तयाचें प्रायश्चित ॥ २४ ॥ चतुर्दशभागवतांत । प्रल्हाद प्रथम तो निजभक्त । विद्यागुरू तयाचा निश्चीत । तो हा संत कलीमाजी ॥ २५ ॥ कलिमळातें धुवावया । मल्हापा जन्मले भूठाया । लाविलें जन भजनोपाया । निर्सीलें अपाया जेणे पै ॥ २६ ॥ आतां प्रल्हादनामें प्रल्हाद अंश । आवतरला निजभक्त पृथ्वीतळांत । ते कथा प्रेमळ सुरस । यजुर्वेदास जन्म तया ॥ २७ ॥ व्रतामध्ये श्रेष्ट द्वादशी । प्राकृत जन ह्मणती बारसी । तेचि नगरी हे बारसी । भगवतासी वास ते ॥२८॥ तयेस्थानीं पुण्यश्लोक । माध्यांदिनी अवतार शाखे । वृत्ति शोभे ते सात्विक । निःसीम भाविक भक्तवतंस ॥ २९ ॥ याकागी प्रल्हादमाऊ ऐसे । जगामाजीं नाम मिळसें । दर्शनी आल्हाद सर्वास । प्रल्हादअंश संत तो ॥ ३० ॥ पूर्वी प्रल्हादाचे सहा जन्म । वर्णियेले भक्तिप्रेम । प्रल्हाद अगद उत्धव नेमे । देव नाम कलीत चवथा ॥ ३१ ॥ तुकाराम तुकाविप्र । ऐसे सहा अवतार । सांगितलीं हीं चरित्र । तेणे पवित्र सर्वजन

॥ ३२ ॥ कळा अंशे विभुती । देवभक्त जन्म घेती । असो सांप्रत प्रल्हादमूर्ती । जन्मली क्षीती बारसीग्रामीं ॥ ३३ ॥ भक्तिलक्षणी बाळपणीं । वैराग्य आंगी प्रेम भरुनी । परेसहित नामस्मर्णी । अनुदिनी येलरी ते ॥ ३४ ॥ माहाभागवत धर्म ज्याचा । विष्णुउपासक तो मुळींचा । करुनी त्याग इतर कर्माचा । पंढरीचा पंथ धरिला ॥ ३५ ॥ अनेक प्रकारें जीवाच्या । मति भ्रमल्या विपई साच्या । करिती उपासना मल्लसाध्या । यक्षीणीच्या क्षुल्लक दैवते ॥ ३६ ॥ नानाप्रकारें नानादैवत । भजती मनीं धरुनी अर्थ । विसरूनी गेले आत्महित । तेणे अनंत काळवळला ॥ ३७ ॥ निजभक्त प्रल्हादासी । सांगे स्वये हृषीकेशी । मेळवी जन स्वरूपासी । भागवतपंथासी लाउनी ॥ ३८ ॥ कळीमध्यें आला आयुष्य । अल्पबुद्धी स्थीरता नसे । काय घेउनी व्यर्थ संन्यास । पढरीपूस न जीकता ॥ ३९ ॥ पंचाग्नी धूम्रपान । नग्न मौनी जटाधारण । शरीरासी काय दंडून । नाहीं मन स्वाधीन जया ॥ ४० ॥ येकादशी सोडुनी व्रत । अनेक आचरती धरूनी मनोरथ । तया कैचे स्वसुख प्राप्त । भ्रमलें चित्त अभिलाषी ॥ ४१ ॥ स्वर्गासी जावयातें । यज्ञ करिती जे दिक्षीत । ते ते पावती पतनातें । गांठीचे सुकृत सरतांचि ॥ ४२ ॥ देवरूपण कितेक असति । क्रित्रिम करुनी जगा मोंदिती । नानापरीचे शकुन सांगती । पुढे फजीती तयाची ॥ ४३ ॥ कोणी कथेचा विकरा करून । मेळविती अपार धन । तयादर्शनी करावें स्नान । नये भोजन करूं तेथें ॥ ४४ ॥ नामविक्रयापरते । नाही पाप सृष्टीवरूते । कळीमध्यें जाहला अनर्थ । म्हणुनी संत अवतरती ॥ ४५ ॥ देती धरूनी वैष्णव शेष । बुडाला धर्म निःशेष । करूनी जगा उपदेश । केला नाश स्वहीताचा ॥ ४६ ॥ भजन दीक्षा बुडऊन । अनेक तन्हेची शिकविती ज्ञान । द्रव्य दारा हे साधन । नाहीं चिंतन भगवंताचें ॥ ४७ ॥ वरी वरी दाउनी भक्ति । नटापरी ते मिरविती । अंतरी धरुनी विषयासक्ती । आदा करीती संताचा ॥ ४८ ॥

असो अभक्ताचे सांगता गुण । वाण्या पावती बहु शिण । धन्य धन्य ते भागवतजन । करीती स्थापन शुध्दभक्ति ॥ ४९ ॥ माहाभागवत प्रल्हाद अंश । प्रल्हादबावा संत विशेष । बारसीक्षेत्रांत जयाचा वास । लावी सर्वांस हरीभजना ॥ ५० ॥ अनेकभक्ति कोकाकरवी । सांडविल्या जेणे सर्वी । उगवला जो भावार्थरवी । मार्गी लावी मूढजन ॥ ५१ ॥ शुध्दउपासना पंढरीची । प्रगटविली जेणें साचि । वारी धरविली नेमाची । भजनाची निष्ठा ते ॥ ५२ ॥ असंख्य केले वारकरी । प्रतिमासा जाती पढरी । भजनकढाका मार्गावरी । कोंदलें गजरीं नभ सारे ॥ ५३ ॥ ठाई ठाई संतपणें । निष्काम करीती कीर्तन । गीताभागवत होतसे पठण । रामायण वाचिती पै ॥ ५४ ॥ ज्ञानेश्वरीचा निरंतर पाठ । ह्मणती नित्य हरीपाठ । मोक्षपथासी केली वाट । घडघडाट नामाचा ॥ ५५ ॥ कृष्णापर अभग ह्मणून । पांडुरंगासी आळविती जाण । येकादशीस जागरण । करीती उपोषण बाळवृध्द ॥ ५६ ॥ वेताळझोटिंगमायराणी । जाखाई जुखाई कूळपूजनी । त्याग सर्वांचा करउनी । लाविले भजनीं शुध्द हरीचे ॥ ५७ ॥ श्रीपांडुरंगापरते । सांडविली सकळदैवते । मार्ग स्थापीला श्रीभागवत । धन्य भागवत प्रल्हाद तो ॥ ५८ ॥ शामवर्ण सावळा पुरूष । तुळसीमाळा गळा विलसे । प्रल्हादभाऊ ह्मणती व्यास । प्रल्हाद अंश तो जाणा ॥ ५९ ॥ अठरासहस्र माहाभागवत । हे जयासीं मुखोद्गत । ज्ञानेश्वरीचा बोले अर्थ । वसे हृदयांत गीता सारी ॥ ६० ॥ अभंग पूर्ण तुकारामाचे । स्तोत्रासारीखे पदे याचे । कीर्तन हे तो वैभव उपाचें । भजनाचें सौभाग्य पै ॥ ६१ ॥ निस्पृहता विराजमान । अमानित्व आंगी लक्षण । भक्ती करणें साभिमान । येकविध पूर्ण निष्कामता ॥ ६२ ॥

पांडवगीता व्यासोक्ति ॥ श्लोक ॥

वासुदेवं परित्यज्य । अन्यदेव उपासते ।
तृषितो जान्हवीतीरे । कूपं खनति दुर्मति. ॥ १ ॥

॥ टीका ॥ वास्तव श्रीविष्णुउपासन । हेचि जयाचे अनुष्ठान । अन्य-

देवता त्याग करऊन । दाविली पूर्ण येकात्मता ॥ ६३ ॥ यात्रा श्रीपंढरीची । भरविली वारकऱ्यांची । दाटी जेथे पताकाची । भजनाची गर्दी पै ॥ ६४ ॥ देशोदेशींचे वारकरी । बहुत येती नरनारी । भजनीं लाविले वर्ण च्यारी । भवतमारी उदेला तो ॥ ६५ ॥ टाळमृदुंगविणा । गावोगावीं करीती कीर्तना । समारंभ पाहता मना । अमरगणा आश्चीर्य पै ॥ ६६ ॥ दोहीरस्ता हजारो प्राणी । अभंग सुस्वर गाती वदनीं । मध्यमध्य भजन करुनी । चक्रपाणी स्तविती पै ॥ ६७ ॥ साधीचाल करुणापर । अभंग ह्मणती नारीनर । एकताचि प्रेम भरे । चकित सारे ब्रह्मनिष्ट ॥ ६८ ॥ प्रेमळ तया भजनावरुनी । समाधी टाकावी ओवाळुनी । वामदेव आसन त्यागुनी । येती धाउनी शुकादिक ॥६९॥ वारकऱ्याचें प्रेम मोठे । ऐसे वदे नीळकंठ । भगवान जेथें सदा प्रगटे । राहिला विटेवरी उमा ॥७०॥ प्रऱ्हाद अवतार प्रल्हाद साधु । कीर्ती जयाची पाहतां अगाधु । नेणती जग तया अंधु । तोडिला बाधु भवभयाचा ॥७१॥ तुळशीमाळ घाळविती । पंढरीसी जावया आज्ञा करीती । पताका देउनी निरंतर हातीं । भजन करविती मूढजना ॥ ७२ ॥ अज्ञानासी लाउनी वाटे । अधःपतनाची मोडीली वाट । स्वसुख धनाचे दिधले लाटे । आनंद वाटे तयादर्शनीं ॥ ७३ ॥ प्रेमात येउनी नृत्य करावा । वारकऱ्याचा भोवता थवा । वाळवटीं कीर्तन हेवा । केले देवा जेणे ऋणी ॥ ७४ ॥ प्रल्हादभाऊ संत योग्य । पंढरीचे ते सौभाग्य । वग्भुत्वाचा अद्भुतरंग । कीर्तनरंग धन्य तो ॥ ७५ ॥ मंगळसूत्र सुवासिनीचे । तैसे भजन प्रल्हाद संताचे । ज्याचे कथेंत पंढरीचे । पांडुरंगाचें वर्णन पै ॥ ७६ ॥ कीर्तन श्रवणीं एकतां । अनुताप होये तात्काळ चित्ता । अनाधिकारी असो मळतां । पंढरीनाथा भजे तो ॥ ७७ ॥ करुनी तेणे पारावारी । पंढरीची धरी वारी । कथेंत माहात्म ऐशापरी । वदे वैखरी प्रल्हाद तो ॥७८॥ नानाप्रकारें सांगुनी अर्थ । उपासना सिध्द करीत । तोचि जाणावा वैष्णव संत । इतर व्यर्थ शाब्दीक ते ॥ ७९ ॥ गीताभागवतवेदांत । उपासनेस जो स्थापींत । सकळामध्यें जाणा महंत ।

तेणे स्वहित घडे जीवा ॥ ८० ॥ साधक ह्मणविती शिवादिक। काय जीव तेथे रंक । न भजता पंढरीनायक । ऐके शुष्क वेदांत पै ॥ ८१ ॥ यात्रुवाचा अधिकार । सामान्याशी न घडे विच्यार । भक्तिपरते नसे सार । वेद च्यार हे गर्जती ॥ ८२ ॥ वेदार्थाच्या पूर्णगर्भा । प्रल्हादभाऊनीं केले सुलभा । विटेवरी देव उभा । दाविली प्रभा त्या भजनाची ॥ ८३ ॥ हायवतराव आळंदींत । तेहि साधु भजनवेंचे। समारंभे गजर करीत । येती सतत पंढरीसी ॥ ८४ ॥ यात्रा असंख्य बरोबरी । देवाजीची काढीति स्वारी । टाळ वाजती परोपरी । सहस्रावरी अपरमित ॥ ८५ ॥ विणेपताका झळकती । वारकऱ्याशीं नाहीं गणती । प्रतिपाळीं हरी स्मरती । भजन करविती ठाईठाई ॥८६॥ धन्यधन्य ते वैष्णववीर । जयासी आवडे रुक्मीणिवर । भजनी रंगले नारीनर । नमस्कार तयासी ॥ ८७ ॥ कुळदैवत ज्याचा हरी । ध्यानीमनीं ज्या पंढरी । तयाचे मी चरण धरीं । वंदा शीरीं त्या पादुका ॥ ८८ ॥ पंढरी आमुचे वसतिस्थान । श्रीपांडुरंगदेवार्चन । हृदई ध्याऊं समचरण । करूं कीर्तन गरूडपारीं ॥ ८९ ॥ अयोध्याधीश पंढरीराणा । हेचि माझी उपासना । नमन तया हनुमाना । वान्नरगणा वारकऱ्याशी ॥ ९० ॥ अनंतजन्माची करूनी वारी । पंढरीची दीधली वारी । प्रसन्न जाहले रावणारी । अहंकार शरीरीं मारूनिया ॥ ९१ ॥ निजभक्ताचे करविती स्तवन । सिध दयाळु जानकीजीवन । राजारामीं रंगवी मन । विठल पूर्ण विटेवरी तो ॥९२॥ संतमंजीरीं प्रिय तयाला । ओविती आव्या हेचि माळा । अर्पण होतसे श्रीरंगाला । वल्लमाला रुक्मीणिच्या ॥ ९३ ॥ पुढे अवधान द्यावें श्रोतीं । वर्णिजेल अपूर्व कथनोक्ति । गुंढा आख्यान सांगीजे प्रीति । ऐकता पुरती अर्थ जीवीचे ॥९४॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ। श्रवणे चि पुरती मनोरथ । प्रल्हादसाधुवर्णन कथे । अध्याय समाप्त परीपूर्ण हा ॥ ९५ ॥ श्लोक ॥ १ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अध्या० ॥ ८१ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥

## अध्याय ८२

### — गुंडोजी बावा —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरू श्रीसिद्धेशा । पंढरीनिवासा परमपुरुषा । पन्नगप्रिय हृदय हंसा । सरोवरमानसा क्रीडसी तूं ॥ १ ॥ इंदिरावरा कमलोद्भवजनका । शेषशाई वैकुंठनायका । दाशरथी रविकुळटिळका । पांडवरक्षका श्रीकृष्णा ॥ २ ॥ जयजय भक्तिप्रिया भागवतोत्तमा । भवगजारी भजकप्रेमा । भद्रासनीं शोभे आत्मा । गरूडहनुमान सन्मुख पै ॥ ३ ॥ समचरण समकर । समदृष्टी समानविस्तार । तिष्ठायमान निरंतर । पंढरपुर धन्य ते ॥ ४ ॥ पुंडरीक धन्य भीमा । धन्य तेथील संतमहिमा । वाळवंटीं कीर्तनधर्मा । पाहून ब्रह्मा चकित पै ॥ ५ ॥ इंद्रादिक अमर समस्त । मृत्युलोकीं जन्म इच्छित । पंढरीच्या सुखापरते । वाटे अमृत तृणप्राय ॥ ६ ॥ स्वात्मसुखाचें ते राउळ । जेथे प्रत्यक्ष श्रीघननीळ । ओवाळुनी टाकिजे भले । वैभव सकळ तयावरुनी ॥ ७ ॥ भक्तमंडळी प्रेमरसें । करीती भजन सावकाश । उपमू जातां पंढरीस । स्थान विशेष नाहीं दुजे ॥ ८ ॥ अनेकसाधु अवतरोन । पंढरपुरीं करीती कीर्तन । तेणेयोगें नारायण । वसे पूर्ण जेथे सदा ॥ ९ ॥ असो ऐशीया हृषीकेशी । भक्तरूपी वाहूं तुळशी । गुंडोसंतचरित्रासी । अर्पण हरीसी करीतसे ॥ १० ॥ माळोपंताचा तो अवतार । भजनीं तोषविला रमावर । कथन ऐकता ते सुंदर । दोष सारे पळती पै ॥ ११ ॥ तव श्रोतीं प्रश्न केला । माळोपंताची सांगणे लीळा । नमन करुनी श्रोतयाला । वृत्तांत पहिला निवेदितो ॥ १२ ॥ यजुर्वेदी अनुष्टाता । ब्राह्मण समर्थ आत्मवेत्ता । तया उदरीं जाणुनी सुकृता । माळोपंता जन्मवी हरी ॥ १३ ॥ उपजतस्वभाव सात्विक । चातुर्यकळा सकाळिक । बाळपणीं खेळणें कवतुक । भजन सुखें करावें पै ॥ १४ ॥ मुलें मेळउनी धाकुटीं । भक्तिपर सांगे गोष्टी । कथा करावी गोमटी । पाहती दृष्टी मायबापें ॥ १५ ॥ पांचवेवर्षी व्रतबंध । करीतां जाहला पिता शुध । न

सांगता च्यारीवेद । पठण प्रत्तीत्य केले तें ॥ १६ ॥ अठरापुराणाचा अर्थ । जयासी अवघा मुखोद्गत । धन्य समर्थ मालोपंत । आवडता संत देवाचा ॥ १७ ॥ भाषा साऱ्या बोलत असे । यवनवाणी विशेष । पातशाहास कळता ऐसे । आणिर्के भेटीस लवलाही ॥ १८ ॥ दिवाणगीरीची वर्खे देऊन । सकळप्रजा केली स्वाधेन । हाताखालतो नसे कार्कुन । हिशेब राखणें सर्वांचा ॥ १९ ॥ मालोपंतसाधु निःसीम । पंढरीस जावयाचा नेम । आषाढी कार्तिकी न टळे धर्म । अतिप्रेम पांडुरंगीं ॥ २० ॥ हे पूर्वी पातशाहासी । सांगून राहिले तत्कार्यासी । कांहीं काळ लोटता यासी । केले नेमासी विघ्न ते ॥ २१ ॥ यात्रा येता सन्निध । दुर्जनें करविला सागुनी रोध । मालोपंतासी जाहाला खेद । न चले विविध तर्क पैं ॥ २२ ॥ रात्रंदिवस उभा पाहरा । वेढीला वाडा दुतें सारा । कड्याकुलपे घालुनि द्वारा । येणाराजाणारा वाट नाहीं ॥ २३ ॥ ब्राह्मणाने उदक न्याहावे । फुके मालिये घेऊनि जावे । उभयतारहित यावे । आज्ञा स्वभावे पातशाहाचीं ॥ २४ ॥ ऐसा करितां बदोबस्त । अपूर्व जाले ऐका श्रोते । मालोपंत उद्विग्नचित्ते । केले कृत्य तेणे पै ॥२५॥ फुलारीमाळ्याची घेऊनी घोंगडी । निघाले पाहाटे तेचिघडी । जयाचा सखा देव गडी । गेले थडी चंद्रभागेचे ॥ २६ ॥ पाय उतारा नृत्य करीत । करूणापर भजनी रत । आटाहस्ये अभंग गात । मार्ग क्रमीत स्वानंदे ॥ २७ ॥ वाटेसी तया काय उणे । जया साह्य वैकुंठरमण । पंढरीसी पोहचले आनंदाने । केले स्नान चंद्रभागे ॥ २८ ॥ श्रीपांडुरंगाचे यथोक्त । पूजन केलें मालोपंतें । करुनी नगरप्रदक्षणेते । कीर्तनाते आरंभिले ॥ २९ ॥ प्रेमळ संताची जेथे कथा । तेथे येणें श्रीभगवंता । रूक्मीणीसहित गरूडहनुमंता । प्रघट सर्वथा होणे पै ॥ ३० ॥ वाळवटी भक्तराज । कीर्तन करीतसे अद्भुत चोज । ते धगुत्व वेदबीज । मिळाला समाज श्रोतांचा ॥ ३१ ॥ श्रवण समाधी नरनारी । धन्य धन्य ते पंढरी । स्वर्गींहुनी पुष्पें अमरीं । वर्षिती परी ते काळीं ॥३२॥ असो ऐसा अद्भुतरंग । मालोपंत जाहले

दग । इकडे श्रीपांडुरंग । घेतला स्वांगें अवतार पै ॥ ३३ ॥ भक्त-वछळ दीनदयाळ । माळोपंत आपण जाले । पातशाहाकडे सांगून धाडिले । राहणें जाहलें आपुलें ह्मणून ॥ ३४ ॥ संतोष होऊन तया यवना । कचेरीस आणविता जाणा । कारभार करी देवराणा । न्यूनपणा कांहीं नसे ॥ ३५ ॥ जिकडे तिकडे कामें लाऊन । पातशाहासी सुचविलें पूर्ण । पंढरीसारिखे येथें करणें । व्रतस्थ राहणें आह्मासी ॥३६॥ श्रींची करीतो वाड्यात स्थापना । मंडप चांदव मखरें जाणा । ब्राह्मण भोजन अनुष्ठाना । असावी कीर्तना सतवृंदें ॥ ३७ ॥ माळोपंत स्वरूप श्रीभगवान । याजना करीता ऐसी पूर्ण । पातशाहा बोलती हास्यवदनें । खर्चावें धन अपार पै ॥ ३८ ॥ मग तेथें काय उशीर । जेथें प्रत्यक्ष रूक्मिणीवर । जेवि दुसरें पंढरपुर । तेवि नगर शोभविलें ॥ ३९ ॥ कीर्तन घुमाळी रात्रदिवस । अन्नदान सर्वांस । ध्यानजपपाळा विशेष । सदा घोष नामाचा ॥ ४० ॥ समारंभ तो अत्याद्भुत । कारकून सारे सेवेंत रत । आज्ञा करीती माळोपंत । ते ते वदित परिवारें ॥ ४१ ॥ भगवत्भक्ताची भार्या जाण । भगवतासी मातेसमान । सांगती तयासी मी व्रतस्थ पूर्ण । यात्रा परतणें तेथवरी ॥ ४२ ॥ पंढरीचा बुका येईल । मग शयन येकत्र होईल । ऐसें सांगून स्त्रियेसी भले । आपण वेगळे निजती पै ॥ ४३ ॥ इतर कार्यें घरांतील । करीती संपूर्ण घननीळ । पुत्रावरी बहु स्नेहाळ । नरहरी प्राजळ नाम तया ॥ ४४ ॥ कांहींयेक उणें नाही । माळोपंत जाहले शेषशाई । भक्तवछळ विठाबाई । नमन पाई असो सदा ॥ ४५ ॥ धन्य तो यवन धन्य नगरस्थ । प्रत्यक्ष दर्शन जालें तयांते । कारभार केला पंढरीनाथें । उल्हाहातें आरंभिलें ॥४६॥ सप्तदिवस समग्र पाही । भजन कडका तये ठाई । गोपाळकाला करविला ते हि । वर्णू काई येकयाचें ॥ ४७ ॥ भक्तस्वरूप श्रीपांडुरंग । माळोपंत तेणें आंगें । प्रसाद दिधला सर्वांसी साग । धन्य भाग्य जीवाचें त्या ॥ ४८ ॥ असो यात्रा करून माळोपंत । येते जाहले स्वगृहातें । ग्रामाजवळ

घेऊनी तेथें । आम्रबागेंत उतरले ॥ ४९ ॥ मळ्यांत आलों ह्मणून । पाठविला घरासी ब्राह्मण । ताक दही आणाया पूर्ण । गेला जाण लवलाही ॥ ५० ॥ तव तेथें हि माळोपंत । देवार्चन करीत होते । द्विपेसी सांगतां वृत्तांत । जाहली लज्जित ते काळीं ॥ ५१ ॥ देवघरांत जाऊन । केलें विपरीत निवेदन । माळोपंतरूप भगवान । हास्यवदनें बोलती ॥ ५२ ॥ ह्मणती तोतया असेल कोण्ही । मीच खरा सर्वथा जनीं । वार्ता फुटली सर्वत्र वदनीं । पहावया नैनीं निघाले ॥ ५३ ॥ पातशाहा आदिकरून । मिळाले ग्रामस्थ कार्कून । माळोपंतासी संगे घेऊन । स्वारी पूर्ण निघाली ॥ ५४ ॥ बागेंत जाउनी पाहातां । दोघे ते सारीखे तत्वतां । आश्चर्य वाटलें समस्तां । करीती चित्ता विच्यार पै ॥ ५५ ॥ खरें ह्मणावें कवणाला । ऐसें पातशाहा बोलता जाहाला । श्रीहरी वदे यवनाला । धरा हाताला तयाचे ॥ ५६ ॥ सत्य तुमचा तो चि दिवाण । ऐसें सांगुनी रुक्मीणी रमण । तात्काळ जाले अदृश्यमान । तेज पूर्ण फाकलें पै ॥ ५७ ॥ मग माळोपंतासी खेद जाहाला । आग टाकिलें धरणीला । उदक वाहतसे नेत्राला । कंठ दाटला भरुनी ॥ ५८ ॥ म्हणे माझ्या जीवीच्या प्राणा । शीणविले तुला करुणाघना । अतिसकुमारा राधिकारमणा । जानकीजीवना श्रीरघुपति ॥ ५९ ॥ ऐशापरी अनेक प्रकारें । माळोपंत दीर्घस्वरें । आळवीतसे करुणाउत्तरें । आक्रोश फार केला पै ॥ ६० ॥ ते चि क्षणीं लुटऊनी दौलत । संगे घेउनी जाया सुत । पंढरीचा धरीला पंथ । माळोपंत विरक्त जाहले ॥ ६१ ॥ बहुतप्रकारें पातशाहानें । प्रार्थना केली असे जाण । परी न गुंते भगवद्भक्त । धरीती चरण श्रग्पाणी ॥ ६२ ॥ आर्त्री व प्रेमळ नैराश्यता । तयांत वर्तली ऐसी कथा । शीणविले पंढरीनाथा । तेणें चित्ता क्लेश बहु ॥ ६३ ॥ यवनाधीप तयानें । हात जोडितां करुणा भाकून । छपाटही केला पावन । दाऊन रूप स्वरुपाचीं ॥ ६४ ॥ येथें अधिकार सकळिका । भजन पूजन सांगुनी

लोका । पंढरीचा मार्ग चोखा । घडिला नेटका ते चि क्षणीं ॥ ६५ ॥
ऐशा अनेक असती लीळा । अन्यग्रंथीं त्या वर्णिल्या । यास्तव येथें संक्षेप केला । यादविला नाहीं क्रम ॥ ६६ ॥ माळोपंताचा जो अवतार । गुंडोजीबाबा संत थोर । ऋग्वेदांत धरीलें शरीर । लक्षणें सुंदर ते चि सर्वों ॥ ६७ ॥ सडपातळ गौरवर्ण । माळोपंतासारीखें ध्यान । मितभाषण अवलोकन । करचरण इत्यादि ॥ ६८ ॥ भजनाठाईं हेतु जयाचा । यास्तव जन्म जाहला साचा । बाळपणीं वैराग्याचा । फुटला प्रेमाचा मोड पै ॥ ६९ ॥ हृदयभुमीकेमाजी । ज्ञानवृक्ष वाढला सहजी । फळें आलीं सोहं बीजी । भक्ति ताजी रस बहु ॥ ७० ॥ नामामृत ते श्रवे याचे । पूर्ण स्थान शांतिक्षमेचें । धन्य ऐश्वर्य गुंडोसंतांचें । माळोपंताचे अवतार ते ॥ ७१ ॥ स्वात्ममाळ कमाविला । माळोपंत तो चि भला । रुक्मीणीवल्लभ मानवला । भजनसुखाला जयाचे पै ॥ ७२ ॥ सकळसंतांत जो का गुंडा । म्हणुनी नाम तया गुंडा । होये पातका रमरला चुराडा । याचागि गुंडा मरा तयाचे ॥ ७३ ॥ कीं रुक्मीणीचे मुक्त मोत्यांतील । शोभे गुंड अतिसोज्वळ । भक्तिप्रेमें देतसे ढाळ । अवतार निर्मळ गुंडोबा ॥७४॥ कळीकाळावरी फेकिला गुंडा । निर्मूळ करी तया प्रचंड । कळींत भक्त समर्थ गुंडा । पंढरातें बाडा जयाचा पै ॥७५॥ माहाद्वारीं भजन ज्याचे । ऐकतां वैराग्य उत्पन्न साचे । करुणापर अभंग याचे । म्हणतां प्रेमाचें भरतें ये ॥ ७६ ॥ अटाहास्ये दीर्घस्वरे । अभंग म्हणावा सुस्वर । भगवान सद्गुरु विठेवर । ऐसा गजर होतसे तो ॥७७॥ प्रति अभंगीं तैसें चि भजन । अष्टौमाव आंगीं पूर्ण । प्रेमाश्रु गळती नैन । वर्णी कवण भाग्यासी त्या ॥ ७८ ॥ शिष्यमंडळीसहित फेरा । नृत्य होतसे यवये प्रहरा । तेणें शोभा महाद्वारा । हर्षे अमरा पाहती गगनीं ॥ ७९ ॥ भजनकाळीं देहमान । गुंडोपंताशीं नसे जाण । शरीराशीं घाम येऊन । भिजे आंगण माहाद्वारीचें ॥ ८० ॥ पंढरीच्या शिवेबाहेर । भजनाचा उमटे गजर । ऐसा समर्थ वैष्णववीर । पूर्ण अवतार श्रीमाळोचा ॥ ८१ ॥ पिंगळी शिष्यीण जन्मांतरींची ।

श्रीगुरुचरणीं निष्ठा जियेची । सेवे तत्पर सदा साची । आणीक शिष्याची मंडळी ते ॥ ८२ ॥ नामे तयाची असंख्य पहाता । भजनानुष्ठानी ते सर्वथा । प्रगटणें तेथें पंढरीनाथा । समुदाय वसता तये स्थानीं ॥८३॥ स्वदेशाहुनी गुंडोपंत । निघतां मार्गीं भजन करीत । ठाई ठाई उमे राहत । अभंग गातां दीर्घस्वरें ॥ ८४ ॥ तये काळीं प्रेमांत येतां । चमत्कार होती तत्वतां । वर्णावया ते सर्वथा । सारस्वता शक्ति नवे ॥ ८५ ॥ दर्शन होतां गुंडाजीबावाचें । समूळ पातक जाय जीवाचें । भक्तिज्ञान प्राप्त साचें । जाय मनाचें चाचल्यपण ॥ ८६ ॥ अज्ञान-दरीद्र दूर होवे । सामान्य पीडा तेथें काय । उगेचि वंदितां सहजी पाय । नाहीं अपाय कदाकाळीं ॥८७॥ ऐसा साधुसमर्थ गुंडा । लोकत्रै ठ्याप्या झेंडा । भजनरंगीं जो कां निघडा । केला वेडा देव जेणें ॥ ८८ ॥ रात्रंदिवस सदा जवळी । मार्गे हिंडे श्रीवनमाळी । प्रेमानंदें बिचरे ब्रळी । जोडी कळी हात तया ॥८९॥ भजनमार्ग स्थापुनी जनीं । आपण पावके वैकुंठसदनीं । माहाद्वारा सन्मुख नैर्नी । वाळुवंटस्थानीं समाधी ते ॥९० नामामृताची जेथें लूट । धन्य धन्य ते वाळुवंट । ज्ञानगुजरी पंढरीपेठ। घडघडाट भजनाचा ॥९१॥ प्रतिवर्षीं पुण्यतिथी । अन्नदान सर्वांभूतीं । संतवृंदें कीर्तन करीती । शिष्य मिळती बहुत पै ॥ ९२ ॥ धन्य धन्य ते गुंडाजीबावा । प्रीती जयाची रमाधवा । प्रताप लिहीतां अगाध बरवा । येक जिव्हा काय वदे ॥९३॥ मौनावलीं सहस्त्रवदनें । तेथें मानव काय दीन । परी उदेला भाग्यदिन । फाकली कीर्ण गुरूकृपेचीं ॥ ९४ ॥ तेणेंप्रकारीं सुजीवडे । संतस्तवनें छाघली जोड । सिधनार्थीं प्रताप प्रौढ । ह्रदईं रूढे राजारामीं ॥ ९५ ॥ यानंतर चरीत्र बरवे । मोरो-पंताचें वर्णीजे मावें । ग्रंथप्रिय पंढरीराव । अवधान द्यावें श्रोतिये ॥९६॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । गुंडाजीबावाचरीत्रातें । अध्याय समाप्त होतसे हा ॥ ९७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय १ ॥ ॥ अनु० अ० ॥ ८२ ॥ समाप्त ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडु-रंगार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ ॥

## अध्याय ८३

### — मोरो पंडित —

॥ श्रीगणेशायनमः॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरू परमेश्वरा। अनादिसिद्ध परात्परा। निजनिर्गुण निर्विकारा। भालचंद्रा श्रीगणपति ॥ १ ॥ महावाक्यप्रशस्तशुंडा। सोहस्फुर्ति ते प्रचंडा। च्यारीभुजा तेचि प्रौढा। शोभती निधडा चतुर्वेद ॥ २ ॥ ज्ञान वैराग्य भक्ति प्रेम। हींच साजिरीं आयुधें परम। येणें वधिला दैत्य अधम। अहंकार अधर्म गज्यासुर तो ॥ ३ ॥ स्वात्मधर्म स्थापन करून। आनंदविले देवब्राह्मण। लंबोदर करुणाघन। प्रगटे ध्यान पिंडब्रह्मांडीं ॥ ४ ॥ कासे कासीला पीतांबर। गळा शमीपत्राचा हार। शमदमादि साधनप्रकार। दुर्वांकुर जयाचे शीरीं ॥ ५ ॥ कटीसूत्र कडदोरा। कुंडलिनद तोचि खरा। पाईं ब्रीद तोडर बरा। ज्याचा दरारा कळीकाळा ॥ ६ ॥ ऐसा समर्थ मयुरेश्वर। भक्तवछळ रुक्मिणीवर। समचरण विटेवर। पंढरपुर धन्य तें ॥ ७ ॥ सत्कर्मजीन्या प्रिय तयाला। निरखीं सदा ते चि माळा। तेणें भूषण श्रीविठ्ठला। हृदईं प्रगटला स्वयेंचि तो ॥ ८ ॥ दाशरथी श्रीरघुनंदन। श्रीपंढरीनिवास जगज्जीवन। भक्तवराचे वदवी गुण। धावें अवधान सर्वत्रीं ॥ ९ ॥ शिव आदिकरून वैकुंठाधीप। अवतरले कळीत सतस्वरूप। निवृत्तिनाथ ज्ञानदीप। प्रेम चिद्रुप भोगावया ॥१०॥ वानरगण गोपाळमेळा। जन्मले सारे भूमंडळा। पंढरीसी गोपाळकाला। प्रसादाला सेविती पै ॥ ११ ॥ चतुर्दशभागवत। अवतारले ते हि समस्त। प्राशन केले प्रेमामृत। कीर्तनमुखाते रंगोनी ॥ १२ ॥ ऐसें पाहुनी मयुरेश्वरें। मानवाकृति धरीलें शरीर। जाहला गणपति अवतार। हे चरित्र ऐकिजे पै ॥१३॥ स्वानंदपूर मयुरेश्वर। क्षेत्र पूर्ण कुमंडलीतीर। पूर्वभागीं उत्तमनगर। ह्मणती सारे बारामती ॥ १४ ॥ बारा गणपती अवतरला। बारामती बारा कळा। तेचि तेज सूर्यमंडळा। प्रकाश निर्मळा आत्मयासी ॥ १५ ॥ कीं बारा स्कंद भागवत। बारामती ते चि निश्चीत। राहिला गर्भी राम सत्य। या चि निमित्य या नगरीं ॥१६॥

आत्माराम तो चि हृदयीं । वारामती ऐसें नगरीं । जन्मले स्वयें विघ्नारी । ब्राह्मणोदरीं मयुरेश्वर ॥ १७ ॥ गर्भस्थ असतां मातेशीं चिन्ह । दुर्वांकुर वाटुनी पिणें । करावें सदा मोदकाशन । नित्य भक्षणें सितपलाडु ॥ १८ ॥ चतुर्थीचे उभयतां व्रत । मातापिता अनुष्ठाते । जन्मांतरीचें थोर सुकृत । आले गणनाथ उदरासी ॥ १९ ॥ उत्पन्न होतां चि हास्यवदन । छोकरांसा करी रूदन । परी सर्वदा सोहंस्फुर्गे । नसे विस्मरण कदा ते ॥ २० ॥ विस्मरण ते चि दानव । सदा स्मरण, ते देव । वेदशास्त्री हा अनुभव । ज्ञाते सर्व जाणती पै ॥ २१ ॥ यास्तव विसर आपुलेपणाचा । कदाकाळीं नसो साचा । विभाग तो गुरुपुत्राचा । बहिर्मुखाचा लाग नसे ॥ २२ ॥ ते श्रीगुरुमोरोपंतीत । गणपतीचा अवतार सत्य । जगदोद्धार कराया छत्य । जाहले अपत्य द्विजाचें सा ॥ २३ ॥ व्रतबंध होतां चि अध्ययन । च्यार वेद प्राप्त जाण । चवदा विद्या ज्यासी प्रविण । कळा पूर्ण चतु:षष्ठी ॥ २४ ॥ ब्रह्मक्षमूर्ति श्रीविघ्नहराची । तेथें ज्ञानासी उणीव कैचि । मूत बोतिली भक्तिची । वैराग्याची खाणी ते ॥ २५ ॥ समारंभें विवाह जाहला । ते तो अद्भुत लिहितां सोहोळा । जेथें प्रगटला ऋषीमेळा । गृहस्थ जाहला मयुरेश्वर ॥ २६ ॥ पंढरीसी जाता स्वछंदें । सामोरे पातले श्रीमुकुंद । ते सुख वर्णितां शुध । दाटे आनंद भुवनत्रई ॥ २७ ॥ निजभक्ताचा धरुनी हात । गेले हरी राउळात । परस्परें भाषण होत । तो गुह्यार्थ न सांगवे ॥ २८ ॥ मोरोपतास गाढ आलिंगन । दिधले तेव्हा रुक्मीणिरमणें । जगज्जीवन गज्यानन । शोभती अभिन्न एकरूप ॥ २९ ॥ पांडुरंग ह्मणती स्वकाव्योक्ति । कीर्तन करावे तुह्मी गणपति । आर्याछंद मजप्रति । आवडे प्रीती करूनिया ॥ ३० ॥ मुद्गलाच्यार्य माहाभक्त । पूर्वी जाहला परमसत्त । आर्यास्तवन केलें अद्भुत । विचित्र अर्थ तयाचा ॥ ३१ ॥ आद्यापि तो अभिप्राय । मनन करीतो सदा पाहे । समदृष्टी समकाया । तिष्ठत आहे समाधींत ॥ ३२ ॥ तया अलिकडे काहीं । श्रवणासी आर्या मिळाली नाहीं । पंदे अभंग ऐकतो देही । श्लोक तेही वामनाचे

॥ ३३ ॥ तरी आतां मयुरेश्वरा । सिद्धिबुद्धींच्या दातारा । आर्याछंदें कथन करा । ग्रंथ विवरा सारे पै ॥ ३४ ॥ भारत भागवत रामायण । व्यासकूट सकळ शोधून । आर्यासेतु बांधून । जीव तारणें भवाब्धिवरी ॥ ३५ ॥ आज्ञापिता श्रीविठ्ठ । मोरोपंडीत हर्षिन्नले । गणपति अवतार जो सोज्वळ । बुद्धी प्रबळ ज्याची पै ॥ ३६ ॥ मग तेथें काय उशीर । सरस्वती बैसली जिव्हेवर । आर्या केल्या अपार । ग्रंथ समग्र धुंडाळिले ॥ ३७ ॥ सकळ शास्त्राचें मथन करून । ग्रंथ रचिले असंख्य जाण । अवलोकिता चतुर्वदन । विस्मित पूर्ण मानसीं ॥ ३८ ॥ सन्मालेच्या करीता आर्या । प्रेम दाटले पंढरीराया । प्रसन्न जाहले भक्तराया । कवळीती काया मोरोपंताची ॥ ३९ ॥ वारवार पोटाशी धरून । कुर्वाळिती निजहस्तानें । श्रीरुक्मीणी येऊन । उतरी लोण वेळोवेळा ॥ ४० ॥ येकावळीं पदे अभंग । श्रवण केलीं श्रीपांडुरंगें । करुणारस तेथें चांग । पाहीला आगे सनकादिकें ॥ ४१ ॥ आर्याछंद देखून । व्यासादिक तुकविती मान । मग इतराचा पाड कवण । वध पूर्ण जगद्वद्या ॥ ४२ ॥ असो पंढरीस मोरोपंडीत । कीर्तन केले स्वकाव्योक्त । वाळुवंटीं अनेक संत । बैसले समस्त श्रवणासी ॥ ४३ ॥ तये कथेचा अधिकारग । कीर्तनीं उभे रमारंग । वरत्नुत्वरस अव्यंग । धन्य भाग्य त्या श्रोत्याचें ॥ ४४ ॥ च्यातुर्मास्य करुनी वास । निरोप मागती देवास । सद्गद होउनी वैकुंठनिवास । स्वभक्तास बोलनी पै ॥ ४५ ॥ वारवार लवकर येऊन । भेटत असावें मजला जाण । जगीं सर्वां देउनी दर्शन । सांगुनी भजन पावन करा ॥ ४६ ॥ आज्ञा घेऊन भक्तशिखामणी । स्वआश्रमा आले प्रेमखाणी । गृहस्थाश्रमीं वर्तती जनीं । पुण्य मेदिनी से जागा ॥ ४७ ॥ तये स्थानीं द्वादशमतींत । साधुस्थळे असती बहुत । रामदास अवतार सिद्धनाथ । आश्रमाजगत मठ तयाचा ॥ ४८ ॥ अतिस्नेह मयुरेश्वरीं । प्रेम सिद्धचरणावरी । मूर्अंतर्गत बैसती विवरीं । संगती बरी परस्परें ॥ ४९ ॥ सिद्धस्वरूप त्या मारुतीचा । आशंकित दास

युगायुगीचा । ह्मणुनी ग्रंथ वदे वाचा । प्रताप गुरूचा काय वर्णू ॥ ५० ॥ तयाचे संगें सकळ कल्याण । संतस्तवन भाग्य पूर्ण । घातिले डोळा ज्ञानांजन । रघुनंदन सर्वत्र पै ॥ ५१ ॥ सद्गुरूनाथ सिध्द स्वामी । भरुनी ठेला अंतर्यामीं । तेणे स्फूर्ति राजारामीं । विचरे धर्मी साधुलिळें ॥ ५२ ॥ भक्तरूपी मयूरेश्वर । जो का प्रसिध्द अवतार । बारामती जयाचें घर । ऐका चरित्र तयाचें ॥ ५३ ॥ अन्नार्थी जे येतील प्राणी । तयासी भोजन देती सदनीं । परोपकार सर्वत्र जनीं । काळ भजनीं सारीतसे ॥ ५४ ॥ निरंतर पाटी लेखणी हातीं । आर्याकाव्य नित्य करीती । नरनारी मुमुक्षु येती । अनुग्रह देती तयासी ॥ ५५ ॥ जे जे जयाचे मनोरथ । ते ते पुरविती मोरोपंडित । सुलभ साधन सांगुनी जीवाते । भवभयाते वारीती पै ॥५६॥ पराशरक्षेत्र श्रीपन्हाळा कविरासान्निध्य जो किल्ला । श्रीमयुरेश्वरें अवलोकीला । राहिले स्थळाला तेथें पै ॥ ५७ ॥ पराशरऋषीचे गुह्येत । वास्तव्य केलें मोरोपंडीत । प्रत्यक्ष दर्शन दिधले तयाते । महाभागवत व्यासपित्याने ॥ ५८ ॥ परस्परें ऐक्यविचारें । संवाद घडला वेदांतसार । ठेविता माथा वरदकर । मयुरेश्वर कृतार्थ पै ॥ ५९ ॥ कांहीं वास करुनी तेथें । काशीस गेले मोरोपंत । क्षेत्रस्थासी हर्ष बहुत । येती सतत ज्ञानी दर्शना ॥ ६० ॥ पंडीत आणि भजनशीळ । काव्य करता संत निर्मळ । विद्वज्जनाचे अर्थ सकळ । पुरवी प्रांजळ साधु तो ॥ ६१ ॥ सिध्दीविनायक जो प्रत्यक्ष । आत्मसिध्दी अपरोक्ष । पूर्ण जयाचे ज्ञानाक्ष । साक्षांश येवो पै ॥ ६२ ॥ संशय सारे दूर करीती । असो प्राणी भक्ते ज्ञाती । सांगुनी तया आत्मप्रचिती । मेळविती सस्वरूपा ॥ ६३ ॥ ऐशाप्रकारें महास्मशानीं । उत्धरीले अनेक प्राणी । उत्तरमानस समग्र करुनी । आले निघोनी परस्परा ॥ ६४ ॥ षोडशोपचारें अर्चियेला । जो का विटेवर घनसावळा । कीर्तनरंगीं तोषविला । संतमेळा सर्वत्र पै ॥ ६५ ॥ दक्षणमानस साधुरयानें । अनुक्रमें वंदीलीं जाण । ठाईं ठाईं लाउनी भजन । दाविले सोपान ब्रह्मीचे ॥ ६६ ॥ आत्मप्राप्तीसी विघ्न

जाहलें । षड्वैरी देश मातले । माया आवर्ती जे पडले । विषई नाडीले नरनारी ॥ ६७ ॥ देहाभिमान बळावला । सिंदुरासुर तो मातला । माराव्या तया खळा । अवतार जाला मोरेश्वर ॥ ६८ ॥ फरश अंकुश विवेक विच्यार । धारण करुनी उभयकरें । निवारण केलें दुर्विकार । दानव सारे जगांतील ॥ ६९ ॥ मूढमति असो प्राणी । आर्या ज्याची गाती वदनीं । सरस्वती प्रगटे जननी । हृदयभूवनीं प्रयक्षता ॥ ७० ॥ अर्थ स्तवन श्रीसाधूचें । मोरोपत केलें साचें । भक्तियुक्त ह्मणतां वाचे । सकट जीवाचें हरे पै ॥ ७१ ॥ भक्तवछळ भक्तस्तवनीं । लक्ष्मीसहित असव ऋणी । अंतरबाह्य निशीदिनीं । जनीं वनीं हींडे मार्गे ॥ ७२ ॥ साधुळीलेपरते कांहीं । देवासी दुजे गोमटे नाहीं । ह्मणुनी तिष्टे पढरीठाईं । समपाईं श्रीविठोबा ॥७३॥ तयाचिये हृदयकमळा । जे का मिळे तुळसीमाळा । तयांतील हा मणि सोज्वळ । मोरोपत वर्णिला भक्तराम ॥ ७४ ॥ जयाचें काव्य प्रसादीक । उद्धरीले सकळ लोक । धन्य धन्य तो सतटिळक । रघुनायक प्रिय तया ॥७५॥ उदय होतां चि सूर्य किरण । भूमंडळासी व्यापिती जाण । मयुरेश्वराचें तेवि कवन । पसरलें पूर्ण भुवनत्रईं ॥ ७६ ॥ जेथें तेथें आर्या ह्मणती। कीर्तनरंगीं प्रेमळ गाती । शास्त्रज्ञ वैदिक अर्थ करीती । मुक्त होती श्रवणपठणें ॥७७॥ सकळग्रथाचें सारस्य । काढुनी रचिले आर्यांकोश । रामायणादि अर्थ विशेष । भारत विलसे ज्यामार्गी ॥ ७८ ॥ गणपतीचा तो अवतार । प्रत्यक्ष स्वयें मोरेश्वर । काय वर्णू मी पामर । कीळा अपार तयाची ॥ ७९ ॥ भक्ति प्रेम भोगावया । सतरूपीं धरीली काया । जगदोद्धार करूनीया । निर्गुणठाया लीन जाले ॥ ८० ॥ श्रीशिवाचा तो पुत्र । लंबोदर जो का पवित्र । शिव अवतार महारुद्र । जन्म चैत्र पौर्णिमेसी ॥ ८१ ॥ पर्व जाणुनी तये दिवशीं । विसर्जन केलें जडदेहासी । मोरोपंत वैकुंठवासी । निजधामासी गेले पै ॥८२॥ संतजनाची पुण्यतिथी । श्रवण करीतां पुण्यप्राप्ती । वृधीं होय आयुष्याप्रति । नासोनी जाती पातकें तीं ॥८३॥ सिध्दरूपें राजारामी ।

वृत्ति निमग्न पादपद्मीं । संतस्तवनसेवाधर्मी । अंतर्यामीं प्रेमभरतें ॥ ८४ ॥ अमृतप्राय अमृतकथन । यानंतर होईल पूर्ण । श्रोतावक्ता रघुनंदन । भक्तजीवन नमन तया ॥ ८५ ॥ भक्तमंजीरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । मोरोपंडीतचरीत्रातें । अध्याय समाप्त होतसे हा ॥८६॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अ० ॥ १ ॥ अनु० अ० ॥ ८३ ॥ समाप्त ॥ ॥ शुभंभवतु ॥ ५ ॥

## अध्याय ८४

### — अमृतराय चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरूसिद्धनाथा । मायामल्ल त्रिगुणरहिता । अनादिसिद्धा अपरमिता । लक्ष्मीकांता तुज नमो ॥ १ ॥ जय जय सर्वोत्तम सर्वेश हरी । सगुणलिळा मायाविहारी । सर्वोत्कर्षा रावणारी । अज्ञानतमनिवारी रविवंशा ॥ २ ॥ पुराणपुरुषा रविकुळमंडणा । भक्तांकित जानकीजीवना । कौशल्यात्मज दशरथनंदना । हनुमंतप्राणा जगद्गुरु ॥ ३ ॥ जय जय अखिलजगपाळका । जनकज्यामात त्राटिकांतका । जळाब्धिवासा वैकुंठनायका । पुंडरीकावरद हरी ॥ ४ ॥ प्रेमसुखा सुखेन । पंढरीसी सदा राहाणें । धन्यधन्य तूं अयोध्यारमण । सन्मुख हनुमान शोभतसे ॥ ५ ॥ त्रेतायुगीं देवांश वानर । द्वापारी ते गोपाळ सारे । कलीमाजी वैष्णववीर । संत थोर रामदासादि ॥ ६ ॥ प्रेमळाच्या ऐशा गोष्टी । कर्थेत बोलाव्या वाळवंटी । यालागी जन्म दिधला निकटी । कृष्णातटी मज दीना ॥ ७ ॥ तरी रिघोनी हृदयकमळीं । संतमालिका गुंफवी मळी । जिये ग्रंथीं तूं वनमाळी । कीर्तनमेळीं डोलसी ॥ ८ ॥ विनविता ऐसे पांडुरंग । भक्तलीळा वदवी आंगें । प्रगट जाहला अंतरंग । कथा भोग जन्मांतर ॥ ९ ॥ तेणें होउनी आनंदवृत्ति । नमुनी सकळ संतमूर्ति । धारण केली लेखणी हातीं । लिहीतसे युक्ति संतचरीत्रा ॥ १० ॥ देवगुरु श्रीबृहस्पति । तयाचा अवतार जाला जगतीं । ते

जाहलें । परवैरी दैत्य मातले । माया आवर्ती जे पडले । विषई नाडीले नरनारी ॥ ६७ ॥ देहाभिमान बळावला । सिंदुरासुर तो मातला । मारावया तया खला । अवतार जाला मोरेश्वर ॥ ६८ ॥ फरश अंकुश विवेक विस्तार । धारण करुनी उभयकरें । निवारण केलें दुर्विकार । दानव सारे जगांतील ॥ ६९ ॥ मूढमति असो प्राणी । आर्या ज्याची गाती वदनीं । सरस्वती प्रगटे जननी । हृदयभुवनीं प्रत्यक्षता ॥ ७० ॥ अर्थ स्तवन श्रीसाधूचें । मोरोपंत केलें साचें । भक्तियुक्त ह्मणतां याचे । संकट जीवाचें हरे पै ॥ ७१ ॥ भक्तवछळ भक्तस्तवनीं । लक्ष्मीसहित असेंद्र ऋणी । अंतरबाह्य निशीदिनीं । जनीं वनीं हींडे मागें ॥ ७२ ॥ साधुलीळेपरते कांहीं । देवासी दुजें गोमटे नाहीं । ह्मणुनी तिष्टे पंढरीठाई । समपाई श्रीविठोबा ॥७३॥ तयाचिये हृदयकमळा । जे का मिळे तुळसीमाळा । तयांतीळ हा मणि सोज्वळ । मोरोपंत वर्णिला भक्तराज ॥ ७४ ॥ जयाचें काव्य प्रसादीक । उत्धरीले सकळ लोक । धन्य धन्य तो संतटिळक । रघुनायक प्रिय तया ॥७५॥ उदय होतां चि सूर्य किरण । भूमंडळासी व्यापिती जाण । मयुरेश्वराचें तेवि कथन । पसरलें पूर्ण भुवनत्रई ॥ ७६ ॥ जेथें तेथें आर्या ह्मणती। कीर्तनरंगीं प्रेमळ गाती । शास्त्रज्ञ वैदिक अर्थ करीती । मुक्त होती श्रवणपठणें ॥७७॥ सकळग्रंथाचें सारस्य । काढुनी रचिले आर्योक्तीस । रामायणादि अर्थ विशेष । भारत विलसे ज्यामाजीं ॥ ७८ ॥ गणपतीचा तो अवतार । प्रत्यक्ष स्वयें मोरेश्वर । काय वर्णूं मी पामर । लीळा अपार तयाची ॥ ७९ ॥ भक्ति प्रेम भोगावया । संतरूपीं धरीली काया । जगदोत्धार करूनीया । निर्गुणठाया लीन जाले ॥ ८० ॥ श्रीशिवाचा तो पुत्र । लंबोदर जो का पवित्र । शिव अवतार महारुद्र । जन्म चैत्र पौर्णिमेसी ॥ ८१ ॥ पर्व जाणुनी तये दिवशीं । विसर्जन केलें जडदेहासी । मोरोपंत वैकुंठवासी । निजधामासी गेले पै ॥८२॥ संतजनाची पुण्यतिथी । श्रवण करीतां पुण्यप्राप्ती । वृध्दी होय आयुष्याप्रति । नासोनी जाती पातकें तीं ॥८३॥ सिध्दकर्पे राजारामीं ।

सत्तमर्थ । व्रतबंधास केलें पै ॥ २७ ॥ न करीता अभ्यास वेदध्यारी । साही शास्त्रें वदे वैखरी । पुराणें तीं सकळ वरी । हृदयांतरीं तिष्ठती पै ॥ २८ ॥ चहू वाचेचा स्वामी निश्चीती । ह्मणुनी नाम त्या वाचस्पती । तो हा महाराज पातला जगती । जीवाप्रति तारावया ॥ २९ ॥ अमृत सदा सेवणार । अमृताधीप तो निर्धार । कलींत नाम साचार । ते चि खरे याजलागी ॥ ३० ॥ लोकरीत्या पाहतां वतन । अमृतराय ते महाजन । जनामध्यें महा जन । साधु पूर्ण ते जाणा ॥ ३१ ॥ पालखी पदस्थ वडिलार्जित । पातशाहाचा कारभार करीत । जयाचे स्वाधेन ध्यारशत । आज्ञांकित कारकून पै ॥ ३२ ॥ विसाजीपंत दिवाण । पातशाहाचा असे पूर्ण । तया आंगी रजतम दारुण । वर्तती गुण अतिशये ॥ ३३ ॥ वैराग्य भक्ति रायजीची । विसाजी पंतासी नावडी साचि । अंतरी बुधी छळक नेमाची । हेळणा साधूची आरंभिली ॥ ३४ ॥ पातशाहासी सर्वप्रकारी । विश्वासुक रायजी कारभारी । हे दिवाणासी निज अंतरीं । विषवत् भारी वाटले ॥ ३५ ॥ दरबाराची चाल तये समई । गैरमर्जी होतां पाही । लेखणी मागून घेता कांहीं । तये ठाई राहूं नये ॥ ३६ ॥ विसामोरू दिवाण यानें । यवनाधिपासी न कळतां जाण । जासूद पाठविला विनोदानें । कलम मागून आणावया ॥ ३७ ॥ तव रायजी प्रातःकाळी । विधीपूर्वक करुनी आंघोळी । संध्या पूज्या आरंभिली । आसनी बैसली गुरुमाय ॥ ३८ ॥ येकाग्रता ध्यान स्थीती । तेजःपुंज्य अमृतमूर्ति । तये काळीं येऊनी दूतीं । लेखणी प्रति मागितले ॥ ३९ ॥ रायासी तेव्हा हर्ष जाहला । कलमदान दिधले जासूदाला । हरीभजनासी आरंभ केला । तया सुखाला कोण गणी ॥ ४० ॥ निघाला कंटक पायांतील । कीं नेत्रामाजी खूपता हाले । कीं कुमारीकेसी जाचीतेवेळ । पाठविले मूळ मायेनें ॥ ४१ ॥ कीं उदकांत प्राणी बुडता । धावला नावाडी तारता । रायजीस तैसी अवस्था । आनंद चित्ता स्तुति न समाये ॥ ४२ ॥ कारभार शृंखळा तुटली । भगवंते पूर्ण कृपा केली ।

कथा ऐकतां प्रीती । श्रुतिस्मृति फळ तया ॥ ११ ॥ पातक फार कर्लीत जाहाले । भवार्णवीं प्राणी बुडाले । विषय मनीं उबवले । स्वहीत गेले विसरोनी ॥ १२ ॥ याळागी कळवळोनी जीवें । तारावया समूळजीव । मृत्युलोकी गूरुदेव । अवतरण घरखें केलें पै ॥ १३ ॥ महानिष्ट श्रीयाज्ञवल्की । माध्यांदिनी शाखा निकी । यजुर्वेद तो त्रैलोकी । व्यासादिकी स्तवियेला ॥ १४ ॥ यास्तव श्रीदेवगुरु । यर्जुवेदी त्या अवतारू । त्यापोटा जेणें भक्तिधुरू । अचळ मेरू मावार्थ पै ॥ १५ ॥ अवरंगाबादेत तपोनिष्ट । ब्राह्मण पाहोनी परमश्रेष्ट । पतिव्रता भार्या स्पष्ट । उभयता वरीष्ट गुरुभजनीं ॥ १६ ॥ जाणुनी तयाची सुकृतराशी । देवगुरु जन्मले तयाकुशी । डोहोळे जाहाले तपे सतोशी । ते मानसीं श्रवण करा ॥ १७ ॥ हरीब्राम्हभक्षण पीतवसन । पीतवर्णे आवडती सुमने । हळदी घालुनी खिचडी खाणें । वाटावे सुमन ब्राह्मणादीका ॥ १८ ॥ पीतांबरधारी पिवळा हरी । घ्यान तयाचें सर्वदा करी । नऊ महीने ऐशापरी । पूर्णता बरी गर्भासी त्या ॥१९ ॥ प्रसूतकाळी पित्यानें । उत्छाह केला बहुत जाण । अनेकप्रकारें देउनी दान । करविले भोजन सर्वांमूर्ती ॥ २० ॥ अमृतवाणी वृहस्पतीची । श्रुति ऐशी आहे साची । यास्तव नाम ठेविले तेचि । स्मरतां जीवाची हरे पीडा ॥ २१ ॥ धन्य महाराज अमृतराय । वाचस्पति अवतार होये । पुण्यपावन ते माये । वर्णूं काय तया कुळा ॥ २२ ॥ ज्या ज्या स्थळीं साधु राहाती । पवित्र देश तो निश्चिति । कुर्धीतग्राम असो वस्ती । उत्तम क्षीती ते जाणा ॥ २३ ॥ संतवार्ता ऐकतां कार्नी । सकळ पातका होये घुणी । सारीं तीर्थे संतदर्शनीं । लोळे चरणीं पर्वकाळ ॥ २४ ॥ असो अवरंगाबादेंत रायाजी । जन्मले जगदोद्धारकाजी । इद्रादिदेव करीती अर्जी । वृहस्पति सहजीं तो अवतरला ॥ २५ ॥ पंदरींचें सुख अधीक । म्हणुनी त्यागिला अमरलोक । प्रेम भोगाया अलौकिक । आले कौतुक निजभूतळा ॥ २६ ॥ बाळपणीं दिवसेंदिवस । च्यातुर्य अधिक रवि सदृश । प्राप्त होता

सतमवर्ष । मतवंधास केलें पै ॥ २७ ॥ न करीता अभ्यास वेदध्यारी । साही शास्त्रें वदे वैखरी । पुराणें तीं सकळ वरी । हृदयांतरीं तिष्ठती पै ॥ २८ ॥ चहू वाचेचा स्वामी निश्चोती । ह्मणुनी नाम त्या वाचस्पती । तो हा महाराज पातला जगती । जीवाप्रति तारावया ॥ २९ ॥ अमृत सदा सेवणार । अमृताधीप तो निर्धार । कलींत नाम साचार । ते चित्तें पावली ॥ ३० ॥ लोकरीत्या पाहतां वतन । अमृतराय ते महाजन । जनामध्यें महा जन । साधु पूर्ण ते जाणा ॥ ३१ ॥ पालखी पदस्थ वडिलार्जित । पातशाहाचा कारभार करीत । जयाचे स्वाधेन ध्यारशत । आज्ञांकित कारकून पै ॥ ३२ ॥ विसाजुरु दिवाण । पातशाहाचा असे पूर्ण । तया आंगी रजतम दारुण । वर्तती गुण अतिशयें ॥ ३३ ॥ वैराग्य भक्ति रायजीची । विसाजी पंतासी नावडी साचि । अंतरी बुधी छळक नेमाची । हेळणा साधूची आरंभिली ॥ ३४ ॥ पातशाहासी सर्वप्रकारी । विश्वासुक रायजी कारभारी । हे दिवाणासी निज अंतरीं । विषवत् भारी वाटले ॥ ३५ ॥ दरबाराची चाल तये समई । गैरमर्जी होतां पाही । लेखणी मागून घेता कांहीं । तये ठाई राहूं नये ॥ ३६ ॥ विसामोरू दिवाण यानें । यवनाधिपासी न कळतां जाण । जासूद पाठविला विनोदानें । कलम मागून आणावया ॥ ३७ ॥ तव रायजी प्रातःकाळी । विधीपूर्वक करुनी आंघोळी । संध्या पूज्या आरंभिली । आसनी बैसली गुरुमाय ॥ ३८ ॥ येकाग्रता ध्यान स्थीती । तेजःपुंज्य अमृतमूर्ति । तये काळीं येऊनी दूतीं । लेखणी प्रति मागितले ॥ ३९ ॥ रायासी तेंव्हा हर्ष जाहला । कलमदान दिधले जासूदाला । हरीभजनासी आरंभ केला । तया सुखाला कोण गणी ॥ ४० ॥ निघाला कंटक पायांतील । कीं नेत्रामाजी खूपता हाळें । कीं कुमारीकेसी जाचीतेवेळ । पाठविले मूळ मायेनें ॥ ४१ ॥ कीं उदकांत प्राणी बुडता । धावला नावाडी तारिता । रायजीस तैसी अवस्था । आनंद चित्ता स्तुति न समाये ॥ ४२ ॥ कारभार श्रृंखळा तुटली । भगवंतें पूर्ण कृपा केली।

अमृतरायें तये वेळीं । आरंभिली स्तुति देवा ॥ ४३ ॥ तीं पदें करुणापर । वैराग्यशील अतिप्रखर । श्रवण करीता षड्विकार । जाती शरीर सोडुनी ॥ ४४ ॥ अष्टोभाव रायजीस । प्राप्त जाहले त्या समयास । विणा घालुनी गळ्यास । बांधिले पायास घुंगर पै ॥ ४५ ॥ चिपळ्या शोभती वाम करीं । नृत्य करीती अति कुसरी । भजन जयाचें मधुरस्वरीं । नाहीं सरी दुजी तया ॥ ४६ ॥ गधर्व चकित गायन पाहता । नारद तिष्ठती गगनीं जाता । ऐशा परी पंढरीनाथा । आळवी त्वरता साधु तो ॥ ४७ ॥ भजनरंगीं समाधिस्थ । देहभान कैंचें तेथें । प्रेमरंगें नाचत । धन्य अमृतरायजी ते ॥ ४८ ॥ जामुदे नेता कलमदान । घाबर्ला तो विसोबा ब्राह्मण । बादशहासी कळता पूर्ण । होईल शासन सत्वराही ॥ ४९ ॥ मग तात्काळ जाउनी दर्शना । मिठी घातली रायजीचरणा । दीनवचनीं मागी करुणा । क्षमा सज्जना करा ह्मणे ॥ ५० ॥ प्रार्थना करी अनेकविच्यारें । रायजीपुढें पसरीला पदर । घातिला साष्टांग नमस्कार । ठेविले शिर पायावरी ॥ ५१ ॥ त्रिवाचा वदे चुकलो ऐसें । चलावे आता कचेरीस । अमृतरायानी ते वेळेस । पद सुरस केलें पै ॥ ५२ ॥

॥ रायजीचे पद ॥ ( पण मूळांत येथें पद नाहीं )

कचेरी पुरे ह्मणे ह्मणून । दर्शविले वैराग्य जाण । ह्मणती आह्मा हें चि करणें । कीर्तन नरतनु श्रीपासी ॥ ५३ ॥ मनांत इच्छा होती जैसी । श्रीहरीनें पुरविली तैसी । आतां न करा आग्रहासी । जावें गृहासी दिवाण तुम्ही ॥ ५४ ॥ पातशहासी येता राग । निवारण करू स्वयें आंगें । क्षमासिंधु श्रीगुरू संगे । केले अव्यंग समाधान ते ॥ ५५ ॥ मग विसाजीपंतें जाउनी वाड्यांत । सांगितला मूळ वृत्तांत । आश्चर्य वाटुनी पातशहाते । दर्शनाते तेहि निघाले ॥ ५६ ॥ कडकडा वाजती भेरी । उठली मंडळी समग्र सारी । येकायेकीं पातली स्वारी । आले घरी रायजीचे ॥ ५७ ॥ तव नेत्री अश्रू वाहाती । येकाग्रता भजन करीती । राधिकारमणा सीतापति । अभग गाती करुणापर ॥ ५८ ॥

शरीराचें नाहीं भान । नृत्य होतसे नेत्र झांकून । अंतरीं सुंदर सावळें ध्यान । प्रगटायमान ते काळीं ॥ ५९ ॥ मन गुंतलें भगवत्पदीं । देहावरी नाहीं सुधी । येणारजाणाराची शुधि । नसे सबाधि आपणावया ॥ ६० ॥ पातशाहा येऊनी ठाकला उभा । तटस्थ पाहती सारी सभा । अनौपम्य भजन शोभा । फाकली प्रभा प्रेम सूर्याची ॥ ६१ ॥ नेत्रकमळिणी विकासील्या । स्वानंदभ्रमरा त्या मोहिल्या । अपणसमाधी प्रोतिपाश । प्राप्त जाहल्या सर्वांसी ॥६२॥ पातशाहानी देखुनी भजन । रोमांच उठले आंगीं पूर्ण । वैराग्य आंगीं दाटलें सघन । जाहाले सद्लीन निसमावें ॥ ६३ ॥ ह्मणे व्यर्थ मी येऊनी, जन्मा । धन्य धन्य संतमहीमा । अनन्यभावें पादपद्मा । विनटला प्रेमा धरुनी ॥ ६४ ॥ सहा सद्दू घटिकानंतर । रायजी आले देहावर । करीती सारे नमस्कार । दंडवत प्रकारें शूद्र यवन ॥ ६५ ॥ पातशाहा उभा जोडुनी हात । विनवी रायजीस अनन्युक्त । ह्मणती करावे कीर्तनातें । आपण वाड्यांत येउनी स्वयें ॥ ६६ ॥ कन्यापुत्र कलत्र तेणें । पावन होती कथा श्रवणें । कारभार नाहीं आपणाकारणें । तरी तारणें भवजळ अह्मा ॥ ६७ ॥ न जाणुनी ते शिणविले । संताहातीं लिहीणें करविले । आतां स्वस्थ असोनी वहीले । कल्याण इछिले पाहिजे पैं ॥ ६८ ॥ आदर पाहुनी रायजीनीं । जातां जाहाले पातशाहासदनीं । आरंभ केला श्रीकीर्तनीं । मिळाले जनी नरनारी ॥ ६९ ॥ विद्वज्जन पंडित भले । बाधमुमुक्षुसाधक आले । नारदादि सिध पातले । श्रवणीं बैसले मुनि सारे ॥ ७० ॥ पातशाहा दूर मर्यादेनें । तेहि बैसले कराया श्रवण । तये काळीं त्या भावेनें । करीतो भाषण राय अमृत ॥ ७१ ॥ अमृतवाणी वर्षाव होतां । श्रोते जनी तन्मयत्ववस्था । पातशाहा सद्गद होउनी चित्ता । ठेविला माथा चरणावरी ॥ ७२ ॥ मोत्याची आणोनी कंठी । घातली रायजींचे कंठीं । बुका उधळुनी ललाटीं । तुरा निकटी खोविला शीरीं ॥ ७३ ॥ भरजरी पोषाक लेवऊन । विनविला साधु करुणाघन । पाया लागती समस्तजन । आरति पूर्ण होतसे पैं ॥७४॥

क्षीरापत शर्करा घेउनी हातीं । कार्कून माविक ते वांटिती । रायजी अवतार श्रीबृहस्पति । वैराग्य दीप्ति ज्या अंगीं ॥ ७५ ॥ गळ्यांतील काढुनी कंठी जाणा । बोलाविल्या अवघ्या ललना । हातावरी ठेविपला येकयेक दाणा । दिधली आक्षणा यत्नें तीं ॥७६॥ भजन करीत स्वगृहासी । गेले समर्थ आत्मविलासी । आश्चर्य केलें यवनें मानसीं । लागले मार्गासी धराधिप ते ॥ ७७ ॥ रायजीस अग्रहार । द्रव्यभिक्षा पस्तीसहजार । सालावादी करुनी विचार । योजना थोर केली पैं ॥७८॥ निस्पृहाचा मुगुटमणी । गुंतेल तये स्थानीं । परस्परें ब्राह्मण भोजनीं । संस्थानीं समर्पिलें ॥ ७९ ॥ पातशाहासी सांगुनी साधनक्रम । अधिकारपरत्वें सुचविला नेम । आपण निघोनी सत्वर प्रेम । लागले परम मार्गासी ॥ ८० ॥ कुटुंबसहीत झडकरी । गेले रायजी पंढरपुरीं । पाहतां भगवान विटेवरी । भरले अंतरीं अष्टभाव ॥ ८१ ॥ मग ते स्वसुख वर्णील कोण । देव भक्तासी आलिंगन । धयधया गळती दोनी नैन । बाष्प पूर्ण दाटले पै ॥ ८२ ॥ आंगीं उठले रोमांच । निरसन जालें चहुदेहाचें । वो आनंद सांगता वाचे । अनिर्वाच ब्रह्मसुख ॥ ८३ ॥ निर्विकार अद्वैत । जेथें वेद नेति म्हणत । तेचि होउनी भक्तांकित । साकार तिष्ठत पंढरीसी ॥ ८४ ॥ असो रायजीस श्रीपांडुरंगें । धरीले पोटासीं निजांगें । म्हणती सखया टाकुनी स्वर्ग । प्रेमरंग भोगीतसा ॥ ८५ ॥ देवाच्यार्य गुरुवर्या । धरीली तुवां मानवी काया । धन्य स्वामी अमृतराया । निवती हृदया माझे पै ॥ ८६ ॥ उदरस्थ सारे जीव । प्रबोधावे तुम्ही जीव । उपदेशुनी प्राकृतकाव्य । स्ववैभव दाखवा तुम्ही ॥ ८७ ॥ आधींच अवतार बृहस्पतीचा । तयांत प्रसार श्रीकृपेचा । अमृतवाणी कथन वाचा । रस तयाचा अद्भुत पै ॥ ८८ ॥ पदरचना कटाबंद । व्यासादिक ऐकतां स्तब्ध । नाना आख्यान केली विषद । अनेक प्रबंद धाव्या मुद्रा ॥ ८९ ॥ भक्तिज्ञानवैराग्य । प्रसादिक जयाचें काव्य । बहुत पदें केली भार्य । पाहातां अन्वय संत सारे ॥ ९० ॥ अमृतरायाचे

जाणतो पद । प्राप्त होय निजात्मपद । धन्य धन्य ते श्रीगुरुपद । सतत पदें करावी ती ॥ ९१ ॥ मुक्ताफळासारिखी अक्षरे । मनक छंद अर्थे सुपूर । मानिती मनीं चमत्कार । गोरीहार स्वये पै ॥ ९२ ॥ असो रुक्मीणीगर्भी अमृतराया । ठेउनी घेतले पदरीठाया । आज्ञापिले कीर्तन कराया । अनन्य हृदया विजप्रीती ॥ ९३ ॥ आज्ञा वदुनी भक्तवत्सें । नमन केलें श्रीचरणास । आरंभ केला श्रीकथेस । अतिहर्षे सप्रेमें ॥ ९४ ॥ मग ते अद्भुत काय पाहाणें । डोलु लागले ऋषीकारमण । सनकादिक विस्मितमनें । दाटली विमानें गगनीं पै ॥ ९५ ॥ स्वर्गस्थ देव अवघ पाहती । भजनप्रेमा लाळ घोटीती । धन्य अवतार श्रीवृहस्पति । सुमनें वर्षती कीर्तनरंगीं ॥९६॥ अमृतवाणी अमृतवृष्टी । जेणें श्रोतिया तुष्टीपुष्टी । नये वर्णिता ते गोष्टी । पडली मिठी स्वानंदीं ॥ ९७ ॥ च्यतुर्यमास ऐसा सरला । कीर्तनाचा गजर केला । तेणें योगें श्राविठ्ला । उपच्यार घडला सर्वही ॥ ९८ ॥ रायजीस वदती कमलनैन । जीव ताराचे देउनी दर्शन । मग श्रीची आज्ञा घेऊन । निघाले भ्रमण करावया ॥ ९९ ॥ सकळतीर्थे वृहस्पतिपाई । तो हा अमृत अवतार मही । लोकरीती आचरे देहो । करीती सर्वही क्षेत्राटण ॥ १०० ॥ माहात्म्यशात पूर्ण काशी । स्नान केलें भागीरथीसी । तप्पन करुनी विश्वधाशी । पाहिली दृष्टीसी सारे दैवते ॥ १ ॥ ऋतुरुत्वेण मोक्ष नाही । ऐसें बोलती शास्त्रें काही । यालागी विच्यार केला हृदई । लागले पाई यतिवर्याचे ॥ २ ॥ पूर्णानंद पूर्णब्रह्म । दाविलें तेणें स्वात्मधर्म । द्वैताद्वैत जाउनी भ्रम । स्वरूपप्रेम लाधलें पै ॥ ३ ॥ आधींच अवतार वाचस्पतिला । तयासी आनन्द पूर्णानंदाचा । तेणें संपूर्ण भाग कैचा । भाट हृदयाचा भाला तो ॥ ४ ॥ दृशदेह पिंड ब्रह्मांड । निरसन जालें माया थोताड । स्वानुभव लाघला जाड । निज-प्रभाव पूर्णचैतन्य ॥ ५ ॥ धन्य स्वामी पूर्णानंद । रायजीस दिधला पूर्णानंद । गुरुपदकमळीं सेवी आमोद । शिष्य मिळींद मायार्णव ॥६॥ स्वामीसेवसी होउनी रत । काशीवास केला अमृते । आज्ञा घेउनी

जगदोद्धारातें । फिरले समस्त देश पै ॥ ७ ॥ पुन्हा येउनी पंढरीसी । अर्चियेला हृषीकेशी । कीर्तन करुनी वाळवंटामी । संत जनासी वंदीयेले ॥ ८ ॥ काहीं दिवस राहून । घेउनी देवाची आज्ञा जाण । मार्गी चालतां करीत भजन । आले पूर्ण स्वआश्रमा ॥ ९ ॥ पातली भेटीसी संतवृंदें । आरंभिले मोदे प्रसिद्ध । मंडप घातिला परमशुद्ध । पाहातां अगाध समारंभ ॥ ११० ॥ असंख्य ब्राह्मण मिळाले । वेदघोष होऊं लागले । ध्वजापताकें वेष्टिले । वारकरी भक्ते ते हि पै ॥ ११ ॥ उत्कृष्ट होतसे अन्नदान । वाद्यें वाजती बहुत जाण । जेथें प्रत्यक्ष रुक्मीणीरमण । पंक्तीतून हिंडतसे ॥ १२ ॥ तेथें उणें पडेल काई । अष्टमासिद्धी लोळती पाई । कीर्तनें होतीं ठाईं ठाईं । धन्य मही ते जागा ॥ १३ ॥ औरंगाबादेंत द्वादशदिन । समारंभ जाहाला जाण । यात्रा मिळाली पंढरीप्रमाण । तीर्थविधान जाले पै ॥ १४ ॥ नंतर रायजी सदनी असता । अपूर्व वर्तली सुंदरकथा । ते ऐका देउनी चित्ता । जेणें समता वृत्तिशी ॥ १५ ॥ मेघवृष्टी पृथ्वीवर । अमृतपदे तैसी निर्धारी । वैराग्यशीळ अतिकुसरी । ऐकतां अंतरीं अनुताप ॥ १६ ॥ हिंदुस्थानांत उदासीन वीतरागी । महान्समर्थ महंत वैरागी । शिष्य तयाचे फार जगीं । भजनरंगीं क्रीडतसे ॥ १७ ॥ तेणें माहात्म्य ऐकीलें कानीं । अमृतराय धन्य मेदिनीं । काव्य श्रवण करितां मनीं । अंत:करणीं दचकला ॥ १८ ॥ ह्मणे ऐसा निस्पृह पुरुष । वैराग्य ज्याचें कवनीं विशेष । आवर्जून पाहावे त्यास । सार्थक देहास तरी च पै ॥ १९ ॥ बाराशेवैरागी ज्याचेसगे । निघाला तो महंत वेगे । मार्ग क्रमीत अनुरागे । आला अवरंगाबादेस ॥ १२० ॥ स्थळ पुशीत तृतीयप्रहरीं । रायजीचे पातले घरीं । मंडळी लंगोटवंद सारी । गजर वैखरी नामाचा ॥ २१ ॥ तव महाराज राय अमृत । चौरंगावरी बैसले आहेत । तृतीयप्रहरीं विलासांत । स्त्रिया असत दोघी जवळी ॥ २२ ॥ भरजरीवस्त्रे अलंकार । गळा मुक्तरत्नाचे हार । हातीं घेउनी चामरें । उडविती वर रायजीचे ॥२३॥ वसंतऋतू ह्मणून । प्रक्षाळिती श्रीचरण । आर्गी उटी सुगंधचंदन ।

सुमन गजरे ते माळा ॥ २४ ॥ धूपदीप पक्वाने । नानापरीचीं अर्पितीं पूर्ण । कोणी विंजणा घेऊन । मक्तीं करून वारीती पै ॥ २५ ॥ ते साधु ऐशा प्रसंगीं । येते जाहाले समस्त वैरागी । विलास पाहुनी अंतरंगीं । चकित वेगी जाले पै ॥ २६ ॥ ह्मणती अमृतराय तूं चि निर्धार । पदरचना वैराग्यपर । आचरण पाहतां विपरीत सारे । कोण विचार काव्याचा ॥ २७ ॥ बोला ऐशी नाहीं करणी । व्यर्थ शिणविली नऊ मास जननी । मिरवावया स्फीती जनीं । कवनरचनी पाखांड ॥ २८ ॥ कीर्ती ऐकुनी दूरपंथ । आलो आपणासी हुडकत । परी येथे नाहीं किंचित । वैराग्य सत्य आंगासी ॥ २९ ॥ कामव्याग उम्या जवळी । जैश्या दिसती चाफेकळी । रंगला स्त्रीविषय गोंधळी । उगीच केली कविता हे ॥ १३० ॥ वैरागी ते ऐसे बोलता । हांसें आलें राय अमृता । नाना प्रकारें तया बोधितां । नोहे चित्ता समाधान ॥ ३१ ॥ रायजीस तेव्हां महंत बोलत । परोपदेश हें पांडित्य । असोनी स्वयें लोभग्रस्त । प्रारब्ध सत्य सांगतसा ॥ ३२ ॥ ऐसे बोलतांचि त्या अवसरीं । रायजी ह्मणती स्त्रीयासी वैखरी । वस्त्रें अळंकार टाकुनी झडकरी । निघावें बाहेर घरांतुनी ॥ ३३ ॥ ब्राह्मणा सुचऊनी ते चि वेळा । लुटविलें समग्र संपत्तीला । हातीं घेउनी तुंबिफळा । पीतांबर टाकिला फेडुनी ॥ ३४ ॥ जेवि का श्रीरघुनाथ । झुगारिलें राज्य समस्त । निघाले भगवान वनांत । तेवि अमृतरायें केलें ॥३५॥ लघु पंचा नेसुनी आंगे । स्त्रियांसी दिधलें उपवस्त्र सांग । निघते जाले तयासंग । वेद वैराग्य जयाचा ॥ १३६ ॥ अधिर्य करूनी तेणें सर्वी । निघते जाहाले फिराया उर्वी । तयामध्यें अमृतरवि । प्रभा बरवी ज्ञानाची ॥ ३७ ॥ जाता पंथीं त्या अरण्य । निबिड लागलें सुंदरवन । जेथे वाहे निर्मळ जीवन । क्रीडती वनचरें बहु ॥ ३८ ॥ तेथ उतरले वैरागीवृंद । सहित अमृतराय प्रसिद्ध । स्त्रिया संगी ज्याच्या शुद्ध । उतरले सिद्ध तये स्थळीं ॥ ३९ ॥ अर्धघटीका होता चि पाहीं । विचित्र वर्तलें ऐका ते हि । सांप्रदाई श्रीमंत देहीं । लव-

कोंही पातलों तेथें ॥१४०॥ रायजीचे दर्शनास । जात होता अवरंगाबादेस । स्थीर जाहाला मार्गास । स्नानविधीस सारावया ॥ ४१ ॥ अपार सैन्य बरोबरी । घेउनी पूजा सामुग्री । भजन करीत वैखरी । जातसे मिर्याणी गुरुजवळी ॥ ४२ ॥ तव अवचिता देखिले स्वामी । मस्तक ठेविले पादपद्मी । हृदय दाटलें सप्रेमी । ह्मणे मी व्यर्थ जन्मोनी ॥ ४३ ॥ कोणी लुटले तुह्माते । येथें आणिले कोणी बसाते । करीन तयाचें पारपत्य । शिरविला समर्थ गुरुराये ॥ ४४ ॥ ऐसे ह्मणुनी ते चि काळीं । राहावटी तयानें तेथें चि दिधली । अमृतरायाची पूजा केली । उभयता मनी स्त्रियासहीत ॥ ४५ ॥ पहिल्यापेक्षा अधीक । वस्त्रे अलंकार अर्पियेले देख । बैरागी यांणी पाहुनी कौतुक । जोडिती निके हात स्वामीयां ॥ ४६ ॥ गडबड लोळती पाईं । ह्मणती धन्य तूं गोसाईं । देखप्रारब्ध खरें पाही । आलें हृदईं प्रत्ययासी ॥ ४७ ॥ पूर्णकृपा संपादुनी । बैरागी गेले मार्गांनीं । राजयोगी पूर्ण जनीं । कळले मनीं तयाचे ॥ ४८ ॥ अनेक ऐसे चमत्कार । लिहितां न कळे ययाचा पार । सुहृदरतीचा तो अवतार । रायजी थोर समर्थ साधु ॥ ४९ ॥ असंख्य जीव उद्धरुन । सत्स्वरूपी जाले छान । ते लीळा अत्यंत गहन । गहिवरती भगवान यासाठीं ॥ १५० ॥ भगवत्स्वरूपी रायजी होता । दुंदुभी वाजल्या स्वर्गीं तत्वतां । पुजाद्रव्य घेउनी धाता । समर्पी अमृता अष्ट करें ॥ ५१ ॥ नारद तेव्हां गायन करीती । अमर आनंद पुष्प टाकिती । अमृत अवतार वाचस्पती । सत जगतीं कळिमार्जी ॥ ५२ ॥ पुढे आख्यान भुजगनाथाचें । वदविती स्वामी सिध्द वाचे । ऐकता अघ जाय जीवाचें । पुण्य साचें अगाध पै ॥५३॥ राजारामी रंगवी वाणी । श्रीगुरुसमर्थ आनंदानी । श्रोता वक्ता कोदंडपाणी । समचरणी विटेवरी जो ॥ ५४ ॥ तया हृदईं शोभे माळा । मणी सुंदर त्यांतील भला । अमृतनाम विटले जपाला । पाजी जीवाला ज्ञानामृत ॥५५॥ भक्तमंजीरीमाळामय । श्रवणें चि पुरती मनोरथ अमृतरायचरीत्राते । अध्याय हात समाप्त हा ॥ १५६ ॥

|| श्रीकृष्णार्पणमस्तु || अध्याय || १ || अनु० अ० || ८४ || समाप्त ||
|| श्रीरामचंद्रार्पणमस्तु || श्रीपांडुरंगार्पणमस्तु || शुभंभवतु ||

## अध्याय ८५
### — भुजंगनाथ चरित्र —

|| श्रीगणेशायनमः || श्रीरामसमर्थ || जयजयसद्गुरु सिध्दरामा । परात्परा पूर्णब्रह्मा । पंचवदन आदि ब्रह्मा । हृदई प्रेमा ध्याती पै ||१|| सहस्रमुखाचा शिणला अही । सेवी आंथरूण जाला तोहि । यास्तव भुजला शेषशाई । ह्मणति पाही सकळ जन || २ || धन्य स्वामी सहस्रवदन । पहुडती हरी जयावरी आपण । पृथ्वी मस्तकी धरीली पूर्ण । आधार जाण सर्वांसी || ३ || मछादि अवतार अनंत । देव दानव प्रचंड बहुत । ऋषी साधु समस्त । आधार भूत तया फणि || ४ || धन्य धन्य ते नागकुळ । ज्याचे आश्रये भूमंडळ । योगभ्रष्ट तयांतील । काळया प्रबळ सर्प तो || ५ || तयाचा अवतार भुजंगनाथ । जाला साधु परम विख्यात । जन्म व्हावया इवरक्षातीत । कारण श्रोते ऐका ते || ६ || काळ्या भुजंगाचें वर्णन । श्रीभागवती केले जाण । येथे संक्षेप कांहीं सांगणें । जन्मांतरखूणसंज्ञेसी || ७ || सौरभऋषी यमुनातीरीं । ब्राह्मण्यस्वभावें तप करी । शरण येउनी जळचरी । प्रार्थीता वेळरी मुनिवर्य || ८ || मछ मिळुनी तेथें सारे । भाकिती करुणा निज आदरें । ह्मणती येउनी खगेंद्र । करी तो संव्हार आमुचा तो ||९|| आपुले सान्निध्य हिंसा होत । हे तो स्वामि दिसे अनुचित । तये काळीं तपोनाथ । वदले शापाते गरुडासी || १० || आमुच्याजवळ यमुना डोही । विष्णुवहन येता पाहीं । मृत्यु होईल त्या लवलाही । निर्भय ठाई आसा तुह्मी || ११ || सौरभद्विजें द्विजेंद्रासी । शापोक्ति वदोन चळचरासी । निर्भय केले मानसीं । कृपाराशी धन्य ते || १२ || भयरहित जळ पाहून । काळया राहिला आंत जाऊन ।

स्वपत्न्यासहित आपण । नांदे पूर्ण यमुनाडोही ॥ १३ ॥ सर्पकाळा विषव्रत । तमयोनी मूर्तिमंत । गरळ वमी उदकांते । ज्वाळा निघत भडभडा ॥ १४ ॥ तया ह्रदांतील पाणी । न सेविती कदा प्राणी । गोधनें चारीत तयें स्थानीं । चक्रपाणी पै गेले ॥ १५ ॥ यमुनातीरीं गोपाळ गाई । वडजेवाकुडेसगडे पाही । क्रीडा करिती भीमकजाबाई । अद्भुत मही तो खेळ ॥ १६ ॥ तृषीत होउनी कांहीं गोप । प्राशीती सूर्यकन्येचें आप । तव तेथें काळयासर्प । अतिदर्प जयाचा ॥ १७ ॥ डखुनी तया व्रजजना । प्राणरहित केले जाणा । वर्तमान कळता कमळनैना । क्रोध मना आला पै ॥ १८ ॥ मुरलीवादन करीत होते । आले तैसें चि श्रीभगवंत । पाहुनी गोपाळांचीं प्रेतें । सखेदचित्ते रागावले ॥ १९ ॥ ह्मणती कोठें आहे तो काळया । चिरडून टाकीन सर्पा तया । शिरले तात्काळ यमुनातोया । दारूण ह्रदया कोप तो ॥ २० ॥ पाहतां पुढें अहि काळा । निघती मुखातुनी विषज्वाळा । चक्षुश्रवा हाती धरला । भवडीला गरगराट ॥ २१ ॥ मणके आंगीचे होता ढिले । जाहाला काळया बहु व्याकुळ । नारायणासी डखी बळें । परी न चले सामर्थ्य पै ॥ २२ ॥ शेवटी काढीली फडी जेणें । चढले वरतें श्रीभगवान । आरंभिले सुंदर नर्तन । सुस्वर गायन मुरलीचें ॥ २३ ॥ गोकुळात कळता वृत्तांत । घाबरे जाले समस्त । नंदयशोदा आली धावत । शोक करीत सारे पै ॥ २४ ॥ इकडे श्रीकृष्ण काळियाशिरीं । नृत्य करी बहुकुसरी । विमानें दाटलीं अंबरीं । उतरली सारी खाली दैवतें ॥ २५ ॥ इंद्रादिक यमवरूण । आश्वीनिकुमार बृहस्पति जाण । शुक्राच्यार्य मरुद्गण । आले निवोन देवद्वंद्वें ॥ २६ ॥ सनक सनंदन सनत्कुमार । चतुर्दश भागवत समग्र । आठ्याऐंशी सहस्र ऋषेश्वर । पातले योगेंद्र वामदेव ॥ २७ ॥ सावित्रीसहित महादेव । गीरीजावल्लभ सदाशिव । पाहाती दृष्टी अपूर्व । मिळाले गंधर्व अप्सरा ॥ २८ ॥ देवऋषी राजऋषी । पितृऋषी नरऋषी । अवलोकिती ह्रषीकेशी । आत्मविलासीं ब्रह्मवेत्ते ॥ २९ ॥ नारद

विणा वाजवीत । गंधर्व गायन आलाप करीत । जैसे श्रीकृष्ण नर्तनीं करीत । अनुकार देत तैसे ते ॥ ३० ॥ रंभाउर्वशीतिलोत्तमा । मधुरस्वरें धरूनी प्रेमा । छुमछुम नाचती निर्लज्यधर्मा । पुरूषोत्तमा सुर देउनी ॥ ३१ ॥ श्रीसांब हृदई पूर्ण केला । तेणे हाती डउर घेतला सारीगमपदनिस या प्रबंदाला । आरंभिला छंदगण ॥३२॥ ज्या डमरूतून शब्द । नाना सूत्रें निघाली प्रसिध्द । व्हघुगुरूविच्यार प्रसिध्द । उपनिषदभाग तो ॥ ३३ ॥ ऐसा डमरू विराजीत । वाजवी स्वामी कैलासनाथ । येकसराघाई अद्भुत । तल्लीन चित्तें सर्वांची ॥ ३४ ॥ काळ्यानें ऐकुनी डउरध्वनी । तन्मयता जाहाली मनीं । विदेहास्थीती प्राप्त उन्मनी । पूर्णपणी समाधीस्त ॥ ३५ ॥ पूढे लीला जे जे जाली । सविस्तर भगवंती वर्णियेली । भुजंगाची वृत्ति गुंतली । अंतरीं मळी डउरध्वनी ॥३६॥ तेणें योगें डउरेज्ञातीत । जन्म जाला त्या भुजंगाते । ऐकतां ते समुळ मात । करी भगवंत कृपा तया ॥ ३७ ॥ धन्य धन्य तो योगभ्रष्ट । कृष्णपदचिन्हें ज्या देहाते । तमोगुण जाउनी संत । जाला निश्चीत कलीमाजी ॥३८॥किंचित करीतां विष्णुध्यान । विष्णुस्वरूप जीव पूर्ण । काळ्याशरीरीं प्रत्यक्ष भगवान । केले नर्तन पदें ठेउनी ॥३९॥ कोण तयाचे भाग्य वर्णी । जन्मांतरीची पुण्यखाणी । अवतरला तो संतगणीं । गुण वर्णी भगवंताचे ॥ ४० ॥ परंडग्राम पुण्यशील । नागनाथाचे हिवरे जवळ । योगभ्रष्ट तेथे जन्मले । उत्तमस्थळ भूमी ते ॥ ४१ ॥ मातापिता पुण्यवंत । काशीबाई दादनाथ । जाणुनी तयाचे मागील सुकृत । भुजंगनाथ अवतरले ॥ ४२ ॥ काळ्याचा अवतार म्हणून । काळा दांत टाळ्यांत पूर्ण । सेंडे जिव्हेसी दोन जाण । आरक्त नैन तैसे चि ॥४३॥ काळ्यावर्ण काळा । सर्पाकृति शरीराला । हरीगुण वर्णावयाला । देह धरीला श्रीभुजंगें ॥४४॥ मसादगीरीपासून । प्रसाद जाली बीस वर्षानें । अनुग्रह होता अज्ञान । जाले निर्शन ततक्षणीं ॥ ४५ ॥ अंतरबाह्य स्वरूप निबिड । वितळुनी गेले द्वैत जुंबाड । उघडले महाकवाड । स्वरूप रोकडे लाधलें पै ॥ ४६ ॥ भाक्ति

प्रेम सद्गुरुकृपे । येकात्मतेचा लागला दीप । द्वयभास होउनि लोप । आपी आप न्याहाळीतसे ॥ ४७ ॥ श्रीशिवाचा डमरू ऐकिला । तो चि छंद हृदई भरला । अनुहात डमरू वाजविला । नांदे कोंदला गगनमंडप ॥ ४८ ॥ भगवतपदे स्पर्शीला वपू । चिन्हांकित काळ्यासर्पु । तो हा अवतार भवरिपू । दवडीला दर्पु अहंकार ॥ ४९ ॥ मुरलीवादन हरीने केले । भुजंगाते ठाउक सकळ । धेनुवत्सा चुकाऊले । हृदई राहिले ते शब्द ॥ ५० ॥ मानवी धरुनी शरीर । काव्य केले ऐसे चि सारे । ऐकता चि मन स्थिरे । वृत्ति नुरे देहावरी ॥ ५१ ॥ पदलालित्य श्रवण करीता । वाजती मुरलीवाटे आर्ता । नंदकिशोर प्रत्यक्षता । नेत्रपथा भासतसे ॥ ५२ ॥ ऐसे काव्य भुजगनाथाचे । कर्णी पडतां अघ जाय साचे । पदे म्हणतां सद्भावे साचे । हरे जिवाचे दुःख पै ॥ ५३ ॥ ताल सुर मुक्त कवन । पूर्वी त्याचे पूर्ण ज्ञान । जियेकाळीं श्रीकृष्ण । केले गायन मुरलीसी ॥ ५४ ॥ गंधर्व हेल्हा सुर देती । अप्सरा ते आलाप करीति । ते सर्व भुजगाप्रति । ज्ञान निश्चीती विदीत पै ॥ ५५ ॥ पदरचना सुरबद्ध । ताल न चुके जेथें प्रसिद्ध । ऐसे कवन त्याचे शुद्ध । भवतारू सिद्ध काळ्याचा ॥ ५६ ॥ भुजंगनाथाचे सर्व देवावरी । स्तवनपर पदे वैखरी । पाहिले देव यमुनातीरी । नाचतां हरी मस्तकी तेव्हा ॥ ५७ ॥ त्यालागी पदे करून । अर्चिला समस्त देवतागण । स्तुति अक्षरे ऐकता कर्णे । जाय निघोन त्रिविधताप ॥ ५८ ॥ विषबाधा नुरे साचि । पदे म्हणता भुजगनाथाची । सकळ कामना पुरे जीवाची । कैवल्याची प्राप्ति पै ॥५९॥ जेथें जेथें भुजंग काव्य । भुजगाचे नाही भय । ऐसे भगवान वदती स्वयें । साधुवर्य कलीमाजी ॥ ६० ॥ भुजगनाथ कीर्तन करीतां । नमन करावे प्रथमता । श्रोतावक्ता हरी म्हणता । प्रत्यक्षता देव प्रगटे ॥ ६१ ॥ भजनसमई नित्यकाळीं । दर्शन देती श्रीवनमाळी । भुजंग अवतार भूमंडळी । सतमेळीं शोभतस ॥ ६२ ॥ पदरीसी यात्रा निघता । हर्ष जाला भुजंगनाथा । आंगी प्रेम भरुनी तत्वता । डउर हातात घेतला

तो ॥ ६३ ॥ शिष्यमंडळी बहुत संगे । विणाचिपळ्या वाजती मृदंग । ध्वजपताका मिरवती साग । गजरधिंग होतसे पै ॥ ६४ ॥ मार्गी चालता उमे राहावे । पांडुरंगाचें ध्यान करावें । तादृशता होय स्वभावें । काय वैभव वानूं ते ॥ ६५ ॥ प्रेमाचा तो केवळ पुतळा । क्रीडे संगे ज्या सावळा । भजनरंग अद्भुत सोहाळा । पंथ क्रमीला पंढरीचा ॥ ६६ ॥ राउळांत प्रवेश करीता । मरले वीरें थांगीं भक्ता । येकायेकी विदेह अवस्था । दृष्टी पाहाता शामसुंदर ॥ ६७ ॥ समचरणीं घाळिता मिठी । भुजंगा धरीतीं देव पोटीं । उभयता बोलती गुह्यगोष्टी । रुक्मीणी निकटी जवळ ते ॥ ६८ ॥ श्रीहरी ह्मणती मदपदचिन्हे । गेला मदमछर पूर्ण । जगीं साधु जाहालासी मान्य । धन्य कथन तुझें पै ॥ ६९ ॥ राहुनी पंढरीस्थानास । निरवी कर्ण स्वकाव्यरसें । ऐसें सांगता जगन्निवासें । भुजंगनाथास हर्ष मनीं ॥ ७० ॥ तात्काळ ढउर घेतला हातीं । शिष्य मंडळी मिळाली भवती । कीर्तनाते आरंभ करीती । सन्मुख निश्चिती गरूडपारीं ॥ ७१ ॥ मग तेथें काय पाहाणें । मिळाले श्रोते समस्त जाण । संतस्वरूप गोपाळ पूर्ण । नारदभगवान आदि करुनी ॥ ७२ ॥ भक्तमुमुक्षुविषई । तन्मय जाले कीर्तनठाईं । ढउर वाजे अनुहातघाईं । थयथया पाईं नाचतसे ॥ ७३ ॥ श्रीहरी ह्मणती सनकादिका । हा काळयाभुजंग सत देखा । आलाफ छंद सुंदर निका । मागील आवाका स्मरणांचा ॥ ७४ ॥ यमुनातीरीं वनांत । खेळ खेळलो आह्मी तुह्मी ते । ते सर्व जया विदित । मुरली शब्दाते जाणतसे ॥ ७५ ॥ रवितनयेच्या राहुनी जीवनीं । येणे ऐकिले जें जें श्रवणीं । तें तें बोलतो सुंदर वाणी । केला कीर्तनीं बहु रस ॥ ७६ ॥ परस्परें भक्तिप्रिय । सांगती भक्तासी पंढरीराय । ढउर ऐकुनी विस्मीत पाहे । त्रिनेन होय संतोष पै ॥ ७७ ॥ असो ऐसा बहुतकाळ । पंढरीसी वास्तव्य केलें । पांडुरंगा तोषविले । कीर्तनबळें त्या भुजंगें ॥ ७८ ॥ आज्ञा घेउनी विठ्ठलाची । द्वादशलिंगे पाहिलीं

साचि । स्वकाव्यस्तवनें तयाची । केली नेमाची पदरचना ॥ ७९ ॥ जो जो देव दृष्टीस पडला । तो तो कवनोक्ति पूजीयेला । गुरुप्रसाद भुजंगनाथाला । पूर्ण जाहाला पूर्वबोधें ॥ ८० ॥ तीर्थे करुनी बहुत । जीव दर्शनीं केले मुक्त । धन्य साधु भुजंगनाथ । करी सनाथ प्राणिया ॥ ८१ ॥ वाजविता जेणें डवर । प्रगट होय शारंगधर । भूतपिशाच पळे दूरे । निरसे ज्वर मदबाधा ॥ ८२ ॥ भुजंगनाथ स्मरतां वाणी । भुजंग जाती स्थान सोडुनी । चमत्कार प्रत्यक्ष जनीं । संत मेदिनी काळ्यां तो ॥ ८३ ॥ सर्पदंश जाला जया । नाथें स्पर्श करीता तया । निर्विष होये तात्काळ काया । भगवत् पाया विनटला तो ॥ ८४ ॥ श्रीकृष्णपदें जन्मांतरीं । स्पर्शिली वपु ती द्वापारीं । तो हा काळ्या जन्म धरी । प्रेम अंतरीं धरुनी ॥ ८५ ॥ चरणामृत लागतां शरीरा । अमृतरूप भुजंग तो खरा । घेउनी तेणें संतअवतारा । भवविषयारा मोडला, पै ॥ ८६ ॥ काव्यामृत सेवितां जनीं । दुरीत रोग गेले निघोनी । भुजग अंश जो अवनी । आठवा मनीं नाथ भुजंग ॥ ८७ ॥ कृपा अवतार करी आठवा । देवकीचा गर्भ तो आठवा । हृदयांतरीं त्या आठवा । सागर आठवा भावाचा ॥ ८८ ॥ भुजगनाथ श्रीकृष्णरूप । याजलागी चरीत्रीं वर्णिला प्रताप । श्रवणपठण होय निष्पाप । आपीं आप ब्रह्म स्वयें ॥ ८९ ॥ शके सत्राशे पचेचाळीसात । जाले नाथ समाधिस्त । द्वादशी तीथी विष्णु व्रत । जडदेहाते विसर्जिले ॥ ९० ॥ कृष्णपक्ष कृष्णप्रिया । प्राप्त जाहाला समाधीसमया । कृष्णरूप होउनी पापा । निर्गुणठाया लीन जाले ॥ ९१ ॥ निर्याणसमई चतुर्भुज । भगवान प्रगटले सतेज । प्राणज्योति अधोक्षजे । यदुराजें मुखीं घेतली ॥ ९२ ॥ वैकुंठीं नेउनी भुजग । केला अपुला निज पलंग । क्रीडा करी श्रीरंग । ते भाग्य न वर्णवे ॥ ९३ ॥ यदुलाल भागवत असा । भुजगनाथीं प्रिती विशेष । चावरभूमी पुण्य तिर्थीस । अर्पिली निःशेष तेणें पै ॥ ९४ ॥ श्रमहरणनदीतीरीं । नाथजीची समाधी बरी । उत्साह होत प्रतिसंवत्सरीं । भूवमार्गी

अन्नदान ॥ ९५ ॥ कीर्तन करीती भगवतभक्त । ठाईं ठाईं भजन होत । अनेकरी वाद्यें वाजत । छबीना मिरवत प्रत्यही ॥ ९६ ॥ जे जे जयाचे मनोरथ । ते ते पुरवी भुजंगनाथ । धन्य साधु कळीयुगांत । दर्शन देत भाविका ॥ ९७ ॥ समाधीस्त जाहल्यावरी । प्रगट जाले श्रीपंढरी । व्यापक पूर्ण चराचरी । उपमा दुसरी नाहीं तया ॥ ९८ ॥ पुढें कथा आनंदतनयाची । वर्णितो श्रीगुरु साचि । उदय पावली माग्याची । सुकृताची प्रेमकळा ॥ ९९ ॥ कृपामूर्ति सिध्दस्वामी । वृत्ति रंगवी राजारामीं । भक्तसुमनें ह्रदय पद्मीं । पुरुषोत्तमीं समर्पण ॥ १०० ॥ पुढें कथा आनंदतनयाची । कथन होईल सुंदर साचि । सिध्दस्वामीनी गुरुमाय आमुची । पंढरीची विटेवरी ॥ १०१ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । भक्तमेळी भुजंगनाथ । चरीत्र समाप्त अध्याय हा ॥ १०२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु. अ. ॥ ८५ ॥ समाप्त ॥

---

## अध्याय ८६

### — आनंदतनय —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय श्रीसिध्देशगुरु । जगत्रयाशी परमआधारु । स्वसत्तेसे चराचरु । घडे विस्तारु वेदशास्त्रीं ॥ १ ॥ परब्रह्म निर्विकारा । अज अव्यय सर्वेश्वरा । निरोपम करुणासागरा । अद्वय अपारा श्रीरघुपति ॥ २ ॥ गगनीं गंधर्वनगरें दिसती । मृगजवरी माया तेवि भासती । ठाईं पाहातां मूळप्रकृती । जेवि दीसी सूर्याची ॥ ३ ॥ रविकीर्ण नोव्हे मित्र । जानकीमाता रघुनंदन । उभय ऐक्य अनन्य नमन । श्रीहनुमान स्वानुभव तो ॥ ४ ॥ महाकारण ते सोज्वळ । आनंदाचें निज राउळ । स्फुरद्रूपीणी वीट निर्मळ । त्रिभुवनपाळ तयेवरी ॥५॥ तो सर्वात्मा श्रीराम । पांडुरंग परब्रह्म । भक्तमानस कल्पद्रुम । मेघःशाम पुरुषोत्तम ॥ ६ ॥ पिंडब्रह्मांड ते पंढरी । निज

गजर महाद्वारीं । अनुहातध्वनि नानापरी । भजन सुस्वरीं होतसे पै ॥ ७ ॥ निलयाचा सोहंभावें । ईडापिंगळा विचरे स्वभावें । जाणती प्रेम निजवैष्णव । महानुभाव आत्मवेत्ते ॥ ८ ॥ तयांमध्यें सर्वोत्कृष्ट । महाभागवत भीष्म वरिष्ट । जयाची प्रतिज्ञा श्रीवैकुंठ । करी स्पष्ट साच पै ॥ ९ ॥ शांतनूचा तो पुत्र । क्षेत्रीकुळांत जो पवित्र । परम योद्धा विचित्र । पद्मनेत्रें प्रिय ज्या ॥ १० ॥ तयाचा अवतार आनंदतनय । चरित्र तयाचें अद्भुत पाहें । श्रवण करितां अघ जाय । प्राप्त होय निज आत्मपद ॥ ११ ॥ स्तवराज श्रीभीष्माचा । पंचरत्नांत आहे साचा । तो पाहुनी देवाचा । उल्हास मनाचा अतिथोर ॥ १२ ॥ रसिकवाणी करुनी श्रवण संतोषले रुक्मिणीरमण । म्हणती भीष्मा जन्म घेऊन । करी स्तवन आणिक पै ॥ १३ ॥ सुखें भोगुनी प्रेमभक्ती । यावें तुवां पंढरीप्रती । पुंडरीकास्तव मी श्रीपति । तिष्ठे निश्चिती भीमातीरीं ॥ १४ ॥ तरी देउनी आलिंगन । निववी माझें अंग पूर्ण । ऐसें वदला श्रीभगवान । पावले जनन भक्त-राज ॥ १५ ॥ ते कथा अति गोमटी । संतमंजरीमाळे निकटी । अर्पितसे हरीकंठीं । केवळ पेटी स्वात्मसुखाची ॥ १६ ॥ अग्नया दिशेचे ठाईं । आरणी ग्राम विलसे पाहीं । आरणी मथन करितां देहीं । प्रगट होई ज्ञान हुताश ॥ १७ ॥ विवेकइंधनें ज्वलितां जाणा । जाळी संचित समुळ पूर्ण । क्रियमाण कर्तृत्व शून्य । प्रारब्ध भोगणें देहासी ॥ १८ ॥ देहचतुष्टय निरसन करितां । आपला आपण आत्मा आईता । सद्गुरूला शरण जातां । येईजे हाता निश्चळसुख ॥ १९ ॥ ते श्रीगुरू भीष्मा-च्यार्य । भागवतोत्तम योगवर्य । आरणीक्षेत्री धरीला देह । शाखा होय आश्वलायन ॥ २० ॥ गोत्र शांडिल्य द्विजोत्तम । आत्मनिष्ट भाविक परम । शोभे जया आनंदनाम । सर्वज्ञ निःसीम गुरुभक्त पै ॥ २१ ॥ शांतनूचा तो अवतार । भक्तिमान् शूर गंभीर । निर्दळीले षड्विकार । वैष्णव थोर भूमंडळी ॥ २२ ॥ पतिव्रता तुर्या अबळा । सन्नारी ते जीवनकळा । वरिले तेणें आनदाळा । राय भला विप्र तो ॥ २३ ॥ आनंदराव तया म्हणती । तिन्ही व्याख्या शोभन्या वृत्ति । देशपांडे

ज्योतिष निरखीती । कुळरूर्णोस्थीती ते जाणा ॥ २४ ॥ सया उदरीं श्रीमार्गवत । गंगातनय भीष्म विख्यात । जन्म घेतला भगवद्भक्त । ते सुख ऐकिजे पै ॥ २५ ॥ उपजतां चि वैष्णववीर । श्रीराम गर्जती दीर्घस्वरें । आश्चर्य करीती नारीनर । रुदनविच्यार नाहीं तो ॥ २६ ॥ गणीक ज्योतिषी होते जवळी । वर्णीले जातक तेथे काळीं । सुलक्षणी योगमेळीं । संत सकळी वर्णीती जया ॥ २७ ॥ त्रयोदशदिनीं रायाजी ऐसें । नाम ठेविलें तया मुलास । साधुमध्यें राये विशेष । भगवत्कृपेस पात्र तो ॥ २८ ॥ दिवसोदिवस ज्ञान अधिक । पत्रें शाखा जेवि रूक । भक्तिवैराग्य सेवि देख । फळ सुकृत सुरेख तें ॥ २९ ॥ सतवंध होता चि उदासीन । अनुग्रह केला निजपित्यानें । प्राप्त जालें आत्मज्ञान । ज्याचथी खूण स्वरूपस्थीति ॥ ३० ॥ तन्मयता येकायेकी । निर्विकल्प समाधी निकी । उन्मनी स्त्री वैसली अंकीं । अलौकिकी दशा ते ॥ ३१ ॥ सुलीनतेच्या मंदिरांत । स्वानंदविळास ते भोगीत । दव्यदृष्टी सरली मात । इंद्रियें सटरत जाहाली हीं ॥ ३२ ॥ श्रीगुरुनीं साक्ष करीतां । पातली तेथें तुर्य अवस्था । परी सुख स्वात्मयेकात्मता । राहिले तावता निरंतर ॥ ३३ ॥ धन्य रायाजी योगीराणा । आनंदपदरीं विनटला जाणा । परंपरा सीपाईबाणा । निमग्न भजनमार्गीं पै ॥ ३४ ॥ विवेक खर्ग सदा हातीं । क्षमा धेंदर्णे साजे निगुतीं । ज्ञान शास्त्र पाहुनी भीती । पळुनी जाती काम क्रोध ॥ ३५ ॥ अहंकार वैरी मारीला । जन्ममृत्यूचा घोट भरीला । अविच्यार बळी रगडीला । नाश केला द्वैताचा ॥ ३६ ॥ मोहो दुरधर धरुनी पाई । आपटीला तो मछर पाहीं । मदाधी तें फोडुन डोई । दंभ ठाई निर्दाळीला ॥ ३७ ॥ लोभाचा पुसोनी ठाव । निर्भर जाले भक्तराव । रायाजी शांमे जैसा नाव । भक्तिवैभव ज्यापासी ॥ ३८ ॥ ज्ञानतेज सुंदरकांती । हास्यवदनें ते मूर्ति । भरपोषाक मेघाकृति । अलंकारदीप्ती सौदामिनी ॥ ३९ ॥ केशरीटीळक मस्तकीं फेटा । मुक्ताचा तुरा मोठा । पायजमा सैंगा निकटा । बोध सोटा निजहस्तकीं ॥ ४० ॥ धार्कनामा शाक सर्वां ।

श्यामवर्ण अति शोभवी । निळांबरात ज्ञानरवि । विख्यात रवी किर्णे तीं ॥ ४१ ॥ ईयापरी शिपाईवेश । भीष्म अवतार श्रीयोगेश । समरंगणीं भक्तवतंस । भोगी वेश श्रीगुरुकृपें ॥ ४२ ॥ पुत्रपित्यासी नाहीं भेद । गर्जे ऐशी श्रुति प्रसिद्ध । जगीं विख्यात नाम शुद्ध । ह्मणविती सिद्ध आनंदतनय ॥ ४३ ॥ गंगातनय पूर्वी ह्मणविले । मातायेश प्रगटविले । या अवतारीं भूमंडळ । कीर्तीनें भरलें जनकाचे ॥ ४४ ॥ स्वनाम ठेउनी येकीकडे । पितृनामें वर्ते कोडें । आनंदतनय कवि गाढे । भक्तिकवाड उघडिलें पै ॥ ४५ ॥ उद्यापन ब्रह्मचर्याचें । ईहि जन्मीं करणें साचें । मनागत हें वडीलाचें । जाणीले जीवीचें हृद्गत तें ॥४६॥ गृहस्थाश्रम स्वीकारून । केले पित्याचें समाधान । अलिप्त वर्तती स्वयें पूर्ण । नीळवर्ण तयापरी ॥ ४७ ॥ सकळशास्त्रीं पारंगत । आनंदतनय महापंडित । काशीक्षेत्रीं ज्या मानीत । अग्रपूजेत अधिकारू ॥ ४८ ॥ पंढरीसी येतां जाण । आनंदले रूक्मीणीरमण । भीष्मावतार भागवत पूर्ण । भेटले निधान हरी ह्मणती ॥ ४९ ॥ सनकसनंदनसनत्कुमार । वैष्णव मिळाले तेथें समग्र । रंगशिळेवरी भजन थोर । होतसे गजर अनौपम्य ॥ ५० ॥ तव तेथे अत्रीचा । पुत्र आला अनसूयेचा । प्रकाश पडला आंगीचा । कोंदला साचा सभामंडप ॥ ५१ ॥ शींगी शेली गळा गोदडी । विरक्ती ज्याच आंगी वडी । षड्भुजमूर्ति आयुधें गाढीं । धन्य घडी ते जाणा ॥ ५२ ॥ श्रीपांडुरंगीं हातीं भेटी । आनंदाची तेथें लुटी । आनंदतनयासी पहाता दृष्टी । घातली मिठी श्रीदत्तें ॥५३॥ ठेउनी मस्तकीं दट हात । वरप्रदान जालें तेथें । जिव्हेवरी सारस्वत । राहीले तिष्ठत सर्वदा ॥ ५४ ॥ पद्मलाविल्य यमकें सारी । विष्ठली जे दुनी उभय करी । सहजी वदे ते वैखरी । वेदांत सरी कवन तें ॥ ५५ ॥ श्रीविठ्ठल प्रसन्नवदनें । आज्ञापिले निजकृपेनें । ह्मणती आनंदतनया गाईं गुण । लावी जन भक्तीसी पै ॥ ५६ ॥ सद्गुरुराया श्रीहरी । असो पुरुष किंवा नारी । ऋद्धी सिद्धी ज्या कामारी । मोक्ष द्वारी लोळतसे ॥ ५७ ॥ ते

बोलती तें कथन । ते पाहती तें दर्शन । सहजी करीती जेथें गमन । प्रदक्षणेंत गणना ते ॥ ५८ ॥ निद्रा तयाची ते समाधी । उरली नाहीं च भवव्याधी । श्रीगुरुकृपें आत्मसिध्दी । योगी प्रमीली ते जाणा ॥ ५९ ॥ असो आनंदतनयासी होता प्रसाद । दाटला हृदई प्रेमानंद । मग जे निघती मुखीं शब्द । ते ते प्रसिध्द कवन पै ॥ ६० ॥ भक्तिज्ञानवैराग्य । अर्थभरीत जाले काव्य । जे पाहातां कवित्वयें । वाटे आश्चर्य व्यासादिका ॥ ६१ ॥ आनदतनयाची ऐकता पदें । संतोषले फार मुकुंद । कीर्तन करविले प्रसिध्द । आनंदले सिध्द साधक पै ॥ ६२ ॥ मुमुक्षू आगळे भक्तीसी । अनुताप जाला बध्दासी । आनंदसुत बोधीती ज्यासा । ब्रह्मसुखासी मिळती ते ॥ ६३ ॥ भागवतभारत-रामायण । शोभले आनदतनयकवनें । भागीरथाचा बोध पूर्ण । गाय मुखातून निघतसे ॥ ६४ ॥ नातरी हेम मूळांचे वरें । परी अळकारीं दर्शी निवे । तैसे आनदतनयकाव्य । श्रोतियां गौरव देतसे पै ॥ ६५ ॥ किंबहुना शर्करा गोड पहिली । पदार्थ होता रूची आगळी । आनंद-सुतें तेवि केली । लीला वर्णिली भगवंताची ॥ ६६ ॥ काव्योक्ति ते पढता कर्णी । भक्ति उत्पन्न होये मनीं । ज्ञान तया प्राप्त होउनी वैराग्यजनी विचरतसे ॥ ६७ ॥ या नाव बोलिजे कवन । नातरीं वृथाचि कविता पूर्ण । वित्पत्ति काय पढून । अभिमान व्यर्थ काव्याचा॥६८॥ कोणी ग्रंथ शोधनी बहुत । मेळविती यमकाते । कोणी आठवले जे मनात । तेंचि रचित गद्यपद्यें ॥ ६९ ॥ कोणी विषई स्त्रियालुब्ध । लावण्या करीती विप्रबंध । कोणी चाऊन संस्कृतछंद । वरळती क्षुद्रदेवतास्तुति ॥ ७० ॥ याहुनी पुढे घरोघरी । कवन करतीळ नर-नारी । वैष्णव होती वेशधारी । नाहीं अंतरीं भूतदया ॥ ७१ ॥ धीटपाटप्रसादिक । कवनप्रकार त्रिविध दख । प्रसाद होणें हें अधीक । कैचा विवक धीटपाठया ॥ ७२ ॥ मनास येईल ते रचावें । धीटकवन ते म्हणावें । उचिष्ट काव्य जें करावें । तया नाव पाठ कविता ॥७३॥ असो प्रसादीकरण कांहीं । मदतैयाशी प्राप्त नाहीं । शरण सदा

श्रीगुरुपाईं । त्याचही सोई प्रसाद तया ॥ ७४ ॥ आनंदसुत महाराज । संतांमध्यें शोभाई साजे । ज्याचें वचन गरुडध्वजें । पाहुनी चोज करीतसे ॥ ७५ ॥ आनंदतनयाचे भाविकत्वन । पदें गातां जे कां पूर्ण । तयाजवळी नारायण । निरंतर जाण तिष्ठतसे ॥ ७६ ॥ जें जें ज्याचें काम । ते ते पुरवा सर्वोत्तम । आनंदसुतीं ज्याचें प्रेम । नाहीं जन्ममृत्यु तया ॥ ७७ ॥ पर ऐसा पदरीनाथें । दिधला आनंदतनयवचनातें । जगीं फाकली मात । वेता समस्त ऐकुनी ॥ ७८ ॥ पदरीसी मास च्यार । राहिले श्री आनंदकुमर । आज्ञापिती रुक्मिणीवर । जगदाधार करावया ॥ ७९ ॥ तीर्थनामें हिंडुनि जनांत । पुनीत करावे प्राणीयाते । वैकुंठ सोडुनी आलों येथें । कारणाने याचें पैं ॥ ८० ॥ तें व्रत तुझा सन्निविण । सिध्दीशी लावील कोण वा जाण । ऐसें बोलता कौसल्यानंदन । भरले नैन प्रेमाश्रु ॥ ८१ ॥ समचरणी ठेविता डोई । आलिंगन देतसे विठाबाई । संच्यार करीते जाले मही । ध्यान हृदई विठोबाचें ॥ ८२ ॥ अनेक देश फिरोन । प्रबोधीले बहुत जन । सांप्रदाय आपुला देऊन । केले निमग्न भगवत्पदीं ॥ ८३ ॥ रात्रदिवस भजनस्थीती । ठाईं ठाईं कीर्तन करीती । प्रगटाविली जेणें विरक्ति । लाविली भक्ति अज्ञान ॥ ८४ ॥ मूतमात्रीं देऊन अन्न । तोषविले अतिथी जाण । दया आंगीं विराजमान । साधु धन्य आनंदतनयें ॥ ८५ ॥ ब्रह्मांड घटीं न समाये कीर्ती । ज्ञानप्राचीस उगवला गभस्ती । काव्य तेज प्रकाश दीप्ति । प्राणी राहटतां निज आत्महिता ॥ ८६ ॥ आरतासी जातां निर्गुणाचला । गोड न वाटे श्रीविठ्ठला । म्हणती पुन्हा उदयो मला । होता जीवाला सुख द्यावे ॥ ८७ ॥ घेउनी देहाचें आणिक वस्त्र । काव्य करणें तुम्ही पवित्र । आवडे मजला बहु स्तोत्र । रुक्मीणीछत्र वदतसे पैं ॥ ८८ ॥ प्रेम ठेउनी श्रीहरी पाईं । विसर्जिली जडतनू म्हणी । निर्गुणरंगी राहुनी कांहीं । धरीली देही सगुणाकृति ॥ ८९ ॥ पूर्ववत् लक्षणें आंगीं सारीं । निस्पृह प्रेमा भक्ती अंतरीं । नामस्मरणीं निज वैखरी । रंगली खरी श्रीरामपदा ॥ ९० ॥

भावतपेश शूद्रवर्ण । वर्णितां ते चि नामाभिधान । सुमराव वदती तयालागुन । आनंदतनय अवतारा ॥ ९१ ॥ जन्म होतां सोळापुरा । सोहळा जाला तेथें बरा । भगवत्भूषणीं जो कां तुरा । अळंकारा संतमेळीं ॥ ९२ ॥ जनक जननी पुण्यराशी । वैष्णव जन्मले ज्याचे कुशी । ध्वज लाविला वंशासी । काय तयासी वर्णू मी ॥ ९३ ॥ पवित्र देश पावन कुळें । तीर्थमय ते चि स्थळ । वास करीती जेथें प्रमळ । पर्वकाळ तयेठाई ॥ ९४ ॥ आनंदतनयाचा तो अंश । सुमराव ह्मणती जन तयास । पंढरीहुनी सोळा कोस । नगर विशेष सोळापुर ते ॥ ९५ ॥ भागवतोत्तम तयेस्थानीं । धन्य जागा ते मेदिनीं । अखंड कीर्तन सोहंध्वनी । हरीभजनीं रत सारे ॥ ९६ ॥ योगवैभव सौंदर्य मूर्ति । उत्पन्न बाळ केवळ भक्ति । वैष्णवमेळी ते विभुती । प्रगटली जगती तारावया ॥ ९७ ॥ बाल्यदशेपासून । येकाग्रता हरीचें ध्यान । सविता आर्गी जेवि कीर्णे । तेवि लक्षणें मुळिचीं तीं ॥ ९८ ॥ प्रपंचमान कैचि रीती । निस्पृहता भरली वृत्ति । देहप्रारब्धा गाठ घालिती । आपण विचरती वेगळेपणें ॥ ९९ ॥ लौकिकाची नाहीं चाड । आत्मचिंतनीं मन गाढे । गृहस्थाश्रम करणें पडे । परी वोढ श्रीगुरुपाईं ॥ १०० ॥ सद्गुरुकृपा संपादून । आत्मानुभव जाला पूर्ण । सेवेमाजी सदा निमग्न । असोनी मन उन्मन ते ॥ १ ॥ ध्यान धारणा समाधी । सस्वरूपीं रमली बुध्दी । अष्टांगयोग लाधली सिध्दी । द्वैत-उपाधी कैचि त्या ॥ २ ॥ सुमरावयोगी पूर्ण जाणा । आवडे जया पंढरीराणा । तिष्ठे जवळी ज्याचे भजना । सहितललना रमेश तो ॥ ३ ॥ जे जे येती दर्शनासी । पूर्ण करावें मनोरथासी । अन्नदान दिवसनिशीं । क्षुधितासी तृप्त करणें ॥ ४ ॥ श्रुतिस्मृतींचा अर्थ । विच्यारीती कोणी पंडीत । संशय तयाचा दुरी करीत । नाना मतें करुनी ॥ ५ ॥ खळ चांडाळ असो प्राणी । विरक्ति उपजे पहातां नैनीं । पांडुरंग भजाया मनीं । तेचि क्षणीं प्रीती तया ॥ ६ ॥ सुमरावबावा ऐसे संत । आनंदतनयाचे अवतार

निश्चित । वास्तव्य त्याचें सोळापुराते । नित्य भोगीत समाधीसी ॥ ७ ॥ मानसचंद्राच्या पहातां कळा । वासनात्मक त्याहि सोळा । शहुनिया तये स्थळा । कळंक दवडीला विषयाचा ॥ ८ ॥ सांप्रदाई शिष्य बहुत । योगसाधनीं केले रत । तयामध्ये शास्त्री ह्मणवीत । नाम तयाते वासुदेव ॥ ९ ॥ अंतरबाह्य देव चि सारा । निश्चय जयाचा हा चि खरा । वासुदेव या विच्यारा । ह्मणती नरा तयाते ॥ ११० ॥ साधननिष्ठ तो सत्‌शिष्य । वास तयाचा पंढरीस । विराढ माघे बोवरीस । आचरती योगास श्रीजळीं ॥ ११ ॥ घेउनी शेवटीं चतुर्थाश्रम । पावले निर्गुण निजधाम । धन्य श्रीगुरु सुभराव परम । स्थापिला धर्म भक्तियोग ॥ १२ ॥ स्वरुपीं रमउनी अनेक प्राणी । रंगविले कीर्तनभजनीं । आपण निमग्न योगासनीं । ध्यानीं मनीं श्रीविठ्ठल ॥ १३ ॥ पांडुरंगीं निष्ठा फार । दर्शना जाणें वारंवार । कुळधर्म अवघा विच्यार । रुक्मीणीवर परमात्मा ॥ १४ ॥ रात्रंदिवस तो चि छंद । टाळमृदंग गाती प्रबंद । कीर्तन करणें स्वयें प्रसिद्ध । अर्थपूर्ण अध्यात्मिक ॥ १५ ॥ कीर्तनाशी उभे राहातां । श्रीराम गर्जोनी वाचे ह्मणतां । अर्ती होय विदेही अवस्था । तन्मयता वृत्तीस पै ॥ १६ ॥ मग जे निघती शब्द वदनीं । ब्रह्मस्थीती ते अवे वाणी । भक्ति वैराग्य उमटे ध्वनी । डोलती ज्ञानी श्रवण करीतां ॥ १७ ॥ समाधीसुख टाकुनी मुक्त । शुकादिक येती तेथें । धन्य सुभराव बावा सत् । आनंदसुत अवतार तो ॥ १८ ॥ राहिले कवन पुरश्चरण । आरंभिले प्रीतीकरून । पदरचना अनुष्ठान । भगवत्‌गुणवर्णन पै ॥ १९ ॥ भक्तिज्ञानवैराग्य । त्रिविधपदांत तो अन्वय । श्रवण करीती पंढरीराय । हृदय येकाग्र करुनी ॥ १२० ॥ नारदादिका स्वमुखें । सांगती श्रीवैकुंठनायका । सुभरावकवन अलौकिक । ऐकतां सुख मन होये ॥ २१ ॥ इयाप्रकारें मधुरवाणी । मोहित जाले रथांगपाणी । हिंडती मागें निशीदिनीं । आवडी मनीं साधूची ॥ २२ ॥ असो ऐसे सुभरावबावा । आनंदतनयचि अवतार बरवा । तारावया जडजीवा । कादीला ठेवा आत्मधनाचा ॥ २३ ॥ अज्ञानदरिद्र करीतां दुरी ।

स्वसुख दाटलें चराचरीं । आनंदल्या नरनारी । प्रेमें अंतरीं भक्तीचें ॥ २४ ॥ यानंतर पुढील अध्याई । कथा गोमटी अत्यंत पाही । मछींद्र गोरक्ष समर्थ साई । चरीत्र कांहीं वर्णू तें ॥ २५ ॥ वदविता स्वामी सिध्दनाथ । रामदास श्रीहनुमंत । राजारामी वरदहस्तें । केलें सनाथ कृपादृष्टी ॥ २६ ॥ जन्मांतर जाणुनी निश्चिती । लेखणी दिधली स्वयें हातीं । सन्मार्गग्रंथोक्ती । गुंफविती नीज लीळे ॥ २७ ॥ भक्तमंजीरी-मालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । आनंदतनय आख्यानातें । अध्याय शोभत शुभप्रद हा ॥१२८॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनुक्रमअध्याय ॥ ८६ ॥ समाप्त ॥

---

## अध्याय ८७

### — मच्छींद्र गोरक्ष —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरूसिध्द हनुमंता । मुख्य प्राणा आत्मया समर्था । चराचरी व्यापकता । दिसे पहातां परी पूर्ण ॥ १ ॥ पिंडब्रह्मांडीं वायुस्वरूपें । क्रीडा करीशी तूंचि अमूप । कार्य कारण ज्ञान दीप । आपीं आप परब्रह्म ॥ २ ॥ गणेशसरस्वतीनाम । अवतारादि नानाक्रम । हे तो लीळा सहजीधर्म । कल्पद्रुम श्रीमारुति ॥ ३ ॥ असो ऐसीया सिध्दमूर्ति । नमन माझे पुढतो पुढती । भक्तमंजीरी माळेप्रति । गुंफवी युक्ती प्रीतीवेळें ॥ ४ ॥ मागे सुंदर जाहलें कथन । आनंदतनयाचें चरीत्र पूर्ण । आतां मछींद्र गोरक्ष निधान । इछितो गुण वर्णावया ॥ ५ ॥ अनादि सिध्द महायोगी । शिवविष्णूचे अवतार जगीं । स्तवावया प्रेम आंगीं । वांछितो सलगी करावया ॥ ६ ॥ स्तव्य स्तवन तू चि येक । देहबुध्दीचा निरसी कळंक । विनविता ऐसें गुरुनायक । प्रघटले सुखें हृदयांतरी ॥ ७ ॥ बैसोनिया जिव्हाग्रीं । वदविती कथा ते चि बरी । जेणें पातक होये दुरी । समूळ वारी भयातें ॥ ८ ॥ दाशरथी श्रीरघुनंदन । तो चि

महाराज पंढरीराणा । तयाचें हृदय जो हनुमान । सद्गुरु जाण आमुचा पै ॥ ९ ॥ ते सज्जनगडनिवासी रामदास । पुन्हा होउनी श्रीसिद्धेश । तत्परेंनी निजशिष्य । सन्मार्गेस कराविती पै ॥ १० ॥ मछिंद्रगोरक्ष अढीत पदकें । सदाळमणी प्रकाशक । योगीतो वरा अलौकिक । रविकुळ टिळक पुजावया ॥ ११ ॥ मछिंद्र-नाथाचें जनन कैसें । जयाचा तो गोरक्षशिष्य । ऐका तयाचें जन्म कर्मास । येकाग्रमानस करुनी ॥ १२ ॥ कोणी येके समई ईश्वरगौरी । बैसली असतां समुद्रतीरीं । ब्रह्मस्थीती वदती वैखरी । येकांत अवसरी उभयतां ॥ १३ ॥ तो संवाद अति गुह्य । ब्रह्मादिक इछिती पाहे । तें स्वसुख वर्णूं काय । प्राप्त नोव्हे सामान्या ॥ १४ ॥ ऐसा प्रसंग अतिदुर्लभ । ब्रह्म उपदेश बोलती सांब । तो जाला तयाशी लाभ । सगर्भ मछींद्र त्या योगिया ॥ १५ ॥ ते कैसे जाले प्रकर्ण । श्रोते ऐका देउनी मन । गर्भदुख निवारे जेणें । तात्काळ होणे ब्रह्म स्वयें ॥ १६ ॥ सागरवेटांत प्रकृति पुरुष । येकांतीं बैसली पार्वतीमहेश । समाधी योग कथिता विशेष । जळांत असे मछी ते ॥ १७ ॥ आत्मानुभव ऐकतां सुण । गिरीज्या समाधीस्त जाली पूर्ण । हुंकार देतसे गर्भांतून । योगी जाण मछोदरीं ॥ १८ ॥ आश्चर्य मानिती सदाशिव । दुसरा जवळीं नसतां जीव । जळामध्यें पहातां भाव । जाणिले अपूर्व त्रिनेत्रें ॥ १९ ॥ मग अभय वचनें तया पुरुषा । बाहिर निघ ह्मणती योगेशा । शुकापरी जाली दशा । कैंचि निशा द्वैताची ॥ २० ॥ प्रसूत जाली मछी त्वरें । प्रसवली योगी दिगांबर । तेनीं दाटलें अंबर । लावण्य विचित्र तयाचें ॥ २१ ॥ तात्काळ तेणें येउनी शिघ्र । मस्तक ठेविता शिवपदावर । पोटाशीं धरिलें अपर्णावरें । कृपाकरें कुर्वाळिलें ॥ २२ ॥ मंत्रोपदेश करुनी कारणी । आत्मस्वरूप दाविलें नेनीं । ते स्वमुखे कोण वर्णी । थकली

जिवित्व जगीं दवडावया । शिवित्व सर्वी स्थापावया । आज्ञा करीती मच्छींद्रा तया । हिंडावया भूठाई ॥ २५ ॥ शिवपार्वतीचा उपदेश । अंतरमूत जो ब्रह्मरस । तयाची मूर्ती तो पुरुष । किती तयास वर्णावे ॥ २६ ॥ जे प्रत्यक्ष शिवावतार । मच्छींद्रनाथ साधु थोर । करावया जगदोद्धार । महीवर विचरती पैं ॥ २७ ॥ अनेक देश अनेक स्थानें । समुद्रवलयांकित पृथ्वी जाण । फिरती समर्थ योगी आपण । जन पावन करावया ॥ २८ ॥ सहज स्थीती भ्रमण करीत । आले येका नगरांत । आश्चर्य वर्तले असे तेथें । ऐका श्रोते ते सकळ ॥ २९ ॥ विग्रह पहातां मच्छिंद्रमूर्ती । लावण्यखाणी योगसंपत्ती । अलक्षामुद्रा अंगी विभूति । मस्तकी शोभती कुरळ केश ॥ ३० ॥ व्याघ्रतनयासारीखें ध्यान । अनुहातशींगी वाजवी पूर्ण । हाती फावडी प्रबोध जाण । विराजमान कान फाटे ॥ ३१ ॥ कोटी मदन ओवाळुनी । टाकावे मच्छींद्रनाथावरुनी । जगदोद्धारार्थ फिरती अवनी । उघडली खाणी चिद्रत्नाची ॥ ३२ ॥ सहजवृत्ति नगरात येका । भिक्षा मागत फिरती देखा । वाडा पाहुनी सुंदर निका । आला सवा योगाचा ॥ ३३ ॥ तव ती बाई घरांतून । आली सावकार पत्नी जाण । साधु पाहुनी केलें नमन । भिक्षा अर्पण करीतसे ॥ ३४ ॥ म्लान देखुनी मुखकमळ । विच्यारीती नाथ दयाळ । कया माई वदन सुकलें । सांगणें सकळ मजलागी ॥ ३५ ॥ तयें समई ती बाई । वंदन करुनी पुन्हा पाई । ह्मणे स्वामींचा सर्व कांहीं । आहे गृहीं द्रव्यादि ॥ ३६ ॥ दासदासी शिबिका लोक । अनकुल समग्र ऐश्वर्य चोख । परी हृदईं चिंता येक । निपुत्रिक व्यर्थ जिणें ॥ ३७ ॥ दौलतीस अधिकारी । कोणी नाहीं या संसारीं । ऐसें बोलतां बाई वैखरी । द्रवले अंतरीं मच्छींद्रनाथ ॥ ३८ ॥ भस्म काढुनी चिमटभर । झोळींतुनी दिधले स्वकरें । ह्मणती तुजला होईल कुमर । भक्षीता त्वरें निज आवडी ॥ ३९ ॥ आशीर्वाद ऐसा देउनी । निघुनी गेले चित्सुखदानी । इकडे कैसी जाली करणी । ते श्रवणीं ऐकिजे पैं ॥ ४० ॥ नाथजींचो प्रसाद विभुती । बाईनीं भक्षण करावी प्रीती । तो संशय आला चित्तीं ।

जाती सांगती शेजारीणींसी ॥ ४१ ॥ फळींतील मूर्ख स्त्रिया । करूं लागल्या वल्गना त्या । म्हणती गोसावीयाची चेंगाटविद्या । नेतील फुगरे करुनी ॥ ४२ ॥ ऐकुनी ऐसें शेणखाईंत । भस्म टाकीले त्वरीत । सावकारपत्नी दैवहत । संतवाक्याते अव्हेरीले ॥ ४३ ॥ गुरु आज्ञा उल्लंघीती । परबुध्दी जे ऐकती । ते तो नाडीले त्रिजगतीं । नाहीं गती तयासी ॥ ४४ ॥ असो होणारासारीखी बुध्दी । मछींद्रनाथ दयानिधी । संच्यार करीत पृथ्वीमधीं । आत्मस्थितीं व्यापासीं ॥ ४५ ॥ जो जो दृष्टीस पडे प्राणी । उध्दरीती त्या दर्शनीं । सकळ कामना पुरवोनी । आत्मसुखनीं नांदविती ॥ ४६ ॥ ऐशाप्रकारें द्वादशवर्षे । होती जाली त्या नेमास । पुन्हा आले सावकारगृहास । श्रीयोगेश मछींद्रनाथ ॥ ४७ ॥ भिक्षेची काखेसी झोळी । आदिनाथ वंदुनी दिधली आरोळी । तो गृहस्वामीण बाहिरली । भिक्षा घातली स्वामीते ॥ ४८ ॥ वदती नाथ उपलाहे । बेटा तेरा क्यों हाय । तव ती बाई सांगती पाहे । निपुत्रिक आहे नाथजी मी ॥ ४९ ॥ मछींद्रयोगी म्हणती तयेला । बारा वर्षांचा असावा पुत्रला । इतुकियामध्ये सावकार आला । विच्यारी मला वृत्तांत तो ॥ ५० ॥ नाथजी सांगती साकल्य । माईस तये स्मरण जालें । म्हणे मी भस्म टाकुनी दिधले । ते चि वेळे शेणगर्तेत ॥ ५१ ॥ मछींद्र तेव्हां आज्ञा करीती । ते जागा दाखवा निश्चिती । स्त्रीपुरुष दोघे पावोनि भीती । स्थळाप्रति दाविलें त्या ॥ ५२ ॥ माणसें लाउनी उकर्डा काढीतां । निघाला पुरुष त्यांतुनी तत्वता । मछींद्रचरणीं ठेविला माथा । वय पहाता द्वादशवर्षांचा ॥ ५३ ॥ जन सर्व करीती आश्चर्य । सावकारानें धरीले पाय । म्हणे नाथजी गुरुमाय । अनाथ आहे पुत्राविण ॥ ५४ ॥ सनाथ करुनी श्रीगुरुदेवा । येवढा मजला धावा । मछींद्र सांगती निर्दैवा । व्यर्थ हेवा करीसी तूं ॥ ५५ ॥ तये काळीं त्या धनिकानें । पदर पसरीला असे जाण । मस्तक न काढी पायावरुन । गळती नैनीं दुःखाश्रु ॥ ५६ ॥ मग नाथजीस आला कळवळा । म्हणती पुत्र होईल तुजला । खरे धरी या वचनाला । सोडी पाउला

जाऊ दे ॥ ५७ ॥ आनंद पाउनी तो द्विजवर । प्राप्त जाला इच्छितवर । सुखें करुनी ससार । लाधला थोर श्रीगुरुकृपा ॥ ५८ ॥ मछींद्रनार्थे गोरक्ष ऐसें । नाम ठेविलें त्या पुरुषास । करुनी तात्काळ उपदेश । केला योगेश निजभावर्दे ॥ ५९ ॥ गोवराखेत निपजला । गोरखनाम याचि बोला । स्वरुपीं पूर्ण योग जाला । धन्य लीळा साधूची ॥ ६० ॥ वैराग्याची केवळ मूर्ति । गोरक्षशिष्यें शोभे जगती । गुरुसेवा आरंभिली युक्ति । लाधली संपत्ती ज्ञानाची ॥ ६१ ॥ काणे येके प्रामीं भिक्षार्थे । गेले सहजी गोरक्षनाथ । वडे घातिले झोळींत । श्राद्ध होते तये गृहीं ॥ ६२ ॥ आणुनी मधुकरी श्रीगुरुते । अर्पण केली स्वहस्तें । वडे भक्षिता मछींद्रनाथ । नावाजीत सत्‌शिष्या ॥ ६३ ॥ ह्मणती मिष्ट वडा लागला । कोठोनी आणीलासी गोरक्षबाळा । ऐसे आणीजे भिक्षेला । रसनेला आवडते ॥ ६४ ॥ आवडला वडा सद्गुरुसी । ह्मणुनी गेले दुसरे दिवसी । त्याचि बाईचे घरासी । भिक्षेसी झोळी घेउनी ॥ ६५ ॥ वडे घाल ह्मणता । झिडकाविती गोरक्षनाथा । खळ घेउनी तेथे बैसतां दुरोक्ति सर्वथा बोलती ॥ ६६ ॥ जो पाहीलासी दृष्टीसी पदार्थ । पुन्हा जाहाला पुन्हा सक्त । आजी वडे नाहींत निश्चीत । ठेव डोळ्याते काढुनी ॥ ६७ ॥ ऐसे वदताचि ते माई । येथें उशीर कैचा काई । नेत्र काढी लवलाही । ठेविला ठाई तयेपुढें ॥ ६८ ॥ मग ती होउनी भयाभीत । वडे तात्काळ करुनी अर्पित । गुरुजवळी आले त्वरीत । गोरक्षनाथ लवलाही ॥ ६९ ॥ येकाक्ष पाहुनी सत्शिष्याला । मछींद्रनार्थे प्रश्न केला । वृत्तांत समुळी सांगितला । दिधला डोळा वड्याशी ह्मणुनी ॥७०॥ आश्चर्य मानुनी श्रीगुरुनी । विनोद केला सहजी वचनी । दुसरा नेत्र काढुनी । गुरुदक्षणा देशी तू ॥७१॥ आज्ञा होतां गोरक्षनार्थे । डोळा अर्पिला सद्गुरुतें । संतोष होता श्रीनार्थे । केले कृतार्थ निजलीळे ॥ ७२ ॥ नेत्रावरुनी हात फिरविता । दिव्यदृष्टी जाली तत्वता । अष्टमासिद्धी उभ्या पहातां । पदतळाया मोक्षलीळे ॥ ७३ ॥ धन्य सत्शीष्य सद्गुरू । चिद्गगनीचे अचळ धुरू । करावया जगदोद्धारू । हरी हर अवतरले

॥ ७४ ॥ गोरक्षासी पूर्णता देउनी । आपण फिरती स्वइछे जनीं । दक्षण समुद्रास जाउनी । रामेश्वर नैनी देखियेला ॥ ७५ ॥ सागर बेटांत मस्याळदेश । तेथें गेले मछिंद्र योगेश । ते लीळा ऐकतां विशेष । हरे निशेष भवबाधा ॥ ७६ ॥ स्त्रीराज्य तयेस्थानीं । स्त्रियाचि तेथें वसती जनीं । पुरुषाविण होती गर्भीणी । सुंदर पद्मीणी सान्या त्या ॥ ७७ ॥ ऋतुकाळीं सुःपकार होता । गर्भ राहावा तयासीं सर्वथा । पुरुष स्वप्नीं न मिळे पहातां । अवध्या तत्वता अबळा त्या ॥ ७८ ॥ ऐशा स्थळीं नाथजी जातां । पद्मीणींसी हर्ष चित्ता । ठेउनी घेतले मछींद्रनाथा । मोहित तत्वता करुनी ॥ ७९ ॥ स्त्रीसंगाची दुर्धरभ्राति । माहान श्रेष्ट मुळुनी जाती । इतराची कोण गती । न धरा स्फ़ीती कलिमाजीं ॥८०॥ जरी ब्रह्मध्यारी राहिला । तरी येवोन पुन्हा जन्मला । विषयाचा हेतु राहिला । म्हणुनी देहाला धरणें पै ॥ ८१ ॥ याचिसाठीं शहाणीये जीवें । गृहस्थाश्रमा स्वीकारावें । सद्गुरुते शरण जावें । आसक्त न व्हावें स्त्रीसुखा ॥ ८२ ॥ मनाची तळमळ काढून । स्वहित पाहावें आपुले जाण । तरीच सार्थक होये जिणें । नातरी शीण भवाची ॥ ८३ ॥ असो मछींद्रनाथ स्त्रिगणदीपात । राज्य करीती पद्मीणीसहित । इकडे गोरक्ष वियोगांत । अति दु:खीत चितातुर ॥ ८४ ॥ जाती गुरुभक्तां माजी मुगुटमणी । नाथ गोरक्ष पहाता मेदींनी । तयाशी उपमां नसे जनी । झुरतां मनीं भेटावया ॥ ८५ ॥ सद्गुरुचा शोध करीत । संचार करीती भूमंडळांत । पाहुनी वृक्ष अच्युत । खिन्नचित्तें बैसलेती ॥ ८६ ॥ तव तेथें अकस्मात । ग्यालंदराचे शिष्य समर्थ । आले महाराज कानिफ़नाथ ।

पहाता । जाहाला तल्लता तये ठाई ॥ ९० ॥ परस्परें आदेश होऊन । आम्रठायेसी बैसले जाण । संवाद करीती प्रीतीनें । तें वर्णन कोण करी ॥ ९१ ॥ जेथे श्रुति तन्मय जाहाल्या । जेवि समुद्रीं गंगा मिळाल्या । स्वरुपाकार होऊनी ठेल्या । वृत्ति रंगल्या चिदार्णवीं ॥९२॥ ते शब्द तरंगाकार । ब्रह्मानुभवें संवाद प्रखर । नये सांगता तो विच्यार । गुरुपुत्र जाणती पै ॥ ९३ ॥ ऐशाप्रकारें संवाद होता । क्षुधा लागली उभयता । वृक्षाकडे पाहू जातां । आंबे असती तया झाडा ॥ ९४ ॥ कानिफा बोलती गोरक्षाते । आंबे भक्षू तुह्मी आह्मी येथें । गोरख ह्मणती न पुरे हात । आंबे खालते पडताल कैसे ॥ ९५ ॥ कानिफनाथ वदती भ्राता । सिध्दी दाविती तुह्मां सर्वथा । आंब आंबे शब्द करीता । नवल तल्लता जाहले पै ॥ ९६ ॥ पक्क फळें तीं अच्युत वृक्षाचीं । खाली रिचवती खाली साचि । भक्षण करिता सरती कैचि । ढीग तैसाचि पडला पुढें ॥ ९७ ॥ कानिफासी गोरक्ष सांगत । फळें लावा जेथील तेथें । नाहीं ह्मणे हें सामर्थ्य । कानिफनाथ आपणाजवळी ॥ ९८ ॥ मग गोरक्षानी गुरुमाउली । अनन्य स्मरोनी हृद्कमळीं । अद्भुत सिध्दी प्रगट केली । फळें लाविली देठासी ॥९९॥ कानिफाचा गर्व हरता । सांगू लागला मछींद्रकथा । राज्य करीत आहेत आतां । स्त्रीराज्यांत विषयलोभी ॥ १०० ॥ गोरक्ष ऐकुनी उत्तर देत । तुह्मे गुरु उकरड्यांत । गौडबंगाळदेशात । टाकिले आढांत गोपीचंदें ॥ १ ॥ परस्परें गौण बोलतां । शोध लागला उभयता । हर्ष होउनी परम चित्त । सद्गदता मानसीं ॥ २ ॥ गाढ आलिंगन देउनी त्वरे । नमन करीती प्रेमभरें । गुरुशोध लागला निर्भरें । आनंद विचित्र जाला तो ॥ ३ ॥ सद्गुरुदर्शनार्थ । निघाले गोरक्ष कानिफनाथ । अटहास्यें भजन करीत । क्रमीती पंथ निजयुक्ति ॥ ४ ॥ पुढील अध्याई चमत्कार । भेटतील श्रीगुरू ज्वालेंधरमछींद्र । उचंबळेल बोधसमुद्र । मानसचंद्र उदय होतां ॥ ५ ॥ मेघ करविता सिध्दस्वामी । सदा प्रगटे राजारामीं । देहाभिमान दवडुनी उर्मी । सेवाधर्मी योजियेलें ॥ ६ ॥ तें दास्य संत-

भजन । अनंत जन्माचे लाधले पुण्य । संतमालिका गुंफोन । करीतो अर्पण निज आवडी ॥ ७ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । मछींद्रगोरक्ष आख्यानाते । अध्याय होत समाप्त हा ॥१०८॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अध्याय ॥ ८७ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पण-मस्तु ॥ शुभंभवतु ॥



## अध्याय ८८

### — मच्छींद्र गोरक्ष —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिध्दनरेंद्रा । वैष्णवाग्र्या महारुद्रा । स्वानुभवा रामचंद्रा । शोभे भद्रासन तुज ॥ १ ॥ चित्कळाशक्ति विराजमान । अनुहात चौवडा वाजे पूर्ण । मिरवती वारू अनेक जाण । स्वानंदवारण झुलती पै ॥ २ ॥ बंदीजन गर्जती च्यारी । विवेकप्रधान सदाच्यारी । इंद्रियगण सेना भारी । द्वैतवैरी निर्दाळिला ॥ ३ ॥ येकात्मचे सिंव्हासनी । सिध्दनाथ साजती धनी । च्यामरे वारीती साजणी । अठरापुराणी समासद ॥ ४ ॥ कर्पी तेचि अठरापद्मे । आठव राहो तत्पदी प्रेमे । अहंकार निवटिला अधम । स्वात्मधर्म राजनीती ॥ ५ ॥ तयाद्वारी मी याचक जाता । निवारीली तापत्रय चिंता । सततस्तवन आले हाता । दरिद्रता हरली पै ॥ ६ ॥ भक्तिसुख देऊन । केला रंक आपुल्यासमान । न घडे कदा उत्तीर्ण । वाग्सुमने अर्पितसे ॥७॥ मछींद्रगोरक्षाचे चरीत्रा । समर्पितो पद्मनेत्रा । ते ऐकता आनंद श्रोत्रा । स्वतंत्र पद पाविजे ॥ ८ ॥ मागील कथन कानिफगोरक्ष । सद्गुरूपदी ज्याचा लक्ष । शोध करीत अति दक्ष । हिंडती सकाक्ष होउनी ॥ ९ ॥ पुढे गुरुदर्शने कैसी जाली । तेचि लीला ऐका भली । बंगालदेशात स्वारी गेली । नाथमाळी ज्यालंदराची ॥ १० ॥ गोपीचंदास उध्दरीला । कानिफदर्शनी सुखावला । तो वृत्तांत सांगणे सगळा । मछिंद्रकथेला मग वदू ॥ ११ ॥ तरी ते

कैसें प्रकर्णे । ज्यालंदर करीता तीर्थाटण । उत्परीळे पातकी पूर्ण । प्राणी पावन जाळे बहु ॥ १२ ॥ गोपीचंदराजा राज्य करीत । गेळे तये नगरांत । भिक्षा करुनी राहिळे स्वस्थ । ज्यालंदरनाथ स्वईछे पै ॥ १३ ॥ कोणे दिवसीं मोळी आणावी । विकोन गरींबे जेववावी । नातरी झोळी फिरोनी बरवी । तृप्त करावी अन्नार्थी ॥ १४ ॥ अनेक प्रकारे वर्तणें । सित्धी आंगीं ज्याचे पूर्ण । कोणे येके दिनीं रानांतून । मोळी घेउनी येती पै ॥ १५ ॥ मस्तकापासुनी सवा हात । मोळी वरें असे शोभत । ग्रामांत येती ज्यालदरनाथ । ते पाहात राजमाता ॥ १६ ॥ मैनावती तिचें नाम । माडीवरी बैसळी होती नेमें । खिडकींतून देखता प्रेम । निष्ठा परम जहळी तये ॥ १७ ॥ नित्य घेउनी दर्शन । सेवा करीतसे जाण । गुरुकृपा व्हाहोनी पूर्ण । जाहळी तल्लीन सस्वरूपीं ॥ १८ ॥ भर्तारहीन तरूण सुदर । दास्य करी निरतर । लोकविरुध विष्यार । आळे कानावर राज्याचे ॥ १९ ॥ दुता सांगोन कुपोदकांत । टाकविळे ज्यालंदरनाथ । केरकचरा लीद बहुत । पुरळे निश्चीत घालुनी ॥ २० ॥ हे कोणासी ठाऊक नाहीं । राजाच मात्र जाणे हृदईं । दूत न सांगती कांहीं । विचित्र पाही वर्तळें तें ॥ २१ ॥ मैनावती ह्मणे मनांत । गेळे तीर्थासी ज्यालंदरनाथ । येकांतीं बैसे ध्यान करीत । लाउनी सतत समाधी ॥ २२ ॥ तो चमत्कार तेथें जाला । राजा बैसला स्नानाला । बारा सहस्र राण्या ज्याला । सहस्र सोळा उपछाया ॥ २३ ॥ स्वरूप विषईं ऐशापरी । नसे उपमा सृष्टीवरी । गोब्राह्मण पाळन करी । प्रजा सारी सुखी ते ॥ २४ ॥ त्रिलोकचंदाचा तो पुत्र । राज्यनीती सकळ पवित्र । परी घडळे येक विचित्र । तेणें पात्र सकळ व्हाया ॥ २५ ॥ *असो पतितपावन साधु समर्थ । योगमूर्ति ज्यालंदरनाथ । ते चि करतीळ पुनीत । ते सार्थत ऐकिजे पै ॥ २६ ॥* गोपीचंद बैसळे चौरंगावरी । लावण्य तयाचें अत्यंत भारी । वाद्यें वाजती परोपरी । लाविती सुंदरी उटणें तें ॥ २७ ॥ मैनावती याची माता । माडीवरी बैसळी होती तत्वता । खाली तयेनें पाहू जाता ।

दुःख चिंता बहु वाटते ॥ २८ ॥ भर्तारासारीखा पुतळा। फार जयाची लावण्यकळा। तो जळोनी गेला। तैसे चि याला होईल कीं ॥ २९ ॥ येउनी ऐसें मनांत। नेत्राशी आले अश्रुपात। अंगावरी पडले समस्त। जाला विस्मीत नृपवर तो ॥ ३० ॥ ह्मणे नसतां घनपडळ। बिंदु कोठून अंगावरी पडले। न्याहाळितां वरते मुखकमळ। नेत्र सजळ मातेचे ॥ ३१ ॥ मग कैचें कारणें स्नान। मातृभक्त राजा पूर्ण। गोपीचंद माडीवर जाऊन। केले नमन जननीते ॥ ३२ ॥ ह्मगे मजसारीखा असतां सुत। तुजला दुःख जाहाले किमर्थ। स्त्रिया माझ्या फार आहेत। बोलली अयुक्त कोणती पै ॥ ३३ ॥ की सेवकांनीं आज्ञा मोडली। पारपत्य करीन यावेळीं। मग सारीन आंघोळी। सांग माउली कैसें तें ॥ ३४ ॥ मैनावती ह्मणे कुमारा। माझ्या पाडसा सकुमारा। तुजसारीखा राजा बरा। लावण्य तुरा होता पै ॥ ३५ ॥ तुझ्याप्रमाणें भव्यत्व की रे। जळोनी जाली राख निर्धार। तैसेचि जाईल हें शरीर। ह्मणोनी घोर दुःख वाटतें ॥ ३६ ॥ गोपीचंद ह्मणे मातेस। उपाय कोणता सांगा यास। ते चि करीन या समयास। कदा वचनास न मोडी मी ॥ ३७ ॥ तव ती वदे अरे बाळा। सद्गुरु सान्हुल्या स्नेहाळा। ज्यालंदरनाथ नाथ असतां भला। अमर तुजला करीतां पै ॥ ३८ ॥ कोठें गेला तीर्थाटणा। योगीयाचा जो कां राणा। कृपादृष्टी पहातां नैना। सकळ कल्याणा पात्र होसी ॥ ३९ ॥ ऐसें सुचवितां मैनावती। राजा खिन्न जाला चित्तीं। अंतरीं पावोन परम प्रीती। मातेप्रति निवेदितसे ॥ ४० ॥ जाले कृत्य साफल्य। तें

॥ ४४ ॥ बळकट धरीता दोनी पाय । मग कैचा त्याशी अपाय । सांगे भूपाशी त्या उपाय । अगाध आहे लीला ती ॥ ४५ ॥ त्यारी पुतळे करविले । लोखंड ताम्राचे ते भले । तृतीय रौप्य ते हि जाले । सुवर्ण सगळे देहरूप ॥ ४६ ॥ अभय देउनी राजीयाते । संगे घेतले कानिफनाथें । आले उकरड्याजवळ त्वरीत । भजन करीत श्रीगुरूचें ॥ ४७ ॥ केरकचरादीक सारी । काढविली सेवकाकरीं । सद्गुरु पाहाता आसनावरी । निवांत अतरीं बैसलेती ॥ ४८ ॥ मस्तकापासुनी केरकचरा । सवा हात वरता सारा । आसनाखाली राहणे निरा । योगीश्वरा जालंदर तो ॥ ४९ ॥ पंचभूतातीत स्वरूप । निर्गुणनिर्धर्मे आपींआप । तेथें कैचा दृश्य आरोप । शेष थापे ते वर्णिता ॥ ५० ॥ ऐसा समर्थ ज्यालंदर । तयाचा शिष्य कानिफ निर्धार । गोपीचंद जवळी नृपवर । करीत गजर भजनाचा ॥५१॥ अटहास्य करुनी शब्द । आदेश केला गुरुते प्रसीध्द । जालंदर वदती कोण तू सिध्द । सांगणे प्रसीध्द त्वमलाही ॥५२॥ कानिफ ह्मणे शिष्य आपुला । गोपीचंद आहे जवळा । ऐकुनी ऐसें स्वामीला । कोप आला तत्क्षणीं ॥ ५३ ॥ तेरेसात जो का हाय । तेरी काया कानिफा खाक हो जाय । लोखंडपुतळा जळाला पाहे । पाहात आहे सकळ जन ॥ ५४ ॥ मग दुसरी त्याची मूर्ति । गोपीचंदाची जे आकृती । कानिफनाथ पुढे करीती । हाक फोडिती आदेश करुनी ॥५५॥ पूर्ववत ज्यालंदरनाथ । तेरेसात कोण ह्मणत । कानिफ सांगे गोपीचंद असत । क्रोधें वदत नाथ आंतुनी ॥ ५६ ॥ खाक होजाय शब्द निघता । राजप्रतिमा जळाली तात्वता । ऐसे पुतळे त्यारी पाहाता । दग्ध सर्वथा जाले ते ॥ ५७ ॥ याच वेळेसी गोपीचंद । उभा केला पुढे प्रसिध्द । भय पावता कानिफासिध । सांगती शुध्द राज्याते ॥ ५८ ॥ आता स्वामीचा कोप गेला । भीऊ नको गोपीचंदबाळा । मैनावती पहाती डोळा । स्त्रिया सकळ्या जवळी त्या ॥ ५९ ॥ नगरस्थजन देखती विष्पार । उभा राहिला राजेंद्र । थरथरा कांपे शरीर । धरीले स्वकरें कानिफें त्या ॥ ६० ॥ आदेश वंदुनी उंचस्वरें । घातिला

सारंग नमस्कार । तेव्हां विच्यारीती जाल्दर । सात तेरे कौन है ॥ ६१ ॥ सांत मेरे गोपीचद । निवेदिता ऐसें शुर । कृपेने द्रवले आत्मविद । बोलती छदें शिष्यासी ॥ ६२ ॥ अजुनी आहे कायरे राज्या । अमर हो जाय तेरे काया । आशीर्वाद जाला तया । गोपीचद राया तत्क्षणीं ॥ ६३ ॥ मग ते स्वसुख वर्णील कोण । ध्यारी वाचेसी पडले मौन । जाहाले चतुष्टयदेहनिर्सन । लागली घन समाधी ॥ ६४ ॥ पचम अवस्था प्रासून । राजा अमर जाला जाण । जन्ममृत्यूचा घोट भरून । पातला पूर्ण आत्मदशा ॥ ६५ ॥ ज्यालंदरनाथ निघाले बाहेर । मगळवाद्यें वाजती तुरे । वाटिली नगरांत साखर । पुज्या थोर आरंभिली ॥ ६६ ॥ तये पुजेचा विच्यार लिहीता । विस्तार होईल फार ग्रथा । राजोपच्यार अनेक पाहातां । सत्शीष्य तत्वता राजा तो ॥ ६७ ॥ जालें पूर्ण दिव्य वैराग्य । पायावरी घालिता कानिके सांग । सकळराज्याचा करुनी त्याग । सोडिला सग स्त्रीयाचा त्या ॥ ६८ ॥ मानुनी विषय वमनापरी । हाती घेतली जेणें किंगरी । भिक्षा मागता स्वनगरीं । नरनारी विस्मय करीती ॥ ६९ ॥ द्वादशवर्षे गुरुसगे । कमाविला पूर्ण योग । पुन्हा येउनी नि सग । राज्य सांग केलें पै ॥७०॥ मग स्वपुत्र बैसउनी आसनीं । उत्तरपथा गेले निघोनी सवालाखपर्वती जाउनी । आत्मचिंतनीं निमग्न ते ॥ ७१ ॥ अद्यापि तेथें गोपीचंद । योगासनी आहेत सिध्द । भाविका दर्शन देती प्रसिध्द । वर्णितां शुध्द वैखरी ते ॥ ७२ ॥ आतां गोरक्षासी मर्छींद्रभेटी । कैसी जाली ते ऐकिजे गोष्टी । जेणे स्वानदघनाची वृष्टी । पडे मिठी परब्रह्मीं ॥ ७३ ॥ कानिफमुखें गोरक्षानीं । मर्छींद्रवार्ता ऐकोनी । स्त्रीराज्यांत चालिले निघुनी । तव स्थानोस्थानीं चौक्या त्या ॥ ७४ ॥ अठरावर्णे असो ज्ञाति । परवानगी नाहीं पुरुषाप्रति । गोरक्ष येईल याचि अर्थी । बंदोबस्त युक्ती केलावे ॥ ७५ ॥ येकदोनवेळा फिरोन गेले । उपाय कांहीं तेथें न चले । नाथगोरक्ष सकटीं पडले । मन वचले गुरुदर्शनीं ॥७६॥ तव अकस्मात गणीका तेथें । आली परीवारासहित । मग आनदले

नाथ चिवें। स्त्रीराज्यांत जातसे ॥७७॥ कव्वातिनीबरोबर। निघाले गुरु-दर्शना योगेश्वर । मृदंग वाजविती सुंदर । निघाले अंतर वेश्येचें ॥७८॥ पखवाजी आपुला म्हणून । संगे घेतला गोरक्ष जाण । सींगणदीपांत गेली घेऊन । पात्रा पूर्ण गुणवती ॥ ७९ ॥ मुख्य पद्मिणी सकळ वृत्तांत । ठेउनी घेनले गणिकेते । कचेरी करुनी त्वरीत । गायन नृत्य कारविले ॥ ८० ॥ मछींद्रमहाराज पट्टासनी । मेनीनाथ सुपुत्र जनीं । सभेसी आल्या बहु कामिनी । नर्तन यामिनी होतसे ते ॥ ८१ ॥ परोपरी व्याळ प्रबंद । नाना धाव्या मुद्रा प्रसिध्द । गायन होतसे विषद । दाटला आनंद सभेसी त्या ॥ ८२ ॥ तव पखवाज्यातून शब्द सुस्वर । निघता जाला अतिगमीर । पात्रा नाचे थरथरथरथर । चलो मछींद्र गोरख आया ॥ ८३ ॥ पद्मिणीसी सुचविती साग । गोरक्ष आला येथें कोंगे । आता तुटला तुझा संग । गुरुभक्त अभ्यंग आहे तो ॥ ८४ ॥ गायन समाप्त कारऊन । पाव्यारीता गोरक्षा जाण । साष्टांग करुनी नमन । धरीले चरण श्रीगुरुचें ॥ ८५ ॥ मग तो प्रेमा काय वदावा । विष्णु भेटले सदाशिवा । कीं मारुति श्रीराघवा । समग बरवा तैसा तो ॥ ८६ ॥ घळघळा नेत्री अश्रू वाहाती । आलिंगन जाले उभयतांप्रति । गुरुमाता वदिर्ले प्रीती । नाही चिची द्वैतभाव ॥८७॥ काहींदिवस राहुनी तेथें । प्रार्थिला स्वामी श्रीमछींद्रनाथ । चलावे म्हणता स्वदेशाते । परीक्षिती शिष्याते स्वलीले ॥ ८८ ॥ गोरक्षजी तूं शिण-लासी । ब्रह्मचर्य आजवरासी । करुनी देतो स्त्री तुजसी । ऐश्वर्यासी भोगी बापा ॥८९॥ विज्ञप्ती करी गोरक्षी तेंव्हा । हे बरें नव्हे गुरुदेवा । ताराव्या जडजीवा । सदाशिवा अवतार तुझा ॥९०॥ हास्य करुनी श्रीनाथ । जाणिले शिष्यें मनोगत । काढिले सहजी युक्ताते । निघावया तेथुनी पैं ॥ ९१ ॥ मेनिनाथा धुवावया । आज्ञापिले गोरक्षा तया । तेथें आपटुनी धुतली काया । सुकावया चर्म टाकिले ॥ ९२ ॥ मेनी तेन्हा न पडता दृष्टी । पद्मीण घाबरी जाली पोटीं । हुडकी ग्राम बाजार हाटीं । न पडे दृष्टी कोठेचि तो ॥ ९३ ॥ गोरखीसी त्या विध्यार्थीता । सांगोतली समूळ

कथा । आहे प्रमाण पुराणी सर्वथा । घरवर्ती वाळू घातला ॥ ९४ ॥ मग तो अनर्थ शोक स्त्रियांचा । अर्थी न करवे वर्णन वाच्या । गुरु गोरक्ष वदती आमुचा । सांडिता साचा सर्जीव करीन ॥ ९५ ॥ पवोणी ह्मणे या वेळा । आतांच गुरुशिष्य तुह्मी चला । परी मेनीनाथ बाबा मला । धरी वचनाला गोरक्ष तो ॥ ९६ ॥ अष्टमासीं त्यापासी । गुरुभक्त तेजोराशी । आय ह्मणता मेनीनाथासी । उशीर तयाशी काय मग ॥ ९७ ॥ शतसंख्या मेनीनाथ । उभे राहिले पुढें निश्चित । आश्चर्य करीती पवोणी समस्त । मछींद्रनाथ चाकाटले ॥९८॥ नवल पाहुनी सत्शिष्यासी । पोटाशीं धरीती कृपाराशी । मेनीनाथ ठेवला येक सर्वाशी । अदृश्यासी करविले पै ॥ ९९ ॥ अनसरी त्या नितता नाथ । पवोणी जोडीती सकळ हात । गोकुळा-तुनी जातां श्रीकांत । तैसा वृत्तांत जाहाला पै ॥ १०० ॥ उभवे त्याशी प्रबोधीले । गोरक्ष तेथें समाधान केले । गुरुशिष्य तेथुनी निघाले । झोळींत घातले सुवर्ण पै ॥ १ ॥ ते गोरखोसी नाहीं विदीत । पाहिले होते मछींद्रनार्थे । मार्गी चालतां प्रश्न करीत । डर येथे आहे का ॥ २ ॥ गोरक्ष ह्मणती डर ता काय । झोळी जड लागताहे । स्वामींसी न कळता उघडाहे । काढुनी हेमा टाकिले ॥ ३ ॥ वाही मार्ग क्रमुनी जाता । विच्यारीतां गोरक्षनाथा । डर येथे आहे आतां । देश पहाता फाटक दीसे ॥ ४ ॥ गोरखी वदती नाथजीला । डर तो पिछे मार्गे राहिला । चापचिती झोळीला । तो सुवर्णाश न देखती ॥ ५ ॥ वृध्यापकाळी काय खावे । रागे शिष्यासी मरती स्वभावे । गोरक्षे नमुनी गुरुदेव । योग वैभव दाविलसे ॥ ६ ॥ श्रीगंगेचे उत्तरेस । चद्रावती नगर असे । उर्फ भाइमड बिल्से । केले निर्दोष कनक ते ॥ ७ ॥ कांचनपर्वत ह्मणती जन । मछिंद्रनाथे पहाता नैनें । पोटाशी धरीले आनदानें । प्रेमे करून सत्शिष्य ॥ ८ ॥ पूर्णता जाणून योगाची । हर्षमळी गुरुनाथ साचि । आवडवळा गोरक्षाची । घेतली नेमाचा श्रीनार्थे ॥ ९ ॥ असो ऐसा

अनेक लीळा । मती न पुरे त्याहावयाळा । हरीहर अवतार घेतला । तारावयाला जन सारे ॥ ११० ॥ पदेसंख्या बहुत करुनी । प्रगटविले वैराग्य जनीं । हटदीपिका ग्रंथ रचुनी । केले प्राणी योगारूढ ॥ ११ ॥ नाना काव्य पदरचना । जेणे प्रबोध होये मना । ऐसे प्रबंध विचित्र जाणा । पहातां मना सुख होये ॥ १२ ॥ अनेक तीर्थे गुरुशिष्ये । करीते जाले उभययोगेश । शेवटीं येउनी पंढरीस । स्थीर मानस पै जाहाले ॥ १३ ॥ मछींद्रगोरक्ष भेटतां योगी । प्रेमभरते पांडुरंगी । येकात्मता मुळिची अंगीं । आत्मरंगी देवभक्त ॥ १४ ॥ सूक्ष्मसंवाद अलक्ष मुद्रा । बोलती हरी गोरक्षमछींद्रा । ते काय फळे इतर क्षुद्रा । ज्ञानसमुद्रा नमन तया ॥ १५ ॥ योगरथीती कीर्तनरंगे । तोषविला रमारंग । धन्य मछींद्रगोरक्ष अभंग । तोडीला वियोग जीवशिवाचा ॥ १६ ॥ योगसाम्राज्यदिवाळी । सकळप्राणिया भूतळी । हृदयमाया दवडुनी मुळी । दृष्टी न्याहाळी परब्रह्म ॥१७॥ सद्गुरूसिध्द कृपाराशी । कथन करविले चारित्रासी । मछींद्रगोरक्ष तत्वविलासी । नमन तयासी पुनःपुन्हा ॥ १८ ॥ पुढील कथा मनोहर । यादवराजसाधूचें आख्यान सुंदर । वदविता स्वये श्रीरघुवीर । श्रोतीं सादर ऐकिजे पै ॥ १९ ॥ राजारामीं पंढरीनिवास । स्वतसिध्द हृदई प्रगटलासे । कारणकार्य मर्कलीळेसे । कथवी निःशेष शेषशाई ॥ १२० ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । मछींद्रगोरक्ष आख्यानाते । जाले समाप्त दोन अध्याई ॥ १२१ ॥ अध्याय ॥ २ ॥ येकूणसंख्या ॥ २२९ ॥ समाप्त ॥ अनु० अ० ॥ ८८ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

## अध्याय ८९

### — यादवेंद्रसंत —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिध्दसागरा ।

स्वरूपोदकाचा नाहीं पार । भक्तिज्ञानवैराग्यजळचर । क्रीडती साचार अनेक पैं ॥ १ ॥ प्रेमरसाचा पयाब्धी । विवेकवटवृक्ष तयामधी । अनुभवलोचन आत्मसिद्धी । पत्रशुद्धी तूर्या ते ॥ २ ॥ बाळमुकुंद तेथें पाहीं । शेष निर्गुण विळसे ठाईं । पंचभूतें कोचि काई । निःशब्द ठाईं परीपूर्ण ॥ ३ ॥ ते निःशब्द आनंदगाभा । विटेवरी सदा उभा । चराचरीं तेणें शोभा । फाकली प्रभा सर्वत्र ते ॥ ४ ॥ दाशरथी रविकुळमंडण । पंढरपुरीं श्रीचिद्घन । सन्मालिका तया करून । करी अर्पण श्रीगुरुकृपें ॥ ५ ॥ श्रीपराशर महान्‌ऋषी । तृतीयभागवत आत्मविलासी । अवतरले नारायण जया कुशी । निश्चयेंशी व्यासरूपें ॥ ६ ॥ संतमंडळींत तेणें स्वामी । अवतरण केलें ईहि भूमी । ते कथा ऐका तुम्ही । स्वात्मधर्मी मेळवी जीवा ॥ ७ ॥ पराशर म्हणिजे परेचा शर । नामीपासुनी जो उद्गार । पश्यंतीसी येउनी स्वरें । मध्यमा सत्वर उच्चेचिली ॥ ८ ॥ वैखरी ते दुर्गंधा । तीच फेकी तेथें सुगंधा । जळचरी ढीमरी ते प्रसिद्धा । देवता शुद्ध वरुण तो ॥ ९ ॥ गंगेत तये ती सत्यवती । असत्य न वदे कदा निश्चिती । परेचा शर तिजप्रति । झगटला प्रीति जोन्हेसी ते ॥ १० ॥ तो पराशरमहाराज पूर्ण योगी । सत्यवतीसी नित्य भोगी । शब्दव्यास उत्पन्न जगीं । अनुभव आंगी पाहतां तो ॥११॥ शब्दापासुनी ग्रंथ निर्माण । वेदशास्त्रें सकळ जाण । व्यासोच्छिष्ट सर्व म्हणून । सांगती जन तत्वनिष्ट ॥ १२ ॥ परी हे नेणते कवणा इतरा । गुरुपुत्र जाणती विच्यारा । सद्गुरूचे पाय धरा । पराशरा ओळखीजे ॥ १३ ॥ घरोघरीं वाचिती ग्रंथ । येकमेका सांगती अर्थ । विसरुनी गेले आत्महित । दवडिले व्यर्थ आयुष्यासी ॥ १४ ॥ असो ऐसा सर्वांभूतीं । व्यापिला पराशर त्रिजगतीं । तेणें अवतार धरीला क्षीती । ते कथनोक्ति वर्णिजेल ॥ १५ ॥ निर्गुण निर्विकार । परब्रह्म साचार । तेंचि होउनी साकार । विटेवर तिष्टतसे ॥ १६ ॥ धन्य क्षेत्र ते श्रीपंढरी । विठ्ठल उभा भीमातीरीं । भेटावया त्या प्रेम अंतरीं । जन्मली खरी साधुवृंदे ॥ १७ ॥ जाणुनी हे चि

पराशरमुनि । देह धरीला प्राकृतजनीं । परेपासुनी शब्द करणी । कुंडल भूपणीं तें ग्राम ॥ १८ ॥ कृष्णेपासुनी दोन कोस । तेथें कुंडलनगरी विशेष । माहात्म तेयील बहुत असे । अन्य ग्रंथास वर्णियेलें ॥ १९ ॥ ऋग्वेदी ब्राह्मण कुळकर्णी । भाव तयाचा पाहुनी । उदरीं आले पराशरमुनि । सुकृतखाणी धन्य ते ॥ २० ॥ यादवेंद्र ठेविलें नाम । पार्थें कारण जाणीजे नेम । यादवेंद्र हरी तैसे कर्म । व्यभिच्यार धर्म नातळे अंगा ॥ २१ ॥ दिवसो दिवस वैराग्य जगीं । स्वयंप्रकाश आत्मसंगी । ज्ञान तैसें पहातां जगीं । नेणती अभागी जीव तया ॥२२॥ भजन पूजन वेदाभ्यास । ही तो स्थीती मुळिची असे । पुत्र येक होता निजतपास । गेले योगेश निघोनी ॥२३॥ ते स्थान कोणते ह्मणाल । समुद्रेश्वर वदती सकळ । कुंडलराज्याचे प्रांजळ । शरीर सोज्वळ जाले ते ॥२४॥ ते स्थळ परम चोखट । सर्व ऋषींचे वसते पीठ । तीर्थ महिमा वरीष्ट । नांदे श्रेष्ट गिरीजापति ॥ २५ ॥ ऐशी जागा पाहुनी बरवी । गेले तेथे यादवगोसावी । तपश्चर्या आरंभिली बरवी । लीळालाघवी योगी तो ॥ २६ ॥ गलितपत्रे भक्षून । वरी करावे उदकपान । रात्रंदिवस भगवत्ध्यान । नाहीं भान देहाचें ॥ २७ ॥ तीन तपे छत्तीस वर्षे । आराधिला जगन्निवास । मग निघाले पंढरीस । पराशर योगेश यादवेंद्र ते ॥२८॥ शुचिर्भूत येकाग्रता । भजन करीत क्रमिती पंथा । तपो तेज सुंदर पहाता । निजध्यास तो पांडुरंगीं ॥ २९ ॥ जो जो जवळी पंढरी दिसत । तो तो आनंद वोसंडत । प्रेमाश्रू नेत्रीं गळत । नृत्य करी अति हर्षे ॥ ३० ॥ इकडे देवासी जाली त्वरा । ह्मणे भेटेन केव्हां पराशरा । संगे घेउनी वैष्णव भारा । आला सामोरा श्रीघननीळ ॥ ३१ ॥ यादवेंद्रा त्या धरीले करें । आलिंगन जाहले परस्परें । आले राउळांत शारंगधर । गजर थोर होतसे पै ॥ ३२ ॥ देवभक्त बोलती गोष्टी । ते सुख नेणे परमेष्टी । संतमंडळी जाली दाटी । धुरजेटी आदिकरुनी ॥ ३३ ॥ भजनकडाका लागली घाई । रंगशिळेवरी नाचे पाही । विटेवरी श्रीविठाबाई । देहावरी नाहीं यादवसंत ॥ ३४ ॥

विदेहस्थीतीनें मेधीर्ली दृष्टी । ताटस्ता भजनी गोमटी । परब्रह्मीं पडली मिठी । होतसे दृष्टी प्रेमाचीं ॥ ३५ ॥ मग सावरोनी आनंदभरतें । पुजीला यादवें रुक्मणिकांत । चवथे प्रहरी कीर्तनातें । वाळवटात ठाकले उमे ॥ ३६ ॥ ते यशुराल कोण वर्णी । पराशर अवतार जाला मेदिनी । भक्तिसुख भोगावया जनी । प्रेमखाणी उघडली ते ॥ ३७ ॥ च्यातुर्मास्य राहुनी पढरी । तोषविला रावणारी । भ्रमण कराया पृथ्वीवरी । सांगती हरी साधु ते ॥ ३८ ॥ भगवान ह्मणती यादवेंद्रा । श्रीपराशरअवतारा । भक्तिमार्ग स्थापोनी धरा । उपदेश करा प्राण्याते ॥ ३९ ॥ कलीमध्यें घरोघरीं । वेदांत बोलती नरनारी । भूतदया नाहीं अंतरीं । मधुकरी न घालिती ॥ ४० ॥ अन्नदान जनीं राहिले । ह्मणुनी पोट भरीले मी कारकमळें । क्षुधा लागली मज प्रबळ । सुचविले जगत्रया ॥ ४१ ॥ परी न जाणती हें वर्म कोण्ही । ऐसे सांगता चक्रपाणी । यादव नेत्रासी आले पाणी । समजले मनीं भगवद्भक्त ॥ ४२ ॥ क्षेत्र जे का पराशर । तेथें आले पराशरअवतार । नाम जयाचें यादवेंद्र । केला विच्यार तो ऐका ॥ ४३ ॥ पनाळागड ह्मणती प्राकृत । देशपांडे तेथील गृहस्थ । उपदेश केला तया त्वरीत । भेटले तेथें आपदेव ॥ ४४ ॥ तो सुकृती जन्मांतरीचा । स्वशिष्य जाणुनी आपुला साचा । दीक्षा देउनी तयाचा । काढीला मनाचा मळ सकळ ॥ ४५ ॥ आपरूपी आपदेव । दाखविता सर्वी सर्व । श्रीगुरुपदीं जडला भाव । नाहीं वाव द्वैतासी ॥४६॥ यादवेंद्र तया आज्ञा करीती । करावया अन्नशांती । ब्राह्मणादि भक्ते ज्ञाती । दिवाराती सर्वकाळ ॥४७॥ झोळीकाठी देऊन । मस्तकीं ठेविला पद्मकर जाण । करविती सदा अन्नदान । क्षेत्र पावन पराशर ते ॥४८॥ अहोरात्र जेथें पगती । पाकशाळेंत श्रीभगवती । अन्नपूर्णा स्वये जगती । तेथें किती जेवतील ॥ ४९ ॥ अन्नसत्र तें सतत । अद्यापी आहे चालत । सर्वाभूतीं पंढरीनाथ । करीतो तृप्त पनाळ्यासी ॥ ५० ॥ सांप्रदाई शिष्य यादवस्वामींचे । मत हे भि निरंतर जयाचें । जे येतील

कोणी स्नाने । अतिथ्य नेमाचे करीती पै ॥ ५१ ॥ पराशरक्षेत्रीं ब्राह्मणभोजन । रात्रंदिवस होतसे यज्ञ । यज्ञभोक्ता पंढरीरमण । तेणेंकरून संतुष्ट तो ॥ ५२ ॥ ऐसे समर्थ पराशरऋषी । यादवेंद्ररूपें पनाळपाशी । आस्तव्य केलें पुण्यभूमीसी । पुनीत जगासी करीती पै ॥ ५३ ॥ अष्टतीर्थें मुख्य तेथे । अष्टमासिद्धी वसती तेथें । अष्टधाप्रकृती निवारण होत । दर्शनी अगणित पुण्यराशी ॥ ५४ ॥ पराशरक्षेत्री अष्टांग योग । साधीले यादव निजअंगें । अष्टवस्तु जेथें सांग । नसे व्यंग काहींची ॥ ५५ ॥ अष्टौ भाव तये स्थानीं । प्राप्त होती आस्तिका जनीं । आठवा अवतार ध्यातां मनीं । पवित्र प्राणी सहजी ते ॥ ५६ ॥ देवकीच्या गर्भ आठवा । हृदयांतरी त्या साठवा । भवार्णव तेणें आटवा । मन ठेवा भगवत्पदीं ॥ ५७ ॥ असो अष्टतीर्थें पनाळपाशी । पराशर-क्षेत्र ते संतमिराशी । पराशरगुल्हा स्थानाशी । करीती ऋषि पराशर वास ॥ ५८ ॥ ते स्थळ रमणीय आपुलें । यादवें जाणुनी शांतीकारीलें । निज आवडीनें आसन घातिलें । समाधिस्थ बैसले पै ॥ ५९ ॥ ते लीळा कौतुकी वर्णीली । धन्य अवतार गुरुमाउली । जगदोध्दारार्थ प्रकट जाली । स्थीरावली पराशरगुल्हे ॥ ६० ॥ काहीं दिवस बाहेर निघोन । अश्वत्थाखाली बैसले जाण । दर्शना पातले ब्राह्मण । आदिकरोन आपदेव शिष्य ॥ ६१ ॥ चिमाबाई स्त्री तयाची । गुरुपदीं निष्ठा फार तयेची । मर्जी पाहून यादवेंद्रस्वामीची । विज्ञाप्ति साचि करीतसे ॥ ६२ ॥ म्हणे स्वामी श्रीगुरुराया । हेतु माझा एक हृदया । सेवन करावे तुम्ही पया । विनवणी पाया सद्भावेंसी ती ॥ ६३ ॥ दीनवदने भाकीता करुणा । कृपेने द्रवला सद्गुरुराणा । करीते जाले दुग्धपाना । धन्य ललना सुंदरी ती ॥ ६४ ॥ बारावर्षें परीयंत । दुग्ध पिती यादवसंत । चिमाबाईची सेवा बहुत । केले सनाथ तिजलागी ॥ ६५ ॥ तीर्थे सकळ फिरोन । उध्दरीले प्राणी जाण । ठाईं ठाईं अन्नदान । ब्राह्मणभोजन करविती पै ॥ ६६ ॥ उपनाम गुळवणी द्विजोत्तम । आपदेव वंश अमळ परम । तेणें वाढविला अन्नधर्म ।

जाला धाम कीर्तीशी ॥ ६७ ॥ करवीरक्षेत्रस्थ नृपति । ज्याचे औदार्य दिव्यसंपचि । गांव तेणें अर्पिले प्रीती । संस्थानाप्रति स्वामीच्या ॥ ६८ ॥ सखारामबावा मोठा सावडा । सद्गुरुगुळवणी तो निधडा । बांधोनी जेणें थोरला वाडा । करी प्रौढा अन्नदान ॥ ६९ ॥ भक्तपरीक्षा करावी म्हणून । देवें दुष्काळ पाडिला जाण । मिळेना जेव्हां कवणा अन्न । येती धाऊन पनाळ्याशी ॥ ७० ॥ भिकारमणंग अनेक ज्ञाती । पराशरक्षेत्री नित्य पंगती । अष्टौप्रहर नाहीं गणती । आश्चर्य करीती श्रीमगवान ॥ ७१ ॥ धन्य ते यादवसांप्रदाई । अन्नदान करीती पाही । मुक्तिद्वार सर्वदा हि । कवणा नाही आडकाठी ॥ ७२ ॥ तीर्थयासी रोगी प्राणी । तेथें रहाता नाही अडचणी । देउनी तया औषधपाणी । प्रीतीकरूनी सेवा करीती ॥७३॥ असो ऐसा सांप्रदाय । पनाळ्यागडाशी चालताहे । यादवेंद्रसत गुरुमाये । अवतार होये पराशराचा ॥ ७४ ॥ परेहुनी जे का पर । पराशरमुनि तो निर्धार । करावया दीनोधार । यादवेंद्रनाम धरीयेले ॥ ७५ ॥ यादवेंद्र हरी श्रीकृष्ण । पराशरऋषी भागवत पूर्ण । उभयतासी नाहीं भिन्न । अभेदपणें देवभक्त ॥ ७६ ॥ म्हणुनी नाम तें चि तया । पराशर भागवत तृतीया । त्रिगुणातीत करावया । धरीली काया भूमंडळी ॥ ७७ ॥ जग सर्वत्र लाउनी भजनी । अन्नदान उमविले जनीं । मिळोनी गेले चिद्गगनीं । ते करणी अगाध पै ॥ ७८ ॥ कीर्तन भजन नित्य जेथें । ब्राह्मण जेविती असंख्यात । कोणे येके दिनीं आलें मनातें । जड देहातें विसर्जन करावया ॥ ७९ ॥ सांप्रदाई जना सागून । घातिलें जेणें योगासन । म्हणती आज्ञा करणें प्रयाण । सावधान असा तुम्ही ॥ ८० ॥ निर्याण कळता वैष्णव सारे । आत्मनिष्ट मिळाले अपार । रात्रंदिवस कीर्तन गजर । पूजनप्रकार अनेकरीती ॥ ८१ ॥ मग तो सोहळा अर्चनाचा । ग्रथीं न करवे लेखन साचा । मेळा मिळाला संताचा । पढरीचा देव आदिकरुनी ॥८२॥ नारद तुंबर गायन करीती । सुरवर पातले सर्वत्र जगती । स्वर्गीहुनी सुमनें वर्षती । अत्म ज्योती लीन होती

॥ ८३ ॥ दशवेद्वारीं सहस्त्र दळ । प्राण तेथे आकर्षिले । यादवसंत मिळोनी गेले । ब्रह्म निर्मळ स्वामार्जी ॥ ८४ ॥ माघमास कृष्णदशमी । कृष्णरूप जाले यादवेंद्रस्वामी । पराशरक्षेत्र पनाळाभूमी । उत्छाहा नेहमी जेथें सदा ॥ ८५ ॥ वृंदावन स्यावेंनी तेथें बरवे । दर्शना येती जीव सर्व । तयाचा तो निर्से भव । जडला भाव श्रीगुरुपदीं ॥ ८६ ॥ नित्यनेम प्रदक्षणा । करीतां तया वृंदावना । सकळ पुरवी मन कामना । योगीराणा यादवेंद्र ॥ ८७ ॥ भूतपिशाच समंध । गती घेती तेथें प्रसिध्य । कुष्ठादिरोग तेथे विविध । पळती निश्चिय दुष्ट विकृती ॥ ८८ ॥ उत्छाहा होतसे पुण्यतिथी । अन्नदान सर्वांभूती । असंख्य यात्रा जेथें मिळती । कीर्तन करीती ठाई ठाई ॥ ८९ ॥ पंढरीसारीखे अतिदृढ । चमत्कार होती निज प्रौढ । धन्य पराशर पनाळगड । संतासी आवडे तें जागा ॥ ९० ॥ जेथें संत तेथें हरी । हे तो उघड ग्रंथांतरीं । याळागी द्वैत टाकुनी दुरीं । धरा अंतरीं श्रीचरण ॥ ९१ ॥ सद्गुरु सित्य पदारविंद । तेथे जाहाली वृत्ति मिलिंद । राजारामी रमवी शुध्य । वदवी छंद संत चरीत्रें ॥ ९२ ॥ यादवस्वामीची अनंतलीला । यथामती प्रताप वर्णिला । भक्तमाळिके मणी योविला । अवतार भला पराशर तो ॥ ९३ ॥ पुढे अवधान द्यावे श्रोती । अजगरबाबाची वर्णूं स्थींती । श्रोतावक्ता श्रीरघुपति । चेतवी स्फूर्ति ज्याचा तो ॥ ९४ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । जाहाला अध्याय समाप्त । यादवेंद्र संतचरीत्रासी ॥ ९५ ॥ अध्याय ॥ १ ॥ समास ॥ अनुक्रम अध्याय ॥ ८९ ॥ समास ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

---

## अध्याय ९०

### — अजगर रायाजी —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरू स्वतसिध्दा ।

आदिविष्णु आत्मयाशुधा । मूळमाया लक्ष्मीसिंधा । वैकुंठप्रसिध्या देहरूपी ॥ १ ॥ विवेकविच्यार द्वारपाळ । जयविजय तें चि प्रबळे । प्रल्हादें प्रबोद संबळे । नाभीकमळ सामाजी ॥ २ ॥ तेतीसकोटी-देवगणे । सकळ शरीरीं वसते जाण । विस्तार करीतां तयाचा पूर्ण । होईल प्रकर्ण ते चि सारे ॥ ३ ॥ अंतरबाह्य येक हरी । द्वैतपणा समूळ हरी । काय वदूं ते वेखरी । स्वसुख लहरी स्वानंद ॥ ४ ॥ धन्य धन्य तो श्रीपाउले । माझें मीपण दुरी केलें । विभक्तपण दवडुनी भले । मेळविले मक्तीसी ॥ ५ ॥ ती भक्ती येकात्मता । मूर्तमात्री भरली संचा । वंदन तया सद्गुरुनाथा । रुक्मीणीकांता पंढरीशा ॥ ६ ॥ भक्तमंजीरी तव प्रसादें । गुंफीतसे मतिमंद । अर्पावया तुज छंद । वोव्या प्रबंद निज आवडी ॥ ७ ॥ ग्रहण करणें हे पुजा । विनवणी माझी अधोक्षजा । ठाकलासी भक्तकाजा । उमा सहजा समचरणीं ॥ ८ ॥ ऋषभदेव आत्मनिष्ट । सकळसंतामाजी वरीष्ट । जयाची स्थीती परम श्रेष्ट । वर्णिली स्पष्ट श्रीभागवती ॥ ९ ॥ तयाचा कळीत अवतार जाला । तये कथेची मंजीरीमाळा । अजगरसाधु मणी शीमळा । ते चि लीळा कथन करूं ॥ १० ॥ गौडब्राह्मण सुकृति वैभव । जाणुनी तयाचा पुण्यभाव । पोटासी आले ऋषभदेव । आंगीं स्वभाव कीरमस्थीति ॥ ११ ॥ उपजत अजगरदृत्ति । कोणी न जांणे तयाप्रति । अवघे जन धिकारीती । मायबाप करीती कंटाळा ॥ १२ ॥ व्रतबंध होता चि उदासीन । परमहंसदीक्षा घेतली जाण । सेविले जाले कदाकानन । देती दर्शन दत्तात्रया ॥ १३ ॥ मग तेथें सांगणें काय । कायाच जाली अकाय । ते अनुभव बोलतां नये । मनाचे होये उन्मन पै ॥ १४ ॥ अजगरासारिखे लक्षण । ते चि पडले नामाभिधान । अलक्षमुद्रा परीपूर्ण । जन विजन नाहीं तया ॥ १५ ॥ परापेक्षा स्नान भोजन । इंद्रियक्रिया जे वर्तणें । तेथें स्वयें नाहीं करणें । अलिप्तपणें तो योगी ॥ १६ ॥ देहप्रारब्ध घालुनी गांठ । आपण वेगळे महानिष्ट । स्वईछे वर्तती चोखट । नाहीं खटपट मन

दुजी ॥ १७ ॥ निर्विकार बाह्यदेशा । तैसे करणें अजगरयोगेशा । उरलीच नाहीं द्वैतनिशा । काय आशा वर्णू मी ॥ १८ ॥ कोणी नेसवो उत्तमवस्त्रें । घालोत अंगा अलंकार । कोणी फेडुनी घेता चिरे । सारखा विच्यार दोहींचा ॥ १९ ॥ जेऊं घातल्या जेवावे । उदक पाजील्या प्राशन करावें । नातरी तैसें चि राहावें । विशादगौरव नाहीं मनीं ॥ २० ॥ भूमीवरी शरीर पडे । किंवा मंचकी करीती आरूढ । दोहींचा सारीखा पवाड । नाहीं चाड कवणाची ॥ २१ ॥ ऐसे महाराज अजगरबावा । सुखधनाचा निज ठेवा । ऋषभदेवाचा अवतार बरवा । भाव ठेवा तयापदीं ॥ २२ ॥ उत्तरदेशीं वैष्णवमूर्ति । उद्धवळीसे तेते जगतीं । नाशीकक्षेत्रासी यावया युक्ति । जाली कोण गती ते ऐका ॥२३॥ शिंदे आणि होळकर । विठलशिवदेव नारोशंकर । राजेबहादुर विंचुरकर । गेले सरदार बहुत तिकडे ॥ २४ ॥ हत्तीघोडे सैन्य भारी । हिंडता तया देशांतरीं । अजगरमूर्ति पाहिली बरी । गजावरी बैसविला ॥ २५ ॥ विंचुरकर याणी आणुनी देशीं । स्वगृहीं ठेविलो आनंदेसी । सेवा करीती दिवानिशी । सुकृतराशी धन्य ते ॥ २६ ॥ विदेहस्थीती योगीराणा । स्वदेश तयासी सर्वत्र जाणा । निरंतर मुद्रा ज्याचे नैना । अजगरपणा शोभे तो ॥ २७ ॥ कोणे येके दिनीं शर्करा म्हणून । मीठ घालिता भक्षीती पूर्ण । रजना आणि रसन्य । रस अभिन्न येकात्मता ॥ २८ ॥ विरोनी गेली सकळत्रिपुटी । ब्रह्मोदकी आनंदवृष्टी नये बोलता ते गोष्टी । पडता मिठी आप आपणा ॥ २९ ॥ असो ऐसे योगीराव । नाशीकक्षेत्रासी आले स्वभावें । अजगरवृत्तीचे निज-वैभव । येती जीव दर्शनाते ॥ ३० ॥ मेवामिठाई अनेक फळें । नैवेद्य अर्पुनी अन्नें सोज्वळ । वस्त्रप्रावर्णे निर्मळ । लेववितो बळें स्वामीते ॥ ३१ ॥ ते कोण तयाचे सामाळी । जेथील तेथे राहाती स्थळीं पर्जन्यशीतउन्हाळी । त्रिकाळी दिगंबर ॥ ३२ ॥ जवळ धुणी करीता कोणी । हात अग्नीत पडला जाउनी । अजगरबावाची अवस्था उन्मनी पाहिले नैनीं विप्रांनीं ॥ ३३ ॥ मग तो येकीकडे काढीला कर । औषधे

जोविली सत्वर । ऐसे महाराजस्वामी अजगर । जाहाला अवतार ऋषभदेवाचा ॥ ३४ ॥ या नांव निर्विकल्प । समाधीचें प्रत्यक्ष स्वरूप। नातरी मिथ्या वाग्जल्प । संतरूप धरीती जगीं ॥ ३५ ॥ शब्दव्युत्पत्यर्थे-बळेकरून । उपदेशीती बावळी जन । विषयभोगीं रातलें मन । नाहीं चिंतन स्वरूपाचें ॥ ३६ ॥ जयाशी जाली गुरुकृपा । तया येथें मार्ग सोपा । येरा चवऱ्याशीच्या खेपा । देता घापा जन्म घेता ॥ ३७ ॥ मुक्तपणाचें नोव्हे सोंग । असावा अंगीं अनुभव चांग। निर्विकल्पसमाधी-योग । पांडुरंगकृपेनें ॥ ३८ ॥ जोवरी न सरे देहबुध्दी । तववरी कर्म करावे त्रिशुध्दी । मायाब्रह्म ळखुनी संधी । आत्मसिध्दी पावावी ॥३९॥ तेथे बध्द ना मुक्त । अंतरबाह्य आपण विलसत । ऐसा स्वामी सद्गुरुनाथ । अजगरसंत या कळयुगीं ॥ ४० ॥ कोणे येके दिनीं ज्ञानतमारी । बैसले असतां गंगातीरीं । उदक चढतां नदीशीं भारी । नरनारी पळती पै ॥ ४१ ॥ अजगरबावासी उठा ह्मणतो । कोण त्याचे ऐके तत्वता । सदा सर्वदा तादात्म्यता । ताटस्तता परिपूर्ण ॥ ४२ ॥ आंगावर चढतां नीर । वाहात चालीलें शरीर । उड्या टाकोनी सत्वर । काढीले बाहेर द्विजेंद्रें ॥ ४३ ॥ आश्चर्य जनीं मानून । करीते जाहालें सकळ नमन। उदक यावयाचे चुकवोन । केले स्थान तयाशी ॥ ४४ ॥ भक्तीसी लागले ब्रह्मवृंद । दर्शना पातले आत्मविद । गोपिकाबाईपैशवी प्रसिध्द । तयेनें शुध्द बगला बांधविला ॥ ४५ ॥ सेवेशी योजिला शूद्रज्ञाती । पुण्यसामोग्री तयाची पुरती । म्हणुनी दास्यभाग्यसंपत्ति । लागले हातीं तयाचे ॥ ४६ ॥ निरंतर तो सेवेशी उभा । पात्र जाला ज्ञानगर्भा । मिळे नित्य ब्राह्मणसभा । अद्भुत शोभा संतजागाची ॥ ४७ ॥ इकडे पंढरीनाथासी चैन न पडे । मेळविले गोपाळ सवगडे । भजन करीत वाडेकोडे । येतो निघडे नाशीकासी ॥ ४८ ॥ रुक्मीणीसहित मुरारी । जनस्थानासी पातले हरी । काय बोलूं ते वैखरी । मिळाली सारी साधुवृंदें ॥ ४९ ॥ अनोपम्य तो आनंद । अजगरबावासी भेटले मुकुंद । बोलत गुह्य संवाद । ऐकती वृध्द व्यासादि ॥ ५० ॥ सनकसनंदन-

नारदशुक । बोलती अध्यात्म निजकौतुक । ते काय वदूं ग्रंथीं सुखें । पडेले ठक वाचेसी ॥ ५१ ॥ ऋषभदेव पंढरीराव । नाहीं तयासी द्वैतभाव । परी भक्तिप्रिय वासुदेव । दाविले भाव खळीळें ॥ ५२ ॥ धन्य अजगर संतमूर्ति । ऋषभदेवाचा अवतार जगतीं । वश केला रमापति । राहिला संगतीं निरंतर ॥ ५३ ॥ अजगरस्वामीस नवस करीती । ते ते तयाची कामना पुरती । मेवेमिठाईशर्करा वाटीती । जेववीती ब्राह्मणादिकां ॥ ५४ ॥ नानाप्रकारार्ची वस्त्रें वहनें । अनेक पदार्थ करीती अर्पण । पुजाविधी अनुष्ठान । होतसे जाण तदेस्थानीं ॥ ५५ ॥ अशक्तासी दूर पंढरी । तयासी तेथें करावा वारी । स्वयें सांगती कंसारी । निजवैखरी पांडुरंग ॥ ५६ ॥ अजगरस्वामी योगीराणा । निस्पृहाचा तुरा जाणा । मिळोनी गेला ब्रह्मभुवना । जमनस्थाना नाशीकातें ॥ ५७ ॥ कीर्तनभजन नित्य धुमाळी । देवें पंढरी दुजी केली । गुरुमाय अवतरली । भूतळीं ऋषभदेव ॥ ५८ ॥ सेवटी ठेविला तेथें चि देह । धन्य भुमीका ते पाहे । पुण्यतिथी होत आहे । दर्वी धावे तत्दर्शनीं ॥ ५९ ॥ लिंगस्थान तये जागीं । करविले स्वयें पांडुरंगीं । अपारयात्रा भरती जगीं । कीर्तनरंगीं चमत्कार ॥ ६० ॥ देहविसर्जना अंतीं । भाविकासी दर्शनें होतीं । अजगरबाबा श्रीविमुती । वर्णितां मति न पुरे तया ॥ ६१ ॥ समुद्राशी अर्घ्य देणें । तें चि उदक घेऊन । * । ॥ ६२ ॥ आतां चोखामेळा भागवत । आत्मवेत्ता परम भक्त । वर्णिले तया पूर्वी संतें । गाईली मात तुकोबादिकीं ॥ ६३ ॥ तयाचा अवतार पुन्हा जाहाला । ऐकावी ती पोतीये लिळा । सेणे करुनी श्रीविठ्ठला । आवडे भला तो प्राणी ॥ ६४ ॥ पूर्वील कथासंकेत । बिगार आली चोखोबांत । देहासी प्रारब्ध भोगवीत । न टळे सत्य कवणासी ॥ ६५ ॥ मंगळवेढ्यामाझारी । यवन असे अधिकारी । बांधीती बुरुज निर्धारी ।

---

* मुळांत च कोरी जागा आहे.

घरीले बिगारी गांवोगांवींचे ॥ ६६ ॥ चळशाटणी तये दिवशीं । आली सहजी चोख्याशी । लाविले धरुनी कामासी । देती चिखलाशी पाथ्या भरुनी ॥ ६७ ॥ येकायेकी बुरुज तेव्हा । ढासळला असे जेव्हां । संव्हार जाला बहुत जीवा । खेद सर्वांलागी तो ॥६८॥ तेथें चोखामेळा दडपला । देहभोग जगा दाविला । साधुछळ यवनाला । दोष घडला असे पै ॥ ६९ ॥ स्त्रियेसी तयाचे रक्तपिती । कुष्ट भरला सत्वरगती । उपाय करीतां नव्हे मुक्ति । दुष्ट विष्कृति बाधा ते ॥ ७० ॥ ब्राह्मणासी बहुपिडीले । अग्रहाराशी जप्त केलें । रात्रौ तया स्वप्न जाहालें । द्विज छळिले म्हणुनी ॥ ७१ ॥ उगाळुनी लावितां चोख्याचें हाड । रक्तपिती जाईल कोड । विच्यारीं पडता अविंध मूढ । सुचविले उघड ते काळीं ॥ ७२ ॥ अस्ती उचलोनिया जाण । लावितां श्रवणा लागून । ज्यामाजीं ध्वनी राम पूर्ण । ते जाण चोख्याचें हाड ॥ ७३ ॥ ही खूण प्राप्त होतां । आनंद जाहाला यवन चित्ता । अस्तीते उगाळुनी लावितां । आरोग्यता जाली पै ॥ ७४ ॥ धन्य ते साधु जीवनन्मुक्त । अस्ती जयाच्या स्मरण करीत । मेले असतां परी जीवंत । येरी व्यर्थ येउनी जन्मा ॥ ७५ ॥ वाचे कदा न म्हणे हरी । तो जिता चि प्रेत निर्धारीं । उत्तम वर्णे असला जरीं । धिःकारी भागवत तया ॥ ७६ ॥ गीतेमाजी व्यासवचन । असो भक्त तो नीच वर्ण । भगवंती जो अनन्यशरण । तो चि मान्य हरीप्रिय ॥ ७७ ॥ असो अभक्ताचें जिणें । धिग धिग ते लाजीरवाणें । चोखामेळा वैष्णव पूर्ण । करीती स्मरण अस्ती ज्याच्या ॥ ७८ ॥ यवनस्त्रीयेशीं गुण आला । रक्तकुष्ट तात्काळ गेला । काय करावें सकळ अस्तींला । विच्यार पडला सर्वांशीं ॥ ७९ ॥ भगवान सांगती नामिका । प्रेमळनिष्ट तया देखा । बहु आवडता माझा चोखा । जीवींचा सखा भागवत तो ॥ ८० ॥ तयाच्या अस्ती पंढरीसी आणून । समाधी रचावी सन्मुख पूर्ण । ऐसे सुचवितां जगजीवन । भक्तजन आनंदले ॥ ८१ ॥ नामदेवाचे पाहीरीपाशीं । केले चोखाचे समाधीशी । पुढे कथा

वर्तली कैशी । ते हि मानसीं श्रवण करा ॥ ८२ ॥ संताचिये द्रोहे-करून । उन्मत्त योनी पावला यवन । हस्ती होउनी फिरे जाण । मस्त धारण तो उपद्रव करी ॥ ८३ ॥ शांतिचे ते पल्लव बोलिले । आपणाकरीता वाया गेले । तयाशी पाहिजे आधी तारीले । हेचि भले साधुव्रत ॥ ८४ ॥ याजलागी चोखा स्वइच्छेतींत । अवतरोनी गज्या त्या केले मुक्त । यशनाक तया जग ह्मणत । येशांकित देह ज्याचें ॥८५॥ देहयोगे बिगार ध्यावी । परईछे टाकीत असावी । अलिप्तपणें जेवि रवि । वर्तणे सर्वी सहजस्थितीं ॥ ८६ ॥ आपण कवणा न करावे । आश्चर्य मानितसे जीवें । चच ऐसे संज्ञे करावें । पाहाता वरवें जगाकडे ॥ ८७ ॥ पळलवनिमीष्याते । काल आहे सदा ग्रासीत । जन गुंतले प्रपंच्यांत । कळवळत जेणें पै ॥ ८८ ॥ उन्मतगज तो तळेगांवीं । तेणें माणसें मारावीं । देखिला येशनाकी माहानुभवी । करपल्लवीं धरी तो ॥८९॥ उपदेश करीता तात्काळ । नम्र होउनी पाईं लोळे । दामाज्याशी नवल वाटले । ठेउनी घेतले येशनाका ॥९०॥ रतीब चारीतेवेळेशी । चग-लुनी ठेवी रोटाशी । जैसे पक्षी स्वपिल्याशी । देती चाऱ्याशी आणुनी ॥९१॥ तेवि येशनाकगुरुते । गजराज तो सेवा करीत । जगीं प्रघट होता मात । समाधीस्थ भक्तराज ॥ ९२ ॥ देउनी गजासी त्या मुक्ती । आणीक देह दुजा धरीती । ते कारण ऐका श्रोतीं । संशय चित्तीं न धरीतां ॥ ९३ ॥ यवनाश्रियेचें भोगणें कर्म । निवारीले वैष्णवें परम । आंगीकारीला पाहिजे धर्म । हे वर्म सकळ शास्त्रीं ॥ ९४ ॥ होमद्रव्य अग्नींत पडतां । जाळुनी सारणे अग्नीसी तत्वता । कीं दुर्गंधी-जळ घेउनी सरीता । जाय सर्वथा समुद्राशी ॥ ९५ ॥ तैसे चोख्यासी येथें घडलें । च्याधीसी मुक्ति देणें पडलें । लोकारीतीं आंगीकारीले । भोगुनी सांडीले स्वदेहीं ॥ ९६ ॥ ते अद्भुत ऐकतां गोष्टी । चोखा जाला शूद्र शेवटीं । मोळी घेउनी भूवैकुंठीं । जातसे भेटी श्रीहरींच्या ॥ ९७ ॥ मिरजप्रांतीं इरळींत । देह धरीला भगवद्भक्तें । रायजी तया जन वदत । कदम सत्य उपनाम तया ॥ ९८ ॥ पाटीलकीची वृत्ती ।

परी निस्पृह त्याचीं वृत्ती । चित्त रंगलें श्रीभगवंतीं । दृढ भक्ति उपासना ।। ९९ ।। बाळपणींचें देवार्चन । पांचवें वर्षी करी भजन । नदींतील गोटे आणून । करणें पूजन तयाचें ।। १०० ।। ती पिशवी घेउनी हातीं । खेळ खेळे मुलाप्रति । सात दिवस उपवास पडती । न सापडती पिशवी हारपली ।। १ ।। निश्चय जाणुनी देवराणा । चराचरीं तो चि जाणा । दगडगोट लक्ष्मीरमणा । होउनी दर्शना देणें पै ।।२।। मग सातवे दिवसीं । भजन करी प्रेमविलासी । भक्तिप्रिय हृषिकेशी । स्वदासीं जवळी सदा ।। ३ ।। भजनकीर्तननामनिष्ठ । आषाढी-कार्तिकीचा पाठ । ऋणी केला श्रीवैकुंठ । ध्याननिष्ट हृदई सदा ते ।।४।। मर्जीस्तव वडीलांचें । काम करणें पाटीलकीचें । तेथें दुर्जनें छळीलें साचें । मिरजे ठाणें दाविलें ।। ५ ।। पांच शत रुपये द्यावे म्हणती । रायजीस प्रभु मारविती । ते काय साहील रमापति । प्रगटली मूर्ति तात्काळ ।। ६ ।। जैसे पूर्वी चोखोबासी । रक्षीले बांधिता जोनिषी । धरीले आंगे शीवालेशी । पढरीसी श्रीविठले ।। ७ ।। तैसें येथें मिरजेप्रती । नवल जाले ऐकिजे श्रोतीं । रायाजीस उभे करीती । जेरबंद मारीती आगावर ।। ८ ।। तो चाबुक वरता चि हात । मिरजकर तो आश्चर्य मानित । मग घातिले खोलींत । आपाढी ते जवळ आली ।। ९ ।। चैन न पडे इंदिरावरा । स्वभक्तासी नेले पढरपुरा । कल्याकुलूपें तैसीं द्वारा । करुणासागरा किती वानूं ।। ११० ।। रायाजीनें तये वेळा । ससार अवघा लुटवीला । पढरीचा मार्ग धरीला । वळावला पश्चाताप ।। ११ ।। सद्गुरूसी जाउनी शरण । आत्मानुभव घेतला पूर्ण । विदेहस्थिती वेधलें मन । सदा निमग्न विठलपदीं ।।१२।। तव भागवतें रोग कुष्ठाचा । दवडिला जो यवनस्त्रियांचा । उभा राहिला पुढें साचा । आंगीकार तयाचा करणें पै ।। १३ ।। जन्मांतरस्वभावें करून । मोळी घ्यावी मस्तकीं पूर्ण । पंढरीसी ती नेऊन । विकावी रायाजीनें ।। १४ ।। द्रव्य येईल ते घ्यावें । श्रीविठ्ठलीं अर्चन करावें । प्रतिमासीं वारीसी जावें । अनुष्ठान धरावें हे चि पै ।। १५ ।। भगवान

म्हणती माझीया चोख्या । रायाजी तूं प्राणसख्या । माव्यसन आगराख्या । रोगराख्या नको शिणूं ॥ १६ ॥ काष्टे विकुनी सांगोल्यात । येत जाई पंढरीत । आज्ञा करीतां वैकुंठनाथ । तैसें वर्ते रायाजी ॥ १७ ॥ घारूबाई सांगोल्याची । ती शिष्यीण जन्मांतरीची । मोळी घ्यावी तिणें साचि । प्रेमळाचो प्रेमकळा ॥ १८ ॥ ऐसें करीतां आराधन । चमत्कार जाला पूर्ण । ते भावें करीतां श्रवण । जाय पळून रोगबाधा ॥ १९ ॥ सुपीढाळचे रानांत । रायाजीबावा आले संत । मोळी टेकउनी झाडाते । बैसले ध्यानस्थ हरिचिंतनीं ॥ १२० ॥ ममधर्मीचे घरीचे । कुतरे आले तेथें साचे । चाटीले आंग रायाजीचें । आरोग्य तेंव्हाच जाले पै ॥ २१ ॥ देहावरी येता सहजस्थीती । रायाजीबावा आश्चर्य करीती गुप्त होता श्वानाकृती । करुणा भाकिती सप्रेम ॥ २२ ॥ देव भक्ताचा अंकिला । तात्काळ तेथें प्रगट जाहाला । आलिंगन दिधले रायाजीला । पोटाशीं धरीला कवळोनी ॥ २३ ॥ अद्यापी तेथें पादुका आहेत । दर्शनें जन उद्धरीत । चोखोबाचा अवतार सत्य । मोळी नेत पंढरीसी ॥२४॥ सांप्रदाई वंशीक । नेम चालविती तो चि देख । सखा ज्याचा रमानायक । सुखदुःख कैचें तया ॥ २५ ॥ द्वंदातीत भक्तराव । दाविली जगी भक्तिभाव । समचरणी घेउनी ठाव । देहभाव समर्पिला ॥ २६ ॥ रायाजीबावा संत चोखा । पंढरीसी वाडा देखा । स्मरणें चि करी जीवा चोखा । जवळ नेटका मुख्य प्राणाचे ॥ २७ ॥ प्रदक्षणेचे वाटेवरी । राहाती निरंतर वारकरी । चरीत्र गाती हे वैखरी । कृपा करी पांडुरंग ॥ २८ ॥ पुढे धनंजय त्रिंबकळीला । अर्पण करूं श्रीविठ्ठला । श्रोतावक्ता स्वयें जाला । रमेश मला जगदात्मा ॥ २९ ॥ स्वतसिद्ध हृदई वसोन । निजभक्ताचे वर्णवी गुण । राजारामीं रंगलें मन । ग्रंथ लेखन होतसे पै ॥ १३० ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । अजगररायाजी आख्यानाते । अध्याय समाप्त परीपूर्ण हा ॥ १३१ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अ० ॥ ९० ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय ९१

### — धनंजय त्रिंबक चरित्र —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिंधु कृष्णा । तुझीये दर्शनीं पुरे तृष्णा । तापत्रयाचे हारविले उष्णा । कृपा पीयुष्णा वर्षे निर ॥ १ ॥ पांडवाचा साहाकारी । ते पांडव सर्व शरीरीं । गुरुपुत्र जाणती निर्धारीं । पहातां अंतरीं अनुभव तो ॥ २ ॥ इंद्र देवता ते चि हस्त । पांडव संभव तेथुनी निश्चीत । पांच बोटें विलसत । पांडव होत तेचि पै ॥ ३ ॥ कनिष्ठिका तो चि सहदेव । ज्योतिष तया ठावके सर्व । संख मोजणे गणित स्वभाव । दिसे गौरव सामाजी ॥ ४ ॥ अनामिका नाम नाहीं । निर्गुण आत्मा सर्वाठाई । कुळ सांगतां कैचें काई । नकुळ पाही या अर्थे ॥ ५ ॥ तो नकुल खुबसुरव । आंगट्या पवित्रे घालितीं स्यात । धनुर्वेद जो जाणत । मध्यमा शोभत अर्जुन पै ॥ ६ ॥ तर्जन गर्जन तर्जनी । उगारीता बोट जनीं । नाशीकावर ठेवितां नेउनीं । दरारा मनीं सर्वांते ॥ ७ ॥ तो भीम भयंकर । आंगठा सर्वांसी धर्म आधार । संशयभूत बोलतां प्रचार । गळाले खरें अंगुष्ट ते ॥ ८ ॥ म्हणुनी काढीं दोनच तया । स्वानुभवे जाणीजे हृदया । द्रौपदी हृचि येक जाया । भोगीती तया पांचजण ॥ ९ ॥ असो ऐसे वैष्णववीर । आत्मसेवेसीं तत्पर । परमात्मा कृष्ण प्रियकर । नमस्कार माझा तया ॥ १० ॥ आत्माराम सर्वांभूतीं । भरुनी उरला त्रिजगतीं । पुंडलीकाची देखोनी भक्ति । उभी मूर्ति विटेवरी ॥ ११ ॥ भक्तमंजरी घालिता माळा । तेणें हरी तो बहु शोभला । ते चि ऐका आतां लीळा । करी मनाला निश्चळ पै ॥ १२ ॥ पांडवामाजी विभूती । धनंजय आपण श्रीपति । ऐसें बोलिले गीतेप्रती । जाली मूर्ति ते प्रघट ॥ १३ ॥ सामवेद हरीसी प्रिय । भगवत् विभुती तो हि निश्चय । तये वेदीं अवतार होये । जन्मले स्वये श्रीअर्जुन ॥१४॥ ते कथा परमचोखडी । नाशी सकळ जन्म उतरंडी । भवाब्धीची

पैलमडी । पावषी घडी क्षणमात्रें ॥ १५ ॥ उपजतांचि स्वभाव पहिला। हरीचिंतनीं छंद लागला । मेळउनी धाकुट्या मुला । भजनाला आरंभ करी ॥१६॥ पांडवसमा करुनी तेथें । आपण व्हावें सुभद्राकांत । रथ सज्ज करुनी त्वरीत । साह्य देत श्रीकृष्णा ॥१७॥ ध्वजस्तंभीं हनुमंतवळी । खेळणें हेंचि नित्यकाळीं । आश्चर्य वाटे जगा सकळी । नेत्रकमळीं पाहातां ते ॥१८॥ मुंजी होतां चि उदासीन । ब्रह्मचर्यव्रत आचरण । जिंकिले कामक्रोध जाण । सदा फिरणें येकटे पै ॥ १९ ॥ दुर्धर मदनाचा चपेटा । युग्मसमई अनर्थ मोठा । हरी धाउनी तया संकष्टा । पुरविल्या चेष्टा विषयाच्या ॥ २० ॥ अमर्यादा घडली जाणून । ब्रह्मचर्य धरी अर्जुन । गुप्तरूपें जगांतून । तीर्थ भ्रमण करीतसे ॥२१॥ कामें व्याप्त सुभद्रा ह्मणुनी । कृष्णासी बोलिला खलितवाणी । ते चिन्ह अवतार घेउनी । हिंडे मेदिनी दावित ॥ २२ ॥ हिंदुस्तानीभाषा प्रविण । सदा आवडत त्याचें बोलणें । पाया पडावे पळत येऊन । मरणे चरण संताचे ॥ २३ ॥ सन्य घालुनी तातडी । पळावे तेथुनी कवडसवडी । मान करुनी वाकडी । दृष्टीं आवडी पाहाणें तें ॥ २४ ॥ दुसरे कोणी जवळ येतां । पळुनी जावें सर्वथा । नमन करूं नेदि तत्वतां । अमानित्वे वरीले त्या ॥ २५ ॥ अर्जुनाचा अवतार जाण । आंगी जयाचें सर्व लक्षणें । गीतेमध्यें वर्णिली पूर्ण । तीं चिन्हें जयापाशीं ॥ २६ ॥ दंम दवडीले देशांतरीं । अहिंसेच्या स्वये चि गोरीं । क्षमा, आर्जव निरंतरीं । सदा अंतरीं तिष्टतसे ॥ २७ ॥ आच्यार्यउपासनेचा स्वामी । शुध्दतेची तरी ते भूमी । अनुभव तया हृदयग्रामीं । राहिला नेहमीं वास करुनी ॥ २८ ॥ ईयाप्रकारे नवविध आंगें । धनंजयसाधया शोभती सांग । तारावया अज्ञानजग । दाविले वैराग्य करुनी ॥ २९ ॥ पूर्वी भोगीला फार शृंगार । येउनी तयाचा तिरस्कार । कौपीन घातली निर्धार । मलीन शरीर दाविती ते ॥ ३० ॥ कुळाळशाळेंत शूद्रगृहीं । राहावयाचा स्वभाव देहीं । तो चि प्रघट केला मही । मळते ठाईं राहाणें ॥ ३१ ॥ जयाची द्वैत नाहीं चरके । निरंतर योगी ते सोवळे।

अनुपासुनी ब्रह्मांड सगळे । पाहातां केवळ ब्रह्मरूप ॥ ३२ ॥ धन्य धन्य ते श्रीभागवत । जयाशी आवडे गीताभागवत । येरी जन्मा येउनी व्यर्थ । आयुष्य सतत गमाविलें ॥ ३३ ॥ नाहीं वोळखीली गायीत्री-माता । ॐकारस्वरूप जा कां पिता । जळो तयाची कुलीनता । नाही हीनता ज्यापाशी ॥ ३४ ॥ जें जें केलें तयानें कर्म । तें तो दांभिक उगाचि भ्रम । नेणोनी आत्माराम । जाती येमपुरीसी ॥ ३५ ॥ दुष्ट अधम एसे प्राणी । उद्धरीले निजमेदीनी । धन्य तयाची पिता जननी । प्रसवली जनीं वैष्णवातें ॥ ३६ ॥ त साधु जेथें राहातां । पवित्र दश तो निश्चितीं । मग ते कुळ पावन किती । सांगता शीणती चतुर्विध ॥ ३७ ॥ तीर्थें वसती जयापाईं । मोक्ष अंकीत ज्याचा पाहीं । अष्टमा सिध्दी जेथें काहीं । दास्यत्व ठाईं करीतों पै ॥ ३८ ॥ ऐसा जिष्णु विष्णुविभूति । जन्म धरीला तेणें क्षीती । तारावया मूढमती । सुंदर आकृति मानव ॥३९॥ आजानुबाहु मंडपातळ । उचपुरूप शरीर सरळ । चचळ अति नेत्रकमळ । जेणें मेदिले मत्रयत्रा ॥ ४० ॥ ऐसे रीतीं शामसुदर । धनजय तो योगेश्वर । हिंडे सर्व पृथ्वीवर । भक्तिविस्तार भोगावया ॥ ४१ ॥ गुप्तरूपें भ्रमण करीत । घाळख न पडे कवणाते । वायुसारीखे चालणें त्वरीत । नाहीं सापडत वचनासी ॥ ४२ ॥ जेथें तेथें नित्य नवा । स्नेहपाश ताडिला बर्वा । यागी सत तो ह्मणावा । धनजय बावा ब्रह्मनिष्ट ॥ ४३ ॥ पढरीसी जाता भले । श्रीहरीसी भरतें दाटलें । देवभक्ताचे आलिंगन जालें । उचवळलें प्रेमादक ॥ ४४ ॥ नेत्रातुनी श्रवती धारा । तेणें अभिषेक रुक्मीणीवरा । राहीमामाइंदिरा । पाहाता बरा धनजय तो ॥४५॥ सर्वात्मतेचें भाषण । अतर्क्य तयाची अनुभव खुण । ग्रथीं न करवे तें लेखन । पडले मौन शेषासी ॥ ४६ ॥ कीर्तनविधी चतुर्थप्रहरा । उभे ठाकता पडूकुमरा । सतमेळा मिळाला सारा । वग्तुत्व शिरा जाले तें ॥ ४७ ॥ एशा प्रकारें कांहीं दिवस । पढरीसी राहिले वैष्णवांश । आज्ञा देवी जगन्निवास । सच्चारास पृथ्वीवरी ॥ ४८ ॥

येवया लवकरी आज्ञापितां । चरणावरी ठेविला माथा । वियोग नाहीं धनंजयसंता । सदा पाहातां समागमीं ॥ ४९ ॥ अंतरबाह्य साधुजवळी । भरुनी ठेला श्री वनमाळी । न विसंबे कदाकाळीं । जैसा जळीं खेळे मीन ॥ ५० ॥ आता त्रिपुरारी जो त्रिंबक । भक्तमेळीं अवतार देख । ज्ञानेश्वर विष्णु प्रमुख । सांप्रदाय चोख तयाचा ॥ ५१ ॥ तें आख्यान याच अध्याई । वर्णविती श्रीगुरु आई । ते कथेची अद्भुत नवाई । सांगेन कांहीं यथामति ॥ ५२ ॥ हरिहराचा अवघा विलास । ते चि होती गुरुशिष्य । ते सविस्तर, सावकाश । सिध्द चरीत्रास श्रवण करा ॥ ५३ ॥ सांप्रत येथें त्रिंबकलीळा । अर्पण करीतो श्रीविठ्ठला । शब्द-सुमनें घालितां माळा । होये सावळा संतुष्ट ॥ ५४ ॥ दशमावरी संस्कृत । पुर्वी केले लीळामृत । तें न कळे अज्ञानाते । ह्मणुनी देह्यातें धरीले पै ॥ ५५ ॥ त्रिंबक नाम धारण करून । प्राकृत केला ग्रंथ निर्माण । पातक जाय निघोन । ऐकतां पूर्ण तत्चरित्रा ॥ ५६ ॥ यजुर्वेदांत रुद्र निर्माण । तेथें रुद्रें केलें जनन । अंबके जयाशी तीन । नाम ह्मणून त्रिंबक तया ॥ ५७ ॥ दोन नेत्रीं सर्वां पाहाणें । ज्ञानचक्षु तिसरा जाण । व्यर्थ जन्म तयाविणें । जावें शरण गुरुराया ॥ ५८ ॥ होता तयाची कृपादृष्टी । ब्रह्मरूप दिसे सृष्टी । लीळामृताची करावया वृष्टी । पृथ्वी तळवटी अवतार तो ॥ ५९ ॥ कृष्णातीरीं ग्राम बरवा । वाल्मीकक्षेत्र ह्मणती जिन्हा । तेथें आले त्रिंबकबावा । जवळ केवा आत्मधन ॥ ६० ॥ स्नानसंध्या श्रीकृष्णध्यान । निरंतर करावें देवार्चन । अहोरात्र कीर्तन भजन । समाधी पूर्ण सहजस्थीति ॥ ६१ ॥ नम्र पाहाणें सर्वाभूतीं । अखंड बैसती येकांतीं । भिक्षा मागून अन्न देती । तृप्त करीती प्राणीया ॥ ६२ ॥ पंढरीचा अतिप्रेमा । अंतर न पडे कदा नेमा । त्रणी केले मेघःशामा । काय महिमा वर्णू तो ॥ ६३ ॥ जें जें मनात येईल त्याचे । तें तें करणें देवासी साचे । उणे पडता निजभक्ताचें । मोद कैचे राहिल ते ॥ ६४ ॥ याळागी संतापाशी । अखंड उभा दिवानिशी । ठेउनी कर कटाशी । हरीकेशी वाट पाहे ॥ ६५ ॥ त्रिंबकस्वामीचे मुखांतून ।

लीलामृत कराया श्रवण । आवड जाहाली हरीसी पूर्ण । सुचावितो आपण निजांगें ॥ ६६ ॥ स्वप्नांत जाउनी श्रीविठ्ठलें । त्रिंबकबावाशी सावध केलें । ह्मणती माझे श्रवण भुकेले । लीलामृत कथिलें पाहिजे तुंवा ॥ ६७ ॥ स्तुतिप्रिय श्रीभगवान । आज्ञा करीता स्वामीसी जाण । सांगितलें सर्वा पूर्ण । जाहालें मन हर्षयुक्त ॥ ६८ ॥ परी अक्षर सुंदर नाहीं । कागद लेखण्या पाहिजे शाई । येतां चि त्रिंबकद्दई । विठाबाई आली धांवनी ॥ ६९ ॥ नाम वदतो कृष्णभट । द्वारकानगरें वसते पीठ । बाळवेग्रामीं होउनी प्रगट । रहावया स्पष्ट स्थळ मागती ॥७०॥ त्रिंबकस्वामी ह्मणती तेव्हां । मठ तुमचा भूदेवा । स्वईछेप्रमाणें वास करावा । लाभ द्यावा संगतीचा ॥७१॥ विनंति करीतां ऐशापरी । संतोषले पूतनारी । राहाते जाले वर्षभरी । केली सारीं कार्यें तीं ॥७२॥ जेंवि राजसूययज्ञांत । उचिष्टें काढी रुक्मीणीकांत । ब्राह्मणाचे पाय धूत । कार्यें करीत स्वकरें पैं ॥ ७३ ॥ तैसें चि येथें फकीराजी । उमा हरी भक्तकाजीं । नीच कामें कराया राजी । आला सहजी बाळव्यांत ॥ ७४ ॥ पत्रावळी लाउनी स्वयें । देवपूजा करीत आहे । घागर घेउनी पाणी वाहे । ह्मणावें काय पांडुरंगा ॥ ७५ ॥ आतिथ्य करावें येईल त्याचें । उणें पडो नेदी साचें । धन्य भाग्य त्रिंबकबावाचें । वैकुंठीचें दैवत घरीं ॥ ७६ ॥ काढाव्या उचिष्ट पत्रावळी । दीनदयाळ श्रीवनमाळी । रात्रंदिवस सदा जवळी । कृष्णभट सगळी म्हणती तया ॥ ७७ ॥ लीलामृत ल्याहावयाते । शाई करीती निजहस्तें । लेखण्या करुनी स्वयें देत । सान्निध बैसत निज आवडी ॥ ७८ ॥ देशमुखासी स्वप्नांत सांगून । कागद आणविले पुणियांतून । साध्या यथोक्त निर्मोन । आलिप्यानें रेखाटीला ॥ ७९ ॥ त्रिंबकस्वामीसी ह्मणती आतां । लेखन करावें लीलामृता । मग तेथें उशीर कोणता । जालिया मंथा श्रीप्रसाद ॥ ८० ॥ दशमस्कंद देवितां पुढें । फुटला बुधीसी तात्काळ मोड । ग्रंथद्रुम वाढला प्रौढ । केला उघड अर्थ पैं ॥ ८१ ॥ अध्ये जाले येकसष्ट । ऐकतां हरतें जीवाचें कष्ट । ब्रह्मसाम्राज्याचा पट । होये

नीट प्राप्त तया ॥ ८२ ॥ श्रवणपठणें आत्मसिध्दी । सरे सहजी जन्मव्याधी । दरिद्र दृष्टी न पडे कधीं । जडे बुध्दी पांडुरंगीं ॥ ८३ ॥ तया ग्रंथाशीं ऐसा वर । सकळ मनींची कामना पुरे । ग्रंथ करविता इंदिरावर । जो का विटेवर पंढरीसी ॥ ८४ ॥ विप्ररूप धरूनी तेणें । नाम आपुलें सांगुनी कृष्ण । त्रिंबकसदनीं राहुनी पूर्ण । ग्रंथ निर्माण करविला तो ॥ ८५ ॥ ते सेविता लीलामृत । प्राणी न होये कदा मृत । जाणती खूण अनुभववेत्ते । होय प्राप्त निज आत्मता ॥ ८६ ॥ असो आतां आध्यात्मपद्धति । श्रोते कथा श्रवणार्थी । त्रिंबकस्वामी वैष्णव जगती । वाळव्याप्रति मठ ज्याचा ॥ ८७ ॥ द्विजस्वरूपपांडुरंग । संवत्सरपर्यंत राहिला सांग । द्वारकेसी जावया मग । विच्यारीती आपेश्वाशी ॥ ८८ ॥ ह्मणती कुटुंबवत्सळ मी ब्राह्मण । येक वर्ष जालें पूर्ण । निरोप दिधल्या जाईन । लवकर येईन माघारा ॥ ८९ ॥ गृहींचे पाहात असतील वाट । याचलागीं जाणें मजला स्पष्ट । ऐकुनी ऐसें वाटलें कष्ट । दाटला कंठ स्वामीचा । ॥ ९० ॥ धोतरजोडा सुंदर आणिला । पागोटें तिसरा शुभ्र शेला । पांघरविता घनसावळा । ते वेळा काय बोले ॥ ९१ ॥ ह्मणे द्वारका दुर येथुनी । तस्कर लुटतील मजला रानीं । पंथ्या मुळीचा धा आणुनी । असावी मनीं निरंतर दया ॥ ९२ ॥ भोजन करवोनी तया द्विजेंद्रा । लीळानाटकी देवकीकुमरा । करउनी सर्वा नमस्कारा । धरीले करा स्वामीनीं ॥ ९३ ॥ गृहद्वाराबाहिर येता । सोडिले त्रिंबकबाबाचे हाता । तात्काळ तेथें अदृश्यता । पाहतपाहता जाहले हरी ॥ ९४ ॥ मग तो विरह काय सांगणें । त्रिंबकस्वामीचे गळती लोचन । अष्टौभाव आंगीं पूर्ण । लोळती जाण भूमीवरी ॥ ९५ ॥ दीनवचनें भाकिता करुणा । ह्मणती सकुमारा मामीकारमणा । कार्ये केली नीच जाणा । होतसे मना तळमळ बहु ॥ ९६ ॥ त्रिंबकपत्नी नाम गिरीजा । सदा स्मरे अधोक्षजा । ती तो स्फुंदे उमारी भुजा । गरुडध्वजा ये रे ह्मणे ॥ ९७ ॥ नानापरी आळकुन ।

शोक करीता सरला दिन । उभयता दिसती दीन । करीती भजन अटाहास्यें ॥ ९८ ॥ द्रौपदीचा ऐकुनी धावा । त्वरा जाली रमाधवा । तैसे जाहाले देवाधिदेवा । प्रगटले तेव्हां भजनांत ॥ ९९ ॥ चतुर्भुज- पीतांबरधारी । मुरली धारण केली करीं । निजभक्ताचा संतोष करी । भेटले झडकरी त्या साधवा ॥ १०० ॥ नेत्रें पुसीलीं स्वहस्तें । बहुत- प्रकारें समजावित । ह्मणे मी जवळ सतत । अभय देत रुक्मीणीपति ॥ १ ॥ तया सुखा वर्णील कोण । देवभक्ताचें आलिंगन । अत्यंतगुह्य तें भाषण । पडे मौन शेषादिका ॥ २ ॥ वेळापुरास तये वेळीं । तेथील सावकारास आज्ञा जाहाली । मुरलीधराची मूर्ति केली । पाहीजे दिधली वावासी ते ॥ ३ ॥ गोजिरे ध्यान सुहास्यवदनें । करीत आहे वेणूवादन । प्रातीवेळा धन्य सुदिन । विग्रह पूर्ण साजीरा तो ॥ ४ ॥ अद्यापी तें दैवत । त्रिंबकस्वामींचें आहे मठांत । दर्शनमात्रें कामना पुरत । चमत्कार तेथें अगणीत पै ॥ ५ ॥ जो जो जयाचे मनीं विच्यार । तो तो पुरवी मुरलीधर । परी चित्तीं असावा धीर । नारीनर असो कां ॥ ६ ॥ येथें भाव चि मात्र प्राधान्य । वर्ण विद्या नाहीं प्रमाण । भक्तिप्रेम मुख्य कारण । ज्ञातिहीन जरी तो ॥ ७ ॥ ह्मणुनी मागणें हे चि सर्वां । सद्गुरूपदीं भाव ठेवा । तरी सापडे निजधन ठेवा । इतर हेवा नको ते ॥ ८ ॥ संतकृपे वण कदा । न मिळे जीवशिव पदा । त्रिंबक श्रीगुरु स्मरतां सदा । टळे आपदा द्वैताची ॥ ९ ॥ श्रीयेकनाथसदनी जगजी- वनें । उदक आणीलें जैसें पूर्ण । तैसेंचि येथें घडलें जाण । त्रिंबक त्रिनयन धन्य साधु ॥ ११० ॥ तृतिय नेत्र ज्ञानाचा । पाहाती आत्मा सर्वत्र साचा । ह्मणुनी तेथें द्वारकेचा । दशवे द्वारीचा रावळा हरी ॥ ११ ॥ तीर्थमासे करूनी सर्वा । उध्दरीले जडजीवा । सांप्रदाय ज्ञानेश बरवा । पंथ बरवा दाविला जनीं ॥ १२ ॥ ज्ञानेश्वरी नित्य वाचावी । अज्ञानतमारी उगवला रवि । भक्तिमार्गा लाउनि सर्वी । ध्वजा उभवी आनंदाची ॥ १३ ॥ ऐसा समर्थ त्रिंबकबावा । वाल्मीक

क्षेत्रांत मठ त्या नमावा । उत्साहाविधी स्वानुभवा । करीती तेव्हां गोकुळअष्टमी ॥ १४ ॥ प्रतिवर्षी श्रावणमासीं । कृष्णजयंति निश्चयेसीं । करीत आहेत तद्वंशी । नमन तयासीं अत्यादरें ॥ १५ ॥ शके सत्राशे वरते सोळा । त्रिंबकनिधन उत्साहासोहोळा । जडदेह विसर्जन केला । सहस्रदळा भेद करुनी ॥ १६ ॥ दिव्य ज्योति श्रीकृष्णवदनीं । प्रवेशली तात्काळ जनीं । सुमनें वर्षली स्वर्गाहुनी । धन्य मेदीनी ते जाणा ॥ १७ ॥ यानंतर पांडुरंगसंताचें । वर्णन होईल आख्यान साचें । राजारामी सिद्धकृपेचें । बोलणे वाचे सकळ पै ॥१८॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । धनंजयत्रिंबक चरीत्राते । अध्याय होत येक चि हा ॥ १९ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ अनु. अ. ॥ ९१ ॥ समाप्त ॥

## अध्याय ९२

### — पांडुरंग स्वामी —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरु सिध्दसमुद्रा । मायामळ हरी येकसरा । जीवतरंग दातारा । उमटके निरा जेथें पै ॥१॥ ते अज्ञान समीरें उडविले । प्रपंचथडीये लागले । किंचितज्ञ होउनी ठेले । व्याकुळ जाले आत्मभ्रमें ॥ २ ॥ ऐसीये भ्रमाचें निरसन । तुज-माजी होये न लागतां क्षण । तो तूं आमुचा पूर्ण । वसशी जाण शिरावरी ॥ ३ ॥ तरी आतां कायसा भव । त्वत्पदीं माझा विसावीठाव । मनीं इच्छा गुण गावे । निरंतर राहावे प्रेम आम्ही ॥ ४ ॥ केशवस्वामी मुकुंदसांप्रदाई । पुन्हा अवतार जाला मही । ते कथा वर्णीन काहीं । आले हृदई पूर्ण करा ॥ ५ ॥ छंद पुरवणें लेकुराचा । सहजी स्वभाव गुरुमायेचा । आळस मी न करी मनोरथाचा । जोडला साचा कल्पद्रुम ॥ ६ ॥ कल्पद्रुम कल्पीले देत । स्वामी करीतो कल्पनातीत । अनोपम्य सिध्दनाथ । केले सनाथ निजदासा ॥ ७ ॥ केशवस्वामीसी

ध्यावया जन्म । भक्ति परी पाहिजे प्रेम । ज्ञानोत्तरभागी हे चि वर्म । जाणती परमवैष्णव ते ॥ ८ ॥ येरी ते शुष्क वेदांती मोक्ष ध्यावया सदा रडती । भक्तवरा प्रेमसंपत्ती । काय मुक्ति तयापुढें ॥ ९ ॥ आधीं बद्धाचि कोणी नसे । तेथें मुक्तिसी कोण पुसे । धन्य धन्य ते प्रेमळ पुरुष । पंढरीसी जाती पै ॥ १० ॥ असो प्रेमऐश्वर्य भोगाया । केशव जन्मले भूठाया । विनवोनिया पंढरीराया । धरीले देहा विप्रकुळीं ॥ ११ ॥ तया प्रेमाब्धु वाचोन । वंध्या असे सकळ ज्ञान । ह्मणुनीं उमेशीं शिव आपण । प्रेमलक्षण सांगत ॥ १२ ॥ पाहापा प्रेमासाठीं । निर्लज्य जाले धुर्जेटी । महास्मशानीं पर्णकुटी । वसविली निकटीं स्वानंदें ॥ १३ ॥ सनकादिकीं बाळपण । नाहीं सोडिले अज्ञोन । नारद स्वयें भगवान । करिती गायन प्रेमेसीं ॥ १४ ॥ तेणें प्रेमकळा गोमटी । प्रल्हाद ध्रुव बाळे धाकुटी । तया बांधली कंठीं । जगजेठी धावे मागें ॥ १५ ॥ ते प्रेम नळनीळजांबुवंता । अंगद सुग्रीवहनुमंता । भरतादि लक्ष्मण समस्ता । वेड बहुता लाविले ॥ १६ ॥ उधवगोपिका अक्रूर । गोपाळादिगाई समग्र । पांडवद्रौपदी-विदुर । प्रेम थोर मागीती ॥ १७ ॥ काय वर्णूं स्वसुख लहरी । प्रेम मागताहे मुरारी । वराही होऊन कामें करी । राहे घरीं भक्ताचे ॥ १८ ॥ प्रेमालागीं नाम्यासंगें । ज्ञानेश्वर तीर्थें करूं लागे । ह्मणे माझे ज्ञानमार्ग । प्रेमासंगें चालवी ॥ १९ ॥ या प्रेमाची नव्हाळी । वर्णूं न शके वनमाळी । त्या पुढे ज्ञानवैराग्य धूळी । माया घाली निजकरें ॥ २० ॥ ऐसीया प्रेमलक्षणाप्रति । सद्गुरूसी मागे केशवमूर्ति । भांडाई गृहीं देह धरीती । ती कथनोक्ति अनोपम्य ॥ २१ ॥ त्रिंबकनामें ब्राह्मण । सत्यवादी अति निपुण । स्वधर्माचे करुनी पाळण । भगवत्भजन करीतसे ॥ २२ ॥ तयाची भार्या वेणुबाई । पातिव्रत्य वसे तिचे ठाई । जिचे उपमे नसे कांहीं । दुजी नाहीं वर्णावया ॥ २३ ॥ भ्रतारसेवेमाजी रत । मानसीं अतिथीपूजेची प्रीत । सर्वाभूतीं पंढरीनाथ । अनुभव

वसत हा जियेचा ॥ २४ ॥ तिचिये उदरकुहरीं । भक्त केशव जन्म धरी ॥ धन्य वंश ते नगरी । काय वैखरी वार्नू ते ॥ २५ ॥ कीर्ती ही ज्याची श्वेतवर्ण । गुण तोहि सत्वप्राधान्य । पांडुरंग नामाभिधान । ठेविलें ह्मणुन तेंचि तया ॥ २६ ॥ नातरी तो पांडुरंगीं दृढ भाव । निजध्यासें द्वैतवाव । याळागीं पडले ते चि नांव । ऐक्यगौरवा मुळींचा पै ॥ २७ ॥ वय जालें किशोर । व्रतबंधादि अधिकार । गृहस्थाश्रमस्वीकार । जाहाला विस्तार अनुक्रमें ॥ २८ ॥ चंद्राभागीं वाढला काळ । भजनीं प्रेमा तेवि शोभळा । वैराग्यानें घातिली माळा । हृदई उदेला ज्ञानभानु ॥ २९ ॥ लाभवेळा येतां समय । सद्गुरूचे देखिले पाय । मग तो आनंद केतुला काय । वर्णितां नये वाचेसी ॥ ३० ॥ जानकीपूर पवित्र ग्राम । योगीवसवटासंभ्रम । जाळने ऐसें ह्मणती नाम । पहातां आराम होय जीवा ॥ ३१ ॥ तेथें बाबा कृष्णनामे गुरुभक्त । द्वारकानाथीं अतिप्रीत । तेणें पांडुरंगा अद्वैत । केले सनाथ कृपादृष्टी ॥ ३२ ॥ मंत्रोपदेश होतां करणी । उगवला सबाह्य ज्ञानतरणी । अद्वयसमाधी तत्क्षणी । ळोधली नैनीं चिदात्मदशा ॥ ३३ ॥ पहातां पाहणें पदार्थ । विरोनी गेले जेथींचे तेथें । आपआपणास सदा न्याहाळीत । जाहाली तटस्थ इंद्रीयें तीं ॥ ३४ ॥ सात दिवस समग्र पाहीं । देहासी तयाचे शुध्दी नाहीं । येकासनीं बैसणें ठाईं । बोलूं काई ग्रंथातें ॥ ३५ ॥ जेथे परा मावळली । घेरीले तये उन्मनीगाळी । आत्मसुखाची नित्य नव्हाळी । लागली टाळी परमली ॥ ३६ ॥ मग सहजस्थीती अपसया । जागृति फावली इंद्रिया । परी आनंदोदकीं उचंबळुनिया । राहाटली कायो पांडुरंगाची ॥ ३७ ॥ अग्नि ग्याला कुंडाबाहेर गेली । तरी ते वेगळी नहीं जाली । तैसी गुरुशिष्य बोली । ऐक्या आली निज अनुभवें ॥ ३८ ॥ वायु आकाशीं भरारे । जेथींचा तेथें सहजी स्थीरे । तैसा गुरुशिष्यविच्यारें । शब्दीं बाहरे परी येक ॥ ३९ ॥ सद्गुरूची ते पांडुरंगे । पूजा केली यथासांग । सेवा करीती नीज अंगें । न पडे व्यंग कांहींचि ॥ ४० ॥ रात्रं दिवस

उमा जवळी । जोडोनीया बध्दांजुळी । जे जे पाहिजे ते ते वेळी । देती सकळी पदार्थाशी ॥ ४१ ॥ अष्टौभाव येकवटले । आत्मसुखें सुखावले । प्रकृतिगुणें वोढीता न हाले । जाहाले अचळ भगवत्पदीं ॥४२॥ मग कांहीं काळें करून । सद्गुरू जे का बाळकृष्ण । समाधीस्थ जाहाले पूर्ण । निर्याण दिन धन्य तो ॥ ४३ ॥ कार्तिकमास दशमी दिवस । निर्गुण सेविले सावकाश । कीर्तन करुनी सुरस । निजधामास गेले पै ॥ ४४ ॥ पांडुरंगें सत्त्वराशी । करुनी पुजिले समाधीशी । उत्साह करुनी आदरेंशी । आटवी मानसीं श्रीगुरुपदें ॥ ४५ ॥ प्रसाद व्हावा जगावरी । ही गुरु आज्ञा वंदीली शिरीं । संचार करी पृथ्वीवरी । नरनारी उध्दरावया ॥ ४६ ॥ तीर्थमीसें बहुदेश । पांडुरंगयोगेश । पावन करीती जनास । गुरुभजनास लावीती पै ॥ ४७ ॥ हृदय कठोर देखिलीया । प्रेमकाठीं लागुनिया । मेळविती स्वसुखठाया । सुगमोपाया दावुनी ॥ ४८ ॥ प्रेमभरें गंगा भरली । लोकोत्धारा वाहूं लागली । अभाव झाडे मोडीली । मुळिहून सगळी येकसरा ॥४९॥ ज्ञानवैराग्यतटें दोन्ही । माजी प्रेममंदाकिनी । वाहे भक्तिपूर्ण पणी । निर्मळपणी अतिगोड ॥ ५० ॥ विवेक तेथें वाळवट । पक्षी बैसले हंस दाट । मुक्त सेविती आला वीट । घेती घोट प्रेमाचा ॥ ५१ ॥ अबोधकडे फोडीले भारी । जळ चालिले अद्वयलहरी । ठाव न लागे चि निर्धारीं । शमदमजळचरी वेष्टीत ॥५२॥ ब्रह्मगीरी पांडुरंग । तेथून उद्भव झये गंगे । उत्धरीत अवघे जन । करी योग श्रीरंगीं ॥ ५३ ॥ धन्य संत पांडुरंग । करी जगाचा भवभंग । जयाचा सखा रमारंग । सदा अभंग विटेवरी ॥ ५४ ॥ ठाईं ठाईं संस्थानें । वाढविले जनीं भजन । पंढरीचा नेम पूर्ण । वारीसी जाणे नृत्य करीत ॥ ५५ ॥ पाईं घागऱ्या गळ्यांत वीणा । प्रेम अश्रू गळती नैना । प्रतिपाळली नारायणा । उध्धार मना अट्टाहास्यें ॥ ५६ ॥ प्रेमाचा तो वोतीव पुतळा । पांडुरंगसंत जो का भला । जेणें देव वेढा चि केला । हिंडवी सावळा सदा मागें ॥५७॥ कीर्तनाचा बहु छंद । कथेंत नाचे श्रीगोविंद । धन्य जगीं आत्मविद । भक्ति शुध्द जयाची

॥ ५८ ॥ भजनप्रेमा वाढऊन । समाधिस्थ जाले आपण । मास जाणा तो फाल्गुन । तिथी पूर्ण येकादशी ॥५९॥ जयजयकार करून । कीर्तनरंगीं रंगोन । श्रीराम वदनीं वदोन । केले विसर्जन देहाचें ॥ ६० ॥ हा केशव अवतार पांडुरंग जाला । धरीले दृढ समाधीला । पंढरीनिवास श्रीविठला । मंजीरीमाला गुंफीतसे ॥ ६१ ॥ सिध्दप्रसादे संतमजीरी । योधीतसे योविया दोरी । राजारामीं अर्पिता बरी । रावणारी संतुष्ट तो ॥६२॥ भक्तमजीरीमालाग्रथ । श्रवणेचि पुरती मनोरथ । पांडुरंगस्वामी-चरीत्रातें । जाहाला समाप्त अध्याय हा ॥ ६३ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु० अ० ॥ ९२ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

## अध्याय ९३

### — अलर्क संत —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिध्देश्वरा । पंढरीनिवास रुक्मीणीवरा । आदि पुरुषा निर्विकारा । परात्परा पूर्णते ॥ १ ॥ नानारूपातें धरीशी । येकीं वेगळा चि असशी । अनेकत्व तूं दाविशी । परी येकपणाशी नाहीं भंग ॥ २ ॥ सर्वी सर्वत्र भरून । निराळा श्रीरघुनंदन । सत्तामात्रेंव रून । त्रिभुवन चळत असे ॥ ३ ॥ चळणवळण जे होत । ते सत्ता चि विलसत । तये सत्तेसी अलिप्त । विराजीत निश्चळपणी ॥ ४ ॥ आता तुझी जयाशी प्रीती । संत तुजला फार आवडती । तयाचिये वर्णना गती । स्वये श्रीपति यावी तें ॥ ५ ॥ भक्तमंजीरी राघवा तुझा । अर्पण करीतसे मेघःशामा । घेउनी वाचेचिये करपद्मा । सप्रेमा वाहुं तुज ॥ ६ ॥ परी वाहातां मी ह्मणता । ते नावडे सीताकांता । तुझी मंजीरी तुझे माथा । वाहाविता तूं येक ॥ ७ ॥ श्रोता वक्ता तुझा तूं चि । देहबुध्दी नुरे साचि । कथा सुंदर अलर्क राजाची । हरी जीवाची जीवित दशा ॥ ८ ॥ ब्राह्मणभक्त अर्क उपासक । नित्य पूजा करी कौतुक । सूर्य अवलोकन करी देख ।

भोगी स्वसुख गुरुद्वारें ॥ ९ ॥ सहस्रभोजन रविवारीं । दक्षणा देत द्विजा भारी । भूदेवाचे पाय चुरी । सदा वैखरी हरीनाम ॥ १० ॥ कीर्तनभजन निशीदिवा । अर्चनीं तोषवी सदाशिवा । आवडे जया संत-सेवा । अलर्क वरवा राजा तो ॥ ११ ॥ शिव पुराण ज्याचे सदनीं । पाचक तृत करीती जनी । विरक्तिमार्गी भोगी मनीं । ऐश्वर्ये जाणुनी नाशीवंत ॥ १२ ॥ वैराग्य भरुनी देहा अंतीं । प्रेमकळा वरीली चित्तीं । जन्म वितळा पुन्हा क्षीती । ते फळनोक्ति अनोपम्य ॥ १३ ॥ प्रेमगीरी धरुनी नाम । दीक्षा संपादिली प्रेम । मसविके शिवाचे धाम । जीवित्र अधम टाकुनी ॥ १४ ॥ त्र्यंबकेश्वरी हालसाक्रांत । तेथें राहाती प्रेमगीरी समर्थ । संतचरणी ज्याचा हेत । करीती अतिथ्य सर्वांचें ॥ १५ ॥ वैष्णव देखिल्या दृष्टीसी । आनंद होये बहु मानसीं । शीधासामोग्री देउनी त्यासी । आदरेसी ठेउनी घ्यावें ॥ १६ ॥ इच्छीत जाणुनी अंतर । दास्यत्व करणें निर्धार । धनधान्य देउनी वस्त्र । अलंकार वहनादी ॥ १७ ॥ भगवत्कीर्तन ऐकतां श्रवणीं । प्रेमाश्रू भाहुती नैनी । प्रेमगीरी म्हणुनी । बोलती वदनीं जन सारे ॥ १८ ॥ मार्तंडपदीं ज्याचा प्रेमा । मटार कपाळा लाविजे नेमा । आरक्तवर्ण नेत्रपद्मा । तेजें सीमा सांडिली ॥ १९ ॥ प्रेमगीरीची पाहाता मूर्ती । मदन लज्जीत होये चित्तीं । भामण ज्याचे प्रेमोक्ति । ब्राह्मण भक्ति फार जयाँ ॥ २० ॥ भगवत्‌विभूति ब्राह्मण । सांगती ऐसी सकळ पुराण । साधवे त्या हे जाणून । करी भजन द्विजवराचे ॥ २१ ॥ नित्य करावी वेदब्र-पूजा । संतर्पण करणें भोजा । तेणें संतोष गरुडध्वजा । अधोक्षजा पंढरीशा ॥ २२ ॥ प्रेममूर्ति ते प्रेमगीरी । रहात असता आंजेओरी । पंढरीची आली वारी । निघाली वारी साधुवृंदें ॥ २३ ॥ भजनध्वनि ते ऐकतां कानीं । प्रेमभारे भरलें मनीं । प्रेमगीरी ते चि क्षणीं । निघाले नैनी प्रेम झिरपत ॥ २४ ॥ दिंड्या पताका झळकती । मृदुंग विणे टाळ वाजती । नादें कोंदली तेव्हा जगती । झणत्कारीती टीपऱ्या चिपळ्या ॥ २५ ॥ शिष्यमंडळी

घोंवता मेळा । मध्ये प्रेमगीरी प्रेमपुतळा । नभमंडप गजरें कोंदला । हेलावला प्रेमसिंधु ॥ २६ ॥ उदय होता मावचंद्रा । भरतें दाटे आनंदसमुद्रा । प्रेमगीरीसी लागली मुद्रा । नव्हे निद्रा तामसता ॥ २७ ॥ च्यारघटीकानंतर पाही । सचेतनता आली देही । परी जाणवे दुसरें कांहीं । येक हृदई घनसावळा ॥ २८ ॥ माउल हृदयीं तीं द्वाकिती । भजनाशी आरंभ पुन्हा करीती । तव तव थिरे देहस्फूर्ति । डोळे भरती प्रेमें दर्शे ॥ २९ ॥ आनंदेशीं ऐशी परी । प्रेमपुरुष प्रेमगीरी । जाते जाहाले श्रीपंढरी । राउळांतरी प्रवेशले ॥ ३० ॥ महाद्वार उल्लंघीता । गरूडपारी नमन करीता । पुढें देखिले हनुमंता । अंजनीसुता लवलाही ॥ ३१ ॥ वंदन करीता वायुनंदन । दोही डोळां भरलें जीवन । पुढे पाहातां जगजीवन । मनमोहन विटेवरी ॥ ३२ ॥ समचरण समकर । समदृष्टी देवकीकुमर । समकाम ध्यान सुंदर । रुक्मीणीवर परमात्मा ॥ ३३ ॥ चरणावरीं ठेविला माथा । आलिंगन दिधले तत्वता । जाली पूर्ण विदेही अवस्था । विदेही व्यामाता अवलोकिता ॥ ३४ ॥ प्रेमगीरी प्रेमेकरून । घोसडतसे आनंदानें । जाले दर्शना सतगण । करीती भजन येकसरा ॥ ३५ ॥ नामस्मरणधडाका । चारीप्रहर जाहाला देखा । स्नानविधी सारुनी निका । जगज्जनका अभिषेके ॥ ३६ ॥ चतुर्थप्रहरा कीर्तन । प्रेमगीरी करीती जाण । वस्त्र अंगींची रक्तवर्ण । पीत पूर्ण भडार तो ॥ ३७ ॥ पायाशी बांधुनी चाळ । विणा वाजवीती प्रांजळ । नृत्य करीता सोज्वळ । वाहे जळ नेत्रातुनी ॥ ३८ ॥ आधें चालिवरी ह्मणता अभंग । कीर्तनीं प्रगटले रमारंग । उशीर केथा भरावया रंग । यात्रुल साग प्रेमगीरीचें ॥ ३९ ॥ समाप्त कथा सायंकाळीं । प्रदक्षणा पुढें आरंभिली । बरोबर शिष्यमंडळी । भजनधुमाळी करीती पै ॥ ४० ॥ नित्योत्साह ऐसे प्रकारीं । भोगीती आनंद प्रेमगीरी । धन्य धन्य ते श्रीपंढरी । पृथ्वीवरी भूवैकुंठ ॥ ४१ ॥ इकडे जेजोरीस झाल्साक्षांत । चैन न पडे तया निश्चीत । निघाले साथ घेवुनी त्वरीत । आले धावत पंढरपुरा ॥ ४२ ॥ हरीहराची होता

भेटी । परस्परें बोलती गोष्टी । ह्मणती माझी प्रेमपेटी । घेतली निकटी ठेउनी ॥ ४३ ॥ गीरीचा आश्रय करुनी तेथें । राहातसे मी उमाकांत । तो गीरीच ठेविला येथें । राहू फेरते पांडुरंगा ॥ ४४ ॥ मग तो देव जेजुरलिंग । धरीला मस्तकीं पांडुरंग । वर्णिता नये प्रेमरंग । अद्वय अभंग शिवविष्णु ॥ ४५ ॥ दुसरें स्वरूप धरुनी आणीक । जेजुरीस गेले म्हाळसानायक । प्रेमळगीरी स्वकौतुक । आले निके स्वस्थाना ॥ ४६ ॥ प्रेमासंगे निरंतर हरी । राहिला सतत त्या अंतरीं । धन्य साधु प्रेमगीरी । भजन करी रात्रंदिवस ॥ ४७ ॥ अनेक तीर्थें हिंडून । उध्दरीले बहुत जन । वारंवार येऊन । करी नमन श्रीविठ्ठला ॥ ४८ ॥ शेवटीं येउनी जेजुरींत । राहाते जाहाले प्रेमगीरीसंत । भजती सदा उमाकांत । पंढरीनाथ येक जाणुनी ॥ ४९ ॥ मल्हारी तो प्रेमभक्ति । मोहीत जाला म्हाळसापति । पूर्वी धरीली साधुव्यक्ति । मिरवे प्रीति वैष्णवमेळीं ॥ ५० ॥ श्रोतिये घेतली येथे शंका । तो अवतार कळावा निका । वक्ता वदे श्रीरघुनायका । स्मरुनी सखा हृदयांतरीं ॥ ५१ ॥ चापळापासुनी तीन कोस । नाहोलीग्राम ते विशेष । संस्थान ते शोभतसे । ह्मणती जयास मल्हारस्वामी ॥ ५२ ॥ मल्हारीचा तो अवतार । लीला तयाच्या अपार । स्मरण केल्या कामना पुरे । होये अधिकार ज्ञानाशी ॥ ५३ ॥ रामदासस्वामी रंगमूर्ति । मल्हारस्वामी त्या संगती । तीर्थें हिंडुनी सकळ क्षीती । पावन करीती जगाते ॥ ५४ ॥ संतस्वरूप निर्विकार । आसक्त तेथें श्रीहरीहर । पुनः पुनः घेउनी अवतार । महीवर विचरती ॥ ५५ ॥ असो प्रेमभरीत प्रेमगीरी । राहातीं क्षेत्र ते जेजोरी । जेथे वसती मदनारी । मिळाली सारी साधुवृंदे ॥ ५६ ॥ प्रेमगीरीसंताशी । आला काळ न्याहावयाशी । तये वेळीची गोष्टी कैशी । सांगू मानसीं अवधारा ॥ ५७ ॥ मूर्तिमंत येउनी काळ । उभा राहिला येउनी ज्वळ । प्रेमगीरी हासिन्नले । बोलती प्रांजळ तयाशी ॥ ५८ ॥ ह्मणती आह्मी मुददे स्वभावें । मेल्याशी तुंवा काय मारावें । जीवित्व निरशीले गुरुदेवें । जाले सर्व

आत्मरतें ॥ ५९ ॥ आज्ञाशी पाट ना पोट । जन्ममृत्यूचा घेतला घोट । आत्माराम निघोट । पाहे नीट तुझा तूं ॥ ६० ॥ ऐसे वदतां योगीराणा । काळ टाळला तया चरणा । प्रेमगीरीसी करुनी नमना । गेला स्थाना आपुले पै ॥ ६१ ॥ मग स्वइच्छे शिष्या सांगून । सुचविले पुनः अवतार घेणे । जडतनूचे विसर्जन । कृष्णेत करणें स्थान ह्मणुनी ॥ ६२ ॥ भजन करीत प्रेमेसी । येउनी तांदुळवाडीसी । जंबुकेश्वराचे देउळापाशीं । देहवस्त्राशी त्यागीलें ॥ ६३ ॥ समाधीस्थान श्रीकृष्णेत । प्रसिध पाहती जन समस्त । घेतला जन्म प्रेमसहीत । भजावयाते पांडुरंगा ॥ ६४ ॥ प्रेमगीरी प्रेमपुतळा । रावजीबाबा तोचि जाहाला । दप्तरणकर ह्मणती जयाला । ऐका लीळा तयाची ॥ ६५ ॥ ऋग्वेदी ब्राह्मण देशस्थ । मान ज्याचा पंढरींत । गोपाळकाला करणें सांत । सकळ संतात वंद्य जे ॥ ६६ ॥ वैष्णवकुळ तें जाणून । जन्म घेतला प्रेमगीरीनें । प्रेमरूमूर्ति प्रघटली जाण । सुकृति पूर्ण जगज्जननी ॥ ६७ ॥ भगद्भक्तामध्यें राव । नाम पडले तेचि स्वभावें । आंगीं ज्याचें प्रेमवैभव । संगे देव खेळे पै ॥ ६८ ॥ व्रतबंध होता उदासीन । निरंतर गावे भगवत् गुण । श्राचे वदे नारायण । करावे कीर्तन आदरेसीं ॥ ६९ ॥ पीतवर्ण ज्याचा बाणा । उपनिषधीं वर्णिला जाणा । पीताभास तो बोलति खुणा । श्रुति गर्जना करुनी ॥७०॥ गृहस्थाश्रम ईश्वर मर्जी । स्वीकारीतां तेव्हा संत रावजी । उतावेळ कीर्तनकाजी । प्रेम सहजी आंगीं ते ॥ ७१ ॥ उभे रहाता श्रीकथेशीं । मूर्ति ठसावे मानसीं । नमन करुनी सारंगीसी । हृषीकेशी स्मरावा ॥ ७२ ॥ श्रोतियाशीं विनऊन । टाळी वाजविती सर्वांकडून । करावे आवडी नर्तन । प्रेमोद्दीपन होत शरीरीं ॥ ७३ ॥ करुणापर अभंग ह्मणता । त्या व्हावी रुक्मीणीकांता । घेउनी संगे सकळसंता । निघती तत्वता राउळांतुनी ॥ ७४ ॥ गरूडाशी टाकुनी मागे । कीर्तनीं प्रगटती श्रीरंग । रावजीसाधु आत्मरंग । धन्य भाग्य तयाचें ॥ ७५ ॥ रामायण श्रीभागवत । करीती त्याचा प्रेमळ अर्थ । गोकुळ अक्षराते वदत ।

नेत्रीं स्रवत प्रेमधारा ॥ ७६ ॥ अनुकार येतां कृष्णराधेचा । विसर पडावा देहाचा । भाव करुनी तें चि साचा । बोलतां वाचा तन्मय होउनी ॥ ७७ ॥ मग तेथें उर्णीव काय । गोपिका हरी होतसे स्वयें । कीर्तनसमाधी ते होये । असोनी देह विदेहस्थिती ॥ ७८ ॥ आबाळ-वृध्दां यथाससमाधी । भगवत्स्वरूपीं निमग्न बुध्दी । तो चि ह्मणावा कीर्तनविधी । आत्मसिध्दी जिये ठायें ॥ ७९ ॥ नातरी ते शिश्नोदर-पाळनार्थ । हिंडती प्राणी जग भोंदीत । नाम विकोन द्रव्य घेत । जाळे सत घरोघरीं ॥ ८० ॥ टिळे टोपी गळा माळ । देवपूजेचें मोठें गदाळ । उपदेश देउनी घेती कवळ । कैचे सोंवळे आपाशीं ॥ ८१ ॥ रांडापोरेंगधड्यादासी । अनुग्रह देती जाउनी त्यांशी । कैफ चारुनी ग्रह्मशी । दाविती नेत्राशीं टखरखाट ॥ ८२ ॥ कोंकणामधीं बावळी जन । देव ह्मणविती आपणालागून । दृष्टांत कृष्णाचा घेऊन । सेविती पूर्ण विषयाते ॥ ८३ ॥ माळ टाळुनी कथा करीती । अमूक वैका चेळ ह्मणती । नरनारी भुलोनी जाती । द्रव्य देती कर्ज काढुनी ॥ ८४ ॥ असो ऐसे दैत्यांश । कलींत ह्मणविती महापुरुष । घेउनी तेणें सतवेश । केला नाश जगहिताचा ॥ ८५ ॥ यालागीं देवाश श्रीधावर । तें चि जाळे गोपाळ साचार । कलींमध्यें वैष्णववीर । साधु थोर प्रेमळ ते ॥८६॥ तयांतीळ हें रावजीबावा । प्रेमसिंधु पुरुष बरवा । ज्याचे कीर्तनीं प्रेम सर्वा । आवडे देवा कथा त्याची ॥ ८७ ॥ गोपाळपुरीं तयाचा मान॥ काळा न करीती तपाविणें । वस्त्र ज्याचें पीतवर्ण । अवतार पूर्ण प्रेम-गीरीचा ॥ ८८ ॥ प्रेमगंगा प्रेमगीरींतून । वाहतसे पाहर रावजी पूर्ण । ज्ञानवैराग्य तळपत मीन । भक्तीजीवन त्यामाजी ॥ ८९ ॥ जगदुरित मळ हरावया । गंगा वाहे कीर्तनठाया । दर्शनें निवाळी त्रिनापकाया । नमन तया प्रेमव्यासी ॥ ९० ॥ पुढें चरित्र नामाजीचें । कथविती सिंधस्वामी वाचें । श्रवण करीता श्रोतियाचें । पुरे मनाचें निजकोड ॥ ९१ ॥ सिंधचि उभा समचरणीं । जानकीनाथ कोदंडपाणी । विठ्ठलनाम धारण करुनी । राहिला येउनी पदासी ॥ ९२ ॥

भक्तमंजीरी राजारामी । वाहतसे त्या पादपद्मीं । देहभाव गेळी ऊर्मी । पुजा नेहमी निरंतर ॥ ९३ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । भळर्कप्रेमरावजीसंत । जाहाळे चरीत्र येकाध्याई ॥ ९४ ॥ ॥ ध्याय ॥१॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ अनु० अ० ॥ ९३ ॥ समाप्त ॥

## अध्याय ९४

### — त्रिविध लीलासंत —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरू पुराणपुरुषा पडशास्त्राची सौरसा । वेदमूर्ति तू परेशा । श्रीसिध्येशा कृपाराशी ॥ १ ॥ भक्तचरीत्रें नानाकथा । आवडती तुला पंढरीनाथा । बहु आख्यान भारत गीता । प्रिय सर्वथा ते तुज हरी ॥ २ ॥ जय जय आदि निरंजना । निर्गुण निरामय आत्मरमणा । स्वानुभूती मोदसदना । चिद्घना श्रीस्वयंजोती ॥ ३ ॥ स्वात्मप्रकाशदिनकरा । ज्ञानाज्ञान सकळविकारा । दिनरजनीशीं आधारा । तूंचि खरा सर्वत्र ॥ ४ ॥ भूमीपासुनी आकाशांत । स्वयमेवचि वर्तत । जडअजडा चेववीत । लीला अनंत रघुराया ॥ ५ ॥ आवघियासी चाळक । अलिप्तपणें वसशी देख । वर्णावया सहस्रमुख । वाणी निःशंक न पुरे ती ॥ ६ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । चौथे जे महाकारण । तयाशी ते अधिष्ठान । निखीळ परीपूर्ण तू आत्मया ॥ ७ ॥ तुजविणे पाहातां काहींच न घडे । राहाशी कर्तुत्वा पैलीकडे । अक्रिय आरुप कानडे । ठावे न पडे शब्दाशी ॥ ८ ॥ याळागीं बरे हेचि आता । मौनें चरणीं ठविजे माथा । बोलवा स्वामी संतकथा । सिध्दनाथा गुरुवर्या ॥ ९ ॥ चरित्ररूप सरीतापति । कल्पतरू कथा मूर्ति । नाना आख्यानकीर्णे गभस्ति । अवतरला जगतीं तो शोनक ॥ १० ॥ वर्णावया ती लीळा । हृदय भूमिके अंकुर फुटला । कृपाजीवन घालिता तयाळा । वाढला

सगळा कथनवृक्ष ॥ ११ ॥ भक्तिज्ञानवैराग्य । पत्रेंपुष्पेफळें सांग ।
रस त्यांतील अव्यंग । सेविती भाग स्वानुभवी ॥ १२ ॥
परिसोनी विनंति जानकीवर । कथाभाग वदविती सार । श्रवण करीता
तें आदरें । सरे येरझार जन्माची ॥ १३ ॥ आठवा भागवत
शौनकरूपी । जन्मला सत्कथा वर्णावयासी । देह धरीला ज्याचें कुशी ।
पुण्यराशी धन्य ते ॥ १४ ॥ नाभाजी ऐसें ठेविलें नाम । हिंदुस्थानी
विप्रोत्तम । गाता तयाचें जन्मकर्म । निष्कर्मपद पाविजे ॥ १५ ॥ उपजतां
चि बाल्यदशेतें । भगवत्भजनीं रंगले चित्त । खेळ खेळतां मुखातें ।
कीर्तनातें उभे राहावें ॥ १६ ॥ श्रोते करुनी अवघे शिष्यु । कथा करणें
अति सरसु । वाचे स्मरावा रुक्मीणीईशु । बोतिली मुस भक्तीची
॥ १७ ॥ ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम । यथापद्धति अनुक्रम । भूतदया सहजी
प्रेम । चाचला धर्म अतिथीपुजा ॥ १८ ॥ अन्नदान सर्वांभूतीं । पंढरीची
अत्यंत प्रीती । श्रीगुरुकृपें अनुभवस्थीती । रंगली वृत्ति पांडुरंगी ॥ १९ ॥
निरंतर ध्याई पद्मनाभा । न विसंबे कदा संत नाभा । आनंदाचा पूर्ण
गाभा । ज्ञानप्रभा ज्या आंगीं ॥ २० ॥ प्रतिसूर्य सद्ब्राह्मण । शौनक
अवतार जो का पूर्ण । बोधप्राचीस उगवला जाण । तेथें कांणें सद्विच्यार
॥ २१ ॥ नानातीर्थें नाना देश । स्यानें पाहीलीं विशेष । परी न होये
संतोष । योगाभ्यास जरी केला ॥ २२ ॥ मग येउनी पंढरीत ।
पूजीयेला श्रीअनंत । जाणुनी हृद्गद रमाकांतें । आज्ञापीत निजदासा
॥ २३ ॥ साधूचरीत्रे वर्णिल्याविणे । कदा न पडे समाधान ।
संत माझे आत्मे पूर्ण । गाई गुण तयांचे ॥ २४ ॥
आज्ञा करीतां कृपेनें ऐशी । स्वमुखें आपण हृषीकेशी । आनंद जाला
बहु मानसीं । नाभाजीसी ते वेळे ॥ २५ ॥ प्रसादार्थ पसरीता हात ।
तुरा दिधला पंढरीनाथें । मुद्दा करुनी प्रणिपात । आरंभिला ग्रंथ
तेथें चि ॥ २६ ॥ हिंदुस्थानी परम मिठी । भाषा जयाची फार
गोमटी । जीवशिवासी पडे मिठी । ऐकता गोष्टी त्या सत्कथा ॥ २७ ॥
धाव्या प्रबंद अनेकरीती । वर्णन केल्या प्रेमोक्ती । तेणे फायदी

विश्रांति । निरंतर गाती भगवत्यश ॥ २८ ॥ रात्रंदिवस तो चि धंदा । वृत्ति निमग्न वैष्णवपदा । तिष्ठती द्वारीं मुक्ति सदा । सहजीं संपदा ज्ञानाची ॥ २९ ॥ परी ती माया येकदेशी । नाही गती सर्वत्राची । याळागी कळवळे शौनकऋषी । धरीती जन्मासी आणीक तै ॥ ३० ॥ देहवस्त्र टाकुनी जीर्ण । नामाजीनें त्या घेतलें नूतन । महिपति नाम स्वीकारून । जाहाले उत्पन्न सद्विप्रकुळीं ॥ ३१ ॥ गर्भीच असतां मातेसी डोहाळे । भक्षण करावी तुळशीदळें । उसणत उठावे भजन प्रांजळ । ह्मणे विठ्ठल वेळोवेळां ॥ ३२ ॥ संततीर्थे सेवन करावा । आवडी तये जननीहृदया । साधु देखल्या लागे पाया । निर्मळ जाया पवित्र ती ॥ ३३ ॥ नवविध भक्ति नऊ मास । पूर्ण होता त्या गर्भास । प्रसवली माये पुत्रास । आनंद विश्वास जाहाला तो ॥ ३४ ॥ नानाप्रकारें करुनी दानें । उभारील्या गुढ्या तोरणें । मिळाले गणक सहजी ब्राह्मण । जातक पूर्ण वर्णीयले ॥ ३५ ॥ नाम ठेविलें त्या महिपती । भक्तराज तो प्रेमसंपत्ति । रंगीं स्वभाव ज्ञानदीप्ती । व्रतबंध करीती सप्तवर्षी ॥ ३६ ॥ जन्मांतर योगें कलत्र । प्राप्त जालें तें हि पवित्र । दिवानिशी पद्मनेत्र । ध्यावी स्वतंत्र हरी सावळा ॥ ३७ ॥ सद्गुरुकृपा होता वरवी । निज अनुभव घेतसे चवी । हृदयाकाशीं उगवला रवि । जाहाली सर्व येकात्मता ॥ ३८ ॥ संचित जळाले ज्ञानाग्नीत । क्रीयमाण पूर्वप्रवाहे घडत । प्रारब्ध देहा भोगवीत । साक्षभूत आपण तया ॥ ३९ ॥ सुलीनदशा अंतरबाह्य । आपआपणा न्याहाळिताहे । पिंडब्रह्मांड कैचे काय । असोनी काय विदेहस्थीति ॥ ४० ॥ इयापरी भक्तिप्रेम । धन्य धन्य तो भागवतोत्तम । पंढरीचा पूर्ण नेम । मेघःश्याम भजावया ॥ ४१ ॥ कुळधर्म सारा हा चि येक । पांडुरंगीं चित्त ऐक्य । न सेवी कदा अन्न उदक । जेवि च्यातक मेघाशी ॥ ४२ ॥ तनुमनधनेशी अनन्य । अर्पणी केला नारायण । अहर्निशी होतसे भजन । करणें कीर्तन नेमेसी ॥ ४३ ॥ धन्य साधु महीपतिबावा । प्रेमसुखाचा जो बोलावा ।

पंढरीसी जाता देवा । भावडे जीवापरता तो ॥ ४४ ॥ प्रेमळ अभंग स्वकाव्योक्ती । उंचस्वरें गाता महिपति । डोलती तेव्हा रुक्मीणीपति । प्रगट होती कीर्तनांत ॥ ४५ ॥ मग त्या कथेची अद्भुत शोभा । हरी जेथें प्रत्यक्ष उभा । भक्तवृंदे निरंतर सभा । अर्थगर्भा कोण वर्णी ॥ ४६ ॥ कोणी येक दिनी संतमेळी । विटेवरी उभे श्रीवनमाळी । महिपतिकडे दृष्टी गेली । करांगुळी धरीली हाते ॥ ४७ ॥ ह्मणती साधवा शौनका । जीवा तारक तू चि नौका । चरीत्रभाग करुनि नीका । लावी लोका संतभजनीं ॥ ४८ ॥ भक्तयशाची उभवी गुढी । प्राणी पाववी पैलथडी । कथामृताची तुजला गोडी । सेवेसी परवडी सुत वदने ॥ ४९ ॥ तरी तो स्वभाव करुनी । प्रघट । भरी श्रोत्याचे श्रवणसंपुष्ट । नलगे करणें दुजी खटपट । लागे मिष्ट संतलिळा ॥ ५० ॥ आधींच अवतार कथानिधीचा । वरी प्रसाद श्रीहरीचा । नामाजी अंश महीपती साचा । खवळला तयाचा प्रेमभाव ॥ ५१ ॥ तात्काळ वंदोनी श्रीरामचरणा । नमस्कार घातिला साष्टांग जाणा । वंदन करुनी साधुजना । विनविला राणा पंढरीचा ॥ ५२ ॥ ह्मणे संतचरीत्रें प्राकृत । करीन तयाचे जे जे ग्रंथ । श्रवणपठणें करीता जगाते । हरावें दुरित तयाचें पै ॥ ५३ ॥ प्रासादिक वाचा रंग । साध्या गोष्टी कथाभाग । तेथें तुवा श्रीरंगें । करावें आगें निर्विघ्न ॥ ५४ ॥ मग अभय देता श्रीभगवंते । आरंभिले सद्ग्रंथ । संतचरित्रें परम अद्भुत । वर्णिले समस्त वैष्णवगण ॥ ५५ ॥ दृष्टांत साहित्य फार । रचिले कथाभाग मंदिर । स्थापिला आंत रुक्मीणीवर । ध्यान सुंदर परमात्मा ॥ ५६ ॥ चतुर्वेदात्मक च्यार ग्रंथ । निर्मीयेले महीपति संत । प्राकृतवोव्या सुनिश्चित । निर्मळ अर्थ करुणारस ॥ ५७ ॥ न धरी अध्यात्माची चाड । सप्रेमता काव्य जाड । वाचिती प्राणी सावडें । वाटे गोड आबाळ वृध्दा ॥ ५८ ॥ संतीं प्रेम नामीं निष्टा । नाहीं आणीक दुजी चेष्टा । पांडुरंगीं भार मोठा । मोडीला वाटा शुष्कज्ञानाचा ॥ ५९ ॥ च्यार ग्रंथ ऐशापरीचे । महिपतिस्वामींनीं केले साचे ।

श्रवण पठण करीता वाचे । वैकुंठीचे सोपान ते ॥ ६० ॥ पदे अभंग करुनी अनेक । तोषविला यदुकुळटिळक । भक्तिमार्गा लाउनी लोक । घरती सुखें स्वानंदीं ॥६१॥ नित्य भजनीं प्रेमोछाहा । हारविला जीवाचा तापत्रयदाहा । निवारीले वैरी कामादिक साहा । जगीं पुरुष हा धन्य महिपति ॥६२॥ आतां गहिनीनाथ गोरक्षशिष्य । तयाचा अवतार जाहाला विशेष । ते कथा ऐकता सुरस । हरे निशेष पातक पै ॥ ६३ ॥ प्रेमज्ञान ज्या अंतरीं । ब्राह्मण गौड सदाच्यारी । जन्म घेतला तया उदरीं । पाहिली वरी सोय भक्तीची ॥ ६४ ॥ भक्त अळंकार जानकीवरा । तयामध्ये गहिनी हिरा । याळागी ह्मणती जगा सोइरा । अवतार खरा नाथाचा ॥ ६५ ॥ सावताचे वाडीजवळ । ग्राम ते प्रांजळ । योगनिष्ट ते जन्मले । सौंदर्य मळे तेजस्वी ॥ ६६ ॥ उपजताचि नेनी मुद्रा । महास्थीती जेवि फर्णेद्रा । ते काय कळे जना क्षुद्रा । नाहीं निद्रा ह्मणती तया ॥ ६७ ॥ नासीकाग्रीं सदा दृष्टी । वसे आंगीं ज्याचे पुष्टी । वासनेची अखंड तुष्टी । नेणती गोष्टी इतर ते ॥ ६८ ॥ भूतबाधा जाली वाटे । जनकजननीसी होती कष्ट । आंगारे लाविती तया स्पष्ट । संशय वरीष्ट शिरला मनीं ॥ ६९ ॥ तव अकस्मात अवधूतवेश । आला सिध्द तद्दर्शनास । सागीतले सर्वास । मायबापास तेवेळे ॥ ७० ॥ जन्मला उदरीं योगीराणा । आशंका चित्तीं कांहीं नाणा । सांगुनी पुढील कर्तृत्व खुणा । तेथे चि जाणा अदृश्य जाहाला ॥ ७१ ॥ मग दचकले सारे मनीं । न विसंबे बाळा कदा जननी । दाटला पान्हा सहजी स्तनीं । उतरी करुनी लोण ते ॥७२॥ सोहिरा न पाहातां क्षणेक । वेडी होये माता देख । बाळलीळा करी कौतुक । संतनायक योगी तो ॥ ७३ ॥ आठ वर्षे होती जाहाली । मुंजीबंधन तयेवेळीं । योगसिध्दी माळ घाली । लोका दाविली क्रियाते॥७४॥ स्वधर्मकर्म करणें उत्तम । सात्विकाचार वर्तती धर्म । परी अंतरीं वैराग्य परम । भाव निःसीम श्रीगुरुपदीं ॥ ७५ ॥ उपनाम आवे शोभायमान । उत्तरीसी मथाची पार करून । नातरी अच्युतवृक्षाशी जाण ।

नामाभिधान आंबे ते ॥ ७६ ॥ स्वरुपापासून नव्हे च्यूत। याळागी आंबे नामे अच्युत। सोहिरोबा आंबे धन्य संत। अवतार दिसत गहिनीचा ॥ ७७ ॥ अयत ज्ञान गहन ज्याचें। भक्ति वैराग्य पूर्ण साचे। नेणति तया नर काचे। नरकाचे आदणें तें ॥ ७८ ॥ साधुविण नाहीं जगती। जगा न कळे त्याची स्थीती। ढोंग पाहुनी पाठीं लागती। मनीं इछिती चमत्कार ॥ ७९ ॥ इतर जन नारीनर। तैसे दिसती योगेश्वर। परी तयाचें अंतर। भगवत्पर सर्वदा ॥ ८० ॥ जटा असो अथवा नसो। निरंतर प्रेम चित्तीं वसो। आत्मानुभवी मन कसो। बोलणें सोसो जगाचें ॥ ८१ ॥ नाहीं माळमुद्रेचें काम। अंतरीं पूर्ण ज्याचा राम। तया कैचे उरलें कर्म। जाहाळा निष्कर्म योगी तो ॥ ८२ ॥ सहजस्थीती ज्याचें वर्तणें। न देखे डोळा पातक पूर्ण। सर्वांभूतीं येक आपण। द्वैत निर्शन जालें तें ॥ ८३ ॥ ऐसे प्रकारें ब्रह्मनिष्ट। सोहिरोबा आंबे साधु श्रेष्ठ। जगरीती वर्तती स्पष्ट। भाव निष्ट सद्गुरुपदा ॥ ८४ ॥ नित्य शेताकडे जावें। येईल त्याचें आतिथ्य करावें। सर्वांभूतीं आत्मत्व पाहावें। भोजन द्यावें क्षुधार्थी ॥ ८५ ॥ कोणे येके दिनीं आरण्यांत। बैसले येकावृक्षाखाळते। जवळी असती शेतेभातें। उदक वाहत निर्मळ पै ॥ ८६ ॥ प्रातीवेळसमय आळा। अद्भुत वर्तली तेथें लीळा। योगीयाचा स्वामी पातळा। गोरक्ष ज्याला ह्मणती पै ॥ ८७ ॥ आकाशपथें दैदीप्यमान। नाथजीचें जालें गमन। मूर्ति पाहातां झाकले नैन। तेज पूर्ण दाटलें ॥ ८८ ॥ सद्यपातळ दिव्य पुरुष। भस्मोधूळित आंगीं प्रकाश। प्रसन्नवदन मुद्रा विलसे। आले योगेश त्या ठाया ॥ ८९ ॥ येकत्र होता उभय दृष्टी। हारपोनी गेली सहजीं त्रिपुटी। मंत्रोपदेश कर्णपुटीं। कृपादृष्टी नाथजीची ॥ ९० ॥ पद्मकर तो पडतां शिरीं। देहमान कैचें शरीरीं। ताटस्थता भरीली वरी। नाहीं सरी दुजी तया ॥ ९१ ॥ घेरीला सोयरा मद्भुतानें। अचेतन पडला सहजीं जाण। आळक्षमुद्रा बाणली पूर्ण। कोण जाणे तया सुखें ॥ ९२ ॥ जेथें प्रत्यक्ष गोरक्षाचा। अनुग्रह

जाणा तयासी साचा । ते कोण वर्णी ग्रंथी वाचा । दृष्टांताचा तर्क न चले ॥ ९३ ॥ झडपण जाहाली ब्रह्मग्रहाची । तेणें शुद्धी उरेल कैची । धाउनी आलीं समग्र घरची । देवऋष्याची घरें फिरती ॥ ९४ ॥ नाना प्रकारें करीती उपाय । बोलाउनी ठाकिती द्विपाद चतुष्पाद । परी तो सोहिरा कोणा न पाहे । जाला अकाय काय आसोनी ॥ ९५ ॥ विदेहस्वरूपीं जडली विवशी । तन्मय जाहाला आत्मस्वरूपाशी । रमली वृत्ति स्वानंदाशी । जाल्या दासी मुक्ति त्या ॥ ९६ ॥ असो कांहीं काळानंतर । सावरोनी प्रेमा स्वरूपकार । विचरती महीवर योगेश्वर । बोलती उद्गार मनींचे ॥ ९७ ॥ भोजनाची होता तृप्ती । देकर बाहीर जेथि येती । जना शब्द ते न कळती । धिःकारीती वेडा म्हणुनी ॥ ९८ ॥ परापेक्षा स्नानभोजन । आपल्या अपण देवार्चन । सोहीरोबा संत योगी पूर्ण । शिष्य जाण गोरक्षाचा ॥९९॥ ऐशाप्रकारे स्वगृहीं । खुळ्यासारीखें रहती देही । प्रपंचकार्य करणें नाहीं । निमग्न ठाई चिदाकाशी ॥ १०० ॥ जगदोद्धार तयादर्शनें । हें जाणुनी गोरक्ष मनें । आज्ञापिती शिष्या-लागुनी । भ्रमण मेदींनी करावया ॥ १ ॥ गुप्तरूपें देउनी भेटी । सांगितली दुजी गोष्टी । टीका करी शुद्ध म्हराठी । आत्मराहाटी लावी जगा ॥ २ ॥ छपन्नभाषा गीतेवर । योजील्या श्रीज्ञानेश्वरें । अडचणती नारीनर । दावी सत्वर मार्ग तया ॥ ३ ॥ आधार धरुनी ज्ञानेश्वरीचा । अनुभवेश्वरी बोलीजे वाचा । प्रसाद होता गोरक्षाचा । सोहिरा साचा आनंदला ॥ ४ ॥ ज्ञानदेवाचे करुनी स्मरण । वंदिला भावें बादरायण । आठवी श्रीकृष्ण । अंतःकर्ण कृष्णरूप ॥ ५ ॥ देहबुधी नसतां कांहीं । कृष्णस्वरूप तो चि पाही । ज्ञानेश्वरीशी द्वैत नाहीं । रचिला ठाइ ग्रंथ सुंदर ॥ ६ ॥ अनुभवेश्वरी म्हणती जन । ज्ञानदेवीची प्रतिमा पूर्ण । अनुभव होये श्रवणपठणें । अवलोकन करीती संत ॥ ७ ॥ धन्य सोहिरोबासाधु समर्थ । श्रीगाहिनीचा अवतार सत्य । तारावया जड-जीवाते । जन्मले नाथ भूठाई ॥ ८ ॥ स्वइछे फिरती अवनीवरी । मुद्रा नैनीं शोभती बरी । गृहस्थापरी वस्त्रें शरीरीं । घातिले शिरीं पागोटें

॥ ९ ॥ मुळीचा वाणा फराया प्रघट । तरी लोक सारे लोभाविष्ट । द्रव्यदारा इछीती स्पष्ट । सांडीली यरीष्ट आत्मस्थीति ॥ ११० ॥ याळागी वोळख न देता । जगांत हिंडणें तया नाथा । सोइ दावी जना समस्ता । सोइरा तत्वता नाम शोभे ॥ ११ ॥ अनुभवनिष्ट ज्याचीं पदें । श्रवण-पठणें भेटे मुकुंद । प्राप्त होये निजात्मपद । धरीतां छंद श्रीगुरुपदीं ॥ १२ ॥ अनेक देश फिरोन । जगदोध्दार केला पूर्ण । पंढरीसी येतां जाण । श्रीभगवान आले सामोरे ॥ १३ ॥ धरीला हातीं तो सोहीरा । ह्मणती माझा तूं सोईरा । भेटलासी मज योग्रेंद्रा । सुदिन खरा जाला पै ॥ १४ ॥ आजी घडली पर्वे सकळ । ऐसे बोले श्रीविठ्ठल । देवभक्तासी आलिंगन जालें । नाहीं उरले द्वैत तया ॥ १५ ॥ रंगशीळेवरी भजन । सोहिरोबा ते करीती पूर्ण । विटेवरी जगजीवन । आनंदाने डोलतसे ॥ १६ ॥ कांहींदिवस राहुनि तेथें । तोषविला रुक्मीणीकांत । समर्थ अवतार गहीनीनाथ । सोहीरा ह्मणत जन त्यासी ॥ १७ ॥ नाना-तऱ्हेचीं करुनी पदें । पुजीली जेणें भगवत्पदें । उध्दरोनी जग विविध । स्वात्मपद सेविले पै ॥ १८ ॥ शेवटीं तो संत सोईरा । पांडुरंगमुगुटीं जडला हिरा । तेणें कीरीट दिसे साजीरा । लाजवी दिनकरा स्वप्रकाशें ॥ १९ ॥ हे सोहिरोबा संत आख्यान । भक्तमालिके गुंफीता जाण । ढाळ देतसे ज्ञानतेजानें । शोभे पूर्ण विठलगळा ॥ १२० ॥ पुढें कथा वनखंडीची । श्रीगुरूमाय वदवी साची । श्रवणमननें श्रोतयाची । पुरवी मनाची मनकामना ॥ २१ ॥ मन ते सुखसींधूचा अंश । स्वसुख पाहिजे त्या अविनाश । स्वामी समर्थ श्रीसिध्देश । देती तयास तेचि तया ॥ २२ ॥ राजारामीं स्वतसिध्द । दिधले स्वयें निजात्मपद । उदार तोचि सद्गुरू सिध्द । केले कृत्य सनाथ पै ॥ २३ ॥ भक्तमंजीरीमाळामय । श्रवणें चि पुरवी मनोरथ । त्रिविघविठलसंतकथे । आध्याय समाप्त येक चि ॥ १२४ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनु० अ० ॥ ९४ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

## अध्याय ९५.

### — वनखंडी चरित्र —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिध्दराजा । सीतावल्लभ गरुडध्वजा । रावणांतक नारदभाजा । अधोक्षजा पांडुरंगा ॥ १ ॥ पंढरीनिवासा गोकुळप्राणा । मुनिजनमानसहंसनिधाना । पुंडरीकवरदाना । करुणाघना श्रीमूर्ति ॥ २ ॥ जय जय हरी वैकुंठनायका । योगीयांच्या स्वात्मसुखा । परब्रह्म रविकुळटिळका । सकळलोका आधार तूं ॥ ३ ॥ हिमाळय जामात प्रियोत्तमा । धातात्मजहृदयविश्रामा । अहील्योध्दारक श्रीरामा । कल्पद्रुमा जगद्गुरु ॥ ४ ॥ वृंदावनविहारी गोपीकारमणा । पूतनारी कंसमर्दना । वसुदेवप्रिया देवकीरमणा । संकटहरणा द्रौपदीच्या ॥ ५ ॥ भीमातीरस्थ यादवेंद्रा । वेदबीजा रामचंद्रा । देवदेवा कृपासमुद्रा । ज्ञानवितो मुद्रांकीत तुझा ॥ ६ ॥ अगस्तीऋषीचा अवतार । वनखंडी श्रीयोगेश्वर । कथन वदावा ते साचार । जे प्रियकर आवडते तुझा ॥ ७ ॥ नाहीं वित्पत्ती कळा ज्ञान । न कळती मजला लघुगुरुगण । बोटविसी याचेंतून । करू अर्पण ते श्रीसमपदी ॥ ८ ॥ कर्ता करविता रघुनायक । देहबुध्दी ते मायिक । श्रोतावक्ता तूं चि येक । गाऊं निके संतचरीत्र ॥ ९ ॥ अगस्तीऋषी यजुर्वेदोक्त । जन्म घेतला तेणें कलींत । महानसाधु श्रीभागवत । अवतार धरीत स्वात्मलिळे ॥ १० ॥ विवेकशस्त्र धारण करून । विषयाचें खंडीता वन । वनखंडी श्रीनामाभिधान । शोभे जाण तया पुरुषा ॥ ११ ॥ सावळी तनु उच मूर्त । आजानुबाहू नेत्र आरक्त । कौपान विलसे आंगी विभूत । सदा फिरत वनांतरी ॥ १२ ॥ गळितपत्र सेवन करीती । तपश्चर्या दिवसराती । पांडुरंगीं ज्याची प्रीती । पंढरीसी जाती सवळाही ॥ १३ ॥ नामस्मरणीं रंगली जिव्हा । योगाभ्यास पूर्ण बरवा । ऋणी केले श्रीराघवा । कीर्तनसेवा निरंतर ॥ १४ ॥ सिध्दपुरुष तो वनखंडी । माया काय त्यापुढे उंडी । ब्रह्मचर्याची अतिप्रौढी । वैराग्यपरवडी बहुसाळ ॥ १५ ॥ जगदोध्दार

करावया । संच्यार करणें त्या योगीया । परमपातकी पडतां पायां । तात्काळ तया मुक्त करीती ॥ १६ ॥ जेथें जेथें साधुवृंदें । बनखंडी जाण तेथें प्रसिध्द । करुनी तयाशी येकांत संवाद । स्वछंदे स्नेह करीती ॥ १७ ॥ क्रीडा करणें वनचरात । राहाणें आवडे अरण्यांत । बळोन्मत्त पिशाच्यवत । येता ग्रामांत दाविती चिव्हा ॥ १८ ॥ जग ह्मणती वेडावेडा । काय कळे तया मूढा । स्वरुपानुभवी पुरुष गाढा । राहे झाडाखाळता पै ॥ १९ ॥ अक्षमुद्रा बाबऱ्याजटा । प्रेमरसाचा घेतसे घोटा । संतमेळीं तत्वज्ञ मोठा । हातीं नरोटा शोभतसे ॥ २० ॥ नवविध गोधडी आंगीं साजे । दाटल्या दिश्या तपोतेजे । धन्य ते बनखंडी महाराज । अवतार विराजे अगस्तीचा ॥ २१ ॥ कोणे येके दिनी पंढरीसी । बनखंडी निघाले भगवत्भेटीसी । चिन्हे होती देवाशी । रुक्मीणीशी सांगे हरी ॥ २२ ॥ ह्मणती आजी वाह्यस्फुरण । नेत्र लवतो का गे जाण । कोण भेटेल भगवत्जन । दिसती लक्षणें बहुसाळ ॥ २३ ॥ हास्यवदनें जगन्माता । बोलतसे तेव्हां अनंता । अवघा छंद तुमचे चित्ता । लक्ष संताजवळी सदा ॥ २४ ॥ मोहित केले वैष्णवानीं । ध्यान सदा तेचि मनीं । वदता ऐसें विश्वजननी । चक्रपाणि सांगती तिला ॥ २५ ॥ मी निर्गुण निराकार । मज कैचा पाहाता आधार । सती अर्पिले अवयव सारे । विटेवर केले उभे ॥ २६ ॥ तरी मग तया कैसें विसरावें । कृतघ्नता दोष स्वभावें । यालागी माझे साधूचि देव । नेणे वैभव आणीक दुजे ॥ २७ ॥ सप्रेमें बोलतां पंढरीराणा । अश्रू दाटले रुक्मीणी नैना । तव इतुक्यांत सांगे गरुड वदना । बनखंडी आला आले ह्मणुनी ॥ २८ ॥ मग तो विठळी जाहाला हर्ष । नये ठेवुन करावयास । धावत आले जगन्निवास । बनखंडीस घातली मिठी ॥ २९ ॥ देवभक्ताचा संगम । कोण वर्णी तेथींचे प्रेम । गुरुपुत्र जाणती हे वर्म । इतर अधम भ्रमलेती ॥ ३० ॥ विसरोनी गेले स्वात्मसुखा । अंतरला हरी तयाशी सखा । वतन वाडा माझा पैका । मागती रक्षा परापरीं ॥ ३१ ॥ मेंद गाउनी दावी

गाणें । देखी घेतो सर्वांचा प्राण । स्त्रियापुत्र तेसें धन । आयुष्य पूर्ण गमाविलें ॥ ३२ ॥ असो अज्ञानाची काय कथा । बनखंडो भेटले पंढरीनाथा । जवळ तेव्हां रुक्मीणीमाता । ठेविला माथा तयेपदीं ॥३३॥ सत्यभामा आणि राही । बनखंडीनें वंदिल्या तेहि । हनुमंत गरूड उद्धवादी । नमिले पाहि अत्यादरें ॥ ३४ ॥ संतसमाज अनुक्रमें । आलिंगन घडलें सर्वां प्रेम । धन्य वेळा ते चि परम । स्वात्मधर्म येकात्मता ॥ ३५ ॥ बनखंडीचें ऐकुनी कीर्तन । आनंदले लक्ष्मीरमण । ठेऊन घेतलें प्रीतीकरून । उतरी लोण वेळोवेळा ॥ ३६ ॥ ह्मणती सद्या निर्गुण न सेवी । जन्म घेउनी पृथ्वी । योगमार्ग सिध्द करवी । जग लावी उपासने ॥ ३७ ॥ बनखंडीनें नमून देवा । मागितली चरणसेवा । जन्मोजन्मीं वासुदेवा । राही वस्या हृदयांतरीं ॥ ३८ ॥ परस्परें प्रेमभरीत । भाषण करीती देवभक्त । ते तो गुह्य अत्याद्भुत । तन्मय होत चित्त पैं ॥ ३९ ॥ असो बनखंडीनें विनवोनी हरी । संचार करीती पृथ्वीवरी । कौसल्योद्धार निरंतरीं । संगे मुरारी हिंडतसे ॥ ४० ॥ दर्शन होता जीवातें । प्राणी पावती निजपदातें । धन्य साधु आत्मवेत्ते । बनखंडी समर्थ ज्ञानराशी ॥ ४१ ॥ उपासनेशी लाउनी जन । देहवस्त्र टाकीले जीर्ण । करुनी वेकुंठीं प्रयाण । जाले पूर्ण समाधीस्त ॥ ४२ ॥ उत्साहा होतसे प्रतिवर्षीं । अमूक पक्ष अमूकमासीं । यात्रा मिळती प्रसादासी । दुर्लभ देवासी अन्न तें ॥४३॥ सवालखडीचा करीती रोट । नवल कौतुक पाहा मोटे । मिळती समस्त महानिष्ट । कीर्तन श्रेष्ट करीती ॥ ४४ ॥ धन्य दिवस तो सोनियाचा । तेथे समोदाव संताचा । देव तेथे पंढरपुरीचा । गाती वाचा भगवतगुण ॥ ४५ ॥ पुण्यतिथी बनखंडीची । प्रसिध्द जगीं सर्वत्र साची । उणीव पडेल तेथें कैची । स्वारी देवाची येतसे पैं ॥ ४६ ॥ असो ऐसा भागवतोत्तम । तृप्तो न होये भक्तिप्रेमें । घेतला तेणे आणीक जन्म । ऐका नेमें ते सकळिक ॥ ४७ ॥ यजुर्वेद माध्यांदिनीशाखे । ब्राह्मण सुकृति पुण्यश्लोक । श्रीवुदप उभयता भाविक । असत निके वैराग्यमती ॥४८॥

जाणुनी तयाचें तपवैभव। पोटाशीं आले महावैष्णव। वनखंडी, महाराज स्वयमेव। उदेले देव तया कुळा ॥ ४९ ॥ उपजतां चि बाळपणीं। हृदयाकाशीं ज्ञानतरणी। सदाच्यार वर्ते कोणीं। मुलांत खेळणीं वैराग्याचीं ॥ ५० ॥ ब्रह्मानंदाची केवळ मूर्ति। नाम पडलें वेश्रि जगतीं। व्रतबंध होतां चि विरक्ती। धरीली हाती योगपीठीका ॥ ५१ ॥ अद्वैतशास्त्र संपादून। वेदाभ्यास केला पूर्ण। योगमार्गी झुरे मन। सद्गुरुखूण पाहीजे तया ॥ ५२ ॥ याकागीं चित्तीं निजध्यास। भगवत्ध्यान करीती विशेष। सागुरुपे जगन्निवास। रुक्मीणीविलास भेटले पै ॥ ५३ ॥ दिव्य अनुग्रह होता चि पाहीं। मेळविले स्वसुखा ठाईं। तया दृष्टांत न मिळे कांहीं। शीणली साही वेवादिता ॥ ५४ ॥ मौनावली अठरा च्यारी। सहस्रमुखाची नाहीं थोरी। मजदीनाची काय उरी। येक वैखरी वदूं ते ॥ ५५ ॥ नेणीवसहीत जाणीव गेली। क्षर अक्षरें मावळली। तूर्य अवस्था विरोनी ठेली। स्वानंदजळीं लवणापरी ॥५६॥ अनुभवसरीतेशीं येता पूर। देखणा बुडाला तेथें खरे। लाटा धावती चैतन्य नीर। नमस्कार तयेगंगे ॥ ५७ ॥ ब्रह्मानंदडोहामाजी। ब्रह्मानंद ते निमग्न सहजी। धन्य धन्य स्वामी गुरुजी। स्वतेजीं मेळविले ॥५८॥ आधीं च अवतार वनखंडीचा। अगस्तीरूपी समर्थाचा। वरी प्रसाद सद्गुरूचा। काय वाच्या वदूं ते ॥५९॥ सुवर्णाचा आळंकार। तेथें जडले दिव्य हिरे। श्रीमंते घालिता आंगावर। चमत्कार तेवि पै ॥ ६० ॥ दृष्टांत देणें येकदेशी। अज्ञान जना कळावयासी। श्रीगुरुसमर्थ दयाराशी। आपुलेपणासी मेळविती ॥ ६१ ॥ ब्रह्मानंदयावा ब्रह्मपदीं। ब्रह्मरूप जाले त्रिशुधी। सेवेठाईं सद्गुरुपदीं। जडली बुधी येकसरा ॥ ६२ ॥ गृहस्थाश्रम तो नावडे। भक्ती प्रेम चि ज्या आवडे। मन जाहाले स्वरूपीं वेडे। निरंतर बुडे आनंदजळीं ॥ ६३ ॥ जगीं राहिला योगमार्ग। विषयासाठीं भीक मागे। रतिसुख इछीती भोग। नेणती सांग अज्ञान जन ॥ ६४ ॥ येतद्वीपईं ब्रह्मानंद। कळवळले श्रीदयाकंद। योगमार्ग दाविती शुध। विचरती प्रसीध वायूकीया

॥ ६५ ॥ नातरी तया पूर्ण साधवा । योग साधनी फायसा देवा । उध्दरावया जडजीवा । पंथ बरवा सिध्द केला ॥ ६६ ॥ स्वभाव मुळीचा अरण्यवासी । येकांती राहाणें प्रिय ज्यासी । गुंफा बांधउनी नदीतीरासी । योगविलासी राहाती ते ॥ ६७ ॥ गीतेमध्ये अर्जुनाते । स्थळ सुचविले श्रीभगवंतें । तैसी जागा पाहुनी निर्वांत । बैसती स्वस्थ योगीनाथ ॥ ६८ ॥ बादरायणसुतासारिखे । किंवा गंगातनय देख । ध्यान शोभे अतिसुरेख । सेविती सुख अचळ पै ॥ ६९ ॥ ब्रह्मचर्य वीराजमान । यातात्मजापरी कौपीन । श्रवणीं रुद्राक्षभूषणें । छाटी पूर्ण आंगावरी ॥ ७० ॥ कुसुमाहूनी हळुवट । बोलणे परमीत योगनिष्ट । हिंदुस्थानीभाषा मिष्ट । संस्कृत वरीष्ट वदणे सदा ॥ ७१ ॥ राजहटक्रीया प्रखर । आसन करणें बहु प्रकार । पृथ्वीपासुनी उर्ध्व अधर । योगेश्वर विचरती पै ॥ ७२ ॥ सहस्त्रदळी सुषुम्नामार्गी । चक्रभेद करुनी वेगीं । क्रीडा करीती स्वात्मरंगीं । धन्य जगीं महानंद ॥ ७३ ॥ त्रिकाळविधी करणें स्नान । पद्महर समाधीस्त आपण । तृतीयप्रहरीं जना दर्शन । करुनी मापण निववितीं जीवा ॥ ७४ ॥ युक्त आहार सेवन ज्याचे । भगवान बोलिले तेचि साचे । वर्तणे सदा नेमाचे । अधीक कैचे अम्रोदक ॥ ७५ ॥ घृतवोदन कपिळादुग्ध । हेचि नित्य भक्षण शुध्द । घेणें नाहीं पदार्थ विविध । केवळ प्रसीध्द परमीत ती ॥ ७६ ॥ अष्टांगयोग जीयापासी । सिध्दी होउनी राहिल्या दासी । न पुसती कदा त्यासी । स्वरुपासी रममाण पै ॥ ७७ ॥ कुशासन मृगाजीन । व्याघ्रांबर शोभे पूर्ण । वरुते निकट कंबलासन । वृंचि निकट महानंदीं ॥ ७८ ॥ महानंदयोगीराज । दैदीप्यमान मूर्ति सतेज । बनखंडीचा अवतार सहज । भागवत विराजे अगस्ती ते ॥ ७९ ॥ योगधर्म स्थापावया । जन्म घेणें त्या योगीया । मानवरूप धरुनी काया । भूमीठाया विचरती पै ॥ ८० ॥ भूतमात्री पाहाणें सम । अंतरबाह्य आत्माराम । ऋणी केला मेघश्याम । बहुत प्रेम पदरींचें ॥ ८१ ॥ पिंडब्रह्मांड सोज्वळ । पदरपुर ते चि केवळ ।

परमहंस श्रीघननीळ । वीट निर्मळ अर्धमात्रा ॥ ८२ ॥ स्वयंज्योति योगफळा । रुक्मीणीमाये ते वेल्हाळा । तुर्यवृत्ति राही प्रबळा । प्रकृति वेगळा अपांग ॥ ८३ ॥ इडानाडी चंद्रस्वामीणी । सोळासहस्र त्या कामीनी । भावपुंडरीक अनुभवमुनी । चक्रपाणी निज आत्मा ॥ ८४ ॥ सन्नाथी ते चंद्रभागा । नित्यस्नान तये जागा । वाळुवंट चिन्मयअंगा । कीर्तनरंगा अनुहातध्वनि ॥ ८५ ॥ षट्चक्राचा करीतां भेद । प्रदक्षणा तीच शुध्द । जिकडे तिकडे ब्रह्मानंद । आप आपणा ॥ ८६ ॥ ऐशापरी पंढरीत । ब्रह्मानंद योगी स्थीत । पांडुरंगीं रंगलें चित्त । नाहीं द्वैत उरलें पै ॥ ८७ ॥ धन्य भागवत योगीराणा । वनखंडी तो आगरती जाणा । जगदोध्दारी वर्ते पुन्हा । नामाभिधाना ब्रह्मानंद ॥ ८८ ॥ ब्रह्मानंद जनीं प्रगट । करुनी दाविली निजपदवाट । झाडीले सकळ विकार काटे । उभविली स्पष्ट भक्तिध्वजा ॥ ८९ ॥ मेइल आतिथ्य पूर्ण । ज्ञानामृताचे करविती भोजन । योगाभ्यासी शिष्य निपुण । केले पावन बहुत पै ॥ ९० ॥ वेदांत वाचक बहिर्मुख । घेती दर्शना धरुनी तर्क । दवडुनी त्याचा अज्ञानकळंक । लाविती सुखे योगमार्गी ॥ ९१ ॥ माघकृष्ण येकादशी । विजईनाम संवत्सराशी । छेपन्नशके सत्राशी । भेट दीनासी जाहाली मज ॥ ९२ ॥ दत्तात्रय-स्थान औदुंबरी । आकलखोप नामे नगरी । श्रीकृष्णासरीतातिरी । दोनप्रहरी अभीजीत वेळा ॥ ९३ ॥ पंक्ति प्रसाद फळ आहार । होता फळले जन्मांतर । सद्गुरु सिध्द कृपाकर । योगेश्वर दर्शन तें ॥ ९४ ॥ योगेंद्राची होता भेटी । आनंदाची तेथे लुटी । अनंतपुण्य असल्या गांठीं । तरीच दृष्टी पडती ते ॥ ९५ ॥ वियोग काढुनी जनाचा । भगवंती योग करीती साचा । अघटीत महिमा तयाचा । काय वाचा वदूं ॥९६॥ कायावाच्या मनेसीं । वृत्ति चरणीं केली दासी । ब्रह्मानंद कृपाराशी । नमन तयासी पुनः पुनः ॥ ९७ ॥ पुढें राजा रुक्मांगदाचा । अवतार भर्तृहरी साचा । आख्यान तयाचें वदेल वाचा । सद्गुरुचा आज्ञांकित ॥ ९८ ॥ समर्थ स्वामी सिध्दनाथ । प्रत्यक्ष स्वये श्रीहनुमंत । रामदास

जगविख्यात । पद्महस्त शौरी तोचि ॥ ९९ ॥ राजारामीं रमऊन । सिध्दचि सदा ह्रदई पूर्ण । संतवराचे वदविती गूण । वर्तमान भूत-भविष्य ॥ १०० ॥ ते हे कथन भक्तमाळा । ब्रह्मानंद मणी घोंवीला । त्रिविध जन्म कथन केला । समर्पिला श्रीसमपदी ॥ १ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । बनखंडी ब्रह्मानंदकथे । आध्याय समाप्त परीपूर्ण हा ॥ २ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनुक्रम अ. ॥ ९५ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभमस्तु ॥

---

## अध्याय ९६

### — भर्तृहरी-चंदुलाल चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसिध्दरामप्रसन्न ॥ जय सद्गुरुसिद्ध सर्वज्ञा । परज्योति परापरज्ञा ! वेदबीजा महामान्या । निज निर्गुणा आत्मस्वरूपा ॥ १ ॥ बोलो जाता शब्दाशी । तयाते हरी तूं नातळशी । महत्तत्वापर असशी । निधर्म विळासी निरालंबा ॥ २ ॥ समजोनी ऐसे उगी राहावे । तरी तुझीये योगचेष्टते आघवे । शास्त्रादिकी श्रवण करावे । यश वदावे हे ईछा ॥ ३ ॥ गुरुत्व गरुडा उड्डाणशक्ति । शलभातरी मदगति । घोवाळिजे फाडवाती । श्रीरामरती भक्तियोगे ॥ ४ ॥ की अजुळीये अपांपति । निजभावे अर्घ्या देती । तेवि जाणा सीतापति । करी स्तवनोक्ति सप्रेमे ॥ ५ ॥ श्रीरुक्मांगदराजा महाभागवत । जन्म घेतला तेणे कळीत । ते आख्यान बोलवा माते । आवडे तुम्हाते जे कांहीं ॥ ६ ॥ विज्ञासी परीसोनी दाशरथी । पंढरीनिवास श्रीरघुपति । ह्रदयस्थ होउनी कृपामूर्ति । निजस्फूर्ति वदवितसे ॥ ७ ॥ अमृत गोड पवित्र कथा । श्रवणे चि हरे भवव्यथा । पठणी नेम नित्य धरीतां । पाविजे अर्था सकळ पै ॥ ८ ॥ भक्तिप्रेम भोगावया । आवडी तया वैष्णवराया । जन्मले भागवत मूढावया । गुण गावया हरीचे ॥ ९ ॥ प्रल्हादादि भगवत्‌भक्त । निर्गुण सोडुनी

देह धरीत॥ पढरीसी कीर्तन करीत। आलिंगन देत पांडुरंगा ॥ १० ॥ अकरावा रुद्र चिरजीवमेळी ॥ अवतार घेणें भूमंडळीं ॥ तरी भागवत अकरावा भूतळी । धेईन खोळी मी देहाची ॥ ११ ॥ प्रेमसुखाचा लाहो घेऊन । पढरीनाथ भजन पूर्ण । मनीं इछा हे धरून । पावला जनन राजेंद्र तो॥ १२॥ नाम शोभे मर्तृहरी । सखा केला जेणें हरी । स्मरतां ज्यासी दुरीत हरीं । मव सव्हारी मदता मुखे ॥ १३ ॥ राजचिन्हें सोदर्य विशेष । निरतर गावे भगवत्‌येश । याचक येती ते द्वारास । पूरवी आस तयाची पै ॥ १४ ॥ काम ज्याचे जो अंतरीं । ते ते पुरवी भर्तृहरी । दरिद्र नाहीं ज्याचे नगरीं । दिगांतरी पळविले तया ॥ १५ ॥ गाईब्राह्मणपालनार्थ । राजा उत्पन्न जाला समर्थ । प्रजा सुखी सर्व असत । पर्जन्य पडत ययाकाळीं ॥ १६ ॥ न्याय निती मर्यादा॥ वैराग्य आंगीं ज्याचें सर्वदा । असोनी सकळसपदा । हरीच्या पदा भजे जो ॥१७॥ देवगुरुसारीखी वाणी । काव्यशक्ति अद्भुत जनीं । ग्रंथ केला जेणें म्हणी । शतक करुनी त्रिविध ते ॥ १८ ॥ भर्तृहरी धन्य नृपति । लोकत्रई ज्याची कीर्ति । वैराग्यशतक ऐकुनी मती । यावे विरक्ती तात्काळ ॥ १९ ॥ तैसे चि नीतिशतक ज्याचे । सारस्य जे पूर्ण शास्त्राचे । शृंगार तेही म्हणता वाचे । कामीक साचे सुखावती ॥ २० ॥ परी ते साधका नोव्हे नीट । वैराग्य पियुष्य प्यावा घोट । तरी च चुकेल विषय आरीष्ट । चढावा घाट ब्रह्मसुखाचा ॥ २१ ॥ वरी का भर्तृहरीराजीयानें । शृंगार वर्णिला स्वमुखे॰ करून । ऐसा करीता श्रोतिये प्रश्न । लागे सांगणें वक्त्याशी ॥ २२ ॥ पत्नी सुदर त्या भूपतीची । भर्तृहरीराजीयाची । तेजी सीमा साडीली साचि । लावण्याची पुतळी ते ॥ २३ ॥ जरी आथलिया पुरुष निष्काम । पाहाता तयेसी उपजे काम । मजुळ भाषण अति परम । मैना प्रेमे म्हणती तिला ॥ २४ ॥ असो ऐसी मैनाबाई । राजा मोहित तये ठाइ । रात्रदिवस छद हृदई । ध्यान नाही दुजे मनीं ॥ २५ ॥ श्लोक शंभरपर्यंत । वर्णिला शृंगार अद्भुत ।

मुळोनी गेला राजा तेथे । जाहाला अंकित विषयार्थी ॥२६॥ ते नावडे पंढरीराया । वैराग्य उत्पन्न व्हावे तया । येतद्विषइ कारण कार्या । निर्मिले ठाया ऐकुनी ॥ २७ ॥ तये नगरी येक ब्राह्मण । अनुष्ठान करी पुत्रालागून । क्रूरतपे दैवत प्रसन्न । जाली जाण देवी ते ॥ २८ ॥ परी द्विजवराचे कपाळीं । पुत्र नाहीं ह्मणे काळी । अमृतफळ हातात घाली । अदृश्य जाली अमर हो ह्मणे ॥ २९ ॥ विस्मय पाउनी तो विप्र । घरासी आला मग सत्वर । भार्येलागी सविस्तर । सांगे विच्यार समग्र पै ॥ ३० ॥ च्यातुर्य मनी विप्रपत्नीचें । भ्रतारासी बोळे वाचे । ह्मणे अमर राजाचें । शरीर साचे करावे पै ॥ ३१ ॥ तेणे पत्नीचे होईल पाळन । आह्मी काय व्यर्थ वाचून । स्त्रियेचे ऐकुनी वचन । समाधान जाळे द्विजा ॥ ३२ ॥ तात्काळ उठोनी उषःकाळीं । विप्रें तेणें केली आंघोळी । आन्हीक सारुनी सकळी । करकमळीं घेतळे फळ ॥ ३३ ॥ राजसभेशी जाउनी त्वरीत । फळ अर्पिले आशीर्वादार्थ । मंत्र ह्मणूनी अक्षता देत । समूळ वृतात सांगितला ॥ ३४ ॥ अमृतफळ पाहता दृष्टीं । आनंद जाला नृपवरा पोटीं । ब्राह्मणासी ज्याहागीर मोटी । दिधली निकटी तेचिक्षणी ॥ ३५ ॥ भर्तृहरी राजेंद्राचीं । अवघी प्रीति स्त्रियेवरी साचि । अमर करावी तनू स्त्रियेची । इछा मनाची जाहली हे ॥३६॥ घेउनी फळ ते स्वहस्तकीं । दिधलें नेउनी राणीशी शेखीं । सांगितलें अमर हो निकीं । भक्षण करी हे वेळा ॥ ३७ ॥ स्नेहभरीत परमळोभानें । दिधलें गाढ आलिंगन । भर्तृहरी विषयानें । भुलला जाण अतिशयेसी ॥ ३८ ॥ मैनावती राजभार्या । सौदामिनी सुंदर आर्या । कृत्रीम नादे तया हृदया । बोले राजीया मक्षीते ह्मणे ॥३९॥ नेम आहे तो सारीन । करणें मजला तूळसी पूजन । नैवेद्य पुढे समर्पून । अमृतपान करीन पै ॥ ४० ॥ ऐकुनी ऐसें नृपति । संतोषला परम चित्तीं । ह्मणे माझी मानस मूर्ति । मैनावती अमर जाली ॥ ४१ ॥ परी बुध्दी राणीची विपरीत । नीच पुरुषावरी चित्त । फळ तयाशी अर्पित । व्हावयाते अमर पै ॥ ४२ ॥ तोहि रत

दासीशी । फळ दिधलें तयेशी । घेउनी चालीली रस्त्याशी । पाहीलें दृष्टीसी द्विजवरें ते ॥ ४३ ॥ येत होता राजद्वारा । आश्चर्य करी निज अंतरा । फळ मागुनी घेतलें त्वरा । राजेंद्रा आसीर्वाद करी ॥ ४४ ॥ ह्मणे राजीया अनुष्ठानाचें । दवडिलें फळ व्यर्थ साचें । भर्तृहरी बोले वाचे । भक्षिलें तेव्हांच अहो द्विजा ॥ ४५ ॥ मग ब्राह्मणें तें चि फळ । ठेविता पुढें तात्काळ । चाकाटला मनीं भूपाळ । अंतर तापलें स्वभावें ॥ ४६ ॥ शोध करीता सूक्ष्मद्वारें । विलक्षण अवघा विच्यार । परी विषय अतिदूर्धर । राणीचें अंतर न दूखवी ॥ ४७ ॥ फळ भक्षण करुनी आपण । स्त्रियेशी भोगी परमप्रीतीनें । पुढें तियेशी येता मरण । राजा उद्विग्न मानसीं ॥ ४८ ॥ देहबुधी ज्याची भ्रमली । शालेभोवता प्रदक्षणा घाली । गोरक्षाची स्वारी आली । तये वेळीं आकस्मात ॥ ४९ ॥ श्रमरु पाहुनी भर्तृहरी । कृपा आली नाथजी अंतरीं । हातीची टाकिता कठोरी । फुटली निर्धारीं ते वेळा ॥ ५० ॥ मग आपणहि तये भोवते । फिरती स्वयें गोरक्षनाथ । कठोरी कठोरी वाचे वदत । हें देखत राजा तो ॥ ५१ ॥ कठोऱ्या आणुनी दूता-हातीं । अर्पण करी तेव्हा नृपति । गोरक्ष सिध्दी प्रगट करीतो । ते युक्ती ऐकिजे पै ॥ ५२ ॥ येकायेकीं सहस्र जाया । मैनावती सारिख्या काया । भर्तृहरीनें पाहुनी तया । धरीले पाया नाथजीचे ॥ ५३ ॥ जन्मांतरीचा पूर्ण योग । जाहलें मनीं विवेकवैराग्य । गोरक्ष वदती चल मार्गे । दावीन आंगे सद्गुरु आपुला ॥ ५४ ॥ सोडुनी राज्य भर्तृहरी । निघाले गोपीचंदापरी । भजन निजवैखरी । भवतमारी देखीला तो ॥ ५५ ॥ मर्छींद्रनाथजी पडता दृष्टीं । घातली सद्द गळा मिठी । मग ती काय वदू गोष्टी । होतसे वृष्टी आनंदाची ॥ ५६ ॥ मस्तकीं ठेवितां पद्महस्त । राजा जाला समाधीस्थ । अंतरबाह्य आपणा पाहात । सरलें द्वैत येकसरा ॥ ५७ ॥ आधींच अवतार द्रुमांगदाचा । महावैष्णव भागवताचा । वरी प्रसाद मर्छींद्राचा । भर्तृहरीचा भाग्योदय ॥ ५८ ॥ अमर काया हो जाय ह्मणुनी । आशीर्वाद देता श्रीगुरुनीं ।

पाई माथा समर्पुनी । आरंभ अर्चनीं केला तो ॥ ५९ ॥ येकाग्रभावें अनेकविधी । पुजीला मछींद्र दयानिधी । स्वात्मरूपीं रमली बुधी । सरली अवधी जन्ममृत्याची ॥ ६० ॥ जवळग धरत्री । तवळग मत्री । ऐसा वर पद्मनेत्रीं । दिधला स्वतंत्रीं श्रीमछींद्रें ॥ ६१ ॥ तो आनंद काय वदावा । जन्मांतरींचा लाधला ठेवा । उदय जाला भर्तृहरीदैवा । वासुदेवा चिंतितसे ॥ ६२ ॥ भागीरथी तीरासी येऊन । घातिलें जेणें योगासन । सहस्रदळीं निमग्न । मनीं पूर्ण स्थिरावले ॥ ६३ ॥ ज्ञानघनाचें व्याज । भोगावया प्रेम सतेज । देह धारण केला चोज । सविस्तर सहज ऐका ते ॥ ६४ ॥ मारुति अवतार रामदास । की ज्योतिपंत जाले व्यास । चिरंजीव असता भूमीस । अवतारास धरीतो पै ॥ ६५ ॥ तैसे मि येथें भर्तृहरीनें । अमर असता स्वयें आपण । जन्म घेतला प्रीतीकरून । भगवद्भजन करावया ॥ ६६ ॥ ते लीळा अनोपम्य । अनुभवी जाणती वर्म । भर्तृहरी वैष्णव परम । स्वात्मकर्म अवतार धरी ॥ ६७ ॥ असता अमरकायस्थ । स्वीकारी ज्ञाती कायस्थ । चंदुलाल जन वदत । जनविख्यात भूमंडळीं ॥ ६८ ॥ चंद्रापरी निववी जना । स्वतेज ढाळ देतसे जाणा । शोभा पूर्ण नामाभिधाना । जन्मला राणा योगीयाचा ॥ ६९ ॥ उपजतांचि आंगीं स्वभाव । भक्तीपर खेळणें सर्व । मुलें मेळउनी करावा देव । कीर्तन करावें प्रेमेसी ॥ ७० ॥ उदयापासुनी रविबिंब । तेज अधीक तेवि कोंब । अज्ञान तम गेलें लांब । निज स्वयंभ ज्ञानराशी ॥ ७१ ॥ ऐश्वर्य योग जन्मांतर । प्राप्त जाला संपत्तिभर । मरली द्रव्यभांडारें । कारभार सर्वत्र पै ॥ ७२ ॥ पद्मपत्र जळीं जैसें । अलिप्त तेवि वर्तणें तैसें । रंगुनी गेलें भजनीं मानस । लागलें हातास प्रेमसुख ॥ ७३ ॥ राजचिन्हें औदार्यता । ती तो मुळींची आंगीं सर्वथा । याचक द्वारीं नित्य तत्वता । ज्ञाती पहाता सकळिक त्या ॥ ७४ ॥ ऋग्येजुसाम-अथर्वण । चहूवेदींचे येती ब्राह्मण । अनेक शास्त्रें सांगती पुराणें । विद्वज्जन बहुसाल ॥ ७५ ॥ नित्य कीर्तन भजन । अनेकदर्शींचे वैरागर

पूर्ण । नानाविध ज्ञाति जाण । देती दर्शन संत येऊनी ॥ ७६ ॥ योगाभ्यासी तीर्थवासी । पुरश्चरणीं काया क्लेशी । विच्यारांत येती आश्रमाशी । करिती त्यांशीं सतुष्ट पै ॥ ७७ ॥ जें जें पाहिजे जया पदार्थ । चदुलाल अर्पिती त्यांते । धनधान्य अपरमित । वस्त्रें देत अगणीत पै ॥ ७८ ॥ शाला पीतांबर सोवळी । स्त्रियांसी छेणें लुगडी कांळीं । जें जें जयास व्हावें वेळी । तें तें काळीं समर्पिती ॥ ७९ ॥ सर्वांभूतीं आत्माराम । गुरुरूपें जाणीले वर्म । आत्मनिष्ठा नित्य धर्म । नाहीं काम दुजे पै ॥ ८० ॥ प्रातःकाळीं नित्य उठोनी । स्नान करुनी बैसले आसनीं । सदया नाहीं याचक जनीं । गर्जती वाणीं जयजयकार ॥८१॥ खिचडी देणें आबालवृद्धा । मांकार मणग प्राणी विविधा । विषमभाव न पडे कदा । पाहाणें मुकुंदा सर्वांभूतीं ॥८२॥ सस्थानें राघूची । तेथें निष्ठा असत साची । अमहारे नेमाची । पत्रें ग्रामाचीं देती करुनी ॥ ८३ ॥ चंदुलाल भगवत्‌भक्त । भूमंडळीं फाकलीं मात । प्रत्यही येती तेथें संत । हायदराबाजेत नित्य भजन ॥ ८४ ॥ कीर्तनाविण दिवस रिकामा । हे तों न घडे कदा नेमा । विविध पुराण नामी प्रेमा । सर्वोत्तमा आळविती पै ॥ ८५ ॥ अन्नदाना नाहीं गणती । सुवर्णरूपें बहु वाटीती । चदुलाल धन्य क्षीती । निरमय सरस्वती करी मना ॥ ८६ ॥ ठाइ ठाइ अन्नछत्रें । अगाध महीमा तो विचित्र । पुण्य वानिती सहस्र वक्त्र । मौन तंत्र धरीतसे ॥ ८७ ॥ अंध पंगु अनाथ । मातेपरी तया रक्षीत । रोगीयासी औषध देत । पथ्य करवीत बहु युक्ति ॥ ८८ ॥ अतर कोमळ वैष्णवाचे । काय बोलू तें मी वाचें । जेवि स्नेह तान्हयाचें । तेवि मनाचे सौहृद पै ॥ ८९ ॥ मूर्तिमत दया तेथें । विश्रांतीसी आली निरुते । चदुलाल पूर्ण संत । अवतार विलसत रुक्मांगदाचा ॥ ९० ॥ शांतीचा तो मोतींव पुतळा । क्षमा राहिली तपे स्थळा । प्रेमनदीचा जिव्हाळा । ज्ञानकळा आंगीं वसे ॥ ९१ ॥ माहेर नवविध भक्तींचें । बिऱ्हाड ते तो वैराग्याचें । रहाणे सदा आनंदाचें । पूर्ण ज्ञानाचे निजमंदीर ॥ ९२ ॥ चदुलाल

पौर्णिमेचा । चंद्र उदेला बोध पूर्वेचा । याचकमेळीं उडुगणाचा । थाट जवळीचा शोभतसे ॥ ९३ ॥ कीं चंदुलाल पूर्ण शशी । चकोर अतिथी जवळी त्यासी । सेविता कीरणे द्रव्यराशी । सुख मानसीं होय तया ॥ ९४ ॥ अंश महा वैष्णवाचा । रुक्मांगदभागवताचा । प्रताप वर्णिता ग्रंथीं तयाचा । हरे मनाचा मनपणा पै ॥ ९५ ॥ जेथें तेथें अन्नदान । ठाइ ठाइ करविती भजन । ऋणी केला नारायण । रुक्मीणीजीवन परमात्मा ॥ ९६ ॥ पंढरीसी नित्य नैवेद्य । नेमणूक तयाची प्रसिद्ध । अन्नठत्र विख्यात शुद्ध । जेविती सिद्ध साधक पै ॥ ९७ ॥ जे ते प्राणी अन्नार्थी । विद्यापाठक वैष्णवस्वार्थी । भोजन करीती परमार्थी । विगत अर्थी द्रव्यहीन ॥ ९८ ॥ वश्य जया श्रीपांडुरंग । चंदुलालजीचें महद्भाग्य । ग्रहण करी पूजा अंगे । न पडे व्यंग कांहींच ॥ ९९ ॥ अर्चनद्रव्य कस्तूरी केशर । नानाविध अळंकार । मंजरी पोषाग अनेक प्रकार । राज्योपच्यार सर्वही ॥ १०० ॥ निरंतर प्रेम समचरणी । रात्रंदिवस चिंतन मनीं । चंदूलाल धन्य जनीं । चक्रपाणी आवडे जया ॥ १ ॥ जीवाहुनी अतिप्रीती । निजध्यास सदा चित्तीं । मागेपुढे रुक्मीणीपति । तिष्टे निश्चीती त्यापासी ॥ २ ॥ पंढरीचें नाम घेता । रोमांच उठती अंगीं तत्वता । वेश धरी भळता असता । ठेविती माथा तया चरणीं ॥ ३ ॥ संत ज्याचे परम दैवत । कूळधर्म श्रीपंढरीनाथ । दुसरा देव न शिवे चित्त । महाभागवत चंदुलाल ॥ ४ ॥ निघता बाहेर ज्याची स्वारी । विठ्ठल गर्जे निज वैखरी । मग त्या येश कैचे दुरी । बरोबरी श्रीभगवान ॥ ५ ॥ जेवि अर्जून रथावरी । सारथ्य करी पूतनारी । चंदुलालभागवताघरी । स्वये श्रीहरी नांदतसे ॥ ६ ॥ जागृती स्वप्नीं सुषुप्तींत । व्यापिलें तेणें श्रीअनंतें । तूर्यारूप जालें चित्त । देखिला प्रांत उन्मनीचा ॥ ७ ॥ पंढरीसी येता चंदूलाल । सामोरे जाती श्रीविठ्ठल । भजन कडाकाध्वनी प्रबळ । प्रेम गळे नेत्रांतुनी ॥ ८ ॥ देवभक्त मिळतां मिळणी ।

तया; सुखा कोण गणी। रोहिला उगा सहस्रफणी। थकली वाणी वेदाची ॥ ९ ॥ पांडुरंग दृढ ऐक्यता। द्वैत नुरे देवभक्ता। श्रवण कराया वैसती कथा। होती तत्वता चमत्कार ॥ ११० ॥ हरीनें चंदुलालासी पुसावे। अर्थांतर भागवत गौरव। ऐकती गुरुमक्त श्री वैष्णव। प्रेमळ बरवे साधु ते ॥ ११ ॥ ऐसे अनेक चमत्कार। लिहीतां ग्रंथ वाढेल फार। रुक्मांगदाचा अवतार। संत थोर लालजी- तो ॥ १२ ॥ यानंतर श्री सिरधनाथ। मूद्गलाच्यार्यांचें वदविती कथे। श्रोतीं अवधान देतां तेथें। पुरेल अर्थ मनीचा पै ॥ १३ ॥ राजारामीं वैकुंठरमण। हृदई सदा प्रगटायमान। वागेंद्रापासिंध होऊन। बोलवी गुण संताचे ॥१४॥ भक्तमंजरीमालाग्रंथ। श्रवणेचि पुरती मनोरथ। भर्तृहरीचंदुलालकथे। अध्याय समाप्त होतसे पै ॥ १५ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु॰ अ॰ ॥ ९६ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

## अध्याय ९७

### — मुद्गलाचार्य —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु सिद्ध आत्मया। सीतावल्लभा करुणालया। कौसल्योद्भव दशरथतनया। हनुमंतप्रिया जगद्गुरु ॥ १ ॥ जय जय राजाधिराज रविकुळमंडणा। वेदांतसार उपनिषधजीवना। षडाननतात हृदयस्थध्याना। देवार्चना परमेष्ठी ॥ २ ॥ मुनिमानसराजहंसा। श्रीपंढरीक्षेत्रनिवासा। चित्‌स्वरूपा स्वयंप्रकाशा। अविनाशा वैकुंठपति ॥ ३ ॥ जय जय रघुवीर दैत्यहनना। रावणांतक ताटीकामर्दना। बिभीषणस्थापक भक्तपाळना। सुरमोचना पद्मनाभा ॥ ४ ॥ जय जय निरोपम अद्वयमूर्ति। मौनावल्या जेथें श्रुति। शास्त्रें वानितां उगी राहाती। न चले गति अठरांची ॥ ५ ॥ अनंतमुखांचा जो का शेष। तो हि शीणला निःशेष। परी भक्ती हे विशेष। इछी मानस गुण गायया ॥ ६ ॥ तरी त्वदात्मये जीवांचे प्राण। परम आवडते ते संत पूर्ण। तयाचें यशाचे आख्यान।

जे का कारण सकळ कारणा ॥ ७ ॥ जेणें प्राप्त आत्मस्थिती । सकळ-सुखा ते विश्रांती । ते आजी पुरवी मनोवृत्ति । स्वयें श्रीपति आपण पै ॥ ८ ॥ हृदयीं घालोनी आसन । करविती लीला वैष्णवकथन । ऐकतां ते निश्चळमनें । पळे अज्ञान येकसरा ॥ ९ ॥ सूर्योदइं नासे तम । संतस्तवनी निरसे भ्रम । श्रोतावक्ता श्रीसीताराम । जों का सम विटेवरी ॥ १० ॥ भागवतामाजी मुगुटमणी । बिभीषण जों का वैष्णवजनी । चिरंजीवपदवी टाकुनी । अवतार मेदीनी घेतला तो ॥ ११ ॥ ते कथा अत्यंत चोखट । नाशी जन्म मृत्यु घोखट । आत्मसाम्राज्य पायवाट । टळे अरीष्ट भवबाधा ॥ १२ ॥ श्रीमारुति रामदास । चिरंजीवमूर्ति भक्तवतंस । तेहि येउनी जन्मास । आले पंढरीस प्रेम धरुनी ॥ १३ ॥ चिरंजीवपदाचा अभिमान । टाकियेला समूळ जाण । प्राकृतदेह स्वीकारून । करीती भजन साधु ते ॥ १४ ॥ यास्तव महाराज बिभीषणराव । अवतरले स्वयमेव । निजभक्तीचे अंगी वैभव । सहजी स्वभाव प्रेमळ तो ॥१५॥ महाबला-व्य पराक्रमी । मुद्गल खेळणें नित्यनेमीं । तेणेयोगे इहि भूमी । नामस्कर्मी प्राप्त तया ॥ १६ ॥ मुद्गलाच्यार्य साधू श्रेष्ट । कलीमध्यें तत्वनिष्ट । रामभक्त सर्वोत्कृष्ट । अंश स्पष्ट श्रीभागवताचा ॥ १८ ॥ गर्भीच असतां मातेशी डोहाळे । श्रीराम स्मरे सर्वकाळ । देवगृहीं बैसोनी डोळे । झाकोनी निर्मळ ध्यान करी ॥ १८ ॥ शामसुंदर पद्मनेत्र । जवळी भरतशत्रुघ्न सुमित्र । वामांगीं सीता पवित्र । पुढे पुत्र वायूचा ॥ १९ ॥ छत्रचामर विराजमान । वानरमेळा जवळी पूर्ण । वसिष्ठादि ऋषीगण । ध्यान करणें ऐशारीती ॥ २० ॥ नामगजरें उसणत उठावें । अन्न साहाचहूदिवसा खावें । नातरी समाधीस्थ असावें । नऊमास वरवे नवविध ते ॥ २१ ॥ प्रसूतकाळीं उत्छाह जाहाला । मुद्गलाच्यार्य नाम त्या बाळा । जैसी तेज रविमंडळा । बुध्दी प्रबळा तैसी ते ॥ २२ ॥ दिवसोंदिवस वाढतां जाण । व्रतबंध जाला सहजी पूर्ण । मुद्गलद्विजाचे करीतां छम । झाले भगवान ते बेळा

॥ २३ ॥ येकायेकी मंडपांत । तेज प्रगटलें अद्भुत । अक्षता टाकिल्या स्वहस्तें । करीती समस्त नवल पैं ॥ २४ ॥ ध्वजवज्रांचिन्हांकित । पाउलें उमटलीं भूमीते । धन्यधन्य भगवद्भक्त । आले दैवत वैकुंठींचें ॥ २५ ॥ असो लग्न सोहोळा तो वर्णन करींता । सरस्वतीसी ताटस्थता । ब्रह्मीयाचा जेथें पिता । उणे तत्वता काय तेथें ॥ २६ ॥ असो विवाह जालियावरी । पंढरीशी आले भक्तमारी । भजन करीत निजवैखरी । प्रेम अंतरीं ज्याचें पैं ॥ २७ ॥ विटेवरी पहाता घनसावळा । अश्रू पातले नेत्राला । ह्मणती अहो श्रीविठ्ठला । पालट ध्यानाला करणें पैं ॥ २८ ॥ शरच्याप घेउनी हातीं । भेट द्यावी दीनाप्रती । वामांकी जानकीसती । स्वरूपस्थीती प्रगटकरा ॥ २९ ॥ अष्टौभाव उत्पन्न आंगीं । प्रार्थना करीता ऐशी सलगी । भक्तांकीत ते श्रीरंगी । जाले वेगीं श्रीराम ॥ ३० ॥ अतिसुंदर लावण्यगाभा । अनंतसूर्याची आंगीं प्रभा । च्यामर ढाळीत लक्ष्मण उभा । निकट शोभा भरतशत्रुघ्न ॥ ३१ ॥ भूमीतनया मांडीवरी । वेष्टीत मेळा निजवानरीं । जोडुनीया दोनी करीं । नमस्कारी श्रीमारुती ॥ ३२ ॥ दाशरथी मेघःशाम । मुद्गलाचार्य देखिला प्रेमें । मग तो आनंद अनोपम्य । पादपद्म नमीले पैं ॥ ३३ ॥ नेत्रीं श्रवती पूर्ण धारा । चरणीं अभिषेक ज्यानकीवरा । निर्वासना वसन सुंदरा । पीतांबरा नेसविलें ॥ ३४ ॥ किरीट माथा तो चि जाणा । अनुभवसिध्द जडीतरत्ना । तुरा खोविला सचीदघना । प्रेमलक्षणा झळकतसे ॥ ३५ ॥ भरजरीशाल बुंदेदारीं । नवविधभक्ति शोभली वरी । सुमनमाळा ते साजीरी । भक्तमंजरी तुळसीहार ॥ ३६ ॥ वेदांतसार अद्वयज्ञान । लेवविली श्रवणीं भूषण । अलंकार सकळ पूर्ण । सोहं स्फूरणे अर्पीतसे ॥ ३७ ॥ गंधाक्षता परीमळ पुष्पें । धूपदीपनैवेद्य अमूप । विडादक्षणा ते चिद्रूप । प्रबोधदीप निरांजन ॥ ३८ ॥ अन्वय-व्यतिरेक प्रदक्षणा । मंत्रपुष्प वाहिले जाणा । नमन करीता पुनःपुन्हा । पूजकपणा कैचा तो ॥ ३९ ॥ अंतरबाह्य श्रीराम । होचि प्रार्थना

निरंतर नेम । नृत्य करीती सप्रेम । मुद्गल परम वैष्णव ते ॥ ४० ॥ येकाग्रमतेचे होतसे भजन । अनुहातध्वनि गजर पूर्ण । संतवृंदीं करीती श्रवण । स्थीरावलें मानस पै ॥ ४१ ॥ मुद्गलाच्यार्य साधु समर्थ । अर्चियेला श्रीपंढरीनाथ । उभे राहीले कीर्तनाते । ते अद्भुत वाग्सुख पै ॥४२॥ स्वकाव्योक्त करुनी आर्या । करुणा भाकीली रामराया । तें श्रवण करीतां हृदया । दशरथतनया नवल वाटे ॥ ४३ ॥ चंद्रकांत वाणी मुद्गलयोगेंद्र । कृपामृत वर्षी श्रीरामचंद्र । न्हावया आपुले निजभद्र । पातले इंद्र आदिकरुनी ॥ ४४ ॥ देवगुरु जो बृहस्पति । कीर्तनीं प्रगटली तेही मूर्ति । नारद स्वये गायन करीती । मुद्गलभक्ति धन्य ते ॥ ४५ ॥ स्वर्गीहुनी सुरवर । सुमनें वर्षती अपार । सिंव्हासनीं जानकीवर । डोलती साचार सनकादिक ॥ ४६ ॥ आर्याछंद करुणारस । श्रवण करीता जगन्निवास । पोटाशी धरीले स्वभक्तास । मुद्गलाचार्यास ते वेळा ॥ ४७ ॥ ह्मणती महाभागवतचूडामणी । धन्य धन्य तुझी वाणी । मानस गेलें माझें मुळोनी । वरप्रदानीं उभा ठेलो ॥ ४८ ॥ माग ह्मणतां श्रीनिवासें । मुद्गलाच्यार्योशी आले हांसे । पदीं ठेउनी मस्तकास । विनवणी हरीस करीतसे ॥ ४९ ॥ मागणें मनाचें निरसोनी । मन टेवा समूळ चरणीं । सद्गुरू स्वये होउनी । द्वैतपणी तुटवी पै ॥ ५० ॥ माक्षेपणा करुनी दूरी । आपण न्हावे सर्वत्र हरी । संतोषले भक्तकैवारी । रावणारी सर्वोत्तमु ॥ ५१ ॥ मस्तकीं देउनी वरदहस्त । मेळविले स्वरूपीं त्वरित । संतरूपें उरधरीत । वर देत मुद्गलकाव्या ॥ ५२ ॥ जे जे आर्या करीती पठण । अथवा कोणी करीत श्रवण । तयापाशी मी अयोध्यारमण । निरंतर जाण तिष्ठतसे ॥ ५३ ॥ संकट न पडे तया कांहीं । आर्यापुस्तक ज्याचे गृहीं । जे जे काम असती हृदई । ते ते सर्व ही पुरती पै ॥ ५४ ॥ नित्य नेम आर्यास्तोत्रें । अष्टोत्तरशत ह्मणती वक्त्रें । तयालागी मी दशरथपुत्र । शिवमित्र न विसंबे ॥ ५५ ॥ वरप्रदान ऐशा रीती । देते जाहाले सीतापति । धन्य मुद्गलाच्यार्य जगतीं । ज्याचे भक्ति अनोपम्य ॥ ५६ ॥ श्रीरामचंद्राविण

कांहीं । आणिक प्रीति दुजी नाहीं । याचिसाठीं विठाबाई । जाली पाहीं रामरूप ॥ ५७ ॥ पंढरीची अयोध्या करून । मुद्गलाच्यार्या दिलें दर्शन । पुन्हा मागुती वीट होऊन । सुचविले पूर्ण निजभक्तासी ॥ ५८ ॥ बिभीषण अवतारा मुद्गलमुनि । संशय न धरी आतां मनीं । उभे केले पुंडरीकानीं । कर जघनीं ठेविले त्यां ॥ ५९ ॥ पुढें माझ्या अंजनीकुमर । विटेवरी मी जानकीवर । आजपासुनी वोळखी धर । वारंवार येत जावे ॥ ६० ॥ ऐसे वदोनी जगजेठी । घातली दृढ गळा मिठी । आनंदाची जेथें लुटी । काय गोष्टी बोलूं ते ॥ ६१ ॥ पंढरीवास करीता बहुत । देव सांगती आच्यार्याते । जग लावी भक्तिपंथे । सांप्रदायाते वाढउनी ॥ ६२ ॥ निरंतर श्रीराम जवळी । संच्यार करीती भूमंडळीं । तीर्थमिसें करुनी सकळीं । उपदेशिली नारीनर ॥ ६३ ॥ निःशीम ते रामउपासना । प्रघटवी जगीं जाणा । ठाइं ठाइं लाउनी भजना । दाविला जना मार्ग चोख ॥ ६४ ॥ प्रतिवर्षी रामजयंति । असादरें उत्छाहा करीती । ते तो अद्भुत वर्णीता श्रीती । जेवविती सकळ वर्णा ॥ ६५ ॥ देह-चतुष्टय बांधुनी मखर । नव छिद्रें जाळ्या प्रकार । तयामाजी साही चक्रें । चमत्कार थोर तयाचा ॥ ६६ ॥ गणपतिब्रह्माविष्णुशिव । चित्रें देखिलीं स्वयमेव । अनेक रंग अपूर्व । अतिगौरव प्रभा ते ॥ ६७ ॥ त्रिकूट श्रीगोल्हाट । औटपीठावर तो घाट । पुण्यगिरीते वरीष्ट । आसन श्रेष्ट सहस्रदळीं ॥ ६८ ॥ मुख्य पीठ तये स्थानीं । स्थापियेला कोदंडपाणी । अर्धमात्रा सीताजननी । शोभे उन्मनी वेदवंद्या ॥ ६९ ॥ पंच्यायतन पंचदेहीं । लक्ष्मणभरतशत्रुघ्न तो हि । विधीयुक्त स्थापन पाहीं । सर्वदाही निरोत्छाहा ॥ ७० ॥ नवविधात्मक नवरात्र । प्राण-प्रतिष्ठा सोहंमंत्रे । मुद्गलाच्यार्ये साधु पवित्र । करितीं स्वतंत्र रामनवमी ॥ ७१ ॥ मंगळ वाद्यें वाजती भेरी । मंडप विस्तीर्ण ज्याचे द्वारीं । रात्रंदिवस गजर भारी । भजन सुस्वरीं होतसे पै ॥ ७२ ॥ तत्वनिष्ठता जेथें कीर्तन । ज्ञानसत्र तें भोजन । जेविती सदा अठरा

वर्ण । अवतार पूर्ण विभीषणाचा ॥ ७३ ॥ असो आतां अध्यात्मपद्धती । श्रोते कथा श्रवणार्थी । ह्मणुनी आवरीली येथें मति । नातरीं युक्ति तेचि धरी ॥ ७४ ॥ बहिर्मुख प्राणी सारे । नावडे कदा आत्मविच्यार । गमाविती आयुष्य थोर । दुर्लभ फार न मिळे ते ॥ ७५ ॥ परस्परें येकमेका । कथीती चावटी लापणिका । विसरोनि गेले भक्तिसुखा । स्फुंदती देखा प्रतिष्टेनें ॥ ७६ ॥ भक्त ह्मणुनी विभक्त राहाणें । जळो जळो तें संतपण । स्वानुभवी तो चि पूर्ण । लाधला खूण श्रीगुरुकृपें ॥ ७७ ॥ ते सद्गुरु मुद्गलाच्यार्य । ज्ञानस्वरूप साधुवर्य । आवडे ज्यासी रघुराय । जन्म होय धन्य तयाचा ॥ ७८ ॥ प्रतिवर्षी अनोपम्य । उत्छाहा करीती सुंदर परम । भिक्षा मागुनी निजधर्मे । सर्वोत्तम आराधीती ॥ ७९ ॥ जयती सन्निध येतां पूर्ण । आनंदले भक्तनिधान । भिक्षेसी निघाले करीत भजन । हृदईं ध्यान रामाचें ॥ ८० ॥ कंटकदेश करनाटक । तस्कर तेथें बहुत देख । द्रव्य अमूप सोनटके । मिळाले निके स्वामीशीं ॥८१॥ वर्तमान हें निशाचरा । कळले बेरडाशी त्या शंभरा । पुढे येउनी धरीला थारा । खोल बरा वोढा तो ॥ ८२ ॥ इकडे मुद्गलमुनि शिष्य सहीत । स्वस्थानाशीं निघाले त्वरीत । ग्रामस्थ आले घालवीत । नमन करीत नरनारी ॥८३॥ निरोप घेउनी सर्वांचा । पंथ धरीला जावयाचा । रामनामें वदे वाच्या । ब्रह्मस्थीतीचा आनंद मनीं ॥ ८४ ॥ तव पुढें ते घातक । मातग रामोशी हिंसक । पाळत घेती दुरुनी देख । हरायास कनक भिक्षेचें ॥८५॥ प्रसग ऐसा प्राप्त होतां । जाला चमत्कार तत्वता । भक्तवत्छळ दीनानाथा । कळलें सर्वथा विघ्न पुढीले ॥ ८६ ॥ प्रघट व्हावया काय उशीर । मागे पुढे लहान किशोर । उभस्वरूप महावीर । घेउनी शर ठाकले उभे ॥८७॥ अतिक्रूर ते भयानक । पाहातां जयाशी येम धाके । मग इतर मानवी रक । केवि देख पुढे सरती ॥ ८८ ॥ दचकले अवघे मनीं । विच्यार केला तयानीं । येतात जे तीरकमटा घेउनी । गेलिया निघुनी मग ठट्ट ॥८९॥ ऐसा प्रकारें चोर तेथें । येकमेका खुणावीत । मागे पुढे चुकउनी

पंथ । चालती मार्गाते दुर्बुद्धि ॥ ९० ॥ संधी कोठे चि पाहातां न पडे । पडले बहु तया साकडे । धनुर्धारी वाडेकोडे । आगे निघडे पुरुष ते ॥ ९१ ॥ मग दीनवदने ग्रामाजवळी । येकसरा मिळाली मंडली । जोडुनिया करांगुली । तस्कर सकळीं देखीले ते ॥ ९२ ॥ मुद्गलपंडितें अवलोकितां । विच्यारीले तया समस्ता । कोण तुह्मी कोठें जाता । अम्लानता मुखावरी ॥ ९३ ॥ तये काळीं ते निशाचर । मातंग रामोशी शंभर । निवेदिती जाला विच्यार । जोडुनी कर मुद्गलाते ॥ ९४ ॥ ह्मणती स्वामीया आह्मी हिंसक । पाळत घेउनी आलो देख । लुटुनी घ्यावया द्रव्य सकळीक । धावतो निशंक मार्गे पै ॥ ९५ ॥ परी उभयता धनुर्धारी । मागे पुढें रक्षक निर्धारी । संगे चालती निरंतरी । वियोग तीळभरी नाहीं ते ॥ ९६ ॥ अत्यंत शूर गंभीर । भय वाटे तयाचे थोर । सांगुनी त्या आज्ञा सत्वर । मार्गे साचार यावा पै ॥ ९७ ॥ ऐसे सांगतां रजनीचर । मुद्गल दाटले प्रेमभरें । ह्मणती पातकी मी पामर । नाहीं अधिकार दर्शनाचा ॥ ९८ ॥ पुण्यवान तुह्मी सारे । दृष्टी पडतसे श्रीरघुवीर । घालुनी घेतले धरणीवर । करुणा थोर मांडीती पै ॥ ९९ ॥ जयजय श्रीदशरथनंदना । कौसल्येच्या हृदयरत्ना । पुराणपुरुषा सीतारमणा । सौमित्रप्राणा भरतप्रिया ॥ १०० ॥ शत्रुघ्नतपया वानरपति । सर्वकाळ तुज हनुमंतप्रिती । अयोध्याधीश करुणामूर्ति । मजप्रति का उपेक्षीले ॥ १ ॥ ऐशापरी करीतां धावा । प्रघट होणे जानकीधवा । मुद्गलाचार्ये श्रीराघवा । नमस्कार तेव्हां केला पै ॥ २ ॥ मग तो संवाद देवभक्ताचा । ग्रंथी वदेल केवि वाचा । विभाग तो गुरुपुत्राचा । स्वानंदाचा निजकंद ॥ ३ ॥ वैराग्य जाले तया तस्करा । आंग कांपे त्याचें थरथरा । ह्मणती अपराध क्षमा करा । परात्परा गुरुमूर्ती ॥ ४ ॥ दंडप्राय भूमीवर । पडले अवघे निशाचर । करुणा भाकीती जोडुनी कर । शरण सारे आले ते ॥ ५ ॥ अनन्यता पाहुनी स्वामी । कृपेनें द्रवले अंतर्यामी । मेळविले परब्रह्मी । रामनामीं लाउनी प्रीती ॥ ६ ॥ उद्धार

केला चोरांचा । बोळला मेघ करुणेचा । प्रताप आगळा श्रीगुरुचा । मुद्गलचा अधिक महीमा ॥ ७ ॥ अनाधिकारी ऐसे कीती । पावन केळे नाहीं गणती । नामनंत्र ज्या उपदेशीती । स्वरूपीं रमती ते ते जीव ॥ ८ ॥ स्थळोस्थळीं उपासना । सांप्रदाय रूढविला जाणा । दोषी येती जे दर्शना । लाविती साधना तयाते ॥ ९ ॥ गळितकुष्टी क्षयरोगी । परम समंध ज्याचे आंगीं । राममजनीं तयालागीं । मुक्त वेगी करती पै ॥ ११० ॥ जे जे जयाची कामना । ते ते पुरवी योगीराणा । मुद्गल अवतार विभीषणा । कृपा जनांवर तयाची ॥११॥ बत्थ मुमुक्ष विषई । दाविली तया ज्ञानसोई । हिंडती सदा सकळ मही । शेषशाई बरोबर ज्या ॥ १२ ॥ माहात्नखळ दुराच्यारी । तत्वरीले वर्णध्यारी । असो भलते नरनारी । राघणारी भेटविती ॥ १३ ॥ समर्थ श्रीगुरु मुद्गलाच्यार्या । नमन तया ज्ञानसूर्या । पठण करीता ज्याच्या आर्या । प्रकाश हृदया जाला पै ॥ १४ ॥ तेणें त्रैलोक्य उजीयेडे । गेले जीवींचे अज्ञान साकडे । अंतरबाह्य स्वरूप रोकडे । राघव पुढे दिसतसे पै ॥ १५ ॥ विभीषणाचा अवतार बरा । श्रीराममक्त प्रेमळ खरा । बोधिला भक्तमंजीरीहारा । जानकीवरा जो कां प्रिय ॥ १६ ॥ घन दावावया जगाते । चवदावा श्रीमागवत । मक्तिरसा चाखवीत । मुद्गलसंत विख्यात पै ॥ १७ ॥ मुद्गलाच्यार्याचे करीतां स्मरण । त्रिविधताप पळती पूर्ण । जन्ममृत्यु टळे विघ्न । रघुनंदन कृपा करी ॥ १८ ॥ अनुक्रमें अध्याय पाहातां । सत्ताणव जाहाले तत्वता । ईयाउपरी वर्णन सर्वथा । सिद्धनाथा समर्थाचे ॥ १९ ॥ अकरा अध्याय अकरा रुद्र । रामदास अवतार भक्तिसमुद्र । वर्णितां आख्यान सुभद्र । माळा अष्टोत्तरशतमणी ॥ १२० ॥ तेणें सांग चरीत्रमाळा । अर्पण होतसे श्रीरामाला । अवधान देता श्रोतियाला । लाभ सगळा होतसे पै ॥ २१ ॥ स्वकथेहून भक्तलीला । आवडती बहु घननीळा । पंढरीसी उभा ठेला । ऐकावयाला संतस्पीती ॥ २२ ॥ राजारामी जाणुनी प्रीती । वर्णितसे साधू कीर्ति । सद्गुरुसिद्ध कृपामूर्ति । सदवी,

युक्ती निज आत्मकथा ॥ २३ ॥ भक्तमंजीरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । मुद्गलाच्यार्य आख्यानातें । अध्याय होत समाप्त हा ॥ १२४ ॥ अध्याय ॥ १ ॥ अनु०अ० ॥ ९७ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥



## अध्याय ९८

## — सिद्धस्वामी —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसिध्दरामसमर्थ ॥ ॐ नमो सिध्दस्वामीया । परात्परा गुरुवर्या । भक्तवत्छळ करुणालया । अखड अद्वया श्रीमूर्ति ॥ १ ॥ नमो अज्ञानतमनाशका । निस्योदयबोधार्का । त्रिविधतापछेदका । निश्चळसुखा जगद्गुरु ॥ २ ॥ नमो अद्वयाब्जीनिविकाशचंद्रा । सर्वोत्मता ज्ञानसमुद्रा । स्वसुखानुभवनरेंद्रा । आक्षई भद्रासन तुज ॥ ३ ॥ नमो ज्ञानपयाब्धिवासा । निज्यात्मशांतिप्रियाविळासा । अभयदाता पूर्णकोवसा । निजदासा तू चि पै ॥ ४ ॥ नमो द्वैतनिकृंदना । मायामळविध्वंसना । अतर्क्यवस्तुनिधाना । अनोपम्य चिद्घना सुखराशी ॥ ५ ॥ धन्य धन्य ती निजपाउलें । पाहता जीवित्व चि हारपलें । विश्व असता मावळले । अवघे कोंदले परब्रह्म ॥ ६ ॥ काय वर्णू श्रीकृपेशी । दृष्टी मुडेळी आपैसी । जडोनी ठेली स्वरूपराशी । अज्ञाननिशी सरळी ते ॥ ७ ॥ चराचरी फावळी सत्ता । पातळी उन्मनी सहजी अवस्था । उमस खाऊ नेदी सर्वथा । कैचि वार्ता दुजी ते ॥ ८ ॥ तेथें स्तवन करू काई । परी प्रेम रुळते पाई । आनंद वोसंडतसे हृदई । वैखरी ठाई द्रवे शब्दा ॥ ९ ॥ सकळ वेधळीं इंद्रियें पदीं । संतस्तवना प्रसवळी बुध्दी । ऐसा स्वामी कृपानिधी । आठऊं नेदी कांहींचि ॥ १० ॥ भक्तमजीरीमाळा ग्रंथ । करविता जाला सद्गुरुनाथ । तयाचे ऐका चरित्रातें । श्रोते समस्त प्रेमळ हो ॥ ११ ॥ प्रथमारंभीं केलें कथन । श्रीरामदासस्वामीचें आख्यान ।

स्वतसिध्द महाराज तो चि पूर्ण । अवतरला जाण भूठाई ॥ १२ ॥ जगदोत्धार करावया । अवतार घेणें श्रीगुरुराया । परिसिजे ते कारण कार्या । येकाग्रहृदया करोनी ॥ १३ ॥ भूमीसी भार जाहाला बहुत । संतवेषें प्रघटले दैत्य । धर्म विध्वंसिला सत्य । मांडिला अनर्थ फार जगीं ॥ १४ ॥ साधुवेषा अवलंबन । असुरें कैसें केलें जाण । ऐसा श्रोतिये करिता प्रश्न । लागे सांगणें वक्त्यासी ॥ १५ ॥ तरी देवदैत्यासी मुळींचे विरुध्द । हे तो ठाउक आहेचि प्रसिध्द । देवीं केला राक्षसवध । रक्षोगण शुध्द जाहले कर्ती ॥ १६ ॥ त्रेतायुगीं क्षेत्रियांत । अवतार घेतला श्रीरघुनाथें । तेथें निवटिले स्वहस्तें । लंकेवरी समस्त निशाचर ॥१७॥ पुढें द्वापारीं श्रीभगवान । गोकुळीं केलें अवतरण । तेव्हां क्षत्रिये कुळी जन्मले जाण । दैत्य पूर्ण सकळ ते ॥१८॥ पांडव महावैष्णवसंत । नाश करविला तया हातें । विचार केला मग मनातें । राक्षस उन्मत्त तयानीं ॥१९॥ साधुसी रक्षितो श्रीहरी । हें वर्म जाणीले दैती अंतरीं । यालागी प्रघटले पृथ्वीवरीं । मंडळी सारी निशाचर ॥२०॥ ते असुर जन्मासी आले । संतांचिये सोंगा धरीले । नटापरी मिरऊं लागले । मोंदिती भोळे जन सर्व ॥ २१ ॥ काष्टाच्या करऊनी माळा । भूषण घालिती आपुले गळा । भूतदयेचे नामे बोंबसोहळा । भिक्षुकमेळा रडे द्वारीं ॥ २२ ॥ मुद्रा रेखोनी अपवित्र । शिश्नोदरार्थ हिंडती क्षेत्रें । घरींच करुनी भगवी वस्त्रें । महापुरुष यत्रें म्हणविती पैं ॥ २३ ॥ दाऊनिया चमत्कार । उपदेशीती बाईकापोरें । करिते जाहले भ्रष्टाकार । गोंधळ थोर विषयाचा ॥ २४ ॥ मद्यमांस भक्षविती । बळेंचि जाउनी अनुग्रह देती । कईफ चारुनी पाहा म्हणती । ब्रह्म दाविती खलखलाट ॥ २५ ॥ वादप्रतिवाद घालुन । मतें स्थापिती आपुलीं जाण । द्रव्यदारा हे चि ध्यान । कैचें चिंतन स्वरूपाचें ॥ २६ ॥ ऐशाप्रकारें शब्दज्ञानी । उत्पन्न जाहले दैत्य मेदिनी । संतवेशा धारण करुनी । धर्म जयानें विध्वंसिला ॥ २७ ॥ तेणें धरा मारावली । दैवतें सकळ निस्तेज जाहालीं । शेषानें फणी हालविली । भूमि कांपली

चळचळा ॥ २८ ॥ कर्म उपासना ज्ञान । योगाभ्यास राहिला पूर्ण । प्राणी न करिती नामस्मरण । वेदाध्ययन त्यजीलें पै ॥ २९ ॥ असो ऐसा घडतां अनर्थ । विचारी पडले रमाकांत । पाचारिले समस्तांते । निजभक्तांते अनुक्रमें ॥ ३० ॥ अवतरोनी तुह्मी सर्व । निजधर्माचें रक्षण करावें । ऐसें वदता श्रीराघव । बोलती सर्व वैष्णव ते ॥ ३१ ॥ ह्मणती महाराज आह्मा सर्वांत । महाश्रेष्ठ श्रीहनुमंत । तयाविणे या कलयुगात । स्थापन घडत न धर्म हा ॥ ३२ ॥ वानरअंश आह्मी गोपाळ । प्रघट होऊं सहजीं सकळ । विज्ञप्ति करिती प्रांजळ । करकमळ जोडुनी ॥ ३३ ॥ तये काळीं सीतारमण । दाशरथी जो रघुनंदन । मारुतीकडे अवलोकन । करिती नेन कृपानिधी ॥ ३४ ॥ संकेतें सुचविता श्रीरामदास । नमन केलें साष्टांग पदास । ह्मणे न जाय मी अवनीस । यातायातीस भोगावया ॥ ३५ ॥ सकळ सुखें तुझे पाईं । ज मा न धाडी रामाबाई । भक्तशिरोमणि वदला पाहि । जाणसी कांहीं सकळ तू ॥ ३६ ॥ तत्समईं श्रीरघुपति । काढिली असे तेणें युक्ती । रामदासासी आज्ञा करीती । कृपा मूर्ति ते ऐका ॥ ३७ ॥ ह्मणती अहो दासा सखया । विचार करावा आपुले हृदया । सावधान काळीं त्यजिली जाया । न हीं तया वरीले बरें ॥ ३८ ॥ दोन जन्मे तपें चाग । करुनी पावारे तुझे अंग । परि तू वैराग्याच्या योगें । डोका चाग दिधला तये ॥ ३९ ॥ अमर्यादतपी परम हटी । आग्रह धरीला असे पोटीं । तियेसी वरोनी सेवटीं । निजवैकुंठीं यावें तुवा ॥ ४० ॥ आणीक आहे बहु कारण । यालागी व्हावें जगीं अवतरण । एसी घालता निज अडचण । बोलती जाण रामदास ॥ ४१ ॥ बध्दांजुळी जेडुनी हात । प्रार्थियेला जानकीकांत । वदती तेव्हां सुनिश्चीत । टळयवत नाहीं आज्ञेसी ॥ ४२ ॥ परि मागतो ते द्यावें । सदा सर्वदा जवळी असावें । तरी ज म घेईन स्वभावें । संकट न पडावें मज दीना ॥ ४३ ॥ ऐसें ह्मणविता चि रामदासें । माग ह्मणती जगन्निवासें । तये वेळीं चिद्विलासें ।

श्रीवत्सलांछनास ईछिती पै ॥ ४४ ॥ बोलती तेव्हां दयाघन । दीनबंधु जानकीरमण । कैसे घावे तुह्मालागून । मुख्य चिन्ह हृदईचें ॥ ४५ ॥ रामदास सुचविती हरिला । पूर्वीं दिधले मुकुंदराजगुरुला । हा विच्यार असे वर्णिला । विवेकसिंधुला मुनिराजे ॥ ४६ ॥ तरी कां मजला न यावे । मी तर ठाईंचा लडिवाळ स्वभावें । ऐसें ऐकुनी रमाधव । दिधले मरवे ह्मणती पै ॥ ४७ ॥ संबोखोनी रामदासातें । कुर्वाळिता सद्रूपें हस्तें । साष्टांग नमोनी वैकुंठनाथ । आज्ञा समर्थें ती वंदिली ॥ ४८ ॥ कोणते स्थळीं अवतारातें । घेते जाले आत्मवेत्ते । शाखा गोत्र मुनिश्रौत । सांगिजेल समस्त अनुक्रमें ॥ ४९ ॥ महाकुमंडलीचे तीरीं । बारामती नामें नगरी । श्रीरामपद जिचे उदरीं । ऐसें क्षेत्रीं जनन तें ॥ ५० ॥ तये स्थळीं पुण्यश्लोक । आत्मवेत्ता पूर्णभाउक । उपास्य ज्याचे श्रीरघुनायक । भाविक जाण द्विजेंद्र तो ॥ ५१ ॥ प्रवृत्ति निवृत्ति दोघी स्त्रिया । रघोत्तमनामें त्या योगिया । प्रवृत्ति धाडुनी मग विलया । निवृत्ति जाया वरीली पै ॥ ५२ ॥ चित्कळा ते महालक्ष्मी । तये उदरीं जन्मले स्वामी । ते साकल्य ऐका तुह्मी । अंतर्यामीं येकाग्रपणें ॥ ५३ ॥ गर्भींच असतां मातेसी डोहाळे । भक्षण करावी सदा फळें । रामनाम सर्वकाळ । उच्चार प्रबळ वाचेसी ॥ ५४ ॥ उसणत उठावे स्वमांत । रामायणाचा पाठ करीत । विस्मय वाटे सर्वांते । पति चित्तांत आश्चर्य करी ॥ ५५ ॥ विदेहस्थिती होउनी । समाधिस्थ पडावे मेदिनी । केव्हांतरी मग उठोनी । सावध जनीं व्हावें पै ॥ ५६ ॥ ऐशा प्रकारें नऊ मास । होते जाले पूर्ण गर्भास । प्राप्त जाला पौष मास । द्वितीया तिथीस अवतार तो ॥५७॥ सोळाशे सत्यांयशि शके शालिवाहन । संवछरासी नाम पार्थिव जाण । ... । जन्म पूर्ण स्वामींचा ॥ ५८ ॥ मूर्ति पाहातां हनुमंताकृति । गौरवर्ण दिसे कांति । पदचिन्हें तीं शोभती । ऊर्ध्व दिसती रेषा त्या ॥ ५९ ॥ हरिस्वामीसारीखे जाण । दक्षणजंघे श्रीवत्सलांछन । पाउलांची प्रसक्ष खुण । पाहती नैनें जन सकळ ॥ ६० ॥ सुहास्यवदन

लावण्यखाणी । सुलक्षणी कैवल्य दानी । अवतार जाहला मेदिनी । धन्य जननी ते माय ॥ ६१ ॥ सिध्दांतकर्ते जोतिषी । मिळते जाले तपोराशी । वर्णियेले भविष्यासी । पत्रिकेसी देखूनी ॥ ६२ ॥ कीं ईश्वर स्वयें मूर्तिमंत । मानवरूपे जन्मला सत्य । गणितकर्ता मुख्य अर्थ । केला सिधांत सर्वांनीं ॥ ६३ ॥ मग तेथें सहजी लक्षणें । आंगीं भईती न लागे सांगणें । जाहले जगीं अवतरणें । दीन जन उध्दरावया ॥ ६४ ॥ असो द्वादश दिन प्राप्त होता । नाम ठेविले श्रीचें तत्वता । आदि करुनी मातापिता । गणेश सर्वथा वदती त्या ॥ ६५ ॥ तयाचा अर्थ विचक्षण श्रोते । जाणती सर्वज्ञ भाविक पंडित । रामदास अवतार सिध्द निश्चीत । वानरगणांत श्रेष्ठ तो ॥ ६६ ॥ यालागीं स्वामीसी नामाभिधान । गणेश ऐसें वदती जन । दिवसेदिवस वाढता पूर्ण । चेष्टा करणे मात्ररांच्या ॥ ६७ ॥ बाळोन्मत्त पिशाच्यस्थिती साधु अंगीं सहजी असती । अवलंबिली पिशाच्यवृत्ति । ऐकिजे श्रोतीं सें सकळ ॥ ६८ ॥ पांच वर्षांचें वय होतां । अतिचपळ नाठोपे सर्वथा । लोक म्हणती पिशाच्य तावता । उद्भवले आतां सांकुडीं ॥ ६९ ॥ माता पिता अनुष्ठाती । कळंक लाविला भौंशाप्रती । जन सकळ ऐसे बोलती । कंटाळती गृहींची त्या ॥ ७० ॥ तव अकस्मात अवधूतवेश । सिध्द पातले त्या स्थानास । घरासी येऊन निर्दोष । आशिर्वादास देतसे पै ॥ ७१ ॥ कुमारासी त्या धरून करीं । भस्म घातले मुखाभितरीं । मातेजवळ नेऊनी निर्धारी । सांगती वैखरी महापुरुष ॥ ७२ ॥ म्हणती हा रामदासअवतार । उदरीं जन्मले तुझे साचार । करावया जगदोध्दार । आला साचार मानीता ॥ ७३ ॥ पिशाच्य नव्हे हे सर्वथा । आठव धरावा तुंवा चित्ता । ऐसें वदोनी मग तत्वता । सिध्द पाहाता उर्ध्व गेले ॥ ७४ ॥ पिता जो कां रघोत्तमसमर्थ । तयासी कळतां हा वृतांत । संतोष पावोनी सहजोचि ते । व्रतबंधातें केले पै ॥ ७५ ॥ वेदाध्ययन आदिकरून । सकळविद्या जाहल्या निपूण । सवितामंगीं जैशी कीरणें । तैसें जाण चातुर्य तें

॥ ७६ ॥ भाषा छपन्न देशींच्या । बोलत असाव्या सहजी वाचा । तर्क न चले कवणाचा । च्यातुर्याचा मुगुटमणी ॥ ७७ ॥ ऐशाप्रकारें सर्वज्ञता । विसाऊ पातली जेथें सर्वथा । काय तया वर्णूं आतां । सद्गुरुनाथा मी दीन ॥ ७८ ॥ नवल तयाचें चतुरत्नपण । मुंगियेचें मनोगत समजणें । सकळ जीवाचें इंगित जाणें । ऐसा दयाघन श्रीस्वामी ॥ ७९ ॥ असो पुढें विवाहप्रकर्ण । श्रीगुरुरायाचें जाहलें लग्न । पूर्वील ऋणानबंधेकरून । प्राप्त जाण तें कलत्र ॥ ८० ॥ विवाहकाळीं जन्मांतरी । जे का त्यागिली होती नवरी । परिती जाली ती निर्धारी । मवतमारि सद्गुरु ते ॥ ८१ ॥ परि उदास मुळिचीं वृत्ति । चैन न पडे कदा चित्तीं । तीर्थें करावया श्री निघती । पितृआज्ञोक्ति घेउनी पै ॥ ८२ ॥ तीर्थमीसें साधु पाहावे । मार्गीं दीनासी उद्धरावे । येतद्विषईं श्रीगुरुराव । पातले बरवे तीर्थाटणा ॥ ८३ ॥ तीं तीं तीर्थें कोणकोण । श्रोते ऐका देउनी मन । श्रवणमात्रें अघ संपूर्ण । जाय निक्षून समूळ लया ॥ ८४ ॥ महाकुमंडली मयुरेश्वर । जयपुरी कडेपठार । सासवडी वटेश्वर । पुजीला थोर सोपानदेव ॥ ८५ ॥ पुण्य स्थानी पितृउल्हासिनी । अलंकावतिये इंद्राईणी । तेथें ज्ञानदेव पुजुनी । वंदिली जनी भीमा ते ॥ ८६ ॥ भीमाशंकर आणि देव । नमोनी अर्चिला त्रिंबकराव । गंगापुण्यप्रवाहउद्भव । स्थान अपूर्व नाशिक ते ॥ ८७ ॥ मोहनिराज्यादि सिद्धेश्वर । गंगातीरीं ऋणेश्वर । पुजोनी दक्षणउत्तरतीर । घृष्णेश्वर वंदिला ॥ ८८ ॥ तापीस्नान सारोनी । अश्वत्थामाश्रम पाहोनी । नर्मदातीरीं जाउनी । सहस्रार्जुन देखियेला ॥८९॥ माहिष्मतीहुनी ओंकारेश्वर । मांधाता जे पवित्र क्षेत्र । अमरकंटक उगम पवित्र । रेवेचा स्वतंत्र पाहिला जो ॥ ९० ॥ उज्जनी महांकाळ क्षिप्रातीरीं । पुजोनी पुढे विंध्याद्रि । मरुदेशामाझारी । तीर्थें पुष्करीं वंदिलें ॥ ९१ ॥ नाना सरिता नाना देव पुजिले । सूर्यकन्यातीरा आले । तेथें श्रीकृष्णासी अर्चिलें । बुधि सोज्वळ मनोधर्मी ॥ ९२ ॥ बारा वनें बारा उपवनें । चयन्यापैसी कोश व्रजाचे लक्षण । तेथुनी केलें प्रयाण ।

दयाघन कुरुक्षेत्रीं ॥ ९३ ॥ कुरुक्षेत्र ते पवित्रस्थळ । ब्रह्म अरण्य अति विशाळ । वसे तेथें ऋषिमंडळ । अद्भुत स्थळ ते जाणा ॥ ९४ ॥ कमाउ पर्वत थोर । वृक्ष पक्षी मनोहर । गैरिकादि धातु समग्र । तेथे विचित्र असती पै ॥ ९५ ॥ हिंगळाजभवानि पर्वती । घोरारण्य श्वापदें वसती । ज्वाळामुखी भारणी वस्ती । ते पाहाती योगीद्वारे ॥ ९६ ॥ तया द्वारांतुनी सुकृती नर । जाउनी करिती नमस्कार । पापी न प्रवेशती साचार । हा निरधार तये द्वारीं ॥ ९७ ॥ काश्मिर देश मैथिलदेश । उत्कळ मालव गौड देश । तेथील ब्राह्मण विशेष । अति विद्वांस मंत्रशास्त्री ॥ ९८ ॥ नेपाळदेशीच्या स्त्रिया उत्थत । योगिणी जाणा क्षणवित । नग्न असती विचरित । निःसंग अद्भुत कामरूपा ॥ ९९ ॥ तेथें गोरक्षसांप्रदाय । मुख्ययोगिणी महामाया । तिची आज्ञा अभिप्राय । वदित आहे सकळजनीं ॥ १०० ॥ ऐसे देश बहुत फिरत । भागीरथीस्नानासी आले गुरुनाथ । तये तीरीं भ्रमण करीत । बद्रिकाश्रमाते पातले ॥ १ ॥ करुनी श्रीनारायणपूजन । वंदिला तेथें नर जाण । अधि करुनी केदारार्चन । लागले महान्न पंथासी ॥२॥ तथ जन्मांतरयोगेकरून । वनीं जाहलें ऋषींचें दर्शन । योगाभ्यासी ते पूर्ण । तत्ववेत्ते जाण महानुभवी ॥ ३ ॥ बहुकाळेंकरून । समाधीते विसर्जून । निघाले असती बाहिर जाण । गुहेंतुनी गुरु आले ॥ ४ ॥ अमृतफळें सोधुनी न्याहावी । सद्गुरुतें समर्पावी । येतद्विषई ते माहानुभवी । वनी सर्वी विचरती ॥ ५ ॥ तयासी भेटले हे गणेशसमर्थ । सहजी मार्गे जाहले पुसत । ऋषींनीं दाउन हस्तसंकेत । पुढे सुचविती चला म्हणउनी ॥ ६ ॥ भ्रमण करिता कांहीं पंथ । वाट निघाली पर्वतांत । तेव्हा श्रीसद्गुरुनाथ । प्रवेश अचलित केला त्या ॥ ७ ॥ पर्वतोदरी कांहीं भूमी । उल्लंघित करिते जाहले स्वामी । दिव्य सरोवर नेत्रपद्मीं । तीर्थ निर्धर्मी देखियेले ॥ ८ ॥ तया उदकाचा सुगंध । अतिसुंदर फाकला शुध । अवलोकिले ऋषिवृंदें । जाहला आनंद चित्तासी ॥९॥ योगमार्गी ते सादर । राजहटी क्रिया प्रखर । सोलिवसुखाचे मंदिर ।

उपमा साचार नसे तया ॥ ११० ॥ मध्यमार्गी सुशोभित । सिंव्हासनीं सद्गुरुनाथ । दर्शन होताचि प्रणिपात । साष्टांगीक केला पै ॥ ११ ॥ मग कुशळ वृत्त तयानी पुसतां । ऐकिली त्रिताप तप्तता । तेव्हां बोलती ते तावता । रामदास समर्था सावध होई ॥ १२ ॥ सांप्रदाय क्रमेंकरुन । स्वरुपोन्मुख केले पूर्ण । तात्काळ समाधी लागली जाण । आनंदघन निर्विकल्प ॥ १३ ॥ दीपीं दीप येकवटले । कीं जळीं जळ मिळोनी ठेले । किंबहुना स्फुरण विराले । तें वर्णिले नव जाय ॥ १४ ॥ दृष्टांत घेणें येकदेशी । स्वामी मुळींचे चित्सुखराशी । काय उशीर तयासी । स्वानंदरूपासी मिळावया ॥ १५ ॥ आकारासी जरी आली । गोठोनी गार जळाची जाहाली । तरी उदकपणा मुकली । कदाकाळीं न घडे ते ॥ १६ ॥ तैसे माहाराज सच्चितघन । तत्वज्ञ समर्थरामदास पूर्ण । जगीं अवतार घेतला ह्मणून । न लागे क्षण निज अनुभवा ॥ १७ ॥ असो कृष्णद्वैपायनीं श्रीसिध्द । सद्गुरूनाथ जो का प्रसीध्द । तयानी करुनी अनुग्रह शुध्द । मेळविले निर्द्वंद आत्मरूपा ॥ १८ ॥ मग अत्यादरें सप्रेमें । सिध्द ऐसे ठेविले नाम । याचा अर्थ सर्वज्ञ निसीम । जाणती परम पंढीत ते ॥ १९ ॥ जगदोद्धार करावयातें । सिध्द जाले रामदास समर्थ । येतद्विषई सिध्दनामाते । जाहले ठेविते श्रीगुरु ॥ १२० ॥ नातरी सकळ सिध्दी । योळंगती जयाचे पदीं । यास्तव नाम त्रिशुध्दि । ठेविले प्रसिध्दीं त्यालागी ॥ २१ ॥ कीं वेदांताचा सिध्दांत । तो चि हा स्वामी सद्गुरुनाथ । ह्मणुनी नाम सिध्दनाथ । सदा शोभत महाराज ॥ २२ ॥ की बध्द मुमुक्षु साधकाचा । सिध्दस्वरूप ठेवा साचा । जेथें निमाली परावाचा । लक्षांश तेथींचा सिध्दरूप ॥ २३ ॥ किंबहुना सित्वपंथ । प्रघट कराया कळयुगांत । अवतार घेतला सद्गुरुनाथें । रामदाससमर्थ स्वता सिध्द ॥ २४ ॥ याकारणास्तव सिध्द नामाभिधान । ठेविते जाहले कृष्णद्वैपायन । श्रीसिध्दपदीं अनेक पूर्ण । संभवती जाण अर्थ पै ॥ २५ ॥ असो सिध्दांनीं अनुग्रहकाळीं । सद्गुरुची पूजा केली । ऐकतां ते श्रोतिये मळी । मुक्ति घाली त्या

माळिका ॥ २६ ॥ प्रथमता आवाहन केलें । तो विश्वरूप मरुनी ठेलें । स्नान घाळावया उरलें । नसे जळ दुजे पै ॥ २७ ॥ निरसन होता चतुष्टयशरीर । प्रेमाश्रु पातले नीर । मग नाहाणीला श्रीगुरुवर । तेणें तुशारें स्वामी ते ॥ २८ ॥ निर्वासना ते वसन पाही । अखंड मेखळा अर्पिली ठाई । त्रिपदा तेच जाणुनी देही । जानवें हृदई घातिलें तें ॥ २९ ॥ जडांश तत्वाचा सुगंध । टिळक रेखिला ते चि गंध । इंद्रियकमळें वीं प्रसिध्द । समर्पिली सिध्द निज आत्मया ॥ १३० ॥ त्रिदळ त्रिगुण विल्वपत्र । अर्पण केलें ते चि पवित्र । असिपदीं ऐक्यसूत्र । येकात्मता तेंच तुळशी पै ॥ ३१ ॥ अहंतेचा धूप घडला । सोहंदीप तेथें उजळिला । अद्वैतस्वरूपीं नैवेद्य केला । पक्वानफळ सुलीनदशा ॥ ३२ ॥ तांबोळ तो चि त्रयोदशगुणी । नवविध आणि चतुर्विधलक्षणी । सेऊं जातां कैवल्यदानी । रंगोनी वदनी ठेला तो ॥ ३३ ॥ हिरण्यगर्भदक्षणा । अर्पिपेले श्रीफळ जाणा । अद्वयप्रकाश निरंजना । कार्यकारणा ओवाळिले ॥ ३४ ॥ मंत्रपुष्प अक्षेस्फुरण । अनुहतध्वनी ते चि पूर्ण । तुरे चि पूज्यपूजकपण । करितां नमन विधियुक्त ॥ ३५ ॥ सहजीगमन प्रदक्षणा । शब्दोत्पत्ती जे जे वदना । तेणें चि योगे घडले स्तवना । केलें अर्चना सिध्दानीं ॥ ३६ ॥ पुढें अपूर्व आहे कथन । सविस्तर लीळा होईल वर्णन । श्रोतिये; करुनी येकाग्र मन । सावधान परियेसा ॥ ३७ ॥ सिध्दकथा परमपावन । नासी कळिमळ सकळ जाण । सिध्दी पावे कामना पूर्ण । स्वरूपानुसंधान तात्काळ ॥ ३८ ॥ निज अभिप्रा मेळऊन । वदवीतसे आपुले गुण । राजारामीं जाहले प्रसन्न । सिध्द दयाघन जगद्गुरु ॥ ३९ ॥ भक्तमंजरीमाळामंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । श्रीसद्गुरुसिध्दचरित्राते । अध्याय होत प्रथम हा ॥ १४० ॥ अध्याय ॥ १ ॥ अनुक्रम अध्याय ॥ ९८ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामजयरामजयजयराम ॥

# अध्याय ९९

## — श्रीसिद्धस्वामी —

( पुढें चालूं )

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु परम मंगळ। परात्परपरेश अखिळ। परंज्योति प्रकाश सोज्वळ। परंधाम निर्मळ निजरूप ॥ १ ॥ जय जय सर्वेश सहस्त्रदळनिवासा। सर्वोत्कर्षा सहजविळासा। सगूण निर्गुण सन्निध सरिसा। सबाह्यांतर सिधेशा परिपूर्ण ॥ २ ॥ जय जय जगदीश जगद्यापका। जगदोद्धारा जगपाळका। जळधीनिवासा भवनाशका। श्रीज्ञानार्का तुज नमो ॥ ३ ॥ जय जय भक्तवत्छळ भयनाशका। भव्यस्वरूपा भद्रासना। भागवतोत्तम भजकानिधाना। मुख्यप्राणा सिधेशगुरु ॥ ४ ॥ जय इति अति उत्कर्ष। ऐश्वर्यपदीं त्या सहजी विळसे। वर्णू जातां मतिसौरसे। काये विशेष बोलूं तें ॥ ५ ॥ याळागी अवर्णीय ते सिधपद। शब्द चि पावती निःशब्द। परी नावरे तो स्वानंद। वदविती सिध निजप्रेम ॥ ६ ॥ नवल कृपेचें सामर्थ्य। धन्य कृपाळु श्रीगुरुनाथ। निवारुनी द्वैताद्वैत। स्वात्मसुखातें दिधळे पै ॥ ७ ॥ ऐसा महाराज चिन्मयदाता। आख्यान तयाचें परीसा आतां। श्रीसिधपदीं ठेविला माथा। वंदिले संता सकळिका ॥ ८ ॥ अवधान देता येकामवृत्ति। तात्काळ वरी आत्मस्थिती। सद्गुरुचरणीं धरितां प्रीती। कामना पुरती सहजी त्या ॥ ९ ॥ सिंव्हावलोकन मागील कथा। उपदेश जाला स्वामीसी निरुता। हिमालयामार्गी तरवता। विश्रांत सर्वथा पर्वतोदरीं ॥ १० ॥ सद्गुरुनाथ श्रीकृष्णद्वैपायनानीं। अनुग्रह केला प्रीतिकरुनी। सिध नाम ठेउनी निज वदनी। दिधळे स्मरउनी, मागील पै ॥ ११ ॥ सांप्रदाय आपुला सांगून। गुरुदक्षणा मागितली जाण। म्हणती सदनासी जाऊन। फेडावे ऋण कुटुंबाचें ॥ १२ ॥ आणि जगदोद्धार लवलाही। सिधराया करणें पाही। तेणें आम्हांसी सर्व कांहीं। पावले ठाईं उपच्यार ॥ १३ ॥ ऐसा प्रकारें श्रीकृष्ण-

द्वैपायनी । आज्ञापिता स्वामीलागुनी । प्रेमाश्रु पातले नैनीं । अष्टी मनीं भाव ते ॥ १४ ॥ वियोग न साहे ऐसें वदतां । वचन दिधले स्वामीसी तत्वता । दर्शन देईन पुन्हा सर्वथा । स्मरण करीतां ते वेळे ॥ १५ ॥ ऐशापरी सांगून । पद्मकर ठेविला मस्तकीं जाण । उत्तरेशी गेले निघोन । कृष्णद्वैपायन श्रीसिध्द ॥ १६ ॥ मग सिध्दस्वामी गुरुमाउली । स्वदेशा दक्षणेसी परतली । हीनदीनें उध्दरीली । असंख्य भक्ती निजमार्गीं ॥ १७ ॥ पंढरीक्षेत्रासंन्निध येतां । आनंद जाला बहुत चित्ता । उचंबळलें प्रेम तत्वता । अनिर्वाच्य पहातां तें सुख ॥ १८ ॥ विटेवरी श्रीभगवान । दीनदयाळ श्रीरघुनंदन । संगें घेऊन संतजन । आले निघोन सामोरे ॥ १९ ॥ हातीं धरुनी सिध्दासी । येते जाले राऊळाशीं । अनुसरले भजनासी । गरुडपाराशी श्रीस्वामी ॥ २० ॥ कीर्तनधुमाळि येकसरे । कोंदाटलें नम त्या गजरें । सुखावले जानकीवर । प्रेमभरें श्रीरघुपति ॥ २१ ॥ संतवृंदें पाहाती डोळा । विचित्र दिसे घनसावळा । अनोपम्य आजीची कळा । बोलती मेळा परस्परें ॥ २२ ॥ तये काळीं प्रेमांत येउनी । अभंग केला सिध्दस्वामीनीं । ऐकावा तो प्रीती करुनी । चमत्कार जनीं अतिगुह्य ॥ २३ ॥

॥ अभंग ॥ श्रीसिध्दस्वामींचा ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

हंसरूप तुह्मि धरियेले रामा । आमुच्या विश्रामा जीविचिया ॥ १ ॥
धनुष्यबाण देवें दिल्हेती सोडून । धरीयेले ध्यान मौनमुद्रा ॥ २ ॥
नामाचा हि लोप आपुल्या केल्यात । दाविला संकेत मध्यभाग ॥ ३ ॥
सिध्द हा मारुती योळख न सोडी । उभा घाली उडी गरुडापुढे ॥ ४ ॥

इतिअभंग स्वामींचा ॥

ऐशापरी अभंग वदोन । लोटांगण घालिता स्वामीनीं जाण । रूपाशीं पालट जाहाला पूर्ण । श्रीदयाघन पाडुरंगीं ॥ २४ ॥ शरच्याप धरीले हातीं । वामांगी ते चिदशक्ति । लक्षुमण जवळी च्यामर ढाळिती । सन्निध निगुती भरतशत्रुघ्न ॥ २५ ॥ ऐशाप्रकारें ध्यानयुक्त । सिंव्हासनीं

श्रीरघुनाथ । सिध्दस्वामी दर्शन देत । कल्पद्रुम भक्तकाजकैवारी ॥२६॥
अवलोकितां हे स्वरूप दृष्टी । अद्भुत जाहाला आनंद पोटीं । घालोनी चरणीं सदृढ मिठी । बोलती गोष्टी देवभक्त ॥ २७ ॥ श्रीहरी ह्मणती अहो दासा । होत असे मी भावाळ तैसा । परी सिध्दराया छंद कैसा । अक्षोनी मानसा तूमचे तो ॥ २८ ॥ सद्गुरुनाथ वदती तेन्हां । मायबापा श्रीराघवा । जन्मांतरींचा माझा ठेवा । युगायुगीं बरवा न विसंबे ॥२९॥ आता तुपेक्षी रामाबाई । निरंतर पाइं ठेविली डोई । चिंतीतसे अखंड हृदईं । दुजी नाहीं वांछा ते ॥ ३० ॥ असो देवभक्ताचा संवाद । लिहूं जाता ठेखणी स्तब्ध । चकित जाहीं संतवृंदें । रामरूप शुद्ध पाहतां पै ॥ ३१ ॥ पुन्हा मागुती विठलरूप । धरीते जाले अयोध्याधीप । सिद्धस्वामीचा धन्य प्रताप । वदती पडप जन सारे ॥ ३२ ॥ सिध्द करुनी उपासनेंत । वास केला पंढरींत । च्यातुर्मास्य राहुनी तेथें । जाले निघते स्वआश्रमा ॥ ३३ ॥ निरोप मागतां देवाशी । प्रेमें दाटले हृषीकेशी । अष्टौभाव आंगाशी । ते वेळेशीं पातले पै ॥ ३४ ॥ भगवान ह्मणती निजप्राणा । तुह्मी आत्मा मी देह जाणा । तरी पालन करुनी आज्ञा । पत्नीऋणा फेडावें ॥ ३५ ॥ सांप्रदाय आपुला रूढऊन । मार्गासी लावी दीनजन । वारवार यावे निघोन । पंढरीशीं जाण पुनःपुना ॥ ३६ ॥ आज्ञापिता ऐशा प्रकारें । घातिला साष्टांग नमस्कार । सिध्दस्वामी मग साचार । आले विच्यारें स्वगृहासी ॥ ३७ ॥ आसो पुढें आणीक नवल । ऐका तुह्मी श्रोते सकळ । भू आंतरगत सापांनले । पूर्वी भले अकाश रुद्र ॥ ३८ ॥ कोणे येके दिनीं ते जागा नीट करावया । भूमीसी लागले उकरावया । पाहूं जातां तया ठाया । विवर अद्भ्या लागले ते ॥ ३९ ॥ सिध्द मूर्तीशीं जाहाला हर्ष । गुन्हा बांधिली तोचि सुरस । सुंदर आणयोनी पाषाणास । मारुतीस रेखियेले ॥ ४० ॥ यंत्राकृति ते प्रमाणवळ करून । मध्ये स्थापीले राजीवनैन । दाशरथी श्रीरघुनंदन । कोदंडधारण सीतेसहित ॥ ४१ ॥ हनुमंत अकरा ते शोभती । पहातां दिसे यंत्राकृति ।

मध्यभागीं चिन्मयमूर्ति । ध्यानस्थीती अनोपम्य ॥ ४२॥ रमणीय स्थान करून । तेथे बैसती करुणाघन । येकांतवास मनापासून । आवडे पूर्ण श्रीसिध्दा ॥ ४३ ॥ समाधिसुख भोगावया । वसती सदा तयाठाया । निर्दाळी जेणें समूळ माया । येकाग्रता ह्रदया परीपूर्ण ॥ ४४ ॥ चक्षुसी देखणी सिध्दमार्ग । अष्टांगादी सकळयोग । आसनविधी अनेक सांग । नसे व्यग आचरणस्थीती ॥ ४५ ॥ मासपक्ष येकासनी । विवरांत बैसती कैवल्यदानी । समाधी ते विसर्जन करुनी । बाहीर जनीं मग निघावे ॥ ४६ ॥ ऐशापरी सद्गुरूनाथ । स्व आश्रमा काळ सारीत । नित्योत्छाहा भजन होत । सतर्पण बहुत आदिकरुनी ॥४७॥ कोणी येके दिनीं श्रीचें मनांत । वाटले करावया आश्रमीं उदक । आरंभिले खननाते । स्वहस्ते करुनी ॥ ४८ ॥ सखोल असता असत जळ । स्वामींनी घेताचि हाति कुदळ । प्रघट होणें मग लागले । गंगेसी प्रांजळ त्याजागीं ॥ ४९ ॥ पाहानयाशी ते कौतुक । येते जाले तेथें शुक । तये स्थळीं होता रूक । बैसले निके त्या वृक्षावरी ॥ ५० ॥ पक्षी राघ्याचे रूप धरून । शब्द करीता मंजूळ जाण । स्वामीनीं घातिले लोटांगण । तया वोळखोन योगेंद्रा ॥ ५१ ॥ संकेत होता परस्परें । उचवळला कूप निरें । सिध्दतीर्थ तें ह्मणती सारे । आश्रमीं थोर स्वामीच्या ॥ ५२ ॥ पुढें चमत्कार आणीक कथा । परीसीजे आदरें तुह्मी श्रोता । आश्रमीं असतां स्वामींचे चित्ता । आठवण तत्वता जाली मनीं ॥ ५३ ॥ राहिली तीर्थे तीं करावीं । मार्गी दोनें उत्थरावीं । येतद्विपद् लीला लाघवी । निघाले उर्वी फिरावया ॥ ५४ ॥ कृष्णा भिव्वारी पूर्व समुद्राशीं । तेथवरी गेले कैवल्यराशी । पुढोनी श्रीशैल्याशीं । निश्चयेशी पोहचले ॥ ५५ ॥ बोढीयाजगन्नाथदर्शन । केले बळदेवसुभद्रार्चन । पाहुनी अन्न महिमान । आले निघोन दक्षणेशी ॥ ५६ ॥ कृत्तिकायोग कार्तिकाशी । पौर्णिमा जें का अधीक-मासीं । सिध्दमहाराज कार्तिकस्वामीशी । निघाले तीर्थाशी आणिक पुढें ॥ ५७ ॥ नंतर पपासरोवरीं स्नान केलें । हंपीविरूपाक्ष पूजिलें ।

तुंगापान असें केलें । दीनत्रय भले स्वामींनीं ॥ ५८ ॥ श्रीव्यंकटेश-पर्वतीं । सप्तरात्र केली वस्ती । तेथें आणीक वंदोनी पंथीं । देखिले प्रीती गोविंदपट्टण ॥५९॥ शिवकांचि विष्णुकांचि पाहीं । बाळुलिंग तेजोमई । अरूणाचळाहुनी त्वराहि । देखीले ठाइं आकाशलिंग ॥ ६० ॥ जळलिंग ते जंबुकेश्वर । त्रिवेलुपट्टण बोलती समग्र । कुंभकोनादि स्थाने अपार । पाहीलीं गुरुवरें तात्काळ ॥ ६१ ॥ मग दक्षणद्वारका मनोहर । पुढें देखिला रामेश्वर । दर्भशयनस्थान सुंदर । अद्भुत थोर जाणीजे पै ॥ ६२ ॥ अनंतशतजनार्दनाशी । पुज्या केली मल्याळदेशीं । केरळदेश निच तयाशी । सिध्दविलाशी ते गेले ॥ ६३ ॥ सकळ तीर्थें करुनी जाणा । आले द्वारकापट्टणा । भगवान पुजोनी साधुजना । अनुक्रमें नारायणा अर्चिले ॥ ६४ ॥ मग सोरटीसोमनाथासी । मूळपुरी माधवासी । अर्चीते जाले कैवल्यराशी । मूळपदासी सिध्दनाथ ॥ ६५ ॥ स्थान सुदामदेवाचें । अवलोकिलें तें हि साचें । तेथील सकळ वैष्णवजनाचें । दर्शन नेमाचें घेतलें पै ॥ ६६ ॥ द्वारका नवीनबेटांत । शंखतीर्थ पिंडतारक विख्यात । गोमती ते अत्याद्भुत । उदंड कीर्त जियेची ॥ ६७ ॥ नारायणसरोवर पंचनंदाते । नाहोनी प्रांचि सरस्वती-ते । येवोनी पुन्हा पंढरीते । पांडुरंगाते देखीले पै ॥ ६८ ॥ अनेकतीर्थें श्रीसिध्दस्वामीनीं केली । ते मज दीनाचेनि नव जाय वर्णिली । यथामति सांगितली । नाहीं केली बहुलेखन ॥ ६९ ॥ ठाइ ठाइ असंख्यप्राणी । उध्दरीले हिंडून मेदिनी । अज्ञानतमनाशकतरणी । उदेला जनीं सिध्देशगुरु ॥ ७० ॥ पूर्वील अवतारीचें समाधीस्थान । पाहावयाशी पातले सहजी जाण । सज्जनगडासी त्या येऊन । केले अर्चन श्रीरघुपतीचें ॥ ७१ ॥ तेथुनी येतां अतीतमासासी । हटयोगी पढला येक दृष्टीशी । येकनाथ नाम तयाशी । बोलती वाचेशीं जन सर्व ॥ ७२ ॥ महावोलका तो वाचाळ । फिरला बहूत भूमंडळ । परी समाधान कोठें न जालें । भ्रांतिपडळ न फिटेचि ॥ ७३ ॥ तयाशी दैवदर्शेंकरून । जालें श्रीसिध्दाचें दर्शन । आरंभिले तेणें प्रश्न । कडेविकडी पूर्ण नानापरी

॥ ७४ ॥ मग रावणाचे जैसे बाण । श्रीरघुपति करीती खंडण । गर्वोक्तिचें तैसें मापण । करीती निवारण सित्वस्वामी ॥७५॥ च्यार घटीका समग्र पाही । वाद घातिला विप्रें तेहि । शेवटीं शरण आला पाहीं । मनेशी देही अनन्य ॥ ७६ ॥ सद्गुरु ह्मणती येकनाथा । कांहीं आणिक बोल आतां । मनीं संशय ठेऊं चित्ता । प्रश्नास सर्वथा करसील ते ॥ ७७ ॥ ऐसें वदता सित्वनाथ । कंठ जाला सद्गदीत । जोडुनिया दोन्ही हात । उभा तिष्टत द्विजेंद्र तो ॥ ७८ ॥ ह्मणे मजला पदीं घ्यावे । अनाथाशी उत्धरावें । सस्वरूपीं मेळवावें । सांप्रदाय देउनी ॥ ७९ ॥ दीनदयाळ सद्गुरुनाथ । कृपेनें द्रवलें सहजी चित्त । अनुग्रह देउनी तयाते । उत्धरीला त्वरीत तो येकोबा ॥ ८० ॥ जन्मांतरीचा योगभ्रष्ट । जो दिवाकरपंडीत येकनिष्ट । रामदासस्वामीचे चरीत्रीं स्पष्ट । कथा वरीष्ट वर्णिली पै ॥ ८१ ॥ सद्गुरुसेवेसाठीं जाणा । जन्मला तो हा योगीराणा । येकनाथ नामाभिधान । येकात्मता घ्याना म्हणुनी ॥ ८२ ॥ असो सित्धमहाराज अतीग्रामांत । राहाते जाहाले दीनत्रय समर्थ । मग गेले निर्गुणपुराते । श्रीरंगनाथस्थान पाहावया ॥ ८३ ॥ नंतर पुढे संतमंडळी । अनुक्रमें सकळ भेटली । ऐका तयाची नामावळी । सित्ध माउली स्मरती ते ॥ ८४ ॥ तुकारामाचा अवतार । तुकाविप्र तो निर्धार । जन्मभूमी त्या रहिमतपुर । समर्थ थोर ज्ञानराशी ॥ ८५ ॥ जोतिपंत दादा विख्यात । जन्म जाला त्याचा बुधांत । व्यासाचि प्रघटला तो कलींत । महाभागवत प्रेमळ पै ॥ ८६ ॥ श्रीपांडु-रंगमूर्ति पृथ्वीवरी । स्थापिल्या तेणें निर्धारी । धोंडभटजी कीर्तन करी । स्वशिष्य निर्धारी जाणीजे पै ॥ ८७ ॥ मोरोपंडित बारामतीचा । आवडता परम श्रीस्वामीचा । सन्निध आश्रम तयाचा । समागम ज्याचा सतत तया ॥ ८८ ॥ श्रीगणपतीचा जो का अंश । आर्याछंद कवन विशेष । करुनी तारीले दीनजनास । बोधचंद्रांश तो प्रघटला ॥ ८९ ॥ बाबजीपंत मयुरेश्वरीं । काकू दुर्जी ते निर्धारी । शिष्यीण स्वामीची ती साध्वारी । वर्णिली चरित्रीं पृथक ते ॥९०॥ मैनाबाइ जेजुरींत । फलटणीं

ज्ञानी सदाशिवपंत । ठाकूरदास तो विख्यात । वेदांतवक्ता अतिशये ॥९१॥ विठोबादादा च्यातुर्मास्ये । पंढरींत तया वास्तव्य असे । जन्मांतरीचे भानुदास । निवृत्ति विशेष बाबा पाचे ॥ ९२ ॥ गुंडोजीबाबा गोपाळसखा । ठाउके जगीं प्रसिद्ध लोकां । वश्य केले पंढरीनायका । भजनसुखा मुख्य तो ॥ ९३ ॥ जळुजिमळुजिसुतार ज्ञानी । कीर्ती जयाची त्रिभुवनीं । श्रीपांडुरंग ज्याचा ऋणी । काय वाणी वर्णावे ॥ ९४ ॥ चिदंबरदीक्षित भटजीबावा । अक्षइ जयाचा आत्मधन ठेवा । श्रीसिद्धाचा स्नेह बरवा । गोंदङ ध्यावा गोविंद तो ॥ ९५ ॥ भगवानदास मच्छनाथ । लक्ष्मणबावा उद्धोधपंथ । कान्होबाचा अवतार सत्य । गोंदङ अद्भुत प्रेमळ दुजा ॥ ९६ ॥ केदारपंत कन्हाटकक्षेत्रीं । आनंदबावा मोक्षसत्रीं । प्रल्हादमाऊचे सदा वक्त्रीं । पद्मनेत्रीं पांडुरंग ॥ ९७ ॥ महानसाधु समर्थ ज्ञानी । बहुत वसती या मेदीनी । प्रीति जयाची स्वामीचरणीं । ते ते वाणी काहीं वदली ॥ ९८ ॥ असो तयाच्या घेउनी भेटी । संतसमाधी पाहिल्या दृष्टीं । मग पातले कृष्णातटीं । ज्ञानतुष्टी सिद्धस्वामी ॥ ९९ ॥ चंफकक्षेत्र जें चाफळ । तेथें येउनी दीनदयाळ । श्रीरघुपतीसी पूजीयेले । हृदगद केले समर्पण ॥ १०० ॥ पुढें चमत्कारकथा गहन । परीसोत सकळ भाविक जन । परमपावन सिद्ध आख्यान । जाय संपूर्ण अघ ज्या ॥ १ ॥ स्वतसिद्ध श्रीगुरुनीं । प्रघट होउनी अंतःकरणीं । राजारामीं वदविती वाणी । उघडली खाणी निजकृपेची ॥ २ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । सद्गुरूसिद्ध आख्यानातें । अध्याय समाप्त दुसरा हा ॥ १०३ ॥ अध्याय ॥ २ ॥ अनु. अ. ॥ ९९ ॥ समाप्त ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

---

## अध्याय १००

### — श्रीसिद्धस्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु अनादिसिद्धा ।

परात्परा स्वसंवेद्या । चतुर्वेद प्रतिपाद्या । सकळ आद्या श्रीमूर्ति ॥ १ ॥ षंमह्म षद्ली श्रुति । ते तूं स्वामिया सिध्दगणपति । चिदाकाशीं सहजीं स्फूर्ति । ते चि शक्ति जगदंबा ॥ २ ॥ बिंदू ते चिद्व्योम पाही । रेफ अर्धमात्रा ध्याई । श्रीरामपदीं ठेविली डोई । सोहं देहीं स्फुरण ते ॥ ३ ॥ ॐकार बीज तें चि जाण । उपासना ते सर्वत्र पूर्ण । आत्माराम सच्चिदघन । जगद्गुरु पूर्ण अविनाश ॥ ४ ॥ देवत्रई तो चि जाहाला । चराचरीं व्यापून ठेला । पाहूं जाता ठाईं संचला । भरुनी ठेला निर्द्वंद ॥ ५ ॥ निर्विकार सिध्दस्वरूप । भरुनी उरले ते निजरूपें । अंतर्बाह्य आपीआप । सोहंदीप उजळिला ॥ ६ ॥ नमो ऐसिया निजपदाते । अनुक्रमें वंदिले श्रोते । सिध्द होउनी स्वामीकथे । द्यावें चित्त सर्वत्रीं ॥ ७ ॥ करावया जगदोध्दार । जन्म घेती वैष्णववीर । तयांत मुख्य महारुद्र । रामदास अवतार मारुतीचा ॥ ८ ॥ धर्म स्थापन करून । वैकुंठीं केलें प्रयाण । धरा गांजीली पुन्हा जाण । भूभार तेणें जाहला बहु ॥ ९ ॥ तये काळीं येऊन करुणा । अवतार घेतला पुन्हा जाणा । शिष्यासहित निजकल्याणा । तारीत जना भूमंडळीं ॥ १० ॥ श्रीवत्सलांछन ज्याचे अंगीं । सिध्दमहाराज तो हा जगीं । उध्दरीती दीनालागीं । आत्मरंगीं मेळविती ॥ ११ ॥ कल्याणाचे पुनरपि जनन । काय धरीले नामाभिधान । ऐसा श्रोतियें केला प्रश्न । माउक तेणें सकळिकें ॥ १२ ॥ सांगणें लागे तेव्हां जना । नातरी ठाईंचें ऐक्य जाणा । ठाकोनी सूर्य किरणा । प्राचिस्थाना नये चि तो ॥ १३ ॥ असो प्रेमळाचे इच्छेस्तव । विस्तार करणें कथा सर्व । अनुक्रमेसी तें परिसावें । वदविती देव सिध्देशगुरु ॥ १४ ॥ चंपकक्षेत्रामाजी आदिमठ । श्रीरामदासस्वामींचा जेथें स्पष्ट । कोसावरी तयानिकट । चरग्राम श्रेष्ट ह्मणती तया ॥ १५ ॥ माहगंगा तेथील तीर्थ । श्रीकृष्णेसी मिळाली जे विख्यात । सत्तळिंगें स्वयंभू निश्चित । तीरीं असत जिचे पै ॥ १६ ॥ श्रीसिध्देश्वर दैवटीचा । तो महादेव चरगांवींचा । अगाधमहिमा मारुतीचा । बहु तेथींचा चमत्कार ॥ १७ ॥

भाविक प्रेमळ सत्वस्थ । यजुर्वेदी महासमर्थ । श्रीनृसिंव्हनाम प्रख्यात । गुरुभक्त ज्ञानराशी ॥ १८ ॥ आपा ऐसे वदती जन । उदकासारिखे निर्मळ म्हणून । चिदशक्ति ज्या लक्ष्मी पूर्ण । उभय जाण पवित्र कुळ ॥ १९ ॥ स्मरणीं असंत प्रीती । ज्योतिष कुळकर्णाचीवृत्ति । पंचग्राम पंचभूतीं । विभाग युक्ति मुळींचा पै ॥ २० ॥ होउनी सहजी निवृत्ति तर्प । देहीं असतां विदेहत्व असे । योगस्थांती सर्वोत्कर्ष । करीती घोष नामाचा ॥ २१ ॥ सेवटी घेऊन चतुर्थाश्रम । सेविते जाहाले निर्गुणधाम । अठाहासे गर्जोनी नाम । तनु निर्धर्मे विसरजीली ॥२२॥ शके सतराशें सतेचाळीस । कृष्णपक्षीं भाद्रपद मास । श्रीकृष्णजन्मसमयास । ब्रह्मीभूत निशेष पै जाहले ॥ २३ ॥ ते समाधी चरेग्रामी । श्रीदत्तात्रयस्थानासन्निध भूमि । प्राणी पावती मंगळ धामीं । सच्चिद्योमीं त्यादर्शनीं ॥ २४ ॥ योगमठ रामानंद । येती धर्मी नाम प्रसिध्य । सारश्वत्याद्य संन्यास सिध्द । आत्मविद जाणती ते ॥ २५ ॥ प्रतिवर्षी पुण्यतिथी । उत्छाह होतसे बहुयुक्ती । अन्नदान सर्वाभूतीं । कीर्तन करिती बहुसाळ ॥ २६ ॥

॥ समाधिपर अभंग ॥ प्रारंभ ॥

नमिली रामानंदमाउलीसमाधी चरेग्रामीं ॥ ध्रु० ॥ न० ॥
पूर्ण अवतार श्रीगुरुचा । तन्मय जेथें वाचा ॥
लेश न वर्णवे ज्या स्थितीचा । फळस अमानित्वाचा ॥
जाणोनी प्राशिली ज्ञानोर्मी । रामानंद ॥ १ ॥
चराचर हे निजरूप । भरले अर्पी आप ॥
द्वैतभ्रांतीचा तो लोप । येकत्वाचा दीप ॥
वृत्ति स्थिरावली परब्रह्मीं । रामा० ॥ २ ॥
शके सत्राशें शाळिवाहन । सत्तेच्याळीस जाण ॥
भाद्रपदीं या पक्ष कृष्ण । षष्ठीतिथी हें धन्य ॥
केलें प्रयाण चिद्योमी । रामा० न० ॥ ३ ॥
विदेही अनुभव जनकाचा । तेवि मम जनकाचा ॥

परि नेणवे जन काचा । स्वभाव बाल्यास्थितीचा ॥
सेवीं विनटले परब्रह्मीं । रामानंद० ॥ ४ ॥
सिद्धकृपेचा अभंग । कीर्तनीं प्रेमरंग ॥
वृत्ति निमग्न सत्संग । संनिध हा श्रीरंग ॥
पदीं मेळविले राजरामीं ॥ ५ ॥
रामानंदमाउलीसमाधि चरेमामी ॥ ६ ॥

तैसीच माता पुण्यशीळ । पुढें कथन ते षाणिंयेलें । अनुक्रमें तें सांगिजेल । अतिप्रेमळ ज्ञानराशी ॥ २७ ॥ केवळ अवतार भावभक्ति ऐशापरी उभयता मूर्ति । कल्याणासी जन्मविती । श्रीरघुपति तया उदरीं ॥ २८ ॥ गर्भीच असतां मातेसी डोहळे । स्निग्धाचे घ्यावे कवळ । श्रीरामध्यान सर्वकाळ । छंद केवळ हा चि पै ॥२९॥ व्याघ्रती स्वप्नीं तो चि ध्यास । उसणत उठावे अतिहर्षे । पूर्ण होता नऊमास । प्रसुर विशेष समय तो ॥ ३० ॥ वृतामाजी जे द्वादशी । कृष्णपक्ष आषाढमासीं । निःसंशय सरता निशी । प्रातःकालासी जनन ते ॥३१॥ सत्राशे शके शालिवाहन । शास्त्रसंख्या भरते प्रमाण । बुधाचा तो वार जाण । नक्षत्र चरण मृगेंद्र तो ॥ ३२ ॥ सामुद्रिक लक्षणें पहातां । नेत्रासी दिसे आरक्तता । ध्वजादि चिन्हें पदतळाथा । अंकुश युक्ता वज्रेसी ॥ ३३ ॥ मछ अवतारापासून । सगती देवाची निरंतर जाण । याछागी हस्ती प्रत्यक्ष चिन्ह । मछ पूर्ण वाम करीं ॥ ३४ ॥ शंखचक्र उजवे हातीं । देउनी स्वये श्रीरघुपति । जगदोधारार्थ जन्मविती । अभेदयुक्ति मुद्रा ते ॥ ३५ ॥ कल्याणाचे जे कल्याण । राजाराम जानकीरमण । याछागी तेचि नामाभिधान । प्राप्त जाण या जन्मीं ॥ ३६ ॥ असो दिवसेंदिवस वाढता पाहीं । स्वभाव मुळींचा उमटला देहीं । नामस्मरण करणें हृदईं । गुप्त ठाईं न कळतां ॥ ३७ ॥ व्रतबंध जाहाल्यावरी पित्यानें । वेदाभ्यासी योजिले जाण । परी मानसीं उद्विग्न । आत्मज्ञान कळवया ॥ ३८ ॥ कोणासी न कळतां अरण्यांत । भजन करावें सुनिश्चित । मनांत

आणुनी थोंची मूर्ति । बैसणें ध्यानस्थ शिवाठाई ॥ ३९ ॥
तव अकस्मात हरिदास आला । वदर कीर्तनाचा तेणें केला । सद्गुरुप्रताप वर्णियेला । वैराग्य प्रबळा पत्यती ॥ ४० ॥ मग अनुताप होऊन निजहृदया । वेधली वृत्ति संत पाहावया । श्रीपंढरीसी जाउनीया । अनुग्रह घ्यावया इच्छिलें ॥ ४१ ॥ बाल्यदशा अज्ञानवृत्ति । पाहुनी सकळ धिःकारिती । अधिकार नाहीं ऐसें ह्मणती । रागासी येती सकळीक ॥ ४२ ॥ तये काळीं श्रीहरीला । वेदध्ययनीं आराधिला । पांडुरंग संतुष्टला । सांगितला योग स्वप्नीं ॥ ४३ ॥ ह्मणती सज्जनगडासी येथुनी जावें । अनुग्रह होईल तेथें स्वभावें । आज्ञापिता देवाधिदेव । केलें वर्वे तैसें चि ॥ ४४ ॥ समाधितें वंदन करून । निराहार केलें उपोषण । तेणें द्रवले कृपावन । सद्गुरु जाण श्रीस्वामी ॥ ४५ ॥ समाधींतुनी प्रत्यक्षता । प्रगट होउनी तत्वता । पद्मकर ठेविला माथा । अनुग्रह सर्वथा केला पै ॥ ४६ ॥ अंगावरील सखळादवस्त्र । ढोळा दाविलें औदुंबरक्षेत्र । कृष्णातीर तें पवित्र । चर्चितसिंदूर जवळ पादुका ॥ ४७ ॥ नाम सांगुनी रामदास । पूर्ण केला मंत्रोपदेश । इंद्रियमेळीं जागृतीस । कांहीं अक्षरास विसरले ॥ ४८ ॥ बैसता पुन्हा निग्रह धरुनी । प्रत्यक्ष बोलती समर्थ स्वप्नीं । ह्मणती अवतार घेतला मेदिनी । पाहावे नैनीं कृष्णातीरीं ॥ ४९ ॥ तारळी संगमीं जावें ह्मणून । आज्ञापिता श्रीकृपावन । राजारामी केलें प्रयाण । किल्लयाहुनी तत्क्षणीं ॥ ५० ॥ औदुंबर क्षेत्रासी जातां । नवल वर्तलें ऐकिजे श्रोता । दृष्टांत जाला तैसा तत्वता । मूर्ति पाहातां श्रीगुरुची ॥ ५१ ॥ गौरवर्ण श्रीहनुमंताकृति । चमत्कारिक नेत्र दिसती । दर्शनीं सकळ वेधली वृत्ति । प्राप्त स्थीती अष्टभाव ॥ ५२ ॥ दुरी असता स्वामीराय । चमारिली निजकृपे वाह्य । पाचारिलें स्वल्लाहे । घेउनी तये पूर्वील नामा ॥ ५३ ॥ ह्मणती ये रे माझ्या कल्याणा । भेटलासी तान्हुल्या निधाना । गाढ देउनी आलिंगना । पोटासी जाणा धरीयेलें ॥ ५४ ॥ संबोधोनी परमप्रीती । जाला क्रम स्वये वदती ।

भ्रमत्वासि म्हणवोनी कुर्वाळिती । कृपामूर्ति दयानिधी । ॥ ५५ ॥ जाणुनी हृदय मोक्षदानी । स्नान करविले ततक्षणीं । सुचविती समर्थ कृपे करुनी । माध्यंदिनी शाखा तुझी ॥ ५६ ॥ समय तो चि जाहाला प्राप्त । उशीर आविसी कासया येथें । पाहुनी घेई आत्मसूर्याते । आत्मलाभ निश्चित वेळा ही ॥ ५७ ॥ माघ शुक्ल येकादशी । गुरुवार होता तये दिवसी । सन्मुख बैसविले कृपाराशी । उपदेशासी केलें पै ॥५८॥ पूर्वी सज्जनगडी सद्गुरुनाथ । मंत्र सांगितला जो स्वप्नांत । आरंभिला तोचि निश्चीत । कृष्णातीरांत प्रत्यक्ष पुन्हा ॥ ५९ ॥ स्मरणांत होतीं कांहीं अक्षरें । विस्मरण दवडून बोधिले पुरें । मस्तकीं स्पर्शितां कृपाकरें । समाधि त्वरें लागली ॥ ६० ॥ ते जड समाधी विसर्जून । पिंड ब्रह्मांड ऐक्य दाविलें पूर्ण । येकात्मता बाणली खूण । नये वचन ते बोलतां ॥ ६१ ॥ श्रवणीं पेरितां निज बीज । नेनीं उगवले सतेज । अंतर्बाह्य व्यापुनी सहज । कोंदले निज अनुपम्य ॥ ६२ ॥ अहंसोहं भेदभान । तुरे चि कांहीं जेथें जाण । अवघे व्यापिलें चैतन्य । उमस क्षण खाऊ नेदी ॥ ६३ ॥ निज कल्याण दाउनी डोळा । शरणागत स्वामी भेटविला । स्वात्मराज्य भोगीतां सोहळा । नाम तयाचा राजाराम ॥ ६४ ॥ मग सद्गुरुसी प्रार्थुनी । सांप्रदाय घेतला ऐकुनी । तो प्रघटावया मेदिनी । सांगणे जनीं सकळिका ॥ ६५ ॥ श्रीस्वामींच्या बोल्या ॥ श्रीशिवें कथिले पार्वती । पार्वतियोगे कपिलाप्रति । कपिले महासित्थाप्रति । बोध केला ॥ ६६ ॥ तया महासित्थाचा ब्रह्मसित्थ । ब्रह्मसित्थाचा अद्वयबोध । अद्वयबोधाचा प्रसिद्ध । आनंदसित्थ ॥ ६७ ॥ आनंदापासाव सदय । उपदेशिला विवेकाच्यार्य । तया विवेकाचा टाय । स्वानुभूति ॥ ६८ ॥ तया स्वानुभूतीचा चुडामणी । आत्मसित्थ महाज्ञानी । तयापासाव ब्रह्मज्ञानी । अनंत नारदी तो जाहाला ॥६९॥ अनंतनारदीये कृष्णद्वैपायना । सिद्धपदीं बैसऊनि जाणा । हिमालई पुण्यस्थाना । ठेउनी मेरुवरी पै गेले ॥ ७० ॥ तेथुनिया सिद्धासी प्रसाद पूर्ण । चरदाश पुरुष श्रीशिवापासून ।

तेचि तुजला बोधिले जाण । गुह्यांत गुह्य कथन स्वमुखें पै ॥ ७१ ॥

॥ इति श्रीसिध्दराजस्वामींच्या पोथ्या ॥ श्लोक परंपरेचा ॥

श्रीशंकरपार्वती कपिल महामुनि माद्दासिद्ध ज्ञानी वरा ।
ब्रह्म अद्वय अनंद सदय विवेक तो स्वानंदखाणी हिरा ॥
स्वानुभुति आत्मसिध्द अनंतनारदि नमो कृष्णद्वैपायनी ।
वंदु श्रीसिध्दनाथ राजारामी अनुक्रमें वंशावळी पावनी ॥ १ ॥

॥ इति श्लोक ॥

या प्रकारें सद्गुरुसिध्दनाथ । ह्मणती आमुचा सिध्दपंथ । बध्यता कैचि राहील तेथें । अनुसरता निश्चीत या मार्गी ॥ ७२ ॥ संप्रदायमाळा श्रवण होतां । सहजी जाली कृतकृत्यता । राजारामीं चरणीं माथा । सद्ढ तत्वतां ठेविला पैं ॥ ७३ ॥ पद्महस्त ठेउनी पुन्हा शीरीं । ह्मणती जावे स्वगृहाभितरीं । जनकजननी नमस्कारीं । संतोष करी तयाचा ॥ ७४ ॥ आज्ञा करितां श्रीगुरु ऐसी । वियोग न साहे सर्वथा मानसीं । वृत्ति वेधली चरणापासी । जाणे घरासी नावडे ते ॥ ७५ ॥ नेत्रांतुनी अश्रू वाहाती । पाउल नुचले चालतां क्षिती । तये काळीं कृपामूर्ति । काय बोलती सिध्दराज ॥ ७६ ॥ होईल वेगीं तुज दर्शन । परी मातेसी भेट जाऊन । दुःखीत तयेचें अंतःकर्ण । उचित जाण नोव्हे हे ॥ ७७ ॥ मग आज्ञा वंदुनी श्रीस्वामीची । वाट धरिली चरगावींची । परंतु स्मृति देहाची । नसे कांहींचि चालतां पंथ ॥ ७८ ॥ दर्शन घेतां माउलींचें । वोळखिले चिन्ह तयेनें सार्चे । पितृ वदति अनिर्वाच्य । जोडिले मुलींचे पद यालागीं ॥ ७९ ॥ प्राप्त जाहलें आत्मज्ञान । समर्थ भेटला गुरु कोण । पालटलें देहभान । कार्यकारण कळलें यया ॥ ८० ॥ गृहस्थाश्रमी यासि करिता बरें । नातरी जाईल हातीचा कुमर । ऐसें बोलती परस्परें । मोहित विच्यारे मायबाप ॥ ८१ ॥ असो राजारामीं निजध्यास । कैं भेटती श्रीसिध्देश । क्षणेक चैन मनास । न पडे निःशेष सर्वथा ॥ ८२ ॥ सायंसंध्येशी गंगेसी जातां । बहुत जाहली

उद्विग्नता । तये काळीं धरिले पंथा । जावया तत्वता अनुग्रहस्थळा ॥ ८३ ॥ ध्यानीं वेधिलें समूळमन । न स्फुरे रात्र किंवा दिन । उल्लंघुनी मार्ग पूर्ण । अनुग्रहस्थान अवलोकिलें ॥ ८४ ॥ तव तेथें कैचे स्वामी । विस्मय होऊन अंतर्यामी । नमस्कार घातले भूमी । सदृढ प्रेमी वाळवंटीं त्या ॥ ८५ ॥ मग घरासी निघोनी तात्काळीं येतां मांडगंगेजवळी । विशाळ देखिला नेत्रकमळीं । शुभ्र बळी वानर पैं ॥ ८६ ॥ भयाभीत सहजी होतां मन । सिध्दमहाराज प्रघटले जाण । राजारामीं केलें नमन । अनोळखें तें सुख ॥ ८७ ॥ तों मध्यरात्र टळोनी गेली । घरासी येउनी निद्रा केली । उषःकाळीं वाट धरिली । भूमंडळी शोधावया ॥ ८८ ॥ अतीतग्रामासी जातां पाही । भेटली तेथें बगाबाई । लक्ष तयेचें श्रीसिध्दपाईं । योगनिष्ठ देही प्रेमळ ती ॥ ८९ ॥ तयेनें आग्रह फार केला । भोजनविधी तेथें सारिला । शिघ्रवत मार्ग लक्षिला । जावयाला राजारामी ॥ ९० ॥ अटव्यवनें पर्वतशिखरें । शहर क्षेत्रें ग्रामें नगरें । पहातां शोध न लागे निर्धारें । देखिलें नंतर फलटण पैं ॥ ९१ ॥ अस्तमानी वस्तिसी तेथें रहातां । विघ्न प्राप्त जाहलें तत्वता । देवाळईं निद्रा करिता । आश्चर्य सर्वथा घडलें निशीं ॥ ९२ ॥ अकस्मात दोघी स्त्रिया । प्राप्त जाहल्या छळावया । दैदिप्यमान लावण्यकाया । भ्रष्ट करावा ब्रह्मचर्य ॥ ९३ ॥ बहुविध उपाय तयेनें केले । परि मन तेथें नाहीं लुब्धलें । सद्गुरुनाथें रक्षीयेलें । संकटीं भलें राजारामी ॥ ९४ ॥ बळें चि करितां स्त्रियांनीं स्पर्श । येउनी तयाची बहु चिळस । सचिल केलें स्नानास । ओढियास जाउनी ॥ ९५ ॥ असो उदय पावता चंडकीर्ण । द्वादशामतीस केलें प्रयाण । वंदिले गुरुमातेचे चरण । घेतलें दर्शन मारुतीचें ॥ ९६ ॥ नंतर मयुरेश्वरास जातां । भेट जाहली सद्गुरुनाथा । चरणावरी ठेविला माथा । सुख चित्ता जाहलें बहु ॥ ९७ ॥ अनिर्वाच्य तो आनंद । लिहीतां होतसे लेखणी स्तब्ध । अवलोकितां सद्गुरुपद । रहता सिध्द अनुराग्य ॥ ९८ ॥ जेधि ताऱ्हयानें

देखिली माय । कीं लघु वत्साती भेटली गाय । नातरी जन्म दरिद्री पाहे । येकायेकी लाहे बहु सुवर्ण ॥ ९९ ॥ कीं वाळुवंटीं पडता मीन । प्राप्त होये त्या जीवन । निज शिष्यास तैसें पूर्ण । अत्यंत मन सुखावलें ॥ १०० ॥ मस्तक काढावे चरणावरुनी । हें तो नावडे कदा मनीं । प्रेमाश्रु झिरपती नैनीं । अभिषेक चरणीं होतसे तो ॥ १ ॥ असो दीनदयाळ गुरुमाउली । निजकृपेची केली साउली । बहु अंतरीं कळवळली । नेत्रे पुशिलीं स्वहस्तें ॥ २ ॥ पोटासी धरुनी वारंवार । कुर्वाळिले कृपाकरें । ह्मणती सख्या श्रमलासी वा रें । आतां कर शांत मना ॥ ३ ॥ सेवेसाठीं जन्मलासी । वियोग नावडे तुज मानसीं । तरी ते चि करी निश्चयेसी । नाहीं आह्मासी कंटाळा ॥ ४ ॥ ऐसें बोलतां सच्चिद्घन । सिध्द महाराज सद्गुरु पूर्ण । राजारामीं सुखसंपन्न । वृत्ति निमग्न सद्गुरुपदीं ॥ ५ ॥ मग स्वानंदपुरीं स्वामींनीं वास । कांहीं दिवस केला असे । सेवाधर्मी मानस । जाहाला उल्हास बहुत पै ॥ ६ ॥ कोणे येके दिनीं स्वामी समर्थ । ग्रामांतर करविलें परोपकारार्थ । दासी दिधली येक सांगाते । संती निश्चित नाम जाणा ॥ ७ ॥ नगर वाळकिसी जावया आज्ञा करितां । चरणावरी ठेविला माथा । नवल जाहलें मार्ग क्रमितां । ते श्रोता ऐकिजे पै ॥ ८ ॥ तये काळीं तये देशांत । आले असती लांडगे बहुत । भक्षण करिती मनुष्यांते । वाटा समस्त वंद पै ॥ ९ ॥ ऐसें असतां दुर्घट । पंथ धरिला तो चि स्पष्ट । येउनी सुपेग्रामानिकट । वस्ति नीट केली तेथें ॥ ११० ॥ सूर्योदय होतां चि पाहीं । उल्लंघिली कांहीं मही । संगती दुसरी कोणी नाहीं । दासी ते हि रजस्वला ॥ ११ ॥ तव पुढें भयानक । अटव्य वनीं देखिले वृक । महाक्रूर उघडुनी मुखें । जांभया देख दिधल्या ज्यां ॥ १२ ॥ धांवत सन्निध लगवगें । येते जाहले ते लांडगे । उपाय न चले कांहीं मग । येक श्रीरंग पाचेसी ॥ १३ ॥ अनन्युक्त गुरु माउली । हृदई ध्याउनी मनें स्मरली । दीर्घस्वरें आरोळी दिधली । नीद सांभाळी ह्मणुनी ॥ १४ ॥ सर्वांघटीं व्यापक असोन । भय

दाविसी कां येथें जाण । राजारामीं ऐसें वदोनी । लोटांगण घातलें पै ॥ १५ ॥ अर्ध घटिकापर्यंत । केला साष्टांग प्रणिपात । तो लांडगे उभे राहिले समस्त । प्रघटला रघुनाथ स्वामाजी ॥ १६ ॥ पुढें चालतां मार्गे येती । उपद्रव कांहीं च न करिती । जेथें तेथें राहावे वस्ती । सतत असती समागमें ॥ १७ ॥ ग्रामाजवळी जातां जन । लांडगे पाहुनी जाती पळून । नगरद्वार करिती रोधन । मग राहणें ग्रामाबाहेर ॥ १८ ॥ असो माघारे येईस्तव कार्य करुनी । नाहीं सोडिले त्या वृकांनीं । आणिले मार्गीं सांभाळुनी । अगाध करणी श्रीगुरुची ॥१९॥ धन्य सद्गुरुसिध्दमूर्ति । दीनासी रक्षिले त्या लांडग्याहातीं । भक्तवत्सल वर्णू किती । बहु प्रीती शरणागता ॥ १२० ॥ मग सर्वदा सेवेठाईं । रात्रंदिवस वर्तणें पाहीं । इकडे चरग्रामीं सर्वहि । मातापिताहि शोध करीती ॥ २१ ॥ जनकजननीचें अंतःकर्ण । व्हावे झडकरी पुत्रदर्शन । म्हणुनी हुडकिले बहु ठिकाणें । साधुस्थानें सकळीक ॥ २२ ॥ असो सिध्दस्वामी स्वानंदपुराहून । स्वस्थानासी आले जाण । राजारामी प्रीतीकरुन । केलें राहणें श्रीजवळी ॥ २३ ॥ सेवाधर्म अनुष्ठान । अखंड हें चि पुरश्चरण । श्रीगुरुपदीं जडलें मन । नाहीं साधन आन पै ॥ २४ ॥ नंतर पुढें कृष्णातीरासी । येते जाहाले सच्चिद्विलासी । चाफळासी येऊन श्रीरघुपतीसी । वंदिले मानसीं स्वामींनीं ॥ २५ ॥ संनित्य डेखणग्रामाजवळी । रामघळ आहे जे का पहिली । ते हि जाऊन अवलोकिली । तेथें राहिली गुरुमाय ॥ २६ ॥ मग प्रार्थना करितां निजदासें । आले स्वामी आश्रमास । मातापितरें तयास । केला उपदेश दर्शनीं ॥ २७ ॥ कृपादृष्टी होतां चि जाण । मातेसी जाहालें आत्मज्ञान । ऐका श्रोते देऊन मन । चमत्कार पूर्ण गुरुकृपेचा ॥२८॥ लक्ष्मी नाम्नी माझी माता । परिसा तयेची कांहीं कथा । पार नाहीं जिचे सुकृता । पतिव्रता न वर्णवे ॥ २९ ॥ सद्गुरुपदीं अनन्यभाव । नाहीं मनीं दुसरा देव । लाधलें पूर्ण योग सर्व । सदृढ वैभव उपासना ॥ १३० ॥ निजधामासी जातेवेळे । बहुत वर्तलें असें नवल । श्रीकृष्णेचें

स्नान केलें । जाउनी भळे फोसपर्यंत ॥ ३१ ॥ ग्रामासी जातात तैशापरी । पुसिले हिंडोनी सर्वत्र घरीं । हसती तेव्हा नरनारी । विपरीतवैखरी वदती पै ॥ ३२ ॥ मग सदनांत येऊन । घातिले जियेनें कंबडासन । मळवट भरला भव्य पूर्ण । कुंकुमानें तेथेळे ॥३३॥ मंडळी मेळऊन सर्वत्र । नामस्मरणें केले पवित्र । नासाग्रीं लाऊन नेत्र । ध्यान स्वतंत्र केलें पै ॥ ३४ ॥ मग मुखांतुनी ज्योति निघाली । चिदाकाशीं लीन जाहली । जडतनु भूमीसीं पडली । अति शोभली ते कथा ॥ ३५ ॥ असो सद्गुरुसिध्दस्वामींचें । षत्र प्राप्त जाहलें हातीचें । उत्तरविधान जाहलें साचें । शास्त्रोक्तीचें यथोक्त ॥ ३६ ॥ शके सत्राशे येकोणतीस । संवत्छरनाम प्रभव विलसे । त्रयोदशी शुध्द जेष्टमास । उत्तम दिवस धन्य तो ॥ ३७ ॥ मातावियोगेकरुन । दुःखीत होतां च अंतःकर्ण । तयेकाळीं अभंगवचन । सद्गुरुनें समजाविलें ॥३८॥

॥ अभंग श्रीसिध्दस्वामींचा ॥

जे जे काळीं जें जें होणार तें तें होये । कासावीस काय होसी वांया ॥१॥
लाभ हाणी मृत्यु नेमिल्या सारिखा । होतसे देखा यथाकाळें ॥ २ ॥
कासया तळमळ करितोसी जाण । सदा नारायण आठवावा ॥ ३ ॥
सिध्द ह्मणे येथें धरी जो विश्वास । होईल तयास सुख बहु ॥ ४ ॥

॥ इति अभंग स्वामींचा ॥

याप्रकारें सिध्द स्वामींनीं । राजारामीं बोध करुनी । निघोनी गेले तीर्थाटणीं । संगे घेउनी स्वदासा ॥ ३९ ॥ पुढें कांहींकाळेंकरुन । दृष्टी पाहिलें अपूर्वस्थान । श्रीपाटेश्वर दैवत जेथें पूर्ण । सन्निधान क्षेत्र माहुली ॥१४०॥ देवताप्रतिमा सकळीक । तये स्थळीं असती देख । वन विचित्र जेथें सुरेख । शुकादीक पक्षी पै ॥४१॥ विवाहकाळीं हरिद्रालेपन । ज्या पर्वतीं घडलें शिवासी जाण । ऐसी जागा परमपावन । पीतवर्ण त्या उदकाचा ॥४२॥ यंत्राकार विस्तीर्ण तळें । पाताळगंगा जेथें प्रांजळ । स्वामीसमर्थ सुखावले । अवलोकिलें स्थान तें ॥४३॥ मुनींचा स्वभाव अंगीं पहिला । अरण्यवास आवडे दयाळा । वास्तव्य केलें तया अचळा ।

माजी निर्मळा श्रीगुरुनीं ॥ ४४ ॥ कोणे येके दिनी सिद्धमूर्ति । सेवकासी आज्ञा करिती । ह्मणती गाई असाव्या पुजेप्रती । चतुर्विंशती मंत्रोक्त ॥ ४५ ॥ आज्ञा वंदोनी राजारामी । भिक्षा केली ग्रामोग्रामीं । प्रथम येवोनी स्वआश्रमीं । धेनु स्वामीस अर्पियेली ॥ ४६ ॥ येकविंशति अणिक मिळाल्या । युग्म पाहिजेत त्या संख्येला । तये काळीं विच्यार घडला । ऐका भव्य साद्यंत ॥ ४७ ॥ छत्रपति जो सातान्यावरील । निजभक्त तो फार प्रेमळ । श्रीरामदासस्वामींचें पदकमळ । आठवी सोज्वळ दिननिशी ॥ ४८ ॥ ध्यान करीत बैसावें । रूप स्वामींचें आठवावें । तया दृष्टांत जाहला त्या स्वभावें । परिसा बरवे श्रोते हो ॥ ४९ ॥ पाटेश्वरीं प्रघटायमान । प्रत्यक्षता आहे जाण । राजीयासी पडतां ऐसें स्वप्न । राजा सावधान शेजेवरी ॥ १५० ॥ मग चटपट लागली मनास । तो उदय पावला चंडांश । भेटले सहजी गोपाळ व्यास । पुराणिक तयास सांगीतलें ॥ ५१ ॥ पूर्वी तयास दर्शन होतें । कथिला तयानीं समूळ वृतांत । पाटेश्वरी श्रीसिद्धनाथ । महा समर्थ आहेत ह्मणुनी ॥ ५२ ॥ तेव्हां राज्यासी हर्ष जाहाला । विज्ञाप्ती सुचविली श्रीस्वामीला । दर्शन देउनी स्वदासाला । उध्दरावया त्वरा ही ॥ ५३ ॥ पत्र पाहुनी सद्गुरुनाथें । द्रवलें कृपेनें सिद्धसमर्थ । राजा-रामीं आज्ञा करीत । चला ह्मणत सातारीया ॥ ५४ ॥ मग सत्वर निघोनी कैवल्यदानी । पोहचले त्या सतत्स्वपि स्थानीं । दर्शन देउनी शिवाजीलागुनी । कैवल्यदानी गुरुवर्यें ॥ ५५ ॥ नृपवरासी आनंद जाहाला । नव्र जाय तो ग्रंथीं वर्णिला । दंडप्राय भूमीसी पडला । मावें वंदिला तो निजगुरु ॥ ५६ ॥ घळघळा नेत्रीं अश्रु वाहती । स्वेद पातला अंगाप्रती । कंठ दाटला करितां स्तुती । प्रेमळ चित्तीं अष्टभाव ॥ ५७ ॥ मग आसनावरी बैसविले । षोडशोपचारें असे पूजिले । वस्त्रे अळंकार लेवविले । वाद्यें वाजली सकळ तीं ॥ ५८ ॥ स्वपुत्र घालुनी पायावरी । मंत्रोपदेश करविला निर्धारी । अन्नसंतर्पण ते अवसरीं । उत्कृष्ट करी राजेंद्र॥५९॥

गुरुदक्षणा घ्यावी ह्मणतां । वदती स्वामी त्या नृपनाथा । पूर्वींच राज्य समर्पिलें असतां । काय आतां उरलें पै ॥ १६० ॥ जरी इच्छा आहे मनांत । तरी देईं मुष्टिमर भिक्षेतें । दासबोधीं वर्णिलें निश्चित । तें चि सत्य करणें आतां ॥ ६१ ॥ तेव्हां तात्काळ सनद घेऊन । मुद्रा केली राजीयानें । प्रत्यही सकळ प्रजेनें । मुष्टिभर धान्य घावयासी ॥ ६२ ॥ आणि सालंकृत धेनु आणिल्या । श्रीसित्धस्वामीसी अर्पण केल्या । राण्या सकळ पायासी लागल्या । दर्शनें केल्या पुनीत पै ॥ ६३ ॥ नंतर निघोनी शिष्यासहीत । गाटेश्वरीं आले सद्गुरुनाथ । पुढें वर्तलें अपूर्व श्रोते । ते हि कथे श्रवण कीजे ॥ ६४ ॥ श्रीरामदासस्वामींचा अवतार । जाहला असे महीवर । करावया जगदोत्धार । सित्धेश्वर या नामें ॥ ६५ ॥ सित्ध होउनी हृदयपद्मीं । ग्रंथ करविती राजारामीं । देहमान दवडुनी उर्मी । मेळविले धामी निज अभिष्ट ॥ ६६ ॥ भक्तमंजिरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । सद्गुरुसित्धचरित्रांत । अध्याय होत तृतीय हा ॥ १६७ ॥ ॥ अध्याय ॥ ३ ॥ अनुक्रम अ. ॥ १०० ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अभंग ॥ ३ ॥ श्लोक ॥ १ ॥ एवं संख्या ॥ श्रीराम जयराम जय जय राम ॥

## अध्याय १०१

### — श्रीसित्धस्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु परमेश्वरा । सिद्धस्वरूपा निर्विकारा । दाविले डोळा पंढरपुरा । काय उदारा वानूं ते ॥ १ ॥ अनादिसित्ध तूं परीपूर्ण । विटेवरी श्रीजगजीवन । अर्धमात्रा सोहं स्फुर्ण । जाणिजे खूण रुक्मीणी ते ॥ २ ॥ अष्टनायका ज्या प्रकृती । अनुक्रमेसी त्या शोभती । गरूड आणि हीमारुती । विवेकविरक्ती सन्मुख पै ॥ ३ ॥ हृदयाकाशीं

सहस्रदळीं । परात्पर तुर्येचे निजराउळी । निरंतर कथेची घुमाळी । संतमेळीं स्वानंदें ॥ ४ ॥ सत्रावीचें निज तीर्थ । चंद्रभागा ते चि निश्चित । वाळवंटीं चिन्मय सत्य । पुंडलीक भक्त दृढभाव ॥ ५ ॥ गोनाम सकळ इंद्रियाचें । गोपाळपुर रचिलें साचें । अद्भुत विंदान मुरलीधराचें । मोहीलिया वृत्ती च गोपीका त्या ॥ ६ ॥ श्रीगुरुकृपेची पौर्णिमा पूर्णता । गोपाळकाला तो चि निरुता । प्रसाद लाधला सद्भक्ता । नित्योत्साह तत्वता अखंड पै ॥ ७ ॥ समचरणीं हरी स्वतसिध उभा । अनुचाही जो का गाभा । तया मूर्तीशी अत्यंत शोभा । भक्तमंजीरी प्रभामाळिकेन ॥ ८ ॥ त्यांतील मुख्य जो का मणी । महासमर्थ वैष्णवजनीं । चरीत्र तयाचें ऐका करणी । श्रीसित्वात्मदानी जगद्गुरूचें ॥ ९ ॥ मागील अध्याईं कथन जाहालें । राजीयासी उपदेशिलें । नतर समर्थ निघोनी आले । स्थान अचळ पाटेश्वरीं ॥ १० ॥ मत्राक्षर गाई चोवीस । मिळाल्या सहजी पूजनास । दुग्ध पुष्कळ त्या धेनूस । भक्षीती स्वइछे तृण वनी ॥ ११ ॥ पुढे सतती तयाची जाहली । दुमते करीते शिष्य मडळी । ब्राह्मण येती नित्य काळीं । तया सकळीं त्या अर्पिती ॥ १२ ॥ भिक्षा चहूकडुनी त्या आणावी । अतिथी दीनें जेववावी । ऐसी आज्ञा गोसावी । करी ते बरवी निजदासा ॥ १३ ॥ राजारामी वंदुनी वचन । आरंभिलें पर्यटण । भिक्षा मागुनी आणावे धान्य । ब्राह्मणभोजन प्रत्यही ॥ १४ ॥ तव येके दिनीं अकस्मात । विप्र मिळाले असती-बहुत । सग्रह मूळिचा नसें तेथें । पाकशाळेंत अल्प अन्न ॥ १५ ॥ तये काळीं चिंता पडली । मडळी सकळ घाबरी जाहाली । तेव्हां देवाजई निद्रा केली । गुरुमाये बैसली होती त्या ॥ १६ ॥ मग हास्य करुनी सिध्दनाथ । ध्वती काय वचनामृत । ह्मणती राम असतां समर्थ । न पडे अन्नाते न्यून कांहीं ॥ १७ ॥ वस्त्रें काढुनी आंगावरील । शिष्याहातीं तात्काळ दिधले । राजारामी आच्छादीलें । पाकावरी भले ते क्षणीं ॥ १८ ॥ पदार्थीते वाढीतां सकळ । परी असती तैसेचि भरले । ब्राह्मण जेउनी तृप्त जाहाले ।

विस्मय सकळ करीती ते ॥ १९ ॥ आणिक ऐका चमत्कार गोष्टी । यमधर्म आला स्वामीचे भेटी । तयासी अनुग्रह देउनी सृष्टी । सांप्रदाय गोमटी दिधली स्योंती ॥ २० ॥ तेरा अभंगी ते कथा । येमबाधा नोव्हे ऐकतां । अवधान यावें येकाग्रता । पाळागी श्रोता सकळीक ॥२१॥

॥ श्रीसिध्दस्वामीचे अभंग ॥ श्रीरामप्रसन्न ॥

यम पूसतसे दुता । हा रे ठाव का वा रीता ॥ १ ॥
जा रे आणा मानवासी । त्याचे पाहावे कर्मासी ॥ २ ॥
दूत बोळ्ताती जाण । ऐका स्वामी हें वचन ॥ ३ ॥
आह्मी जातो ज्या स्थळासी । विष्णुदूत नेती त्यासी ॥ ४ ॥
कोण्ही येक सिध्द जाहाला । तो चि तारी या जीवाला ॥ ५ ॥

॥ १ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

जे जे जीव शरण येती । तारक तयासी सांगती ॥ १ ॥
मंत्र ध्याती तो निश्चळ । तेथें न चाले चि बळ ॥ २ ॥
सागे यम त्या दूतासी । सिध्द कोठें दावा मजसी ॥ ३ ॥
पाश रागें उचलिला । दंड खांदी तो वाहिला ॥ ४ ॥
दात खाउनिया बळी । आला सिध्दाचे जवळी ॥ ५ ॥

॥ २ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

सिध्द बैसले ध्यानस्थ । नेत्री सद्गुरुसी पाहात ॥ १ ॥
पाश सिध्दासी घातिला । दंड बळानें झोकिला ॥ २ ॥
पाशसुत्रें दिव्यावळी । दंड दंडवत घाली ॥ ३ ॥
यम चमत्कारे मनी । काय जाहाली हें करणी ॥ ४ ॥
यमें नमस्कारा केले । सिध्दा बोलो आरंभिलें ॥ ५ ॥

॥ ३ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

सिध्द सागे कोणीकडे । धर्मा आलासी इकडे ॥ १ ॥
काय इछा आहे मनीं । सांग स्वमुखेंकरुनी ॥ २ ॥

यम सांगे तो वृतांता । माझा शोक जाहाला रीता ॥ ३ ॥
कोण्हा उपदेश न कीजे । ठाइं आपुले राहिजे ॥ ४ ॥
हासोनी बोलताती सिध्द । धर्मा बोलसी अबध ॥ ५ ॥

॥ ४ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

ऐक सूर्याच्या तनया । वैष्णवा तूं धर्मराया ॥ १ ॥
धर्म नाम तुझें जाणा । ऐसी दुष्ट का वासना ॥ २ ॥
तुझे राहाणें किती दिवस । व्यर्थ जगा देसी त्रास ॥ ३ ॥
दंड करीसी निष्टूर । काय बरा अधिकार ॥ ४ ॥
धर्म ह्मणे सिध्दराया । कर्मे दंड होये तया ॥ ५ ॥

॥ ५ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

देवें दिल्या अधिकार । दंडी कर्माच्या आधारें ॥ १ ॥
जैसा आचरती धर्म । तैसें तया प्राप्त कर्म ॥ २ ॥
मी तो निमित्याचा धणी । कर्मे ज्याचीं त्या जाचणी ॥ ३ ॥
नाहीं मज्ञा येथें दोष । आज्ञा ईश्वराची असे ॥ ४ ॥
सिध्द बोलती वचन । तुझा देव सांगे कोण ॥ ५ ॥

॥ ६ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

धर्म ह्मणे चतुरानन । तो चि आह्मा स्वामी जाण ॥ १ ॥
त्याची आज्ञा अधिकार । वर्ततातीं देव सारे ॥ २ ॥
ऋषी आदि माहानुभाव । त्यासी पूज्य ब्रह्मदेव ॥ ३ ॥
जेणें निर्मिले सकळ । आज्ञा केले दिशापाळ ॥ ४ ॥
ऐकोनी धर्माचें वचन । सिध्द बोलताती जाण ॥ ५ ॥

॥ ७ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

देव सकळाचा ब्रह्मा । परी भोगीतसे कर्मा ॥ १ ॥

त्यासी कर्मफळ देता । सर्वांवरी ज्याची सत्ता ॥ २ ॥
तया नोळखोनी धर्मा । स्वामी म्हणविती ब्रह्मा ॥ ३ ॥
ब्रह्मा आहे रजोगुण । देव ठाइंचा निर्गुण ॥ ४ ॥
ऐसा वोळखीत्या देव । सिध्द म्हणे नाहीं भव ॥ ५ ॥

॥ ८ ॥ ७ ॥
॥ श्रीरामप्रसन्न ॥

अनंतब्रह्मांडें निर्मीता । ज्याचे मायेची हे सत्ता ॥ १ ॥
त्यासी कां रे भूललासी । अधिकार का दाविसी ॥ २ ॥
काय सत्य हें शरीर । सत्य कैचा अधिकार ॥ ३ ॥
तुझे ब्रह्मे जाले किती । चंद्रसूर्या नाहीं मीती ॥ ४ ॥
यम ऐकोनिया जाण । सिध्दा घाली लोटांगण ॥ ५ ॥

॥ ९ ॥ ७ ॥
॥ श्रीरामप्रसन्न ॥

ऐशा देवासी दाखवा । ब्रह्मज्ञानासी ऐकवा ॥ १ ॥
पुरवा माझा मनोरथ । दास संताचा अंकित ॥ २ ॥
अश्रू दाटले नयना । जाली सत्व ती भावना ॥ ३ ॥
शरीर जाहाले रोमांचित । कंठ दिसे सद्गदीत ॥ ४ ॥
सिध्द म्हणे सावध होईं । आपुले स्वरूपासी पाहीं ॥ ५ ॥

॥ १० ॥ ७ ॥
॥ श्रीरामप्रसन्न ॥

पुढें बैसउनीं धर्म । सांगितलें गुह्य वर्म ॥ १ ॥
वृत्ति उठलीसे जाण । जाले मनाचें उन्मन ॥ २ ॥
हरली देहाची ते बूध्दी । लागे स्वरूपीं समाधी ॥ ३ ॥
मीतूंपणा विसरला । आत्मरंगीं तो रंगला ॥ ४ ॥
सिध्दें तया चेवविले । मागे वृत्तिवरी आणिले ॥ ५ ॥

॥ ११ ॥ ७ ॥
॥ श्रीरामप्रसन्न ॥

आपुला संप्रदाय दिला । धर्म पाइं लीन जाहाला ॥ १ ॥

म्हणे हे चि यावें सुख । नलगे अधिकार दु ख ॥ २ ॥
आमुचे आज्ञेचा हा नेम । पाहे जीवाचे वा कर्म ॥ ३ ॥
अनन्य गुरूचा जो दास । त्यासी देऊं नको त्रास ॥ ४ ॥
सिध्य सांगतांती जाण । काय अधिकार शीण ॥ ५ ॥

॥ १२ ॥ ७ ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

सर्वाभूतीं आहे ब्रह्म । सांगितला मुख्य धर्म ॥ १ ॥
परी पाहुनी कर्माशी । दड करी वा जीवाशी ॥ २ ॥
वंदुनी सिध्याचे आज्ञेला । धर्म स्वस्थानासी गेला ॥ ३ ॥
तेरा अभगीं हे कथा । ऐका नो॰हे गर्भव्यथा ॥ ४ ॥
सिध्यधर्माचा सवाद । गाता नाहीं यमबाध ॥ ५ ॥

॥ १३ ॥ ७ ॥

॥ इति अभंग समाप्त ॥

याप्रकारें त्रयोदश अभगीं । उपदेशिले यमालागी । मिळाला सहजी निज आत्मरगीं । सांप्रदायी नि सगी तो जाहाला ॥ २२ ॥ यालागीं जे सिध्यपथी । तयाशी यमबाधा न घडे निश्चीती । गुरुबधु तो जाहाला जगती । काय भीती तयाची ॥ २३ ॥ सिध्यसाप्रदाइ जे जे जाहाले। अथवा जे का होणार पुढील । यम तयाचे पाई लोळे । दास केवळ होउनी ॥ २४ ॥ गुरुभक्ताचा कुळधर्म । जया गृहीं सदा नेम । दृष्टी न पाहे त्याचें धाम । सदा यम शरण तया ॥ २५ ॥ गुरुनिंदेशी वर्तता कोण्ही । तो चांडाळ पातकी प्राणी । यम तयाशी ताडण करुनी । निरतर न्हेउनी पाडी नर्कांते ॥ २६ ॥ यमगीतेंत बादरायण । प्रत्यक्ष बदला स्वमुखेंकरून । जो का अभक्त निंदक पूर्ण । यम विघ्न करी तया ॥ २७ ॥

॥ यमगीतेचा श्लोक ॥

यालागी प्राणी गुरुभक्त । तो चि सर्वथा होईजे मुक्त । म्हणुनी धरावा सिध्यपथ । भरवसा सत्य नाहीं क्षणाचा ॥ २८ ॥ असो यमानें

अनुग्रह घेऊन । स्वस्थानासी गेला जाण । पुढें चमत्कार जाहाला गहन । ते हि श्रवण करा तुह्मी ॥ २९ ॥ कोण्ही येके दिनीं स्वानंदपुरासी । सद्गुरु गेले मयुरेश्वरासी । तेथील सकळ शिष्ट जनासी । हर्ष मानसीं जाहाला पै ॥ ३० ॥ शिऊबाई प्रेमळ भक्त । वया तिची कन्या विरक्त । उभयता भेटल्या देउळांत । नमन करीत त्या दोघी ॥ ३१ ॥ चतुर्थीव्रत त्या दिवशीं । घेउनी गेल्या स्वगृहासी । अर्चन करूनी भावेंसी । आसनासी बैसविले ॥ ३२ ॥ तव शिष्ट-मंडळी तेथें आली । अध्यात्मचर्चा आरंभिली । सूर्य गेला अस्ताचळीं । मापणमेळी न पुरे ते ॥ ३३ ॥ शिऊवया दोघी जणी । तन्मय जाहाल्या स्वामीचरणीं । पांचवी अवस्था ते उन्मनी । प्राप्त मनीं ते जाहाली ॥ ३४ ॥ तो पर्जन्य तेथें येतां जाहाला । अंधःकार तेथें दाटला । पूज्यद्रव्य आणावयाला । विसरल्या त्या दोघी जणी ॥ ३५ ॥ स्वयंपाकविधी रात्रौ करून । करीत्या जाह्या गणपतिपूजन । तव नाहींत दुर्वांकूर जाण । आदिकरून शमीपत्रें ॥ ३६ ॥ पारण्याची वेळा आली । प्रहररात्र होती जाहाली । मंडळी ते तटस्त बैसली । द्रव्यें मिळाली नाहीं यदर्थी ॥३७॥ तये काली श्रीसिध्दनाथ । ह्मणती कां या चिंताक्रांत । अर्चन करुनी गजाननाते । नैवेद्याते समर्पावें ॥ ३८ ॥ मग ती वया पुढें होऊन । हात जोडिले स्वामींसी जाण । ह्मणे मी दुर्वांकुर वाहिल्यावांचून । भोजन न करी सर्वथा ॥ ३९ ॥ ऐसे ऐकुनी दीनदयाळ । केले विचित्र तेथें नवल । शमीपत्रें दुर्वादळें । काढिलीं सकळ मुखांतुनी ॥ ४० ॥ हे पाहुनी आश्चर्य करीती । प्रेम दाटलें सर्वत्रचिचीं । भक्तवाढळ कृपामूर्ति । धन्य स्थीती स्वामींची ॥ ४१ ॥ जयाचे अंगीं सकळ दैवतें । सिध्द

विनायक । अचळ सौख्य देतसे पै ॥ ४४ ॥ ते ऐका भाविक जन । श्रीसिध्याचे गणपतीस्तवन । कवनप्रसादें निघती श्रवण । करणें लेखन याकागी ॥ ४५ ॥

॥ श्रीसिध्दस्वामीचें काव्य । गणपतिस्तवन प्रारंभ ॥

विषय दुष्ट हा पाठी लागला । छळित चळचळा दास आपुला ।
सोडवील कोण भक्त धांव या । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १ ॥
मायबाप आणि बंधु सोयरे । आस स्वकीय तूं असती खरे ।
धांव धांव पा मान राखी या । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ २ ॥
कामक्रोधलोभ वैरी माजले । विषयकुहरीं लोटूं लागले ।
रात्र दवडुनी दीन दाविया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ३ ॥
बहुत कष्ट मी गर्भी सोसीले । रक्त रेत त्यास क्रिमी लागले ।
अग्नीकुंड त्यांत रक्षीसी जया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ४ ॥
मास नऊ त्वां रक्षिले जरी । रसासी पुरविले गर्भउदरीं ।
प्रसूतकाळीं त्वां निर्मिले पया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ५ ॥
वाढउनी बाळ लाविलें स्तनीं । अन्नपानवास दिधले जनीं ।
प्राक्तनी वळें गोविलें तया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ६ ॥
विनायकाविणें कोण या जीवा । करील सांग बा सत्य या किंवा ।
जाणसी तया सर्व जाण या । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ७ ॥
सप्तहि पुरींत मोक्ष सापडे । वेदशास्त्र त्यांत बोलणें घडे ।
नाम सार येक आठऊं तया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ८ ॥
काशिका अवंती उजनी अयोध्यापुरी । माया मथुरा कंचि दुसरी ।
द्वारकातीर्थ पाहीली गया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ९ ॥
चरणतीर्थ जे प्राशिती सदा । त्याजला कदा नाहीं आपदा ।
थोर भाग्य त्यासी होय हे दया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १० ॥
भक्तिमुक्ति या राहे दासी होउनी । आठविती तुला नित्यकीर्तनीं ।
रंगीं नाचती गाती थयथया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ ११ ॥
कोण कोण देव पुजिती तुला । विश्वव्यापकासी मोल लाविला ।
विश्वपुत्र तूं चि येक गे बया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १२ ॥

सकळ देवऋषी स्तवनीं ध्याविले । आपुले पदाशी जाण योजीले ।
करुनी तूं कृपा हरीसी मया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १३ ॥
भक्तवत्छलाशी बोलणें किती । शुध सत्व देई चांगली मती ।
स्वदास माविकाशी ध्याविशी मया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥१४॥
भक्ति जे करील भाव शुध्द जो । पुत्र वित्त स्त्री त्याजला भजो ।
गधादी हस्ती तो पाळी रे हया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥१५॥
विषयसुख तें त्यागणें किती । इंद्रपदादि पाई लागती ।
गणिल कोण तो इतर विषया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १६ ॥
मुनिजनाचिये कीर्तनीं वसे । हरिहरादिका लागलें पिसें ।
स्तउनी मातरा पुजिती अया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १७ ॥
कमठ असूर फार मातला । मृत्यु त्या खळा जवळी पातला ।
चरणीं ठाव त्वां दिधला तया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥१८॥
कश्यपाश्रमाशी येउनी स्वयें । करुनिया लिळा हरीसी भयें ।
सींदुराचिया नाशिले बया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ १९ ॥
कीर्ती ऐकुनी पावलो जरी । ठाव शीघ्र दे स्वात्मउदरीं ।
ज्ञानदातृ नाम पाजी रे पया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥ २० ॥
सिध्दप्रार्थनेसी मानसीं धरा । गोड जे दिसेल त्याशी बा करा ।
स्तवित मीं तुते भादी निर्भया । विनवितो तुला स्वामी मोरया ॥२१॥
॥ इति सिध्दकृत मोरयाप्रार्थना येकवीस श्लोक संपूर्णमस्तु ॥ ७ ॥ छ ॥

ऐसीयाप्रकारें सिध्दस्वामींनीं । प्रार्थना करीता जोडुनी पाणि । तुरा मरहटीचा दिल्हा काढुनी । स्वहस्तेंकरुनी मयुरेश्वरें ॥ ४६ ॥ तो प्रसाद कल्याणार्थ । निजदासासी श्रीगुरू योपीत । करुनी साष्टांग प्रणिपात । राजारामीं धरीत प्रेमें शीरी ॥ ४७ ॥ मग क्षेत्रस्थांचा निरोप घेउनी । जेजोरीस गेले स्वामी निघोनी । मैनाबाई तेथील ज्ञानी । पाहीले नैनी तयेसी ॥ ४८ ॥ मल्हारमाऊ प्रेमळसंत । देखीले आणिक विद्वज्जन भक्त । तोपविद्या श्रीधाळसाकांत । कीर्तन करीत दिगजय ॥ ४९ ॥ नंतर आळंदीसी सिध्दसमर्थ । गेले ज्ञानेश्वराचे

दर्शनाते । तेथें नवल केले श्रोते । तेंहि वृत्तांत ऐकिजे पै ॥ ५० ॥
मार्गी गर्दभ थकुनी पडले । ह्मणोनी धोणारीयाणी उपेक्षिले । हे पाहुनी
सद्गुरु स्नेहाळें । आज्ञापीले शिष्यासी ॥ ५१ ॥ ह्मणती यासी गांवांत
जाऊन । तृण आणावें हिरवें जाण । भक्षण केलिया घालुनी स्नान ।
स्वच्छंदे धुवोनि टाकावी ॥ ५२ ॥ हुशार जाहाले पाहुनी । आळंदीसी
यावे तुह्मी । वोवरींत भेट होईल ह्मणुनी । गेले सुचवोनी स्वदासा
॥ ५३ ॥ ऐसे महाराज दयाघन । काय वर्णू पामर दीन । राजारामीं
आज्ञेप्रमाणे । करीता प्रसन्न जाले पै ॥ ५४ ॥ संतोषोनी परमनिकें ।
कुर्वाळिले सकर्पे देख । ह्मणती दाविते तुह्मा कौतुक । अरण्यात सुखें
चल आता ॥ ५५ ॥ श्रीज्ञानेश्वराची समाधी वंदून । पुढें केले तेथुनी
प्रयाण । मरकळग्रामींच्या वनांत नेऊन । करविले दर्शन महापुरुषाचें
॥ ५६ ॥ ज्ञानोबानी रेडीयाहाती । वेद ह्मणविले ज्या निश्चीती । तो
हा अवतार जाहाला क्षीती । ह्मणउनी सुचविती सीध्य समर्थ ॥ ५७ ॥
सदाशिव नाम तयाचें । तेथें ज्ञानाशी उणें कैचें । पृथक चरीत्र
तयाचें । वर्णिलें साचें सविस्तर ॥ ५८ ॥ असो तयाची भेटी होतां ।
राजारामीं कृतकृत्यता । श्रीगुरुसंगे सार्थकता । वचन तत्वता बहुतेका
॥ ५९ ॥ जया लाधली सत्संगती । तयाच्या पुण्या नाहीं गणती ।
मुक्ति ध्यारी पाईं लागती । मोक्षाप्रति कोण पुसे ॥ ६० ॥ तपे तीर्थे
व्रतादिके । सद्गुरू कृपेस्तव करणें देख । नाहीं साधन दुजें आणिक ।
शाश्वत सुख पावावया ॥ ६१ ॥ नंतर सित्व महाराज ठाईं ठाईं ।
जडजीव उद्धरोनी पाही । स्वस्थानासी येउनी काहीं । राहिले विदेही
पाटेश्वरी ॥ ६२ ॥ तव पुढें पुण्यतिथीशी । यात्रा चालिली परळीशी ।
माघ कृष्ण नवमीशी । घ्यावयाशी प्रसाद ॥ ६३ ॥ श्रीरामदासस्वामीचें
पटशिष्य । आले असती उत्छाहास । साक्षातदर्शन ते सर्व जनास ।
करविती वार्तेस ऐकियेले ॥ ६४ ॥ तये काळीं राजारामी । चैन न पडे
अंतरयामीं । प्रार्थुनीया आपुला स्वामी । पादपद्मीं नमीयेले ॥ ६५ ॥
सित्धमहाराज लीलाधारी । घेउनी गेले मंडळी सारी । रामनामें गर्जोनी

वैखरी। सज्जनगीरी घेधीला तो ॥ ६६ ॥ तव तेथें यात्रा बहूत। भरोनी गेला असे पर्वत। हनुमंतबावा त्या दर्शन करवीत। रामदाससमर्थ स्वामींचें ॥ ६७ ॥ हे पाहुनी सिध्दस्वामींते। सकळ शिष्य जाहाले प्रार्थीते। राजारामी जोडुनी हात। आळ घेत लडिवाळपणें ॥ ६८ ॥ तेव्हां सद्गुरुसमर्थ कृपाराशी। सांगती पूर्वील ध्यान करावयाशी। तये काळी ध्याता मानसीं। दृष्टांताशी जाहाले पै ॥६९॥ रामदासस्वामीनी स्वप्नांत येऊन। ह्मणती स्वतः आहे मीच जाण। जनासारिखे मरी मरणें। आग्रह धरणें कासया तो ॥ ७० ॥ फार छंद आहे मनाशी। तरी सांगणें ऐके नेमेशी। पाय घाशिले गुरुवार दिवशी। अनुग्रह वेळेशी वेणुबाईनीं ॥ ७१ ॥ आडुळशाचे झाडाखाली। तीच वजरी आहे पडली। उकरीता भूमी खोली। तळ्याधरी सगळी सापडेल पै ॥ ७२ ॥ साक्षात्कार ऐशाप्रकारें। आज्ञा करीता श्रीगुरुवरें। निवेदन केले स्वप्न सारें। अनन्य विध्यार्थे शिष्यासी ॥ ७३ ॥ हास्य करुनी सिध्दनाथ। तैसे चि उठीले त्वरित। खनन करुनी त्या स्थळाते। काढीले त्वरीत वजरीसी त्या ॥ ७४ ॥ तेरा अक्षरी वरुता मंत्र। अवलोकिला सर्वी नेत्रें। मिळाली यात्रा अपार। चमत्कार पाहुनी ॥ ७५ ॥ मग ती वजरी धुवोनी तीर्थ। घेता जाहाले प्राणी पुनीत। धन्य दयाळु सद्गुरुनाथ। करणी अघटीत जयाची ॥ ७६ ॥ निजशिष्याची पुरविली आळी। जगीं कीर्ती विख्यात जाहाली। सिध्दस्वरूपे अवतरली। गुरुमाउली श्रीरामदास ॥ ७७ ॥ उछाहा करुनी सांग। तेथुनी निघाले चित्सुखरंग। चाफळीं येउनी भवभंग। पुजीला अभंग श्रीराम ॥ ७८ ॥ करुनी तेथें कीर्तन। अकरा रूद्राची घेतलीं दर्शनें। अरण्यवास बहुत करून। आवडे जाण सदा स्वामिया ॥ ७९ ॥ केव्हां तरी गांवांत यावें। नातरी घनीं सदा असावें। ऐसें पाहुनी शिष्य सर्व। न राहाती जीव जवळ पै ॥ ८० ॥ मक्षावया निवपाळा। घळींत बैसणें सदा दयाळा। कधीं तरी अन्नाळा। सेवती लीळा सिध्देशगुरु ॥ ८१ ॥ केव्हां

महानवस्त्रें आंगीं ल्यावी । केव्हां धटकटें स्वीकारावी । बहुधा पंचधोत्रें नेसावीं । सखलाद असावी आरक्त बहु ॥ ८२ ॥ कधीं पालखींत बैसविल्या बैसती । कधीं भिक्षार्थ स्वयें फीरती । कधीं अश्वारूढ होती । पाईं चालती मनांतरीं ॥ ८३ ॥ छन्नमाया मोठाल्या । संतमंडळ्या शोधुनी पाहाल्या । जीवीच्या गोष्टी सांगाल्या । परीक्षुनी करान्या ज्ञानसीधी ॥ ८४ ॥ गुप्तरूपें हिंडत असावें । जगीं कोणासी न कळावें । ऐसा प्रकारें श्रीगुरुदेव । सित्य महानुभाव वर्तती पै ॥ ८५ ॥ मर्जी न कळे कदा कवणा । शिष्यासी सन्निध असतां जाणा । मा इतर सामान्यजना । काय आज्ञा समजेल ॥ ८६ ॥ कोण्ही येके समईं रामजयंतीस । प्रार्थना केली श्रीस्वामीस । प्रत्यक्षता थीरघुपतीस । दाखवा दर्शीस ह्मणुनी ॥ ८७ ॥ कृष्णावेण्येचे संगमीं । आळ घेतली राजारामीं । क्षेत्र तयें माहुलीग्रामीं । छंद नेमी धरीला तो ॥ ८८ ॥ तेव्हां स्वामींनीं लीला केली । ऐकावे ते श्रोतिये सकळीं । वाळवंटी भूमीं उकरीली । पुरोनी ठेविली दासतनु ॥ ८९ ॥ दोन प्रहर होतांचि जाण । बाहिर काढिले कर्पकरून । मस्तकीं हात ठेवितां पूर्ण । रघुनंदन देखीयेला ॥ ९० ॥ अनिर्वाच्य तें सर्वथा सुख । मंथींच करवें तयाचा लेख । जाणुनी पदरीचे आपुले रंक । केले कौतुक ते ठाईं ॥ ९१ ॥ असो ऐसा अनेक लीळा । मति न पुरे ल्याहावयाला । परी इच्छा श्रोतियाला । करावयाला श्रवण पै ॥ ९२ ॥ पंढरीचा बहुत प्रेमा । कर्णी केले त्या श्रीरामा । अंतर न पडे कदा नेमा । कीर्तनधर्मा करणें तें ॥ ९३ ॥ पुंडलीकाचे सानिध्ये । कथा करीतो स्वामी सित्व । श्रवणीं बैसती आत्मविद । भक्तवृंदे सकळीक ॥ ९४ ॥ प्रेमांत येउनी सद्गुरुनाथें । नामयाचे कपाळे घरीत्रातें । चित्त देउनी ऐकती श्रोते । साविक समस्त नरनारी ॥ ९५ ॥ विसोबाखेचराचा उपदेश घेऊन । पंढरीसी निघाले नामदेव जाण । दोनप्रहरा करावें भोजन । उतरले ह्मणोन वाटेसी ॥ ९६ ॥ तेथें श्वानरूपें वनमाळी । पळाले घेउनी पांढरीपाळी । नामा धांवला तये वेळी । हस्तांजुळी पसरुनी ॥ ९७ ॥ घृतपात्र धारण करून । ह्मणे

उभे राहावे जगजीवनें । मग प्रघट जाहाले श्रीभगवान । दिधलें दर्शन नाम्याशी ॥ ९८ ॥ कथा अनुक्रमें इथपरीयंत । गाइली आदरें सिधसमर्थें । तो खळ होता येक मंडळींत । प्रश्न करीत केला त्यानें ॥ ९९ ॥ सरसाउनी आला पुढें । दुरोक्तीनें बोले मूढ । घाविता जाहाला तेथे होड । संत प्रौढ ते नाहींत म्हणुनी ॥ १०० ॥ त्याच गोष्टी मागील सांगती । जगाशी मोंदुनी सोंग दाविती । प्रत्यक्षता दावाल प्रचिती । तरी मी निश्चीतो वैराग्य घेईन ॥ १ ॥ आतरी आपुलें सिधनाम । तुह्मी सोडावें हा चि नेम । ऐसें वदला तो अधम । जाहाले परम ते परीयेसा ॥ २ ॥ सिधस्वामींनीं नेत्र झाकिले । प्रेमाश्रूनें गळती डोळे । करुणापर अभंग केले । ते गाईले जगद्गुरुनीं ॥ ३ ॥

॥ अभंग श्रीसिधस्वामीचा ॥

कोठें गुंतलेती कोणासाठीं हरी । कोप मजवरी केला काय ॥ १ ॥
जन्माई अपराधी मी दीन पामर । न करा अव्हेर स्वामी माझा ॥ २ ॥
तुह्मी उपेक्षिल्या काय माझी गती । सांगा हो श्रीपती सत्वरत्व ॥ ३ ॥
सिधचि स्वरूप असता अखंड । माझे चि हे मंड उद्भवले ॥ ४ ॥

॥ १ ॥ ७ ॥

ऐशाप्रकारे भाकीता करुणा । प्रघट जाहाला देवराणा । ध्यानरूप धरूनी जाण । कीर्तन स्थाना पातले ॥ ४ ॥ अवलंबिला कृष्णवर्ण । गौतुमीयेवढे जाहाले ध्यान । पळत आले जगजीवन । महाद्वारातून तत्क्षणीं ॥ ५ ॥ ध्यान पाहाता प्रौढनेत्र । टवकारीले जेणें श्रोत्र । संतवृंदें पाहुनी पवित्रें । विस्मय सारे करीती पै ॥ ६ ॥ सकळादवस्त्र अंगावरील । सिधस्वामींनीं तात्काळ काढिले । वैसावयाशी पुढें केले । प्रीतीनें केवळ अवधाहीं ॥ ७ ॥ सर्वोपरी निजसंताची । आवडी बहु देवासी साची । वैसती जाली पंढरीची । कुळदेवता सर्वांची आसनीं त्या ॥ ८ ॥ अर्धघटिकापरीयंत । स्थिरावलें रुक्मीणीकांत । अपरोक्षिती प्रेमळ भक्त । फाकाटला चित्ते निंदक तो ॥ ९ ॥ श्रीसिधेंदें नवल केले । अंगवस्त्र देवाचे गळ्यांत घातिले । समस्तासी दाखविले ।

मक्तांकित घननीळ ह्मणुनी ॥ ११० ॥ विसरोनी सकळी देहमान । ताटस्थता वरीली जाण । खळाशी जाहालें वैराग्य पूर्ण । धरीले चरण सिध्धाचे ॥ ११ ॥ मग तो आनंद सांगणें किती । घोवाळीला रुक्मीणिपति । सिध्धस्वामी नृत्य करीती । मंगळ आरती होतसे पै ॥ १२ ॥ आयंत रसाळ पुढील कथा । येकाग्र करावे श्रोतिये चित्ता । सिधी पावती अवधान देता । मुक्ति माथा वंदिती पै ॥ १३ ॥ सिध्द चि उभा समचरणी । पंढरीनिवास कोदंडपाणी । ध्यावया पूजा प्रीतीं-करूनी । करजघनीं तिष्टतसे ॥ १४ ॥ याळागी गुंफोनी हे संत-माळिका । अर्पितसे श्रीरघुनायका । राजारामी सिध्धसखा । चाधळा निका परीपूर्ण ॥ १५ ॥ मक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । श्रीसिध्धस्वामीचे आख्यानाते । अध्याय समाप्त चतुर्थ हा ॥ ११६ ॥ अध्याय ॥ ४ ॥ अभंग ॥ १४ ॥ श्लोक गणपतीचे ॥ २१ ॥ अनु० अ० ॥ १०१ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंमवतु ॥ छ ॥



## अध्याय १०२

### — श्रीसिद्धस्वामी —

( पुढें चालू )

॥ *श्रीगणेशायनमः* ॥ *श्रीरामसमर्थ* ॥ *जय सद्गुरु निजआत्मासिध्धा* । जगदोध्दारा स्वामी प्रसीध्दा । मंगळमूर्ति तूंचि आद्या । विश्ववंद्या श्रीगणपति ॥ १ ॥ जियेपासाव ॐ कार जाहाला । गुणत्रयाते प्रसवला । नमन तयाते अंबिकेला । रेफ स्फूर्तिला अनन्य ॥ २ ॥ जगत्रयाचें कुळदैवत । आत्माराम श्रीरघुनाथ । येकात्मता राज्य करीत । देह अयोध्या ते चराचरी ॥ ३ ॥ वान्नरगण संतसारे । हृदयासनीं श्रीरघुवीर । वामांगी ते शक्ति सुंदर । सोहंविच्यार स्फुरद्रुपीणी ॥ ४ ॥ लक्षूं जातां स्वरूपीं मन । सहजी होतसे तें उन्मन । शेष अवतार लक्षुमण । ऐक्य पूर्ण श्रीरामपदीं ॥ ५ ॥ उचंबळता प्रेमाची भरतें ।

भरत जवळी तो निश्चित । षड्‌विकार निर्दाळीत । विवेक बळिवंत शत्रुघ्न तो ॥ ६ ॥ मुख्यकारण भाव शुध । मारुती महाराज तो प्रसिध । वानराध्यक्ष सर्वां अग्र । जगद्गुरु सिध्द सर्वांचा ॥ ७ ॥ पिंडब्रह्मांड रामायण । जयाचे योगे सांगसंपूर्ण । योगी जाणती ते निजखूण । सोहंस्फूर्ण मुख्यत्वें ॥ ८ ॥ अहंकार रावण निर्दाळीला । देवता समुचय संतोषला । देहलंके राज्यीं स्थापीला । विवेक भक्त बिभीषण तो ॥ ९ ॥ असो ऐसा दाशरथी । तो म्यां नमिला पुढत पुढती । युगायुगीं जडली प्रीती । वेधली वृत्ति गुरुचरणीं ॥ १० ॥ तो चि सद्गुरु सिध्दस्वामी । कृपा केली राजारामीं । प्रघट होउनी हृदयपद्मीं । वदवी नेमी निजलीळा ॥ ११ ॥ अतिसुंदर सिध्दचरीत्र । ऐकतां सकळ होती पवित्र । सर्वांगाचे करुनि श्रोत्र । कथनसूत्र परीसावे ॥ १२ ॥ मागील कथा अनुसंधान । पंढरीसी करीता श्रीकीर्तन । प्रघट जाहले रुक्मीणीरमण । करीता छळण दुर्जनें त्या ॥ १३ ॥ संशय तयाचा दूर होता । वैराग्य खळाशी जाहाले तत्वता । तात्काळ लागोनी सिध्दपंथा । साधली समता तया द्विजा ॥ १४ ॥ आणिक बहूत नारीनर । सिध्द पादपद्मीं जाहाले भ्रमर । ब्रह्मांड कोंदर्ले कीर्तीगजरें । धन्य वक्त्रें वदती पै ॥ १५ ॥ मग यात्रा सांग करुनी निरूते । निघाले सहजी सद्गुरूनाथ । ठाईं ठाईं जन उध्दरीत । भ्रमण करीत स्वइच्छा ॥ १६ ॥ जेथें जेथें वैष्णववीर । भेटती तयाशी अत्यादरें । बहुधा आवडे कृष्णातीर । किंवा डोंगर वनांतरीं ॥ १७ ॥ सरळा चि पर्वतकडा चढावा । मार्ग पहाण्याचा नाहीं गोवा । मारुती अवतार जो कां बरवा । सिध्दचि पाहावा तो रामदास ॥ १८ ॥ कोळे येथे दिसों महाबळेश्वराजवळी । पर्वतीं गुरुमायें अवेशळी । संगे असतां शिष्य मंडळी । मार्गे राहिली सर्वत्र ॥ १९ ॥ अवघड वाट चढवेना । दीनवदनें भाकिता करुणा । चुकोनी वनीं हिंडती जाणा । नामस्मरणा करीती पै ॥ २० ॥ तेव्हां सर्व साक्षी सद्गुरुनाथ । कृपेनें द्रवले सिध्द समर्थ । झेळूनिया वरूते घेत । स्वहस्तें शिष्यवृंदा ॥२१॥

उदक झिरपे जेथें जेथें । पर्वतीं वसावें त्या स्थानातें । रामनामें गजर करीत । सदा गुप्तेंत येकांतीं ॥ २२ ॥ कोणी येके दिनीं समाधी लाविला । दरींत पाषाण आडवा केला । शरणागत येकटा असे जवळा शिष्यमेळा नसे पैं ॥ २३ ॥ सूर्य अस्ताशी जातां क्षणी । स्वामींनीं भोगिताती जे उन्मनी । राजारामी जोडुनी पाणी । प्रार्थिली वचनीं गुरुमाये ॥ २४ ॥ योगासनीं आपण बैसतां । रक्षील कोण मज अनाथा । भय वाटे संगती नसतां । आपण तत्वतां करु कवणा ॥ २५ ॥ विनविता किंकर ऐशाप्रकारें । उत्तरविले तेथील वृक्षीचे वानर । बैसविले च्यारी प्रहर । जवळी साध्यार श्रीगुरुनी ॥ २६ ॥ मग तेथें कैंचि भीती । राजारामी आनंदवृत्ति । सरोनी गेली सकळ राती । उदयगमस्ती जाहाला तो ॥ २७ ॥ नंतर सातारीयासि येउनी पाहीं । गोदडमाहा भेटविला तोहीं । पूर्णयोगी जो या महीं । अवतारदेही महानिष्ट ॥ २८ ॥ किती दिवसांचा तो पुरूष । हे तो न कळे सर्वथा कोणास । वय पाहातां तारुण्य दिसे । वार्धिक्य नसे ज्या आंगीं ॥ २९ ॥ पिशाचस्थिती वर्तणें ज्यासी । कोण सांगेल मग ज्ञातीशी । जें जें करील तें तें त्यासी । लीलाविशेषीं शोभे तो ॥ ३० ॥ संकेतरूपें होणार पुढीलें । करुनी दावितीं चेष्टा सकळ । सर्वज्ञ असती तयासी कळे । वाटे नवल सामान्या ॥ ३१ ॥ गुप्त होउनी प्रगट व्हावें । इच्छेसी येईल तेंचि करावें । वाचेशी पडला सहजीं स्वभाव । दुरोक्तीस युक्तीस सदाश्रया ॥ ३२ ॥ तत्वनिष्ट तो गोदड ऐसा । सातान्यांत भेटला श्रीसिद्धेशा । होतां ऐक्य परस्परें मानसा । संवाद सरीसा घडला पै ॥ ३३ ॥ विरार्डी आणुनी तया अन्न । अर्पण केलें प्रीतिकरून । आंगवस्त्र आंगीचें फाडून । कफनी करून दिधली त्या ॥ ३४ ॥ पुढें सहजस्थीति क्रमेकरून । पाटेश्वराशी जाहाले येणें । शिष्यमंडळी मिळाली पूर्ण । होतसे भजन दिननिशी ॥ ३५ ॥ जन्मांतरींचे जे जे शिष्य । जन्मते जाहाले त्या त्या अंशें । उपदेश जाहाला तयास । अधिकार मानस जाणुनी ॥३६॥ तेणेंचि रीती सेवाधर्म । करीती आप आपुले कर्म ।

सद्गुरुनाथ कल्पद्रुम। सर्वत्र सम मेघापरी ॥३७॥ असो कोण्ही येके दिनीं गुरुमाउली। प्रेमपान्हा पान्हावली। निजकरेंस्तनीं कळ लागली। तेव्हां न्याहाळी शिष्यवत्सा ॥३८॥ जवळी होते तान्हुलें निकट। वसुंगा घेतले तयाशी स्पष्ट। कृपामृत पाजीले श्रेष्ट। राजारामी वरीष्ट गुरुवर्यें ॥ ३९ ॥ ह्मणती जगाचे कल्याणाशी। देह धरिला आहे तुजसी। तरी भक्तमजीरीग्रंथासी। लावी सित्धीशी मम आज्ञा ॥ ४० ॥ उपासनेसी लाउनी जन। सित्धसांप्रदाय रूढवी जाण। ऐसें वदोनी दयाघन। मस्तकीं पूर्ण ठेविला कर ॥ ४१ ॥ अभिमंत्रण करुनी विभूति। मुखीं घालिती श्रीसित्धमूर्ति। लेखणी देता निजकरे हातीं। चेतली मति तात्काळ ॥ ४२ ॥ देहस्मृति जाउनी जाणा। प्रघटला हृदईं रामराणा। मूढ असतां अत्यंत कथना। पात्र मना केली पै ॥ ४३ ॥ पूर्वीं रेडियामुखीं ज्ञानेश्वरें। पठण करविले वेद च्यार। तैसेंचि येथें श्रीगुरुवरें। सित्धेश्वरें केलें पै ॥४४॥ असो सित्धकृपा होईल ज्यासी। काय उणे त्या सामर्थ्याशी। मूर्खाहातीं संतलीळेसी। कथन करावयासी आज्ञापीले ॥ ४५ ॥ मग तात्काळ अभंगातें। आरंभ करविला सित्धनाथें। ह्मणती जे जे करशील ग्रंथ। ते ते पावत सित्धीसी ॥४६॥ प्रसाद करिता सद्गुरुनाथें। केला साष्टांगप्रणिपात। राजारामीं सित्ध समर्थ। वरदहस्त ठेविला शिरीं ॥ ४७ ॥ नंतर आणिक चमत्कार। ऐका तुह्मी श्रोते सारे। कोणी येके दिनीं श्रीगुरुवर। त्रिपुटी क्षेत्र अवलोकिले ॥ ४८ ॥ सांप्रदाई मिळोनी बहुत। सित्धस्वामीशीं प्रार्थना करीत। आपण आणि गोपाळनाथ। येकरूप सत्य परीपूर्ण ॥ ४९ ॥ ऐसें वदोन पाया लागले। यथासांग पूजन केलें। आणि मह्यालागीं तेथें आणिलें। पुढें ठेविले स्वामीचे ॥ ५० ॥ तये काळीं चिवस येऊन। वस्त्र घेतले मुखावरून। निर्मिळीता तयालागून। ह्मणती पूर्ण आमुचा पंथ हा ॥ ५१ ॥ दयासिंधु सद्गुरुनाथ। असेल कैंचा क्रोध तेथें। अवलोकन करीता मद्यातें। जाहालें अमृत तात्काळ ॥ ५२ ॥ मग ते छळक शरण येता। लाविले स्वामीनीं शुधपंथा।

भजावया श्रीगोपाळनाथा । आज्ञा सर्वथा केली तया ॥ ५३ ॥ दुराचरण सांडविले । भक्तीयोगा मेळविले । ऐसे महाराज सिध्दपाळ । उध्दरीती सकळ जडजीवा ॥ ५४ ॥ दिनत्रय राहुनी तेथें । येते जाहाले स्वस्थानाते । पुढे वर्तले ते हि श्रोते । श्रवण निश्चीत करा तुम्ही ॥ ५५ ॥ सद्गुरुनाथ कार्तिकमासीं । निघाले सहजी पंढरीसी । संतवृंदें समागमासी । मंडळीसी समवेत ॥ ५६ ॥ नक्षत्रामाजीं रोहिणीपति । कीं सकळसरीतेंत भागीरथी । सिध्दमहाराज तेवि शोभती । समुच्चय संती भजन करीत ॥ ५७ ॥ मार्गी चाळतां होतसे स्मरण । गजरे कोंदले तेणें गगन । ठांई ठांई उभे राहून । अभंग जाण ह्मणती पै ॥ ५८ ॥ नृत्य करीता प्रेमभरें । पुढे दिसे शारंगधर । देहस्मृती सहजी विरे । मग तो विस्तार अनौपम्य ॥ ५९ ॥ ऐशाप्रकारें आनंदें पंथ । क्रमीती स्वामी सिध्दनाथ । शरण येती जीव तयाते । उध्दरीत कृपादृष्टीं ॥ ६० ॥ पंढरीक्षेत्रासंन्निध येता । त्वरा जाहाली रुक्मीणीकांता । ध्यानासी पालट करुनी तत्वता । रामरूपाते धरीले पै ॥ ६१ ॥ तव इतुकीयांत भजन करीत । राउळीं प्रवेशले सद्गुरुनाथ । दृष्टी देखिले सीताकांत । मिठी त्वरीत घातली चरणा । ॥ ६२ ॥ देवभक्ताचे आलिंगन । तया सुखा वर्णील कोण । हर्षे नाचती शिष्यगण । वानर पूर्ण अंश ते ॥ ६३ ॥ आवडे ध्यान जैसे ज्यासी । तैसा होये पंढरीनिवासी । याचलागी सिध्दमहाराजासी । दर्शन तयासी रामरूप ॥ ६४ ॥ असो भक्तांकित घनसावळा । ही खूण ठावी निजसंताला । अभाविक प्राणीयाला । संशय मनाला वाटतसे ॥ ६५ ॥ असो सिध्दस्वामींच्या दर्शनासी । येते जाहाले क्षेत्रवासी । उभे राहावया कीर्तनासी । आग्रह तयासी केला पै ॥ ६६ ॥ तये काळीं सद्गुरुनाथें । वदन करुनी उपास्याते । वाळवंटीं प्रेमभरीत । श्रीरामकथे आरंभिले ॥ ६७ ॥ पृष्टीमागीं शिष्यमंडळी । वाजविती वाद्यें सकळी । मृदंग असावा ते वेळी । ऐसे स्फुरली युक्ती ते ॥ ६८ ॥ तव तेथें काय जाहाले । ऐकावें तें श्रोतिये सकळ । मृदंगाचें रूप धरीले । तेथें

तात्काळ देवानीं ॥ ६९ ॥ ह्मणती विठोगुरव मी पंढरीचा । सर्वांसी ठाऊक आहे साचा । मृदंग्या मी वारकऱ्याचा । साधे चालीचा वाजविणार ॥ ७० ॥ तरी स्वामींया आपुले कथेची । वोवाळणी द्यावी साची । सेवा घ्यावी या दासाची । नाहीं आणिकाची इछा मनीं ॥ ७१ ॥ ऐसे वदोनी कीर्तनांत । मृदंग वाजवी वैकुंठनाथ । रंग भराया मग तेथें । उशीर निश्चित नसे पै ॥ ७२ ॥ सकळरंगाचा जो रंग । पदवाजी जाहाला श्रीपांडुरंग । प्रेमळ स्वामी गाती अभंग । गजर थिंग होतसे तो ॥ ७३ ॥ श्लेशार्थ संकेत प्रश्नोत्तरें । असंख्य बैसले श्रोते चतुर । वग्नुत्वाचा होतसे बहर । आनंद थोर श्रोतिया ॥ ७४ ॥ आबाळवृध भोळी भाविक । वेधली वृत्ति तयाची देख । वैराग्य सेविले कितीयेक । जाले कितेक समाधिस्त ॥ ७५ ॥ मृदंगातुनी अनेक ध्वनी । निघत असाव्या तये क्षणीं । सिध्दस्वामींसी विस्मय मनीं । वारंवार जनीं वाटतसे ॥ ७६ ॥ ऐशा प्रकारें बारा घटिका । कीर्तन जाले असे देखा । तत्परीयंत उभा सखा । वैकुंठनायका जन पाहाती ॥ ७७ ॥ अस्तमानाची वेळा आली । आरती स्वामींनी आरंभीली । उभी राहाता सकळ मंडळी । गोष्टी घडली अपूर्व ते ॥ ७८ ॥ येकायेकी तेथेंचि ठाईं । गुप्त जाहाला मृदंग्या पाही । विस्मय करीते जाहाले हृदईं । श्रोते देही सर्वत्र ॥ ७९ ॥ सिध्दमहाराज समजले मनीं । प्रेमअश्रू दाटले नैनीं । सोंणविठा ह्मणती चापपाणी । आत्मदानी जगद्गुरु ॥ ८० ॥ तये वेळीं अभंग केले । सप्रेमें देवासी आळविले । ऐकावें तें श्रोतिये भले । सिध्दी सकळ श्रवण करीता ॥ ८१ ॥

॥ अभंग ॥ श्रीसिध्दाचा ॥

( मुद्यांत भाग सोडली आहे )

सिध्दाचे कथेसी कोण तूज गोडी । मृदंग आवडी वाजविसी ॥४॥१॥ ऐशापरी सिध्दस्वामींनी । आठविता कोदंडपाणी । तात्काळीक प्रघट होउनी । दर्शन देउनी गुप्त जाहाले ॥ ८२ ॥ भक्तवत्छळ पंढरीनाथ । काय वर्णूं तयाची मात । सर्वभावें आवडी संत । कार्य करीत

स्वर्गी ॥ ८३ ॥ असो कीर्तनविधी सांग जाहाला । भगवान राउळामाजी गेला । जयजयकार यात्रेंत जाहाला । श्रीसिद्धाला नमन करीती ॥ ८४ ॥ नंतर कोणी येके दिनीं सकळ संत । बेसले असती राउळांत । निजदृष्टी न्याहाळीत । विटेसहित समचरण ॥ ८५ ॥ छिद्र पाहुनी श्रीचेपाई । प्रश्न केला सिद्धासी पाहीं । ह्मणती सांगा लक्षणें कांहीं । चिन्हें दृढ्इ ध्यावनीं ॥ ८६ ॥ सर्वांमध्यें श्रेष्ट आपण । देवाजीचे मुख्य प्राण । याजलागी व्हावे साकल्य वर्णन । जाणुनी खुण युगायुगींचे ॥ ८७ ॥ आदर पाहुनी सर्व साधूचा । सिद्धमूर्तीसी आनंद साचा । अर्थ करावया श्रीपदचिन्हाचा । युक्ति वाचा आरंभीली । तें ऐका सकळ जन । चरणरहस्य सिद्धस्तवन । श्रवणमात्रें कामना पूर्ण । सिद्धी होणें तात्काळ ॥ ८९ ॥

॥ ओव्या ॥ श्रीसिद्धाच्या ॥

॥ श्रीरामप्रसन्न ॥

जयाचे चरणाचे आमोद । शिवविरंची वाछिती सदा ।
तो स्वाद मुनिपद्पदा । आत्मसंपदा मिळताहे ॥ १ ॥
ते चरण अतिसकुमार । ध्वजवज्रांकुश मनोहर ।
येकवीस चिन्हें परीकर । शोभतीं साच्यार जेथें पै ॥ २ ॥
तयाचे चरणें सकळिकांती । शोभा आली त्रैलोक्यासी ।
रमा पाहुनी जाली पिशी । होवनी दासी राहिली ॥ ३ ॥
ते चरण या विटेवरी । राहिले पुंडलिकाचे द्वारीं ।
भक्तभावें मुरारी । श्रीपदरीं तिष्ठत ॥ ४ ॥
तया चरणचिन्हाचें वर्णन । करावया मति स्फुरे जाण ।
वेद अनंतहि आपण । पावला शीण जेथें पै ॥ ५ ॥
तयाची जे कृपा भगवती । मुकीया करी वाचस्पती ।
मूढालागी महामती । होये युक्ति प्रसादें ज्या ॥ ६ ॥
तेथील रहस्य निघालें । सद्गुरूप्रसादें वदना आलें ।
तें पाहिजे प्राशन केलें । श्रवण भले आदरेसी ॥ ७ ॥

हा रस अति दुर्लभ । नरदेहींच जाला सुलभ ।
कर्णमुखें हृदयकुंभ । भरोनी स्वयंभ ठेवावे ॥ ८ ॥
तया नाहीं पुनरावृत्ति । सकळविश्रांता विश्रांती ।
जेथें शिवाची मनोवृत्ति । जडली निश्चीती सर्वदा ॥ ९ ॥
चरण सरोजीं लागतां जाण । ते प्रेमाश्रूसी साठवण ।
भागीरथीसी उत्पन्नस्थान । शोभे पूर्ण पूर्णत्वें ॥ १० ॥
माया त्रैलोकी विस्तारली । साधूदर्शनें असे भ्याली ।
ते चि येउनी लपाली । मासें सकळी येथें पै ॥ ११ ॥
जगाची जे सकळमाया । चरण पहातां जाय लया ।
बहुधा तियेशीं निमावया । स्थान पाया केलें हें ॥ १२ ॥
कीं माया प्रबळत्वें वाढली । वाढूनिया बहूत श्रमली ।
चरणस्थानी मुक्ती घेतली । निर्माय जाहलीया तीर्थी ॥ १३ ॥
परमहंसाचें मानस । क्रीडास्थान योगीयास ।
जे पहाता हरती दोष । अतिविळास कविवरा ॥ १४ ॥
चरण वंदीती इंद्रादि भट । तयाचे रूतले ते किरीट ।
तो वण पडला स्पष्ट । पहा नीट विटेवरी ॥ १५ ॥
लक्ष्मी सकुमार बहूत । जंघेवरी धरून चरण संव्हानीत ।
तेथें करक्षत निश्चीत । पडले भासत मानसीं ॥ १६ ॥
नातरी शंखासुर । वेद हरोनी पळाला चोर ।
तयाशी युघ्य करुनी थोर । चरणी थार येदा दिधली ॥ १७ ॥
नातरी कूर्मावतार धरिला । मंदरागिरी पृष्टीं धरिला ।
पाय पोटीं धरीता रूतला । गिरीवर मला मैनाक तो ॥ १८ ॥
वराहा अवतार धरून । केलें पृथ्वीचें उध्धरण ।
हिरण्याक्षाते वधून । चरणीं जाण ठेविले ॥ १९ ॥
नारसिंव्हवपू धरी हरी । हिरण्यकश्यपालागीं मारी ।
उदरविदारीता नखाग्री । क्षत चरणावरी ते जाहाले ॥ २० ॥
मळी सर्वस्वे दानी वमा ठेला । शुक्रे जळीं रिघोनी रोध केला ।

वामनें कुश घालोनी फोडीला । तो नेत्र पडला श्रीचरणीं ॥२१॥
क्षेत्रीयांतक मार्गवराम । स्वशिष्य भीष्म अजिंक्य परम ।
विस्मय पदीं धनू करीता विराम । क्षता धाम ते जाहाले ॥ २२ ॥
श्रीरामपरमात्मा परंज्योती । विश्वामित्र नेई रक्षणाप्रती ।
तेणें तार्टाकेशी दिधली मुक्ती । केली वस्ती क्षतरूप ॥ २३ ॥
चरणरजें अहिल्येशी । उत्धरोनी दिव्य केले तियेशी ।
तेणें ठाव मागितला चरणेंशी । स्थान तियेशी हे गर्ता ॥ २४ ॥
सीतास्वैंवरी रावण । कार्मूकें अवमानिला जाण ।
त्रैंबक मोडीले रघूनंदनें । तो तुकडा येउनी लागला येथें ॥ २५ ॥
जानकी देखुनी रघुवीरा । चरणी मिठी घालिती सैरा ।
तो हा रुतला बिजवरा । पडला खरा रावण पांई ॥ २६ ॥
विदेही देखता रघुपती । लाजिनली विदेहस्थीती ।
येवोनी जडली चरणाप्रती । योगी वांछिती हें स्थान ॥ २७ ॥
जानकी अर्पीली ।

(येथें मूळांत श्रीसिद्धस्वामींच्या २८ ते ४१
ओव्यांसाठीं कोरी जागा सोडलेली आहे )

ऐसा प्रकारें अनंत युक्ती । श्रीचरणरहस्य करिता स्तुती । हांसिन्नले रुक्मीणीपती । सित्धयुक्ती पाहुनी ॥ ९० ॥ ह्मणती सख्या मारुतिराया । मानवरूपें धरीशी काया । सित्ध जाहाला गुण वदावया । अवतारकार्या जाणसी तूं ॥ ९१ ॥ ध्यातुर्यमुद्रा मुख्यप्राणा । संकळ ठाउक्या तुह्माशी खुणा । ऐसें बोलोनी देवराणा । आलिंगना दिधले पै ॥ ९२ ॥ संतवृंदासी आनंद जाहाला । उपमा नाहीं तया सुखाला । करीते जाले पुष्पवृष्टीला । अमरगणाला संतोष ॥ ९३ ॥ सद्गुरुनाथ पूर्ण सित्धासी । प्रसाद करीती पंढरीनिवासी । राजारामीं वंदाजळीसी । तये वेळेसी पसरीतसे ॥ ९४ ॥ कृपालेश तो प्राप्त होता । जाली सहजी कृतकृत्यता । उद्धव होउनीया निजग्रंथा । साधूचरीत्रा वर्णीतसे ॥ ९५ ॥ सद्गुरु सित्ध दयासमुद्र । जो का अवतार मारुतिकपींद्र । राजारामीं करुनी भद्र । कृपानेत्रें आज्ञापीलें ॥ ९६ ॥ तयासित्धचरीत्री

घरींता प्रीती । सकळसुखें वोळंगती । अवधान देता घरी मुक्ती । आत्मस्थितीं तात्काळ ॥ ९७ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें पुरती मनोरथ । सिध्दस्वामी आद्यानातें । अध्याय समाप्त पांचवा हा ॥९८॥ ॥ अध्याय ॥ ५ ॥ अनुक्रम अ० ॥ १०२ ॥ समाप्त ॥ वोव्या सिध्दाच्या ॥ अभंग ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु शुभंभवतु ॥ ७ ॥

## अध्याय १०३
## — श्रीसिध्दस्वामी —
### ( पुढें चालू )

॥ श्रीरामसमर्थ ॥ श्रीगणेशायनमः ॥ जय सद्गुरूसिध्द आत्मया । परब्रह्म निर्गुणालया । अद्वस्वरूप कारणकार्या । गुणत्रया विलक्षणू ॥ १ ॥ निर्विकार निरंजना । निरोपमा निजस्फूर्णा । निर्धर्मा निर्विघ्ना । निगमभजना निरोपाधी ॥ २ ॥ जय जय अपरांपरा । अपरूप अनाम अगोचरा । अज अविनाश अलक्षमुद्रा । अमरोत्धारा श्रीमूर्ति ॥ ३ ॥ करुणानिधी कमलनिवासा । कामांतकप्रियमानसा । कुंजविहारी कुरळकेशा । कमलेशा रुक्मीणीपति ॥४॥ खगेंद्रवाहना खळनिवारणा । खरदूशरविदारणा । खविदंब्रह्म खकारवर्णा । खड्गधारणा खंडी माया ॥ ५ ॥ ऐसी करीतां स्तुती अनेक । न पुरे मति गुण अतर्क्य । सर्वात्मा श्रीरघुनायक । रावणांतक जगद्गुरू ॥ ६ ॥ मुख्यप्राण तत्हनूमान । कलींत रामदास नामाभिधान । अवतार तयांचा कृपाघन । सिध्देश पूर्ण दीनवत्सल ॥ ७ ॥ चरीत्र तयाचें असंतसार । जें का प्रिय तुम्हा निर्धार । ते चि आतां सविस्तर । वदवा साचार पंढरीशा ॥ ८ ॥ श्रोता वक्ता तुम्हा तूं चि । मिथ्या स्फीती देहबुध्धीची । आवड पुरवी स्वदासाची । माउली तू चि विठाबाई ॥ ९ ॥ मागील कथा इतिहास । श्रीचरणावरी छिद्र असे । तयाचें कारण विशेष । कथीले सिध्देश बहुयुक्ति ॥ १० ॥ पुढें चमत्कार जो जाहाला । ते तो नरळ अद्भुत लीळा । श्रवण करीता श्रोतियाला । मुक्ति माळा

घालीतसे ॥ ११ ॥ मूर्तिमंत श्रीभागीरथी । प्रगटली स्वयें पंढरीप्रती । निजपित्यासी करी विनंति । सखेद चित्तीं होउनी ॥ १२ ॥ ह्मणे श्रीपांडुरंगा भवभयभंगा । मायबापा अक्षई अभंगा । दुरी धाडिले मज कां गा । हृदय निःसंगा निष्ठुर तुझें ॥ १३ ॥ ठाव ठेउनी तीनशे कोस । राहीला येथें घोनिवास । कलीमध्यें बहू दोष । येती स्नानास प्राणी ते ॥ १४ ॥ महापातकी जीव सारे । धाव घेती मजकडे निर्धारें । तया स्पर्शे अवघे शरीर । मलीण फार जाले पै ॥ १५ ॥ वैष्णव समग्र आपुलेपाशी । निरंतर येती पंढरीशी । नावडे कदा तया काशी । पडले मानसीं संकट तें ॥ १६ ॥ तरी स्वामी पंढरीराया । हें चि विनवणी माझी पाया । संत रहाता तया ठाया । राहीन सखया महास्मशानी ॥ १७ ॥ मज्ञनिष्ठाचें दर्शनस्पर्शनें । दुरीत जाइल स्नानपानें । पातक हराया सामर्थ्य पूर्ण । येइल जाण माझीयेजवळा ॥ १८ ॥ नातरी तेथे न राहे कदा । जडुनी राहीन आपुले पदा । विज्ञप्ति करितां ऐसी मुकुंदा । सच्चिदानंदा विच्यार पडला ॥ १९ ॥ ह्मणती दोषाचे जाले डोंगर । पंचमहापातकी नारीनर । जो तो निघे सांडुनी घर । पळती सत्वर काशीसी ॥ २० ॥ भागीरथींत करीता स्नान । ते तो पुनीत होती जाण । सुरनदी होउनी मळीन । आली शरण मजलागी ॥ २१ ॥ भक्तवृंदा हे सांगे हरी । संतमंडळी मिळाली सारी । ह्मणती जाउनी कोणी तरी । च्यान्हवीतीरीं वास करावा ॥ २२ ॥ मम कन्या तीर्थस्वामीणी । राहिले तेणें तये स्थानीं । पवित्र होती सकळ प्राणी । चक्रपाणी सुचविती ॥२३॥ तेव्हां बोलती भक्त सारे । अह्मामध्ये वैष्णवाग्र । जो का अवतार महारुद्र । रामदास थोर कलीमाजी ॥ २४ ॥ तो चि पुन्हा सिंधनाथ । जाला नगरीउद्धारार्थ । महास्मशान तया शोभत । स्वामीसमर्थ शिवोत्तमा ॥ २५ ॥ भागीरथीचे आगीचे । अघ सर्व जगत्रयाचें । दवडीतां तेणें स्वयें साचे । देवगंगेचें संकट हरे ॥ २६ ॥ ऐसें वदतां संतवृंदीं । प्रशस्त न वाटे श्रीगोविंदी । परी अडचणीची जाणुनी संधी । सिंधास

कृपाब्धी पाचारिली ॥ २७ ॥ मुख्यप्राण श्रीमारुती । प्रेमवैभव पूर्णस्थिती । तुज नेतसे भागीरथी । आपणाप्रति पवित्र करावया ॥२८॥ मोड न तुटे ब्यान्हवींची । ह्मणुनी आज्ञा करणें साचि । वियोग मजला कधींचा । न साहे चि तुझा पै ॥ २९ ॥ आज्ञापिता जानकीकांत । पांडुरंग श्रीपंढरीनाथ । घातिला साष्टांग प्रणीपात । राहिले हात जोडुनी उभे ॥ ३० ॥ अनन्यभावें सर्वोत्तमा । प्रार्थियेलें आत्मयारामा । आज्ञा प्रमाण सदा आह्मा । चित्सुखधामा जवळ राही ॥ ३१ ॥ मग कोठें दिगांतरी । सांगाव तेथें राहू मुरारी । तये काळी पंढरीविहारी । हातावरी हात देतसे ॥ ३२ ॥ भक्तहृदय सोडून । न राहे विठल नियाच ह्मणे । पांडुरंग वहाता आण । धरीले चरण सिध्दांनीं ॥ ३३ ॥ शिष्यमंडळीसहित निघता । चैन न पडे पंढरीनाथा । सांगती श्रीराम स्वामीसी तत्वता । निजशिष्य सर्वथा असो या इकडे ॥ ३४ ॥ मजतुह्मासी भेद नाही । सुचविता ऐसें विठाबाई । आज्ञा वंदुनी निवाले साई । भजन मही करीत पै ॥३५॥ शिष्यवत्सा वरदहस्त । कुर्वाळीले सिध्दनाथें । कृष्णातीरीं राहावयातें । आज्ञा होत निजकृपेनें ॥३६॥ गाढ देउनी आलिंगन । सुचविले लवकर येऊं ह्मणून । मार्गी चालता श्री आपण । भरले नैनी प्रेमाश्रू ॥ ३७ ॥ जवळी निकट सीतापति । ठांइ ठांइ वास करीती । जे जे प्राणी दृष्टीस पडती । उध्दरीती तया दर्शनें ॥ ३८ ॥ ऐशाप्रकारें क्रमिती पंथ । काशीस पोहचले सद्गुरुनाथ । काळभैरव आले तेथें । बिन्हाड दाविते श्रीसिध्दा ॥ ३९ ॥ भेट होता भैरवाची । स्तुति केली तेव्हां साचि । ऐकता ते नेमाची । हरे जीवाची भवबाधा ॥ ४० ॥

॥ श्रीसिध्दनाथस्वामींचें अष्टक ॥

वसे काशीमाजी शिवासंनिधानें । जीवा मुक्ति देतो स्वयें दर्शनानें ।
जया नेहत यात्रे विघ्यारी भयाला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥१॥
बहू अंध पंगू स्वमार्गासी दावी । न ये जो तया मानसी विघ्न दावी ।

वरा मातका संग हा त्यागियेला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥२॥
जया अन्नपूर्णा ह्मणे त्यां आणावे । तया हो जीवा नेत आहे स्वभावें ।
सदा गांग संगि असा साधूजीला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥३॥
सदा काशिकेमाजी आनंदें राहे । कशी शोभती पूर्ण गंगा प्रवाहे ।
पुरा रक्षीती चालवी धर्म लीळा । नमस्कार माझा तया भैरवाला ॥ ४ ॥
सदा योगनिद्रा धरी श्रोत्रयुग्मी । क्रीडा अक्षरी दावितो श्रोत्रयुग्मी ।
क्षरा अक्षीर वर्ण हा वेगळाला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥ ५ ॥
त्रिशूळायुधें शोभवी दीर्घ बाहू । असे तीर्थकर्त्यामनीं देव पाहू ।
बहू जाती ज्याचे सदा दर्शनाला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥६॥
जया ध्यास आहे मना भैरवाचा । तया भेटीला नेई काशीस साचा ।
ह्मणूनि असो छंद हा वैखरीला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥ ७ ॥
वदे अष्टकालागीं जो भैरवाच्या । घरी सर्व सिध्धी वसे हो तयाच्या ।
स्मरा आदरें भव्य हे स्तोत्र त्याला । नमस्कार माझा तया भैरवाला ॥

॥ इति सिध्दस्तुति श्रीभैरव अष्टक समाप्त ॥ ७

ऐसें करीतां श्रीभैरवस्तवन । संतोषले देवतागण । घेऊन विश्वेश्वर दर्शन । केलें स्नान भागीरथींचें ॥ ४१ ॥ काशीवास बहूत होता । तो कन्येसी गुरु आला तत्वता । ह्मणती हरी सिध्दनाथा । आणावी सरीता कृष्णेसी ॥ ४२ ॥ आपण भागीरथी बरोबर । स्वदेशीं येतां आनंद थोर । ऐसे सांगता रुक्मीणीवरें । निघाले सिध्देश्वर तेथुनी ॥ ४३ पावन करीत मार्गी जीव । महाबळेश्वरासी आले वैष्णव । स्नानविधी सारुनी सर्व । पुजीला शिव स्वामींनी ॥ ४४ ॥ कीर्तन स्वयें करुनी तेथें । ब्राह्मण भोजन केले निरुते । येउनी वाई क्षेत्राते । जेजूरी ते अवलोकिले ॥ ४५ ॥ तव खंडेराय ह्माळसाकांत । सामोरे पातले श्रीसिध्दाते । ठेउनी घेतले कांहीं तेथें । केले अतिथ्य अत्यादरें ॥ ४६ ॥ तये काळीं सप्रेमें । अष्टक केलें तेथेंचि नेमें । श्रवणपठणें पुरे काम । पावे निजधाम श्रीगुरुकृपें ॥ ४७ ॥

॥ श्रीमल्हारीअष्टक ॥ प्रारंभ ॥

वसे प्रेमगिरी देवराणा उदार । तया आठवितां घडे पुण्य फार ।
म्हणूनि बरें म्हाळसाकांत सेवा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥ १ ॥
मणमल्ल हे दैत्य गांजी जगाला । तयाकारणें शीव अवतार जाहाला ।
खळा मारुनी रक्षिलें जाण जीवा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥२॥
हयारूढ जो शोभतो शस्त्रपाणी । तयादर्शनें पातका होय हाणी ।
स्वदासाश्रमा नासुनी दे विसावा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥३॥
स्वभक्तास विघ्नें जरी प्राप्त जालीं । तया संकटीं जो उडी शीघ्र घाली ।
आलिंगुनिया देत आहे स्वमाया । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥ ४ ॥
चरीत्रें जयाचीं सदा देव गाती । नसे पार ज्याचा म्हणे वेद नेति ।
असा शूळपाणी जिवीं नित्य घ्यावा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥५॥
जरी सूख हें इछिसी आपणातें । तरी जेजुरी जाइं बा स्वस्थचित्तें ।
तुझे भ्रांतीचा तोडी तो सर्व गोवा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥६॥
जया दर्शनें भुक्ति मुक्ति जीवाला । तया घ्यात जावें सदा बा शिवाला ।
स्वदासासी दे आपुला राम ठेवा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥ ७ ॥
गणाधीश हा हि गुणालागीं गातो । पहा सिध्द हा सर्वसिध्दीसी देतो ।
यया अष्टकाला मनीं दृढ ठेवा । मना तूं सदा देव मार्तंड गावा ॥ ८ ॥

॥ इति सिध्दकृत श्रीमल्हारीअष्टक संपूर्ण ॥

इयापरी श्रीस्वामींनीं । मार्तंड स्तविला येकाग्र मजनीं । पंढरीसी आले जेथुनी । देखिले नयनीं श्रीचरण ॥ ४८ ॥ देवभक्तांची समदृष्टी । होतां तेथें आनंदवृष्टी । वर्णितां नये ते गोष्टी । सदृढमिठी आलिंगन ॥ ४९ ॥ सिध्दस्वामींचें आगमन । भगवान म्हणतो आजि सुदिन । रुक्मीणी आली धाऊन । उतरी लोण ते वेळां ॥ ५० ॥ संतवृंदीं वेष्टिला स्वामी । नमन करीती पादपद्मीं । परस्परें ऐक्य नेहमी । विचरती प्रेमी हर्षयुक्त ॥ ५१ ॥ चतुर्थप्रहरीं कीर्तनासी । कराविती हरी वैकुंठविलासी । गंगामाहात्म्य श्रीसिध्दासी । वर्णावयासी आज्ञापिलें

॥ ५२ ॥ तये वेळीं प्रेमांत येऊन । अभंग केला स्वामींनीं जाण । ऐकावा तो श्रोतीं पूर्ण । भावें करून सर्वत्रीं ॥ ५३ ॥

॥ अभंग सिद्धनाथस्वामींचा ॥

याचे ह्मणता गंगा गंगा । सर्व पापें जाती भंगा ॥ १ ॥
स्वयें असे पदच्युता । जिवा देत अच्युतता ॥ २ ॥
अनिर्वाच्य हे महिमा । वेद ह्मणती जाली सीमा ॥ ३ ॥
स्नान केल्या जीवा जरी । सिद्ध हरीहर करी ॥ ४ ॥

इयाप्रकारें वर्णन करीता । हर्ष जाहाला पंढरीनाथा । वरदकर ठेविला माथा । प्रताप वर्णितां भागीरथीचा ॥ ५४ ॥ निजकन्येचें गाईले येश । संतोषले रमाधीश । ह्मणती अवतार तूं रामदास । कथन विशेष तुमचें पै ॥ ५५ ॥ पूर्वावतारीं मनाचे श्लोक । प्रबोधीले मानस चोख । तये चालीचे वाटे कौतुक । काव्य आणीक तैसें करा ॥५६॥ शिवाकरिता जिवा बोध । तेणें उद्धरे जग विविध । ऐसे सांगती आनंदकंद । भक्तवरद वैकुंठपति ॥ ५७ ॥ सिद्धहृदयासी तेणें भरतें । प्रेमार्णव उचंबळत । जिवा बोध केला तेथें । पन्नास श्लोकांत ते वेळा ॥ ५८ ॥ ते श्लोक पडता कर्णीं । तात्काळ वैराग्य उपजे मनीं । भक्तियुक्त तो ज्ञानी । विचरे जनीं स्वात्मसुखा ॥ ५९ ॥

॥ श्रीस्वामींचे श्लोक ॥

गणेशा नमो तूजसी ब्रह्मरूपा । तुझें नाम घेतां सरे जन्मखेपा ।
नमो नायका चिद्घना शारदेच्या । हरी संकटें सिद्धी कार्या जनाचा ॥१॥
मना व्यर्थ रे कासया घोलतोसी । अहंताबळें आपणा नोळखीसी ।
तुझा ब्रह्म तूं आपणा वोळखावें । दिसे सर्व ते ब्रह्म भावीत जावें ॥२॥
तुझा कोण तूं मीपणें हें कळेना । विवेकाविणें देहबुद्धी ढळेना ।
ह्मणुनी भजे आदरें त्या गुरूसी । तयाचे कृपे मीपणालागी त्रासी ॥३॥
जिवा सांगणें तुजसी काय आतां । वळें वाहसी जाण संसारचिंता ।
परी चालतो ते कदा नोळखीसी । विवेकें तरी आज्ञुनी पाही त्यासी ॥४॥
जयाचे कपाळे तया मिळताहे । मिळे अन्न तैसेंचि तो खात आहे ।

शिळेमाजी रे मंडुका कोण रक्षी । नसे संग्रहो काय खातात पक्षी ॥५॥
वनीं अजगरा कोण खायासी देतें । परी सांग वा काय त्याचे राहातें ।
तुला घातले गर्भवासासी जेव्हां । तदा अन्न वा पुरवी कोण तेव्हां ॥६॥
असा अन्नदाता तुला आसतांना । भया वाहसी व्यर्थ तूं रे सुजाणा ।
*अज्ञोनी तरी वृत्तीला बोधवावें । भूतादर्शनीं सुख मानीत जावें ॥ ७ ॥*
जयातें सदा ध्यातसे शूळपाणी । उभी पार्वती सिध्द जोडूनि पाणि ।
तयातें भजाया तुझे काय जाते । तयाविण रे कोण राखू पहाते ॥ ८ ॥
जयाचेनि सत्ते जनीं चालताहे । तया विसरोनी भ्रमे जात आहे ।
ह्मणूनि तुला सांगतो येक आतां । बहूभक्तीनें तोषवी विश्वनाथा ॥ ९ ॥
जगीं अन्नदाता तयासी न पाहे । कसा भूतप्रेता बहू भीत आहे ।
ऐसे भ्रांतीचे बूडसी व्यर्थ डोहीं । तरी तूं गुरू तारका पाठीं घेइ ॥१०॥
जरी तारक पाठीशी घेतलिया । न शिवे तुला जाण हि मोहमाया ।
किती या भयालागी भितोसी पाही । गुरूचे कृपें तुछ होउनी जाई ॥११॥
नको रे गुरू चेटकी जाण वारा । जयाचे कृपें काळ कापे थरारा ।
असा श्रीगुरु लाधल्या काय उणें । तयासंगती जाणिवेलागी घेणें ॥१२॥
जगीं रे जरी जाहले ब्रह्मज्ञानी । तरी श्रीगुरूवाचुनी नाही कोण्ही ।
जयाते नसे सद्गुरूची कृपा रे । तया मुक्तीचा मार्ग नाहीच बा रे ॥१३॥
सद्गुरू तरी सांगती दोन गोष्टी । करी तूं स्वधर्मा दया राख पोटीं ।
खरे याच शब्दी जिवा सार आहे । भवाते तराया थोर उपाय पाहे ॥१४॥
भवाचें भयें काय भितोसी जाणा । हरी अंतरीं आठवी तूं सुजाणा ।
तया योळखिल्या नसे जाण चिंता । जयाचे कृपे मुक्ति होताती कांता ॥१५॥
हरी तो कसा नाटकी सूत्रधारी । बहू भोग भोगी परी ब्रह्मच्यारी ।
जयाची लीळा ब्रह्मयाते कळेना । असा तूंचि तूं योळखी देवराणा ॥१६॥
चळेना ढळेना कधीं ब्रह्ममूर्ति । वदे वेद जाणा सदा ते चि कीर्ती ।
असे पाहि रे पाहि रे पाहि बापा । तयादर्शनें चुकती जन्मखेपा ॥१७॥
नसे श्याम ना पीत ना श्वेत कांही । असे गोजिरे दाटले तेचि पाही ।
तयाते सदा आठविताती योगी । ह्मणूनी तूंवा घ्याइरे जाण वेगी ॥१८॥

जया तर्किता तर्क हा शीणला हो । तया ज्ञानदृष्टी करूनी पहा हो ।
असे राहिजे सद्गुरूचेनि हातें । जयाचे कृपें ब्रह्म हातासी येतें ॥१९॥
परी वोळखावा कसा जाण साधु । जयाते नसे विषयाचा संबंधु ।
सदा लीन जो बोलता नम्र वाच्या । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२०॥
वरी हे परीक्षा जीवा जाण आतां । जयाते नसे मोहलोभादि चिंता ।
भूता पूजनी सर्वदा काम ज्याचा । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२१॥
जयाचे मनि क्रोध हा संचरेना । बहूसंकटीं धर्मबुधि ढळेना ।
स्वधर्मी रति बोलतो सत्य वाच्या । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२२॥
अशा साधूचें संगती तें असो दे । कदा विषइं बुध्दी ते हे नसो दे ।
सदा वैष्णवपूजनी चित्त राहे ।•तया भक्तीनें कीर्तिलागी परा हो ॥२३॥
जरी संगती साधुची लाधलिया । उणें रे नसे तुजसी जीवराया ।
परी वोळखावा खरा जाण संतु । नको रे नको विषयालागीं गुंतूं ॥२४॥
असा विषयो लागला जाण पाठी । बहुताचिये घोंवला दृढ कंठीं ।
म्हणूनी धरीं निस्पृह संगतीला । करी सार्थकास त्वरें याचिवेळा ॥२५॥
आशापाश हा सर्व सोडूनि देईं । तरी पावशी सूख तू रे स्वदेहीं ।
जरी पाहिजे तूजला देव आतां । धरी मानसीं ज्ञत्व वेदार्थगीता ॥२६॥
नको रे नको दंभवाद विवाद । असावा जिवा राघवीं पूर्ण छंद ।
निरालस्ययोगें स्मरावें तयाते । जिथें तर्क विस्मीत आनंद होत ॥२७॥
नको वा जिवा संग त्या दुर्जनाचा । जेथें व्यर्थ काळ जातसे नरतनूचा ।
मना आवरूनी हित तेचि करावें । रघुनायका दृढ चित्तीं धरावें ॥२८॥
अळी हे जशी पाहते भृंगटीते । तसा हृदईं ध्याइ रे चिन्मयाते ।
अळी हे जशि भृंगी होऊनि जाते । तसा होसी तू निश्चयो राखि चित्तें ॥२९
जिवा निश्चयो राखीसी येक आत्ता । तेणें पावसी सत्य रे मोक्षपंथा ।
गुरूवाक्य हे मानसीं दृढ किजे । तत्व श्रेष्ठ ते अंतरीं साठविजे ॥ ३० ॥
जेथें वेद नेति नेति म्हणताहे । आत्माराम तू ते चि सर्वज्ञ पाहे ।
सुखें रे तुंवा पाहावें आपणाते । उरे सर्वथा द्वैत हरीपदाते ॥ ३१ ॥
जिवा फार रे संशयो युक्त वाहसी । स्वरूपासी रमता सुखाब्धीच होसी ।

असाचि जरी भावि रे तू हरीते । हरी देहबुध्दि देतसे स्वात्मभावें ॥३२॥
नको रे नको मोहो दारादिकाचा । तयासंगती सांपडे राम कैचा ।
ह्मणूनि तुंवा साधुलागी भजावें । बहुसंकटीं दुःख तें नाठवावें ॥ ३३ ॥
जीवा पाहिजे रे हित तूं आपणाते । सुखें चाळतां पाविजे स्वपदाते ।
तया मार्गी रे सीघ्र आतां निघावे । सुखाकारणें ग्राम तेंहि त्यजावे ॥३४॥
जीवा पाहिजे तुजला सुख आतां । तरी काम सोडी त्वरें बा स्वहिता ।
नको क्रोध हा फार संतापकारी । तया त्यागुनी ध्याईरे नित्य हरी ॥३५॥
जरी सोडीतां मोहो पुत्रादिकाचा । करी संग्रहो सत्य रे शब्द त्याचा ।
अति आदरें रक्षिजे त्या अनाथा । तया रक्षिता पावसी आत्महिता ॥३६॥
असावे सदा नम्र त्या सज्जनासी । न सेवी कदा वाउगे भापणासी ।
जिवा रे सदा हाचि संकल्प राहो । भूता देखिलिया समाधान पावो ॥३७॥
दिसे सर्व ते ब्रह्म पाहूनी राहे । यदर्थीच तूं ग्रंथ शोधूनि पाहे ।
नको रे कधीं घेऊं तूं संशयाते । हरीरूप हि सर्व आहेत भूतें ॥ ३८ ॥
जरी तूज वाटे हरीते पुजावे । तरी भूतमात्रा सदा तोषवावे ।
तदा पावलीया पुजा त्या हरीला । यदर्थि नको तूं धरूं संशयाला ॥३९॥
हरी सर्व ठाई असे वेद बोले । तया निंदुनी रे जगीं कोण चाले ।
ह्मणुनी धरी वेद आज्ञा प्रमाणा । तयासारिखे जाण जीवा सुजाणा ॥ ४० ॥
जीवा हो तुला बा बहू बोधविती । परंतु तुझी संशई फार शक्ती ।
तरी संशयो सोडुनी देई आतां । तया त्यागुनी चाल रे सक्तिपंथा ॥४१॥
सदा मुक्त तूं आससी जाण बापा । परी बध्द होसी धरींता त्रितापा ।
ह्मणुनी आता हित तूं बा करावें । रघुराजजिकारणें हो वरावे ॥ ४२ ॥
बहू कष्टसी हिंडता गर्भवासा । आतां मानवा भूलसी व्यर्थ कैसा ।
फरी रे त्वरें सार्थका या शरीरीं । बरा वोळखी जाण बा सूत्रधारी ॥४३॥
तुझे देहो रे आसती लोक तिन्हीं । भुलोनी तया हिंडसी व्यर्थ रानीं ।
नको रे करूं धूम्र पंच्याग्न तेंहि । तयामाजी वा सर्वथा सूख नाहीं ॥४५॥
नको व्यर्थ रे दंडूं तूं या शरीरा । न सेवी शिताऊष्ण हि मेघधारा ।
धरी भाव रे विश्व हे ब्रह्म आतां । नको दुष्ट चित्ती धरूं ते अहंता ॥४५॥

जया तर्किती तर्क हा शीणला हो । तया ज्ञानदृष्टी करूनी पहा हो ।
असे पाहिजे सद्गुरूचेनि हाते । जयाचे कृपे मज्ञ ज्ञातासी येतें ॥१९॥
परी ओळखावा कसा जाण साधु । जयाते नसे विषयाचा समंधु ।
सदा लीन जो बोलता नम्र वाच्या । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२०॥
वरी हे परीक्षा जीवा जाण आतां । जयाते नसे मोहलोभादि चिंता ।
भूता पूजनीं सर्वदा काम ज्याचा । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२१॥
जयाचे मनि क्रोध हा संचरेना । बहूसंकटीं धर्मबुधि ढळेना ।
स्वधर्मी रति बोलतो सत्य वाच्या । जगी धन्य रे दास तो राघवाचा ॥२२॥
अशा साधूचें संगती तें असो दे । कदा विपाई बुध्दी ते हे नसो दे ।
सदा वैष्णवपूजनी चित्त राहे । तया भक्तीनें कीर्तिलागी वरा हो ॥२३॥
जरी संगती साधुची लाधलिया । उणे रे नसे तुजसी जीवराया ।
परी ओळखावा खरा जाण सतु । नको रे नको विषयालागीं गुंतूं ॥२४॥
असा विषयो लागला जाण पाठी । बहुताचिये झोंबला दृढ कठीं ।
म्हणूनी धरी निस्पृह संगतीला । करी सार्थकास त्वरें याचवेळा ॥२५॥
आशापाश हा सर्व सोडूनि देई । तरी पावशी सूख तू रे स्वदेहीं ।
जरी पाहिजे तूजला देव आता । धरी मानसीं शुध्द वेदार्थगीता ॥२६॥
नको रे नको दभवाद विवाद । असावा जिवा राववीं पूर्ण छंद ।
निरालस्ययोगें स्मरावें तयाते । जिथें तर्क निरसीत आनंद होत ॥२७॥
नको वा जिवा संग त्या दुर्जनाचा । जेथें व्यर्थ काळ जातसे नरतनूचा ।
मना आवरूनी हित तेचि करावें । रघुनायका दृढ चित्तीं धरावें ॥२८॥
आळी हे जशी पाहते मृगटीते । तसा हृदईं ध्याइ रे चिन्मयाते ।
आळी हे जशि भृगी होऊनि जाते । तसा होसी तू निश्चयो राखि चित्तें ॥२९
जिवा निश्चयो राखीसी येक आतां । तेणें पावसी सत्य रे मोक्षपंथा ।
गुरूवाक्य हे मानसीं दृढ किजे । तत्व श्रेष्ट ते अतरीं साठविजे ॥ ३० ॥
जेथें वेद नेति नेति म्हणताहे । आत्माराम तू ते चि सर्वज्ञ पाहे ।
सुखें रे तुवा पाहावे आपणाते । तुरे सर्वथा द्वैत हरीपदाते ॥ ३१ ॥
जिवा फार रे सशयो युक्त बाहसी । स्वरूपासी रमता सुखाब्धीच होसी ।

असाचि जरी भावि रे तू हरीते । हरी देहबुध्दि देतसे स्वात्मअर्थे ॥३२॥
नको रे नको मोहो दारादिकाचा । तयासंगती सांपडे राम कैचा ।
ह्मणूनि तुंवा साधुव्हागीं भजावे । बहुसंकटी दुःख तें नाठवावें ॥ ३३ ॥
जीवा पाहिजे रे हित तूं आपणाते । सुखें चाळतां पाविजे स्वपदाते ।
तया मार्गी रे सीघ्र आतां निघावे । सुखाकारणें ग्राम तेंहि त्यजावे ॥३४॥
जीवा पाहिजे तुजव्हा सुख आतां । तरी काम सोडी त्वरें बा स्वहिता ।
नको क्रोध हा फार संतापकारी । तया त्यागुनी घ्याईरे नित्य हरी ॥३५॥
जरी सोडीतां मोहो पुत्रादिकाचा । करी संग्रहो सत्य रे शब्द त्याचा ।
अति आदरें रक्षिजे त्या अनाथा । तया रक्षिता पावसी आत्महिता ॥३६॥
असावे सदा नम्र त्या सज्जनाशी । न सेवी कदा वाउगे आपणासी ।
जिवा रे सदा हाचि संकल्प राहो । भूता देखिलिया समाधान पावो ॥३७॥
दिसे सर्व ते ब्रह्म पाहूनी राहे । यदर्थीच तूं ग्रंथ शोधूनि पाहे ।
नको रे कधीं घेऊं तूं संशयाते । हरीरूप हि सर्व आहेत भूतें ॥ ३८ ॥
जरी तूज वाटे हरीते पुजावे । तरी भूतमात्रा सदा तोषवावे ।
तदा पावलीया पुजा त्या हरीला । यदर्थि नको तूं धरूं संशयाला ॥३९॥
हरी सर्व ठाई असे वेद बोले । तया निंदुनी रे जगीं कोण चाले ।
ह्मणुनी धरी वेद आज्ञा प्रमाणा । तयासारिखे जाण जीवा सुजाणा ॥ ४० ॥
जीवा हो तुला बा बहू बोधवितीं । परंतु तुझी संशई फार शक्ती ।
तरी संशयो सोडुनी देई आतां । तया त्यागुनी चाल रे भक्तिपंथा ॥४१॥
सदा मुक्त तूं आससी जाण बापा । परी बध्द होसी धरीता त्रितापा ।
ह्मणुनी आतां हित तूं बा करावें । रघुराजजिकारणे हो मरावे ॥ ४२ ॥
बहु कष्टसी हिंडता गर्भवासा । आतां मानवा भूलसी व्यर्थ कैसा ।
करी रे त्वरे सार्थका या शरीरीं । बरा वोळखी जाण बा सूत्रधारी ॥४३॥
तुझे देही रे आसती लोक तिन्हीं । भुलोनी तया हिंडसी व्यर्थ रानीं ।
नको रे करूं धूम्र पंच्याग्न तेहि । तयामाजी बा सर्वथा सूख नाहीं ॥४५॥
नको व्यर्थ रे दंडूं तूं या शरीरा । न सेवी शिताऊष्ण हि मेघधारा ।
धरी भाव रे विश्व हे ब्रह्म आतां । नको दुष्ट चित्तीं धरूं ते अहंता ॥४५॥

असे अहंकृती ते कदाहि नसो दे । हरी अर्पणी बुधि ते हे वसो दे ।
सदा सर्वदा आठवावे हरीते । तया आठविना स्वयें तेचि होते ॥४६॥
ह्मणूनि अतां ध्यात जाइ हरीला । मनीं चिंतितां पावसी तूं गतीला ।
गती हे तुझी सज्जनामाजि पाही । तया संगतीनें गतिरूप होई ॥४७॥
खरा शब्द रे मानी तूं सद्गुरूचा । तरीं पावसी आत्मरूपासी साचा ।
सदा मुक्त तुं आससी मुक्तयोगें । परी बद्ध होसी कसा दुष्टसंगें ॥४८॥
तुझे रूप तूं न्याहळी रे उदारा । बरें लक्ष लाउनीया पाहे धीरा ।
सदा लक्ष राहो तुझा याचि ग्रंथीं । तरी ते विरे रे तुझी जाण भ्रांती ॥४९॥
वदे सिध्द भावें अशा आत्मबोधा । विवेकें सदा आदरें ग्रंथ शोधा ।
आहे पाक हा साधूचे भोजनाचा । अति उत्तम स्वाद अध्यात्मयाचा ॥५०

॥ श्लोक स्वामींचे समाप्त ॥ ७ ॥

पन्नास श्लोक हे वदतां । कीर्तनीं वैराग्य जाले बहुतां । प्राणी लागले भक्तिपंथा । पंढरीनाथा हर्ष तेणें ॥ ६० ॥ सिध्दस्वामीनीं समचरणीं । मस्तक ठेविता प्रेमेकरुनी । आलिंगन देती चक्रपाणी । आनंदेकरुनी ते वेळा ॥ ६१ ॥ मंगळ आरती होउनी तेथें । पांडुरंग अष्टक केले निरूतें । ऐकावे ते सकळ श्रोते । जाय दुरीत तात्काळीं ॥ ६२ ॥

॥ श्रीसिध्दस्वामींचें अष्टक ॥

निजशेष आंगा करुनी पलगा । वसे पाई गंगा जयाचे सुरंगा ।
प्रपचासी दंगा करी स्वात्मरंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ १ ॥
वसे त्या विहंगा करुनी तुरंगा । रमा पादसंगा वरी पद्मीनगा ।
त्यजा लोकसंगा पवितो अनंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ २ ॥
शिरीं शिवतुंगा गिरीजा स्वसंगा । करी कामभंगा पदीं चित्त रंगा ।
तमाच्या पतंगा वदे या अभंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ३ ॥
पदा आसि हूगा वरा सतसंगा । वदा या श्रीरंगा नरे नामी रंगा ।
त्यजा दुष्टसंगा करा पापभंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ४ ॥
मना तूं कुरंगा धरी शब्दसंगा । वरी नियंता सुखें स्वात्ममांगा ।
असे मार्गधिंगा जगाच्या प्रसंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ५ ॥

नमा वेदलिंगा पूजा ज्ञानलिंगा । तुटे मायपिंगा फिटे भ्रांतिभ्यंगा ।
गुरूराजगंगा वरी तू तुरंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ६ ॥
मति दुष्ट शुंगा करी वृत्ति लुंगा । सदा देहशृंगावरी होये भुंगा ।
तुजवीण कुंगा मजी भक्तचुंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ७ ॥
करा सित्धसंगा धरा हृत्तरंगा । तरा या कुसंगा वरी शांति संगा ।
नमा आत्मरंगा त्यजा या दुरंगा । परब्रह्मलिंगा भजा पांडुरंगा ॥ ८ ॥
इयाप्रकारें पांडुरंगस्तवन । सित्धसमर्थे करीता जाण । प्रसन्न जाहाले रुक्मिणीरमण । माळ काढून घातीली गळा ॥ ६३ ॥ ती माळिका वैजयंती । पंचप्रकार जाणिजे श्रोतीं । नीळमौक्तिकवैडुर्यज्योती । सुढाळदीती माणिक्य हिरा ॥ ६४ ॥ वैजयंती ह्मणावे तये । प्रसाद दिधला सित्धासी पाहे । जवळी दीन मी उभा आहे । घातली होये गळा माझ्या ॥ ६५ ॥ तेणे पंचभौतिकदेह पवित्र । संतस्तवनी होउनी पात्र । श्रीगुरूकृपा शिरीं छत्र । वदतसे वक्त्र साधुकथा ॥ ६६ ॥ पुढें कथा रसाळ बरवी । वदविती सद्गुरू लीळा लाघवी । सित्धचरीत्र पावन सर्वी । सकळ पुरवी काम मनींचे ॥ ६७ ॥ स्वतसित्ध राजारामीं । प्रघटले आपण स्वामी । मीतूंपणा दवडुनी ऊर्मी । स्वसुखधर्मी सहजस्थीती ॥ ६८ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । सित्धचरित्रस्तवनातें । अध्याय होत सहावा हा ॥ ६९ ॥ अध्याय ॥ ६ ॥ अनु० अ० ॥ १०३ ॥ समाप्त ॥ अष्टक ॥ ३ ॥ संख्या अष्टक ॥ २४ ॥ श्लोक ॥ ७० ॥ अभग ॥ १ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ श्रीराम ॥ ७ ॥

## अध्याय १०४

### — श्रीसित्धस्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरुसित्ध

अनुभवा । पांडुरंगा श्रीराघवा । पुराणपुरुषा रमाधवा । क्षिराणवा सच्चित्सुखा ॥ १ ॥ जयजय गरुडवहना गौरीशप्रिया । गणगंधर्व गजानना हृदया । गोपाळकृष्ण गवळणीजाया । गोवळीया गोरक्षमक्षका ॥ २ ॥ घनःशामा घनवृष्टिदा । घवघवीतरूप परमशुध्दा । घटमट करीसी माया अविद्या । घोर सदा तोडिसी तूं ॥ ३ ॥ नरोत्तमा नरनारायणा । नाना शास्त्रें निरोपणा । नाना व्यक्ती कार्यकारणा । नागेंद्रशयना निगमाधिपती ॥ ४ ॥ चराचरव्यापक चंद्रवंशा । चरणशरणा संकटनाशा । च्यामधारी वायवेशा । चंपकक्षेत्रनिवासा श्रीरघुपति ॥ ५ ॥ छत्रपति राजाधिराजा । छिद्रतारणी छंद विरेजा । छमछमनृत्य जेथें वोजा । छेदसी सहजा दानवातें ॥ ६ ॥ जयजय जगनिवासा जगदोध्दारा । जळपतिशयना जळजसारा । जंगमस्थीर जठरविहारा । जडाजडविचारा जयश्रीहरि ॥ ७ ॥ बोलता स्तवन बोलचि राहे । निःशब्दीं तर्क कांहीं न साहे । व्याप्यव्यापक अंतर्बाह्य । रतऊं काय जानकीपति ॥ ८ ॥ मागील अध्याई श्रीसितेवास । प्रसाद केला पंढरीविठ्ठलासें । ऐक्यता पावोनी प्रेमरस । जाला सुरस कीर्तनविधी ॥ ९ ॥ देवभक्तासी कैचा भेद । येकस्वरूप हरीहर प्रसीध्द । सेव्यसेवक भाव शुध्द । हा विनोद युगायुगीं ॥ १० ॥ कृतायुगीं शिवहरि । भज्यभजक परात्परीं । त्रेतीं मारुति रुद्रावतारी । रावणारी श्रीविष्णु ॥ ११ ॥ द्वापारीत वैकुंठपाळ । देवकीचा जाहला बाळ । गोपेश्वर गोपीका सकळ । क्रीडा केवळ परस्परें ॥ १२ ॥ कलीमध्यें श्रीपांडुरंग । पुंडरीकाचे पुढें लिंग । कीर्तनाचा सदा रंग । गजर धींग होतसे पै ॥ १३ ॥ संतस्वरुप गुरुशिष्य । नटले आपण हरी महेश । जगदोध्दार करावयास । साधुवेश धरीती पै ॥ १४ ॥ मछेंद्र श्रीगौरीपति । गोरक्ष पाहातां विष्णुमूर्ति । गहिनीराज तद्विभूती । शिवनिवृत्ति ज्ञानेशहरी ॥ १५ ॥ जनार्दन पंचवदन । येकनाथ श्रीद्वारकारमण । जयराम होउनी पुन्हा आपण । गोपाळ त्रिनयन उपदेशिला ॥ १६ ॥ ऐसे सांगता अनेक

संत । गुरुशिष्यत्वें हरीहर विलसत । महारुद्र तो रामदास समर्थ । कल्याण होत विष्णुअंश ॥ १७ ॥ सिध्दनाम स्वामी तेचि । प्रत्यक्ष मूर्ति मारुतीची । मानवरूपें विलसे साचि । लीला तयाची श्रवण करा ॥ १८ ॥ हरिहरात्मक देवभक्त । ऐक्यस्वभाव मुळींचा युक्त । भेदवादी संदेहग्रस्त । मानिती द्वैत अज्ञानपणें ॥ १९ ॥ वामसव्य दोनीभाग । शरीरीं पाहातां येकचि अंग । उमारंग रमारंग । ठाईं अभंग येकात्मता ॥ २० ॥ असो मत्तवादी कथन असारे । अद्वैत कथा श्रवण सारे । संतस्वरूपें सिध्देश्वर । आख्यान पवित्र गाऊं तें ॥ २१ ॥ पश्चात्याईं पंढरीविठ्ठलें । प्रसादमाळा दिली स्वामीस । प्राप्त होता शिष्यास । जाली प्रेमास स्फूर्ति पैं ॥ २२ ॥ नमन करुनी श्रीचरणा । निघाले सिध्द तेथुनी जाणा । समागमे पंढरीराणा । निरंतर भजनामाजीं रत ॥२३॥ माहुली क्षेत्रासी येऊन । नागेश मठासी दिले दर्शन । प्राणायामसाधनीं तो जाण । केले पावन तयातें ॥ २४ ॥ संगमक्षेत्र आणि सातारा । अंत्रभाग मध्यें वरा । पवित्रस्थळ पाहुनी थारा । श्रीगुरुवरा सुख वाटलें ॥ २५ ॥ दिन सप्तक वास करितां । चमत्कार जाहाला तत्वता । ते अद्भुत श्रवण करितां । तुटे चिंता भवाची ॥ २६ ॥ मार्गशीर्षमास विभुती । यात्रा निगडीस जात होती । आली तेथें दर्शनाप्रती । नमन करिती स्वामीतें ॥ २७ ॥ सातारकर ब्राह्मण । यवतेश्वराचें करिता कथन । अकाळीं आंबे येती पूर्ण । धन्य स्थान तें जाणा ॥ २८ ॥ प्रथम आरतीस वृक्षासी मोहर । दुसरे दुपारतीस आंबे साचार । तिसरे वेळे पिकोनी सारे । नैवेद्यप्रकार देवासी ॥ २९ ॥ येक महर्तात त्रिविधलक्षण । यवतेश्वरमहात्म कथिलें तयानें । सिध्दनाथें करितां श्रवण । हास्यवदन केलें पैं ॥ ३० ॥ वदे ब्राह्मण ते स्वामीया । विनवणी माझी हे चि पाया । न कळे अर्थ माझे हृदया । हास्य सखया कां केलें ॥ ३१ ॥ श्रीसिध्द तेव्हां वदती । त्रिविधविचार असती जगतीं । तीन काळ प्रसह्दी होती । गुणत्रयस्थिती सकळ जन ॥३२॥ सर्वांठाईं रघुनायक । लीळा तयाची सर्वत्र येक । भाव तैसा होतसे

देख । पहा कौतुक येथेंचि सातां ॥ ३३ ॥ धूपदीपनैवेद्य करून । प्रार्थना केली फळें दे ह्मणोन । मोहर तात्काळ आला जाण । पाहती नैनें जन सारे ॥ ३४ ॥ अर्ध घटकेनें ते वेळीं । फळें येऊन समग्र पिकलीं । तोडुनी स्वयें करकमळीं । अर्पण केली यात्रेकन्या ॥ ३५ ॥ विप्रेंद्र तो चाकाटला । दृढ धरीले पदकमला । जयजयकार अनघा जाला । गाती यशाला नरनारी ॥ ३६ ॥ धन्यधन्य ते सिध्दचरीत्र । श्रवण करीता जीव पवित्र । आणिक नवल ऐका विचित्र । जेणें स्वतंत्रपद पाविजे ॥ ३७ ॥ कीर्ती फाकता शहरांत । लोक येती बहूत तेथें । मनी धरुनी अनेक हेत । परमार्थ कवणा नावडे ॥ ३८ ॥ तेणे श्रेसी येउनी कंटाळा । सोडीले तया निवांतस्थळा । जरंडापर्वत अवलोकीला । न कळतां कवणाला निघुनी गेले ॥ ३९ ॥ श्रीमारुतीचें घेउनी दर्शन । अष्टक केलें जाण । भाव धरुनी करिता पठण । प्रत्यक्ष हनुमान भेटी देत ॥ ४० ॥

॥ श्रीसिध्दनाथविरचित मारुति अष्टक प्रारंभ ॥

महा संकटीं आठवावे कपीला । तया आठविता कलिकाळ गेला ।
ह्मणुनी आता सांगणें हेंचि मार्गे । जीवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥१॥
सख रामजीचा असे पूर्ण जाणे । सुमित्रासुता रक्षी की हाचि प्राणें ।
आणी आचला हस्तकीं हा स्वभावें । जिवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥२॥
सीताशोकहर्ता वनालागीं भगी । पुरी जाळिली जाण ते रुक्म आगीं ।
क्षमा रक्षिता भक्त हे काय गावें । जीवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥३॥
शरण्यास रक्षी असा धर्म ज्याचा । महासंकटी तारीतो स्वामी साचा ।
तया गाउनी सदा नम्र व्हावें । जीवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥४॥
कसा बहा रुद्रावतारा धरीतो । स्वलीळेचि जाणा तीव्रमाया हरीतो ।
तयाभक्तीलागीं मना दृढ व्हावें । जीवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥५॥
भजे त्या त्वरें संकटीं सोडवितो । स्वनयस्वरूपीं जीवा मेळवितो ।
तया मानसींचे असे सर्व ठावे । जीवा मारुतीलागीं तूं नित्य ध्यावें ॥६॥
ह्मणुनी सदा हित ते आचरावें । निरंतर मना रामदूता भजावे ।

तरी वायूचा सूत प्रत्यक्ष पावे । जीवा मारुतीलागी तूं नित्य ध्यावें ॥७॥
असे आष्टक वर्णिले मारुतीला । तेणें आत्मसिध्दी जीव हा शिव जाला ।
तयाचे गुणीं वा भवीं या तरावें । जीवा मारुतीलागी तूं नित्य ध्यावें ॥८॥
॥ इति सिध्द अष्टक समाप्त ॥ ७ ॥

अष्टश्लोकांत हनुमंतस्तुती । तेणें संतुष्ट जाला मारुती । अष्टसिध्दी प्रघटल्या क्षिती । हात जोडीती श्रीसिध्दा ॥ ४१ ॥ अभेदें श्रीराम हनुमान । सर्वसिध्दी रावती जाण । असो सिध्दांनी करुनी पूजन । केलें कीर्तन जरंड्यावरी ॥४२॥ नंतर निघोन चरेग्रामास । आले समर्थ श्रीसिध्द-रामदास । गुंफा बांधोनी केला वास । चतुर्विधमास तये स्थळा ॥४३॥ देशोदेशींचे येती संत । परस्परें प्रेमा अद्भुत । प्राणी तेथील केले पुनीत । दाविला पंथ भक्तीचा ॥ ४४ ॥ रुद्रदासाचे गृह तेथें । जाणुनी राहिले श्रीगुरुनाथ । प्रश्न आदरिला श्रोती येथें । सांगणें कथे तें सर्व ॥ ४५ ॥ कल्याणांश जन्मला उदरीं । कोण पुरुष तो अवतारी । गुरुभक्तासी तया जठरीं । भवतमारी जन्मविले ॥ ४६ ॥ तें सविस्तर प्रकरण । सांग ह्मणतां आदरें करून । वक्तयातें करुनी नमन । प्राप्त सांगणें जन्मांतर कथा ॥ ४७ ॥ शिवकंचिविष्णुकंचि । क्षेत्रें स्मार्तवैष्णवाची । भूमंडळी प्रसिध्द साचि । महिमा तयाची अधिक पै ॥ ४८ ॥ शिवकंचींत आपया दीक्षित । परम भाविक विद्वान्न पंडीत । प्रतिसूर्य ब्राह्मण समर्थ । दीक्षा स्मार्त जयाची ॥ ४९ ॥ शिवस्मरणीं सदा रत । जीविंव फेर्चे चरेल तेथ । त्रिकाळ स्नान संध्या करीत । पूजा सतत काळत्रई ॥ ५० ॥ रूद्राक्षभूषण जटाभार । रूद्राभिषेक निरंतर । आराधिती गिरीजावर । शुचिर्भूत फार भस्म आंगीं ॥ ५१ ॥ सोहंध्वनि अखंड स्मरणीं । जडोनी ठेला शिव नैनीं । चराचर पाहाती जनीं । शूळपाणी दिसताहे ॥ ५२ ॥ अन्य अविश्वास स्वर्मी जपा । न स्पर्शे कदा या हृदया । भगवत्‌भजनीं रंगली काया । धन्य आपया दीक्षित ते ॥ ५३ ॥ पंच महायज्ञ शास्त्रोक्त । गृहस्थाश्रम ज्याचा शोभत । अग्निहोत्र विराजीत । अतिविळसत यज्ञशाळा ॥ ५४ ॥

यज्ञपुरुषाचें आराधन । केलें येकाग्र भक्तीनें । अतिथींचें नित्यपूजन । अन्नदान सर्वाभूतीं ॥५५॥ वैश्वदेवाचिये अंतीं । कोणी येवो अन्नार्थी । शिवासम ते मानुनी मूर्ति । तृप्त करीती अन्नोदकें ॥ ५६ ॥ ऐसा नित्य जयाचा नेम । वर्तलें तेथें अद्भुत प्रेम । तो श्रवण करीता धर्म । टळे अधम भवव्यथा ॥ ५७ ॥ ब्रह्महत्यारी पातकी पूर्ण । आला अकस्मात तेथें ब्राह्मण । तयाजवळी काळें वसन । विप्रानें तें केलेसे ॥ ५८ ॥ काकबळी टाकीते वेळे । द्विजवरा त्या अवलोकिले । ह्मणती कोण रे तूं कोठील । मळकटलें दिसे वस्त्र ॥ ५९ ॥ तव त्या पतितासी चमकट लागली । शिव शिव वाणी गर्जिन्नली । रुधीर श्रवले त्याचे कपाळीं । मूर्छा पातली ते वेळा ॥ ६० ॥ आपया दीक्षित स्वहस्तें । उदक सिंचिता तयावरुते । सावध होउनी सांगे वृत्तांत । महापतित असे ह्मणुनी ॥ ६१ ॥ दीक्षित महाराज दयाघन । ब्रह्मवेत्ते परीपूर्ण । ह्मणती ये स्नान करून । करी भोजन पंक्तीसी ॥ ६२ ॥ पातक्यासी तया हर्ष जाला । आंघोळी सारुनी तात्काळ आला । चरणांवरी मस्तक ठेविला । भोजनी बैसला तीर्थ घेउनी ॥ ६३ ॥ हे कळतांचि सकळ क्षेत्रस्था । धावले काखेसी घेउनी पोथ्या । ह्मणती बाहेर यावें आपया दीक्षिता । कैसें पतिता पंक्तीसी घेतला ॥ ६४ ॥ ब्राह्मण येता स्वगृहासी । आसनें देउनी तयासी । नमन करुनी आदरेसी । विज्ञाप्तीसी आरंभिले ॥ ६५ ॥ त्रिवाच्य करीतां शिवस्मरण । पतित जाला तो पावन । प्रायश्चित घडलें पूर्ण । घेतला ह्मणून पंक्तीसी ॥ ६६ ॥ दीक्षीतवचन ऐकुनी सर्वां । खवळला क्रोध भूदेवा । वदती अवघ्या पोथ्या बुडवा । संस्कार करा नामस्मरणें ॥ ६७ ॥ मौंजी लग्न आदिकरून । प्रायश्चित्तें समग्र जाण । ते हि करा शिव शिव ह्मणून । काय कारण वेदशास्त्रावें ॥ ६८ ॥ सर्वी ऐसें बोलतां वाचे । आपया दीक्षित सर्वज्ञ साचे । उत्तर देती तया नेमाचें । बीज नामाचें प्रणवाशीं पै ॥ ६९ ॥ वेदासी ॐकार मूळ । तेथुनी शास्त्रें सकळ । नाम चि प्राधान्य केवळ । पहा प्रांजळ अनुभव

॥ ७० ॥ आदी कर्मासी प्रारंभ करीता । आचमनोक्त ते तत्वता । आदि अती नामापरता । नाहीं सर्वथा विच्यार पै ॥ ७१ ॥ पुराणप्रसिध्द नाम महिमा । व्यासोक्तीसी नाहीं सीमा । चतुर्मुखाचा तो हि ब्रह्मा । स्मरे नामा वेदाआधीं ॥ ७२ ॥ वेवाद होता परस्परें । अपूर्व वर्तलें तेथें बरें । आम्हीं येक विप्रेंद्र । वदे विचित्र ते वेळा ॥ ७३ ॥ ह्मणे शिवस्मरणानें जाला पुनीत । तरी नदीनें खावी डाळ निश्चीत । आह्मी घेऊं मग पक्तीते । नातरी वाळीत तुह्मा दोघा ॥ ७४ ॥ आपया समर्थ भगवत्भक्त । ह्मणे उशीर कासया येथें । आणवा डाळ आतांच त्वरीत । ठेवा निश्चीत नंदीपुढें ॥ ७५ ॥ छडकें तेणें तात्काळ । आणविली हरबऱ्याची डाळ । दुरडी भरुनी मोठी प्रबळ । नंदीजवळ ठेविपेली ॥ ७६ ॥ भक्तवत्सळ करुणाघन । कैलासपतिगिरिजारमण । नाममाहात्म्य तया खरें करणें । लाज राखणें दासाची ॥ ७७ ॥ नंदिकेश्वराचे ह्रदई । प्रगटले हिमनगजांवाई । वर्तले विचित्र ऐका ते हि । सरकला मही पाषाण तो ॥ ७८ ॥ दुरडींत तोंड घालून । डाळ भाक्षिली समग्र जाण । पहाती सकळ ब्राह्मण । आले शरण दीक्षितासी ॥ ७९ ॥ दंडप्राय नमस्कार । घालिती तेंव्हां नारीनर । अनुताप होऊनी त्याजिली घेर । धरिला विच्यार परमार्थ ॥८०॥ असो ऐसे भगवत्भक्त । महासमर्थ आपया दीक्षित । शिवभजनीं सदा रत । अग्निसेवेंत सर्वदा ॥ ८१ ॥ तयाचे अवतार नरसिंव्ह नामें । देह धरीले भक्तीसी प्रेमें । लक्ष्मी शक्ती वरीली नेमें । माविक परम सत्वस्थ मूर्ति ॥ ८२ ॥ पूर्वाभ्यासें आपा ह्मणती । मागील चिन्हें आंगी आहती । अवळ तो चि नळ युक्ती । कल्याण वदती कलींत तया ॥ ८३ ॥ तो चि पुन्हा श्रीगुरुसेवे । तया उदरीं जन्मला स्वभावें । तृतियोध्यायांत तें सर्व । वर्णिलें बरवें माघें पै ॥ ८४ ॥ समाधिपरीयंत लीळा सारी । तिसरे अध्यायांत गाईली थोरी । आतां ऐका श्रोते चतुरीं । प्रेमलहरी सिध्द-कथन ॥ ८५ ॥ चरेगांवी सिरधनायें । वास्तव्य केलें कांहीं तेथें । उत्परोनी शिष्यकुळाते । आले समर्थ वासेगांवीं ॥ ८६ ॥ माविक-

द्विज तेथील मोरू । माधार्थस्वरूपी अचळ धुरू । तयासी करविला ज्ञान विध्यारू । सुकृतमेरू धन्य तयाचा ॥ ८७ ॥ उपदेश करउनी शिष्याहातीं । केली स्वईछें तेथें वस्ती । ग्रामस्थजना लाउनी भक्ती । भजन करविती सर्वांते ॥ ८८ ॥ राजारामी करुनी आज्ञा । प्रबोधिले मोरूब्राह्मणा । निष्ठा तयाची फार जाण । छंद मना गुरुचरणीं ॥८९॥ तेणेयोगें संकटें तयाचीं । निवारीलीं फार साची । दयाळु गुरुमाय आमुची । दवडी दासाची विघ्नें तीं ॥ ९० ॥ जे जे सिध्दसांप्रदाई । तयासी रक्षी श्रीगुरुआई । भयचिंता नसे कांहीं । ध्याता हृदई आराम दे ॥९१॥ काशीग्राम पुण्यभूमि । तेथें राहिले सिध्दस्वामी । भजनी लाउनी प्राणी नेमी । चित्सुखधामी निघाले मग ॥९२॥ विश्रामपुरासी येऊन । पवित्र केले स्वशिष्यसदन । श्रीरामाचे जेथें स्थापन । केलें अर्चन स्वयें पै ॥९३॥ मठासी येता सद्गुरुस्वामी । दुसरी केवळ रामनवमी । मंडप घालुनीं सप्रेमी । वाजती नेहमी मंगळतुरें ॥ ९४ ॥ ब्राह्मणभोजन कीर्तनयज्ञ । प्रत्यहि होतसे सहजी जाण । आबालवृध्द घेती दर्शन । करीती नमन नरनारी ॥ ९५ ॥ त्रिकाळपूजा सिध्दांची । आवडीकरून होतसे साचि । दीनवत्सळता नेमाची । पुरवी दासाची आवड पै ॥ ९६ ॥ येकमासपर्यंत । विश्रामपुरी उत्छाव होत । येती भेटीसी महापंडीत । होती कृतार्थ श्रीदर्शनें ॥ ९७ ॥ जन्मांतरीचा योगनिष्ठ । आला पुराणिक भक्तिनिष्ठ । जोडुनी तेणें करसंपुष्ट । वदला स्पष्ट चरीत्रस्तुति ॥ ९८ ॥ तें स्तवन श्लोकपर । ऐकतां सकळ कामना पुरे । यास्तव लिहीणें प्रकार । श्रवण सादर करावें पै ॥ ९९ ॥

जेव्हां अधर्म पृथ्वीवरी भार होतो ।
तेव्हां सहस्रवदनाप्रति भार हो तो ॥
नाहीं तरी शिरीं सर्षप साच राहे ।
त्या अनंतभारशयना किती हो धरा हे ॥ २ ॥
पृथ्वीनिमित्त अवतार हरी करीतो ।
जो पातकें अखिल काळकृतें हरीतो ॥
अशेकरूनि अथवा धरी रूप नाना ।
तेव्हांचि साधुजन हो करिती तनाना ॥ ३ ॥

धर्मे साधुनि अधर्म तूटाया । भाविकास भवबंध तूटाया ।
दुष्टमार हरी तो अवनीचा । उच्च जन्म अथवा नव नीचा ॥ ४ ॥
मछादि जन्मे करुनी उदंड । त्या त्या प्रसंगीं हरी तो चि वड ।
ह्मणूनि त्रेतायुगी राम जाला । आपासी रूद्रें अवतार केला ॥ ५ ॥

हृदय हरहरीचे वर्णिती वेद सारे ।
ह्मणुनि हरीहराचा भेद नाहीं असा रे ।
हर त्यजुनि जाळा वानरी वेशधारी ।
पवनसुत हो तो रामचंद्रावतारीं ॥ ६ ॥
भूकन्या प्रकृति असे जनकजा जाळी तसा मारुती ।
जाळा अंजनिपुत्र रुद्र ह्मणुनी सौमित्र शेषाकृती ॥
माराया दशकंदरा अवघे जाळे अयोध्यापुरी ।
सकेताप्रति साधीळें जनीसुतें उड्डाण ळकेवरी ॥ ७ ॥

काहीं हें न धरीच भयशंका । जाळींच अवघी मग ळंका ।
शोधीळी जनकजा मग सीता । जी बळें हरुनी राक्षस न्हेतो ॥ ८ ॥
ळंकेत जे राक्षस सगराते । करूनी मेळे मग सागराते ।
आळे पुन्हा क्षेत्रिकुळांत माराया । दुर्योधनादि रण ते कराया ॥ ९ ॥
यदुकुळीं कितियेक कितेक हे । मह बळाढ्य व कौरव नीच हे ।
म्हणुनी पार्थकरें हरी धाडीतो । यमपूरासी धरामय तोडी तो ॥ १० ॥
सव ते कळियुगी जगभोंदु । दाविती करुनी वेश सुसाधु ।

द्विज तेथीळ मोरू । भावार्थस्वरूपी अचळ ध्रुरू । तयासी करविला ज्ञान विच्यारू । सुकृतमेरू धन्य तयाचा ॥ ८७ ॥ उपदेश करउनी शिष्याहातीं । केली स्वईच्छें तेथें वस्ती । ग्रामस्थजना लाउनी भक्ती । भजन करविती सर्वांते ॥ ८८ ॥ राजारामी करुनी आज्ञा । प्रबोधिले मोरूब्राह्मणा । निष्ठा तयाची फार जाण । छंद मना गुरुचरणीं ॥८९॥ तेणेयोगें संकटें तयाचीं । निवारीलीं फार साची । दयाळु गुरुमाय आमुची । दवडी दासाची विघ्नें तीं ॥ ९० ॥ जे जे सिध्दसांप्रदाई । तयासी रक्षी श्रीगुरुआई । भयचिंता नसे कांहीं । घ्याता हृदई आराम दे ॥९१॥ काशीग्राम पुण्यभूमि । तेथें राहिले सिध्दस्वामी । भजनी लाउनी प्राणी नेमी । चित्सुखधामी निघाले मग ॥९२॥ विश्रामपुरासी येऊन । पवित्र केले स्वशिष्यसदन । श्रीरामाचे जेथें स्थापन । केलें अर्चन स्वयें पै ॥९३॥ मठासी येता सद्गुरुस्वामी । दुसरी केवळ रामनवमी । मंडप घालुनी सप्रेमी । वाजती नेट्मी मंगळतुरे ॥ ९४ ॥ ब्राह्मणभोजन कीर्तनयज्ञ । प्रत्यहि होतसे सहजी जाण । आबालवृध्द घेती दर्शन । करीती नमन नरनारी ॥ ९५ ॥ त्रिकाळपूजा सिध्दांची । आवडीकरून होतसे साचि । दीनवत्सळता नेमाची । पुरवी दासाची आवड पै ॥ ९६ ॥ येकमासपर्यंत । विश्रामपुरी उत्छाव होत । येती भेटीसी महापंडीत । होती कृतार्थ श्रीदर्शनें ॥ ९७ ॥ जन्मांतरीचा योगनिष्ठ । आप्पा पुराणिक भक्तिनिष्ठ । जोडुनी तेणें करसपुष्ठ । वदला स्पष्ट चरीत्रस्तुति ॥ ९८ ॥ तें स्तवन श्लोकपर । ऐकतां सकळ कामना पुरे । यास्तव लिहीणें प्रकार । श्रवण सादर करावें पै ॥ ९९ ॥

जेव्हां अधर्म पृथ्वीवरी भार होतो ।
तेव्हां सहस्रवदनाप्रति भार हो तो ॥
नाहीं तरी शिरीं सर्षप साच राहे ।
त्या अनंतभारशयना किती हो धरा हे ॥ २ ॥
पृथ्वीनिमित्त अवतार हरी करीतो ।
जो पातकें अखिल कालकृतें हरीतो ॥
अंशेकरूनि अथवा धरी रूप नाना ।
तेव्हांचि साधुजन हो करिती तनाना ॥ ३ ॥
धर्म साधुनि अधर्म तुटाया । भाविकास भवबंध तुटाया ।
दुष्टमार हरी तो अवनीचा । उंच जन्म अथवा नव नीचा ॥ ४ ॥
मछादि जन्मे करुनी उदंड । त्या त्या प्रसंगीं हरी तो चि बंड ।
ह्मणूनि त्रेतायुगी राम जाला । आशासी रूद्रे अवतार केला ॥ ५ ॥
हृदय हरहरीचे वर्णिती वेद सारे ।
ह्मणुनि हरीहराचा भेद नाहीं असा रे ।
हर त्यजुनि जाला वानरी वेशधारी ।
पवनसुत हो तो रामचंद्रावतारीं ॥ ६ ॥
भूकन्या प्रकृति असे जनकजा जाली तसा मारुती ।
जाला अंजनिपुत्र रुद्र ह्मणुनी सौमित्र शेषाकृती ॥
माराया दशकंदरा अवघे जाले अयोध्यापुरी ।
संकेताप्रति साधीलें जनीसुतें उड्डाण लंकेवरी ॥ ७ ॥
काहीं हें न धरीच भयशंका । जाळीच अवघी मग लंका ।
शोधीली जनकजा मग सीता । जी बळे हरुनी राक्षस न्हेतो ॥ ८ ॥
लंकेत जे राक्षस संगराते । करूनी मेले मग सागराते ।
आले पुन्हा क्षेत्रिकुळांत माराया । दुर्योधनादि रण ते कराया ॥ ९ ॥
यदुकुळी कितियेक कितेक हे । मद्र बळाढ्य व कौरव नीच हे ।
म्हणुनी पार्थकरें हरी धाडीतो । यमपुरासी घरामय तोडी तो ॥ १० ॥
संत ते कलियुगी जगभोंदु । दाविती करुनां वेश सुसाधु ।

द्विज तेथील मोरू । भावार्थस्वरूपी अचळ ध्रुरू । तयासी करविला ज्ञान विच्यारू । सुकृतमेरू धन्य तयाचा ॥ ८७ ॥ उपदेश करुनी शिष्याहातीं । केली स्वईछें तेथें वस्ती । ग्रामस्थजना लाउनी भक्ती । भजन करवितीं स्वर्ति ॥ ८८ ॥ राजारामी करुनी आज्ञा । प्रबोधिले मोरूब्राह्मणा । निष्ठा तयाची फार जाण । छंद मन गुरुचरणीं ॥८९॥ तेणेंयोगें संकटें तयाचीं । निवारीलीं फार साची । दयाळु गुरुमाय आमुची । दवडी दासाचीं विघ्नें तीं ॥ ९० ॥ जे जे सिध्दसांप्रदाई । तयासी रक्षी श्रीगुरुआई । भयचिंता नसे काहीं । घ्याता हृदईं आराम दे ॥९१॥ काशीग्राम पुण्यभूमि । तेथें राहिले सिध्दस्वामी । भजनीं लाउनी प्राणी नेमी । चित्सुखधामी निघाले मग ॥९२॥ विश्रामपुरासी येऊन । पवित्र केले स्वशिष्यसदन । श्रीरामाचे जेथें स्थापन । केलें अर्चन स्वयें पै ॥९३॥ मठासी येता सद्गुरुस्वामी । दुसरी केवळ रामनवमी । मंडप घालुनी सप्रेमी । वाजती नेहमीं मंगळतुरे ॥ ९४ ॥ ब्राह्मणभोजन कीर्तनयज्ञ । प्रत्यहि होतसे सहजी जाण । आराटकृत्य घेती दर्शन । करीती नमन नरनारी ॥ ९५ ॥ त्रिकाळपूजा सिध्दांची । आवडीकरून होतसे साचि । दीनवत्सळता नेमाची । पुरवी दासाची आवड पै ॥ ९६ ॥ येकमासपर्यंत । विश्रामपुरी उत्साव होत । येती भेटीसी महापंडीत । होती कृतार्थ श्रीदर्शनें ॥ ९७ ॥ जन्मांतरीचा योगनिष्ठ । आला पुराणिक भक्तिनिष्ठ । जोडुनी तेणें करसंपुष्ट । वदला स्पष्ट चरीत्रस्तुति ॥ ९८ ॥ तें स्तवन श्लोकपर । ऐकतां सकळ कामना पुरे । यास्तव लिहीणें प्रकार । श्रवण सादर करावें पै ॥ ९९ ॥

॥ श्लोकपर श्रीसिध्दाख्यान प्रारंभ ॥

जेव्हां अधर्म पृथ्वीवरी भार होतो ।
तेव्हां सहस्त्रवदनाप्रति भार हो तो ॥
नाहीं तरी शिरीं सर्षप साच राहे ।
त्या अनंतभारशयना किती हो धरा हे ॥ २ ॥
पृथ्वीनिमित्त अवतार हरी करीतो ।
जो पातकें अखिल कालकृतें हरीतो ॥
अंशेकरूनि अथवा धरी रूप नाना ।
तेव्हांचि साधुजन हो करिती तनाना ॥ ३ ॥
धर्म साधुनि अधर्म तुटाया । भाविकास भवबंध तुटाया ।
दुष्टमार हरी तो अवनीचा । उंच जन्म अथवा नव नीचा ॥ ४ ॥
मच्छादि जन्मे करुनी उदंड । त्या त्या प्रसंगीं हरी तो चि बंड ।
ह्मणूनि त्रेतायुगी राम जाला । आशासी रूद्रे अवतार केला ॥ ५ ॥
हृदय हरहरीचे वर्णिती वेद सारे ।
ह्मणुनि हरीहराचा भेद नाहीं असा रे ।
हर त्यजुनि जाला वानरी वेशधारी ।
पवनसुत हो तो रामचंद्रावतारीं ॥ ६ ॥
भूकन्या प्रकृति असे जनकजा जाली तसा मारुती ।
जाला अंजनिपुत्र रुद्र ह्मणुनी सौमित्र शेषाकृती ॥
माराया दशकदरा अवघे जाले अयोध्यापुरी ।
संकेताप्रति साधीलें जनीसुतें उड्डाण लंकेवरी ॥ ७ ॥
कांहीं हें न धरीच भयशका । जालीच अवघी मग लंका ।
शोधीली जनकजा मग सीता । जी बळे हरुनी राक्षस न्हेतो ॥ ८ ॥
लंकेत जे राक्षस संगराते । करूनी मेले मग सागराते ।
आले पुन्हा क्षेत्रिकुलात माराया । दुर्योधनादि रण ते कराया ॥ ९ ॥
यदुकुळी कितियेक कितेक हे । भट्ट बळाढ्य व कौरव नीच हे ।
म्हणुनी पार्थकरें हरी धाडीतो । यमपुरासी धरामय तोडी तो ॥ १० ॥
संत ते कलियुगी जगबोधु । दाविती करुनी वेश सुसाधु ।

कामीनी मनी धरुनी हराया । पुढतीच नरकाप्रति जाया ॥ ११ ॥

टिळा टोपी माळा करुनि स्वगृही वस्त्र भगवी ।
फिरे देशोदेशी अनुग्रह करायासि अघवी ।
हराया अर्थाते वचन मधुरोद्गार पटुसा ।
मनीं परमार्थाचा ल्वहि न दिसे साच फटुसा ॥ १२ ॥

सांगती शरण श्रीगुरु जावें । सर्व त्या तनुधनादिक द्यावें ।
घे अनुग्रह बळेंचि धरावा । पुढतीच अर्थ मग हरावा ॥ १३ ॥
हेतु हाचि धरुनी मनीं । सेवितातीं गुरू नित्य कामीनी ।
पावती विषयसौख्य यामिनी । पुढतिच निरयाशि साधुनीं ॥ १४ ॥
विप्यारे पाहातांचि पाखांड सारे । कशीचे सखे भ्रष्ट केले जगा रे ।
मधुमांस भक्षुनिया शांत होते । असे काय हो पूर्वीचे संत होते ॥१५॥

कोण्ही म्हणेल अघवी तरी संतनिंदा ।
केली न म्या संतसमेशी मिंदा ॥
संती कुसंत तरी अंतरीचाचि खोटा ।

प्रभंजनसुत स्वपे प्रबळ रूद्र तापसी ।
चिरंजीव हरी करी जन्म कुंठ जननियेकुशी ।
करी मग कृपा वरी अवधुतावरी साधुता ।
धरूनि जग उध्दरीं हरी दीनजनाची व्यथा ॥ २० ॥
अधींच कली भ्रष्ट त्यांत जन दुष्ट हे तारणें ।
ह्मणूनि अवतार घे प्रथम रामदास आपण ।
शिवाजि नृप दुसरा कल्याण हो ।
अशा चरीत्र वर्णने कवि जनासी कल्याण हो ॥ २१ ॥
वाळी वधूनि दिधला वर श्रीपतीनें ।
होसील कलींत नृप तू शिव सन्मतीनें ॥
नसतापराध वधीला तूज आत्मवधा ।
कसे करूं सुश्रुत वाल्मिकीचे प्रबंधा ॥ २२ ॥
नळाला वदे श्रीपती शेषबंधु ।
कलीमाजि होसी कल्याणसाधु ।
भवाब्धि तरायाशी श्वेतु स्वहस्तें ।
नळा निर्मिला धन्य केले समस्तें ॥ २३ ॥
ह्मणूनि शिवाजी नृपछत्र जाला ।
दुजा शिष्य कल्याण ह्मणती जयाला ।
असे दोनी जाले मताते कराया ।
जनी नाव केली दिना उध्दराया ॥ २४ ॥
श्रीरामनामामृतपानतुसी । कधीं नव्हे हनुमता सुतृसी ।
ह्मणूनि कल्याण सुपता वर्तीतो । नळासवे जन्म पुन्हा करी तो ॥ २५ ॥
श्रीरामदास अवतार जसा तसा रे ।
त्या सिध्दराज वदती अवनींत सारे ।
शांडील्य गोत्र ऋग् आश्वलायन ।
जोशीतिनामे द्विज पुण्यवान ॥ २६ ॥

कामीनी मनी धरुनी हराया । पुढतीच नरकाप्रति जाया ॥ ११ ॥

टिळा टोपी माळा करुनि स्वगृहीं वस्त्र भगवी ।
फिरे देशोदेशी अनुग्रह करायासि अघवी ।
हराया अर्थाते वचन मधुरोद्गार पटुमा ।
मनीं परमार्थाचा लवहि न दिसे साच फटुसा ॥ १२ ॥

सांगती शरण श्रीगुरु जावें । सर्व त्या तनुधनादिक द्यावे ।
घे अनुग्रह बळेंचि धरावा । पुढतीच अर्थ मग हरावा ॥ १३ ॥

हेतु हाचि धरुनी मनीं । सेवितातीं गुरू नित्य कामीनी ।
पावती विषयसौख्य यामिनी । पुढतिच निरयाशि साधुनी ॥ १४ ॥

विच्यारे पाहातांचि पाखांड सारे । कळींचे सखे भ्रष्ट केले जगा रे ।
मधुमात भक्षुनिया शांत होते । असे काय हो पूर्वीचे संत होते ॥१५॥

कोण्ही ह्मणेल अघवी तरी संतनिंदा ।
केली न म्या संतसमेशी मिंदा ॥
संती कुसंत तरी अंतरीचाचि खोटा ।
शाळिग्रामांत बसला तरी गारगोटा ॥ १६ ॥

गीतेंत गीत आपीचत् सु आहे ।
जो का अनन्यभजने मळाचि राहे ॥
जो अंतरशुत्व बहिरंग कसा असेना ।
तो वद्य निंद्य दुसरा हरी अतरीना ॥ १७ ॥

असो रामदासादि साधु उदड ।
जगा तारुनी मोडीले क्षीप्र बड ॥
सदा सतक्रते गात जाली चरीत्रें ।
भवाब्धि तरायाशी होती अरीत्रे ॥ १८ ॥

जो चिदानदरूपा जगीं साचविला ।
सदोदित श्रीहरी नाचविला ॥
स्वपे मद्य ते इदुबिंब प्रमाते ।
अहो नित्य ज्या गात जावें प्रमाते ॥ १९ ।

प्रभंजनसुत स्वये प्रबळ रूद्र तापसी ।
चिरंजीव हरी करी जन्म कुठें जननियेकुशी ।
करी मग कृपा वरी अवधुतावरी साधुता ।
धरूनि जग उत्धरीं हरी दीनजनाची व्यथा ॥ २० ॥

अधींच कळी भ्रष्ट त्यांत जन दुष्ट हे तारणें ।
म्हणूनि अवतार घे प्रथम रामदास आपण ।
शिवाजि नृप दुसरा कल्याण हो ।
अशा चरीत्र वर्णने कवि जनासी कल्याण हो ॥ २१ ॥

बाळी वधूनि दिधला वर श्रीपतीनें ।
होसील कळींत नृप तूं शिव सन्मतीनें ॥
नसतापराध वधीला तुज आत्मबंधा ।
कसे करूं सुश्रृत वाल्मिकीचे प्रबंधा ॥ २२ ॥

नळाला वदे श्रीपती शेषबंधु ।
कळीमाजि होसी कल्याणसाधु ।
भवाब्धि तरायासी श्वेतु स्वहस्तें ।
नळा निर्मिला धन्य केले समस्तें ॥ २३ ॥

म्हणूनि शिवाजी नृपछत्र जाला ।
दुजा शिष्य कल्याण म्हणती जयाला ।
असे दोनी जाले मताते कराया ।
जनी नाव केली दिना उत्धराया ॥ २४ ॥

श्रीरामनामामृतपानतृप्ती । कधीं नव्हे हनुमंता सुतृप्ती ।
म्हणूनि कल्याण गुपता वरीतो । नळासवे जन्म पुन्हा करी तो ॥ २५ ॥

श्रीरामदास अवतार जसा तसा रे ।
ज्या सिध्दराज वदती अवर्नीत.सारे ।

राहिली इच्छा तेथें । ते स्वामीते निवेदिले ॥ १२ ॥ ह्मणती जेष्ठपुत्राचा विवाहो पाहावा । नंतर संन्यास घ्यावा । प्रार्थिता ऐसे गुरुदेवा । पंढरीसी तेव्हा वसती थी ॥ १३ ॥ ऐकूनी विनंति वडीलांची । पत्रिका लिहीली आज्ञोक्तीची । साक्षी देउनी माबीळ साची । पितयाची ज्ञानेश्वराच्या ॥ १४ ॥ गुरू-आज्ञेवरून । संन्यासासी प्रजोत्पादन । उलंघू नये कदा वचन । लिहिले जाण हे पत्रिका ॥ १५ ॥ हे पत्र घेऊन येता वडिली । विवाहा जाहाला तये काळीं । संतोषली गुरुमाउली । करकमळीं स्पर्शिलें शिर ॥ १६ ॥ ह्मणती तुझा गृहस्थाश्रम । सुफळ करील श्रीराम । उत्छाह करणे सप्रेम । नवमीधर्म परंपरा ॥ १७ ॥ जनन पावेल सत्वस्थप्रजा । शबरी जन्मेल उदरीं सहजा । अनुकूळ राहील सदा भाजा । कपीराजा न विसंबे ॥ १८ ॥ वाम्राशि ते होतील पुत्र । शोळीचा अवतार भार्या पवित्र । अन्नदान दिवारात्र । घडेल स्वतंत्र सहजी ते ॥ १९ ॥ वरप्रदान सिध्दनार्थे । योपिले पूर्वी स्वदासाते । राजारामीं केलें कृतार्थ । सेवा घेत दीनाहातीं ॥ २० ॥ ऐसा समर्थ स्वामी माझा । अवतरला निजशिष्यकाजा । लोकत्रई ज्याची ध्वजा । संशय वर्जा सर्वाभूतीं ॥ २१ ॥ सर्वत्रठाई सिध्दचि-नाथ । न जाणुनी ह्मणविता अनाथ । दावावया हा संकेत । सिध्दनामाते धरीले पै ॥ २२ ॥ असो औदुंबरस्थानीं श्रीगुरुराव । जातां तेथें जाले अपूर्व । दर्शनाशी आल्या योगिणी सर्व । केला गौरव स्वामीचा ॥२३॥ मिळुनी चौसष्टी त्या अबळा । सिध्दार्चनाशी आरंभ केला । पूजाद्रव्य नैवेद्याला । पक्वान्न सुफळा नानापरी ॥ २४ ॥ धूपदीपनीरांजनें । वोवाळितीं भक्तीकरून । नमन करीतां भावें पूर्ण । दयाघनें उपदेशिल्या ॥ २५ ॥ करीतां कृतार्थ योगिनीते । पुष्पवृष्टी जाली तेथें । भेटले स्वामी श्री दत्त । नमन होत परस्परें ॥ २६ ॥ तये वेळीं सिध्दस्वामींनी । अष्टक केलें तये स्थानीं । ऐकावे ते सकळीं श्रवणीं । मुक्ति पठणीं होय जीवा ॥ २७ ॥

॥ अष्टक ॥

जीवाची जया करुणा फार आहे । सदा स्मृत मार्मी असी मूर्ति पाहे ॥
ह्मणून भजावे तुह्मी रे तयाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥ १ ॥
धरी षड्भुजा लोक हे तारणाशी । जीवा तारुनी अघाते सर्व नाशी ।
करी हा कृपा दीनबंधु दीनाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥ २ ॥
करी हो गुरू गुण पाहूनि ज्याचा । नमा मानवी दिसतो देह ज्याचा ।
गुरू हे जगी वर्णिले चोविसाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥३॥
कृपाळु कसा रक्षिरीले यदुशी । स्वभक्ताचिया संकटालागि नाशी ।
श्रुति हे स्मृति सर्वदा ज्यासी गाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥४॥
बहू मूर्खालागि तो गर्व जाला । स्वगुरूपदा जाण सांडून गेला ।
चमत्कार सिध्दी स्फुरे हो जयाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥५॥
सदा पात्रभिक्षा पूर्ण पर्वताग्री । तया ताडिले हस्तीचे जाण नेत्री ।
निघे तो त्वरे साधुचे दर्शनाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥ ६ ॥
ह्मणे व्यर्थ हे पात्र का भंगिले जी । करा हे कृपा दाखवा सिध्दीला जी ।
प्रसादे निघे जाण गोरक्ष चिचें । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥ ७ ॥
असे सिध्दी सिधाप्रति दाखविली । मछींद्रास लीळा अशी दावियेली ।
गुरूपदापर्थी धरी जो शिवाते । नमा आदरें स्वामी दत्तात्रयाते ॥ ८ ॥

॥ इति श्रीसिधकृते दत्तात्रय अष्टक संपूर्णमस्तु ॥

॥ श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ॥

दत्तात्रयाचें स्तवन अर्चन । सिध्दनाथें करीता जाण । तेथें पातले योगेंद्र पूर्ण । नामाभिधान ब्रह्मानंद ॥ २८ ॥ बनखंडीचा तो अवतार । वायुधारणा ज्याची प्रखर । महाभागवत वैष्णववीर । परस्परें नमन करीती ॥ २९ ॥ श्रीसिधासी पाहुनी तया । प्रेमभरतें आलें हृदया । आलिंगन घडतां निवाली काया । बोलावया आरंभीले ॥ ३० ॥ ते बोलचि परी अबोल । स्वानंदाचा येतसे डोल । येरी मापण माईक फोल । वरळवी सकळ जन सारे ॥ ३१ ॥ माझे घर माझी दारा । लेक सुना सासुसासरा । वतनवाडा पैका सारा ।

नारीनरा ईं चि ध्यान ॥ ३२ ॥ देह चि मी ह्मणती आपणा । विसरुनी गेले आत्मज्ञाना । दीर्घस्वप्नीं हे वोसणती जाणा । भरंगळती कल्पना मति धरुनीं ॥ ३३ ॥ तैसे नोव्हे सिध्द भाषण । तुटे जीवशिवाचे भूबंधन । आत्मानात्म विच्यार पूर्ण । मायानिरसन ज्या वचनीं ॥ ३४ ॥ षट्चक्राचा कैसा भेद । विच्यारीती श्रीब्रह्मानंद । उतर देती स्वामी सिध्द । ऐकती प्रसिध्द साधक पै ॥ ३५ ॥ त्रिकुट श्रीहाट गोल्हाट । त्यावरते औटपीट । पुण्यादि तो वरिष्ट । भ्रमरी श्रेष्ट गुंफा ते ॥ ३६ ॥ योगासनें परोपरी । ठाउकी सकळ सिध्देश्वरी । करुनी दाविली निर्धारी । बोलती वैखरी स्वानुभवें ॥ ३७ ॥ सविकल्पनिर्विकल्प । समाधीचे दाविले पडप । दृश्यदृष्टी आपेंआप । दर्शनस्वरूप आपण पै ॥ ३८ ॥ जहदाजहद्लक्षण । अन्वयव्यतिरेक निराला पूर्ण । सहजसमाधी स्वानंदघन । लागली जाण उभयता ॥ ३९ ॥ कांहीं वेळ उन्मनी । भोगिती योगी हृदयभुवनीं । अष्टौभावमंचक करुनी । मृदुसुमनी शेज वरती ॥ ४० ॥ विज्ञानपुष्पें आरूवार । पहुडले तेथें सिध्देश्वर । ब्रह्मानंद योगेंद्र । उभयविच्यार येकात्मता ॥ ४१ ॥ तेथे पादसंवाहन । येकला चि करी मी पदरीचा दीन । आनंदले तेणें मन । वदतसे खूण कांहीं येक ॥ ४२ ॥ नातरी ते सहस्रदळीं । नव्हे प्रवेश कदा काळीं । भक्तवत्छळ गुरुमाउली । पान्हावली शिष्यवत्सा ॥ ४३ ॥ पान्हावली पुष्टीतुष्टी । बोलतसे आत्मगोष्टी । राजारामी आनंद दृष्टी । पडली मिठी श्रीगुरुपदीं ॥ ४४ ॥ ब्रह्मानंदसिध्दानंद । उभयसंगमीं भतिमंद । उध्दरीले प्राणी विविध । पावले शुध्द निजआत्मता ॥ ४५ ॥ अकलखोप धन्य तें ग्राम । औदुंबरस्थान जेथें परम । ब्रह्मानंद राहती प्रेम । योगधर्म सर्वदा ॥ ४६ ॥ तेथे येतां स्वामी श्रीसिध्द । ब्रह्मानंदीं जाला आनंद । ठेउनी घेतले आवडी छंदें । योगिया भेद कैचा तो ॥ ४७ ॥ नंतर पुढे अष्टे क्षेत्रीं । आले सिध्द ज्ञाननेत्री । नमस्कारीती नरनारी । जाहाला नगरीं आनंद तो ॥ ४८ ॥

पाठकसदनीं केला वास । ब्राह्मण येती दर्शनास । उभारुनी संशयास । श्रीस्वामीस प्रश्न करीती ॥ ४९ ॥ वेदज्ञशास्त्रीपुराणिक । कीर्तनकरणार दांभीक । घेउनी नाना कुतर्क । ह्मणती आशंके निरसन करा ॥५०॥ बहिरमुख अज्ञान प्राणी । नकळे प्रताप स्वामीकरणी । नमन करुनी श्रीचरणीं । वरळती वाणी भळतेचि ॥ ५१ ॥ सूर्यापुढें अंधःकार । न उरे कदा निर्धार । तैसे प्रश्न श्रीगुरुवरें । उडविती सारे वाक्यर्किणें ॥५२॥ जो जो जयाचा संशय । तो तो फेडिती स्वामीराय । भक्तिपंथ दाउनी सोय । दवडीला अपाय अहंकृति ॥ ५३ ॥ उपदेशुनी अज्ञान जीव । आले आईतवाड्याशी गुणलाघव । तेथें लीळा केली अपूर्व । ते सर्व ऐकिजे पैं ॥ ५४ ॥ तये ग्रामीं अरण्यांत । ह्मसोबा जाज्वल्य दैवत । झाडें कवणाशी तोडिता लागत । चळचळा कांपत जन सारे ॥ ५५ ॥ श्रीस्वामीस तये दिवशीं । काष्टें नाहींत शेगडीशी । आज्ञा केली शिष्याशी । आणावयाशी इंधने पैं ॥ ५६ ॥ ते सांगती देवता क्रूर । भय पावती नारीनर । तये काळी श्रीगुरुवरें । ह्मसोबाशी त्वरें बोलाविले ॥ ५७ ॥ ह्मणती आह्मासी लागती थंडी । पाहिजे केली उबकर शेगडी । मांडिसी तुवा दवाडी । तरी योवाडी लासील पैं ॥ ५८ ॥ ह्मसोबा ह्मणे चाकव्यांत । पूर्वावतारीं केलें पारपत्य । मारीता मजला स्वामी येथें । शरणांगत ह्मणवीतसे ॥५९॥ महिकावती तुडऊन । पूजा घेतली त्रेति आपण । ते तूं महाराज अंजनीनंदन । वाचवी प्राण श्रीसिध्दा ॥ ६० ॥ आज्ञांकित आह्मी दैवत । काष्टें आणावीं शेगडीते । अनन्यभावें जोडिले हात । शरणांगत जाला तो ॥ ६१ ॥ मग त्या स्थळींची काष्टें सारी । आणविले जाले भक्तमारी । आश्चर्य करीती ग्रामस्थ सारी । धरी शिरीं पादपद्म ॥६२॥ असे अनेक चमत्कार । आईतवाड्यात केले फार । राहाणें जाले मास च्यार । कीर्तनगजर नित्य पैं ॥ ६३ ॥ तेथुनी श्रीसिध्दनाथ । गेले करवीरक्षेत्रात । स्नान करुनी पंचगंगेंत । जगदंबेते अवलोकिले ॥ ६४ ॥ देऊळांत जातां प्रत्यक्ष । दर्शन दिधले अपरोक्ष । ध्यानसुंदर

पद्माक्ष । सर्वसाक्ष जगन्माता ॥ ६५ ॥ षोडशोपच्यार करून पुज्या । नैवेद्य समर्पिला वोजा । कीर्तनें करीतां तेथे सहजा । येणें द्विजा जाले पै ॥ ६६ ॥ पंडीतशास्त्रीपुराणीक । दशग्रंथी माहावैदीक । अध्यात्मवक्ते सभानायक । आले बोलके मत्तवादी ॥ ६७ ॥ कडोविकडी प्रश्न करीती । मत्तें आपुली तीं स्थापिती । बहु योजीती शास्त्रोक्ति । आशंका घेतीं अनेक ॥ ६८ ॥ च्यातुर्यसमुद्र सिध्यस्वामी । गती पूर्ण आगमनिगमी । अंतरनिष्ट परब्रह्मी । स्वात्मधर्मी सदा रत ॥ ६९ ॥ तेथें समज या कीती जीवाचा । संशयमवारी श्रीगुरु साचा । छेदिल्या आशंका सर्वांच्या । अज्ञानाच्या खुडील्या कल्पना ॥ ७० ॥ जेवि रावणाचे बाण । श्रीरघुपति करी खंडण । तैसे सद्गुरु सिध्यवचनें । जाले निरसन मत्तांचें ॥ ७१ ॥ श्रवण समाधी आबालवृध्या । निघोन गेली आशंका बाधा । धन्य ह्मणती स्वामीसिध्या । विनटले पदा श्रीगुरूचे ॥ ७२ ॥ मंगळआरती करून । केले श्रीजगदंबास्तवन । ते अष्टक ह्मणता पूर्ण । होये प्रसन्न जगजननी ॥ ७३ ॥

अष्टक प्रारंभ

कशी हे मला सोडीसी जाण माते । तुजवीण मी भ्रांत जालो अजी ते ।
तरी तारी गे येउनी बाळकाशी । सये अंबिके माय तू चिद्विलाशी ॥१॥
बळे नाडिले पाडिले मोहोजळें । टळेना कळे वोढीले व्यर्थ काळे ।
आतां सोडवी सोडवी कामपाशीं । सये अंबिके माय तूं चिद्विलाशी ॥२॥
गति हे मति खुंटली मोहयोगें । बहू शिणलो जाण संसारसंगें ।
खरे सोडवी वांचीं तू धारणेशी । सये अंबिके माय तू चिद्विलाशी ॥३॥
जगीं सर्व सत्ता तुझी येक आहे । तया नेणुनी भ्रांति हे जीव पाहे ।
भूते वर्तती आत्मयोगें स्वदेशी । सये अंबिके माय तू चिद्विलाशी ॥४॥
क्षराक्षरी व्यापुनी वर्ततीसी । कशी षट्दळामाजी तू राहिलीसी ।
अहश्वास सोहंगति चाळविसी । सये अंबिके माय तू चिद्विलाशी ॥५॥
तुझे सूत्र हे सर्वलोकी विराजे । तया सारीखे वर्तती आत्मकाजे ।
कशी देव दैत्य बळे वागविसी । सये अंबिके माय तू चिद्विलाशी ॥६॥

जगीं भोग हे भोगविसी जिवाला । अभोक्ता स्वये शिव हा तूंचि केला ।
निराळी स्वये ब्रह्म तत्वज्ञराशी । सये अंबिके माय तूं चिद्विलासी ॥ ७ ॥
स्वरंगी कशी रंगशी पांडुरंगें । परी सिध्द तूं व्यंकटाकारसंगे ।
स्वलीळे सख्य भक्त हे तारी तैसी । सये अंबिके माय तूं चिद्विलासी ॥८॥
असे स्तोत्र भावें जनी पाठ कर्ता । तयाशी शिवेना कदा द्वैतवार्ता ।
जगी विजई सर्व सिध्दीसी देसी । सये अंबिके माय तु चिद्विलासी ॥९॥

॥ श्री अंबिकेचें स्तवन समाप्त ॥

स्तुती करुनी जगदंबेची । दर्शनें घेतलीं सकळ देवांचीं । तीर्थे केली अवघी साचि । यथोक्त शास्त्राचे निजाधारें ॥ ७४ ॥ कात्मायनीजवळी । कांही दिवस वस्ती केली । द्वारें सर्व करुनी भली । भक्तीसी लाविली मूढजनें ॥ ७५ ॥ करवीरमहात्मा अत्यंत गहन । देवतामय ते पृथ्वी जाण । ठाई ठाई तीर्थे पूर्ण । जनार्दन पाषाण ते ॥ ७६ ॥ रत्नागीरीसी येऊन । केदाराचें केलें पूजन । करुनी ब्रह्मसंतर्पण । जालें कीर्तन सहजी तें ॥ ७७ ॥ जोतिर्लिंगे प्रत्यक्षता । दर्शन दिधले सिध्दनाथा । परस्परें आलिंगन होतां । स्तवन तत्वता केले पै ॥ ७८ ॥ ते स्तुति श्रवणपठण । गुणत्रयाचे तुटे बंधन । सकामनिष्काम असो जन । पावे कल्याण श्रीगुरुकृपें ॥ ७९ ॥

॥ श्रीसिध्दाचें केदाराष्टक प्रारंभ ॥

कसा जाहलो भ्रांत संसारसंगें । बळें रंगलो मोहकामी सुरंगे ।
असी दुर्गती सोडवी कोण देवा । महासंकटी तारी केदार जीवा ॥ १ ॥
मधीं वाव्हलो भूललो देवराया । आतां सोडवी चिद्घना दावी पाया ।
त्रिपापुत्र हे नाडीती काय दैवा । महासंकटी तारी केदार जीवा ॥ २ ॥
तुजवीण नाथा नसे अन्य माते । बरे जाणता तूंचि सर्वा जीवाते ।
तरी षडरीपु नासुनी लावी भावा । महासंकटी तारी केदार जीवा ॥ ३ ॥
उदीचे दिसे सांडुनी दक्षणेशी । तुवा रत्ननामासुरा नाशीलासी ।
अतां दास हा आपुले पाई ठेवा । महासंकटी तारी केदार जीवा ॥ ४ ॥

असे ज्योतीची ज्योती निर्माण जाली । नितप्तानरा शांतवी स्वात्मबोधी ।
मला लाभ हा भेटला पूर्वठेवा । महासंकटीं तारी केदार जीवा ॥ ५ ॥
कृपादान देऊनिया बाळकासी । त्वरें सोडवी गुंतलों मोहफाशीं ।
कृपाळूवर्णे दास हा उद्धरावा । महासंकटीं तारी केदार जीवा ॥ ६ ॥
जगीं तारीले फार तूं अपराधी । म्हणूनि जडे दृढ ते पाईं बुध्दी ।
अता प्रेमसिंधा श्रीरामींच ठेवा । महासंकटीं तारी केदार जीवा ॥ ७ ॥
असे अष्टकें वर्णिलें ज्योतिर्लिंगा । गुणातिते देवा गुरु स्वात्मरंगा ।
करा सिध्दवाणीं मक्षैक्यभावा । महासंकटीं तारी केदार जीवा ॥ ८ ॥

॥ श्रीसिध्दाचें केदार अष्टक संपूर्णमस्तु ॥ छ ॥

गर्जिन्नला स्तुतिवाद । फणिआगा जाहाला आनंद । बोलती रत्नागिरी-वरद । समर्थ सिध्द अवतार तूं ॥ ८० ॥ ठांई पाहाता स्वरूप अभेद । भक्तिभाव हा सहजी विनोद । महारूद्रांश स्वतसिध्द । जग विविध लावणें भक्ती ॥ ८१ ॥ वन्हि ज्वाला दोन भासे । परी ते मुळीं येक चि असे । ज्योतिर्लिंगी श्रीसिध्देश । येकत्र विलसे शिवरूप पै ॥८२॥ असो जगत्रे देवता । येक पाहाणें सर्वात्मता । समुद्रगामिनी वाहे सरीता । महा तत्वता क्षेत्र बहू ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥

योगवासिष्ठप्रामाण्य । चिदेव सर्वे भूतानि । चिदेव सर्व देवताः ।
अंतर्बहिश्च तत्सर्वं । अहमेव चिदात्मकं ॥ १ ॥

॥ टीका ॥

तैसा श्रीराम देवतांतरीं । मरूनि उरला श्रीपढरी । जाणुनी अवघा सिध्देश्वरीं । स्तवत वैखरी निजप्रेमें ॥ ८४ ॥ शब्दरत्नें रत्नागीरीश । भावें पूजीला श्रीमहेश । येउनी पुन्हा पढरीस । सद्गुरूमानस स्थिरावले ॥ ८५ ॥ याउपरी नागरकथा । नवमोध्याइ होईल सांगता । गुरुशिष्य संवादता । आनंद सर्वथा परीपूर्ण ॥ ८६ ॥ सिध्द आख्यान भूवनत्रई । पुनीत तेणें सर्वत्र मही । राजारामी रमली देही । करी विदेही देह

असता ॥ ८७ ॥ विदेही जनकजामात । पंढरीसी तो पधारतात । वागसुमनें त्या अर्चित । होतसे ग्रंथ सिध्दकृपेचा ॥८८॥ भक्तमंजीरी-माळाप्रय । श्रवणें चि पुरती मनोरथ । सिध्दस्वामी आख्यानातें। अध्याय समाप्त अष्टम हा ॥ ८९ ॥ अध्याय ॥ ८ ॥ अनु० अ० ॥ १०५ ॥ अष्टके ३ ॥ संख्या ॥ २५ ॥ श्लोक ॥ १ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ श्रीराम ॥७॥

## अध्याय १०६

### — श्रीसिध्दस्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरू सिध्द सर्वज्ञा । वेदपुरूषा सर्वमान्या । उपनिषेध भाग प्राधान्या । न कळे अन्या पार तुझा ॥ १ ॥ ढोल दमामे तव कीर्तीचे । ढीसाळ औदार्य श्रीस्वामीचे । ढकलुं नका दीन पदरीचे । ढीवरकाळ हिंसक उभा ॥ २ ॥ नारायण-नरविरेशा । नरोत्तम नागेंद्रभूषा । नागेशशयना निर्गुणविलासा । नरसींहवेशा श्रीरघुपति ॥ ३ ॥ तमांतका तीव्र सूर्या । तन् तन् वदे श्रुति वर्या । तमाळपुष्प तुळशीप्रिया । तळपत श्रीद तव चरणीं ॥४॥ थरथरा कापे काळ स्मरणीं । थडी पैल पावे प्राणी । थब थब स्रवे प्रेम नैनीं । थंड मनी जाहाला शिष ॥ ५ ॥ द्वंद्वद्वैत दुरी करणें । दुष्ट दुर्विकार दवडणें । दुर्मिळ आयुष्य जातसे पूर्ण । दरीद्र हरणे दयानिधीं ॥ ६ ॥ धनुर्धारी रामचंद्रा । धराधीशा गुणसमुद्रा । धार्मिक स्थिती स्वात्ममुद्रा । धन्य कर्पीद्रा सिध्देशगुरू ॥ ७ ॥ अग्रमोऽग्राइ सिध्दनाथ । पंढरीसी आले फिरत फिरत । तव तेथें मिळाले संत । ध्यान पाहात बैसलेतो ॥ ८ ॥ अवलोकिता चरणापासून । हृदई ठसावलें ध्यान । मस्तकीं पाहाता लिंग पूर्ण । काय कारण यासी पै ॥ ९ ॥ ऐसें परस्परें संवाद करीता । पातले सिध्द तेथें अवचिता ।

हर्प जाहाला सर्वत्रचित्ता । प्रश्न तत्वता करीती ते ॥ १० ॥ ह्मणती सकळामध्ये श्रेष्ठ आपण । रामदास श्रीहनुमान । आह्मी समस्त वानर-गण । सांगणें सित्ध कैसें ते ॥ ११ ॥ विष्णुनीं मस्तकीं शिवधारण । किमर्थ केलें सांगा कथन । सित्ध वदती तेव्हां वचन । श्रोते जन ऐकोत पै ॥ १२ ॥ पूर्वी वैकुठीं देवभक्ता । सहजी वदती सकळ भागवत । परस्परें संवाद होत । थोर ह्मणवीत उभयता ॥ १३ ॥ वजन आपुलें विशेप ह्मणून । स्वयें बोलती श्रीभगवान । भक्तवृंदें ह्मणती आपण । देवपण तुह्मा दिले ॥ १४ ॥ निर्गुण निर्विकार । आह्मी केले तुज साकार । वजन आमुचें सर्वथा फार । करा विच्यार मनामाजी ॥ १५ ॥ ऐसे लाडे भांडण होतां । नारद पातले तेथें तत्वता । ह्मणती वेवाद कासया करीतां । जावे लागे तीर्था भूमडळीं ॥ १६ ॥ उत्तम भूमी पाहातां धरी । नेत्रीं देखिली श्रीपढरी । नारदक्षेत्र ते निर्धारीं । वैकुंठविहारी आले तेथें ॥ १७ ॥ मिळाले सारे भागवत । महानुभवी आत्मवेत्ते । वजन करावा आरंभिले तेथें । फाकली मात भुवनत्रै ॥ १८ ॥ तेतीस कोटी सुरवर । पातले गणगधर्वकिन्नर । अठ्याऐशीसहस्त्र ऋषेश्वर । धावले वानर अठरा पद्में ॥ १९ ॥ नऊ लक्ष गोपाळ । कलींतील भक्त सकळ । डोळा पाहाती नवल । वजन प्रांजळ होतसे पै ॥ २० ॥ वैखरी वाण्या चवथी । भाषण तयेचें निश्चिती । भीतूपणा भांडणस्थीती । करणें युक्ती अनुवाद ॥ २१ ॥ तो भागवत चवथा । पुडरीक पहा तत्वता । इकडे मुख्य भगवता । तुळिती सर्वथा श्रीनारद ॥ २२ ॥ सकळ देव विष्णुह्वदई । प्रवेशले तये समई । मिळाले पुडरीकदेही । सत मही तिन्नके ते ॥ २३ ॥ सत्यवाचा ताजवा धरीता । पुंडरीक तळाशी बैसला तत्वता । कटावरी ठेउनी हाता । दावीती निलता अद्यापी हरी ॥ २४ ॥ तरी ते नयेचि बरोबरी । विच्यार केला नारदें अतरीं । लघुदेवाची कोण सरी । महादेव शिरीं उचलोनी ठेविला ॥२५॥ तथापि ते भक्तजनें । तुळणेशी नये रुक्मीणीरमण । चमत्कार पाहाती अद्यापी जन । धन्य स्थान

श्रीपंढरी ॥ २६ ॥ परब्रह्मलिंग ह्मणून । आच्यार्य वदले अष्टक पूर्ण । तें श्रवण करीतां जाण । होये प्रसन्न पांडुरग ॥ २७ ॥

॥ श्रीशंकराच्यार्यांचें अष्टक प्रारंभ ॥

महायोगपीठे तटे भीम रथ्याम् । वरं पुंडरीकाय दातुं मुनींद्रैः ।
समागत्य तिष्टन्तमानंदकंदम् । परब्रह्मलिंगं भजे पाडुरंगम् ॥ १ ॥
तडिद्वासर्स नीलमेघावभासम् । रमामंदिरं सुदरं चित्प्रकाशम् ।
वरं त्विष्टिकायां समन्यस्तपादम् । परमह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥ २ ॥
प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानाम् । नितंबःकराभ्यां धृतोयेन तस्मात् ।
विधातुर्वसत्यै धृतोनाभिकोशः । परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥ ३ ॥
स्फुरत्कौस्तुभालंकृतं कंठदेशे । श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासम् ।
शिवं शान्तमीड्यं वरलोकपालम् । परब्रह्मलिंग भजे पांडुरंगम् ॥ ४ ॥
शरच्चद्रबिंबाननं चारुहासम् । लसत्कुंडलक्रान्तगंडस्थलांगम् ।
जपारागबिंबाधरं कंजनेत्रम् । परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥ ५ ॥
किरीटोज्ज्वलत्सर्वदिक्प्रान्तभागम् । सुरैरर्चित दिव्यरत्नैरनर्घैः ।
त्रिभंगाकृतिं बर्हमाल्यावतंसम् । परब्रह्मलिंग भजे पांडुरंगम् ॥ ६ ॥
विभु वेणुनादं चरन्तं दुरन्तम् । स्वय लीलया गोपवेषं दधानम् ।
गवां वृंदकानन्दनं चारुहासम् । परमह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥ ७ ॥
अजं रुक्मिणीप्राणसंजीवनं तम् । परं धाम कैवल्यमेकं तुरीयम् ।
प्रसन्नं प्रसन्नार्तिह देवदेवम् । परमह्मलिंगं भजे पाडुरंगम् ॥ ८ ॥
स्तवं पांडुरंगस्य वै पुण्यदं ये । पठन्त्येकचित्तेन भक्त्याच नित्यम् ।
भवांभोनिधिं तेऽपि तीर्त्वाऽन्तकाले । हरेरालयं शाश्वतं प्राप्नुवन्ति ॥ ९ ॥
॥ इति शंकराच्यार्यविरचितं पांडुरंग अष्टक संपूर्णमस्तु ॥ ७ ॥ ७ ॥

नरहरीसोनारातें । स्पर्श होतां या लिंगातें । डोळे सोडुनी दर्शन घेत । समपदातें विनटला तो ॥२८॥ ती कथा अन्य ग्रंथीं । वर्णिली कविश्रेष्ठें समस्तीं । ऐका अपूर्व युक्ती । प्रश्न करीतां आणिक सिधा ॥ २९ ॥ ह्मणती ऐसें हें लिंग । धरीलें मस्तकीं पांडुरगें । द्वादशचिन्हें दिसती

सांग । लक्षणें अव्यंग सूक्ष्म तीं ॥ ३० ॥ सिध्दनाथ वदती ते वेळा । बाराळिंगें भूमंडळा । तो शिव येकवटला । मस्तकीं धरिला पांडुरंगें ॥ ३१ ॥ सुचविता ऐसें सर्वांते । हास्य करीती पंढरीनाथें । श्रीसिध्दासी आलिंगन ते । प्रेम अद्भुत परस्परें ॥ ३२ ॥ तये काळीं स्वामीनीं । द्वादशलिंगा स्तविले वाणी । ते करीता श्रवण पठणी । इछित मनीं अर्थ पुरती ॥ ३३ ॥

॥ श्रीसीध्दाचे स्तवनोक्त श्लोक प्रारंभ ॥

पूर्वेस भागीरथी वाहताहे । काशीपुरीं मोक्ष प्रसिध्द राहे ।
स्मरा तया तोडिल बंध सारे । श्रीविश्वनाथ वदनी आदरे वदा रे ॥१॥
कृष्णातिरीं निवृत्ति संगमीं जो । नांदे वनांत वारुणतापशी जो ।
गाथा सदा मानसीं मोक्षदाता । श्रीशैल्यमल्लकार्जुनाशी मी ध्याता ॥२॥
सिंधुद्वयासंगमीं राहिलासे । स्वेतुबंधन ह्मणती जन व्यास ऐसे ।
व्याला भजे राम सदा मनांत । रामेश्वरादर्शनीं मुक्ति प्राप्त ॥ ३ ॥
भीमा जटेंतून निर्मळ निघाली । लीला तिची अघनाशनीं थोर जाली ।
राहे वनांत तारक तो भयाते । भीमाशंकर आठवी मनाते ॥ ४ ॥
लोणाद्रि वदती अजी जाण त्याते । तया दर्शनें अघ सर्व जातें ।
ध्याये सदा पार्वतीच्या वचनाला । तारील घृष्णेश्वर त्या जीवाला ॥ ५ ॥
वरा ब्रह्मगीरीवरीं जो विराजे । जटेमाजी गंगा तयाचेचि साजे ।
जीवा तो नाम घेताचि पाही । मना तूं त्वरें त्रिंबकालागी ध्याई ॥ ६ ॥
समुद्रातीरा पश्चिमेच्याचि भागीं । सौराष्ट्रदेशीं महाराज योगी ।
नांदे गिरीजापतीचा विलासी । तो सोमनाथ स्मरता दुरीते विनाशी ॥७॥
वैजनाथ परळींतचि जो प्रसिध्द । गाती जयाला सुरयक्षसिध्द ।
ज्यादर्शनें मुक्ति जीवाशी होते । त्याते भजे मानस शुध्द होतें ॥ ८ ॥
अमरतीर्थवासी ज्योति जे का भूलोकीं । जाऊनी तेथें मनुश्या विलोकी ।
जो तारीताहे आदरें जनाला । तो नागनाथ नाशी स्मरणें भयाला ॥ ९ ॥
तिरे नर्मदेच्या वसे चिद्विलासी । तमु संहारी सूर्य तैसाचदासी ।
स्मरे रे तयां मानवा सूखदाता । ॐकार ज्याला नमी मान्धाता ॥१०॥

क्षीप्रातिरी वसतसे जो उदार । अवंतिका मोक्षपुरीच सार ।
नदि स्वदासाहितकर्मकारी । वंदी महंकाळ सदा मुरारी ॥ ११ ॥
हिमाद्रीवरी तो वसे स्वामीराणा । तया आठवीता तुरे पाप जाणा ।
सुराआसुरा होय जो सित्धीदाता । तुह्मी आठवा श्रद्रिकेदार आता ॥१२॥
विश्वेश मल्लिकार्जुन रामनाथ । भीमेश घृष्णेश त्रिंबक सोमनाथ ।
वैजनाथ नागेस ओंकारनाथ । सित्ध महंकाळ बद्रिनाथाधारी ध्यात ॥१३॥

॥ टीका ॥

द्वादशलिंगे द्वादशकळा । आत्मासूर्य विनटला । कीं द्वादशस्कंद भागवताला । धरीले शिवाला मस्तकीं ते ॥ ३४ ॥ द्वादशमात्रा ककारापासुनी । टपरयंत विलसती जनीं । लिंगें उत्पन्न तेथुनी । जाणती मुनि आत्मवेत्ते ॥ ३५ ॥ असो श्रीपांडुरंगे । मस्तकीं धरीले लिंग । हरीहरा नाहीं भंग । सदा अभंग येकरूप ॥ ३६ ॥ द्वैत मानिती तयाला । काय उणे दुरीताला । सांडोनिया संशयाला । श्रीविठ्ठला शरण जावें ॥ ३७ ॥ ईयाप्रकारे सित्धनाथें । मस्तकीं लिंगाचा केला अर्थ । आनंदले सकळ श्रोते । नमन स्वामीते करीती पै ॥ ३८ ॥ कांहीं दिवस राहूनि पंढरी । गेले तेथुनी मोरेश्वरीं । भाद्रपद करुनी बरी । आळंकापुरी पाहिली ते ॥३९॥ समागमें शिष्य बहूत । मार्गीं चालती भजन करीत । ज्ञानेश्वराचें दर्शन घेत । कीर्तन तेथें केले पै ॥ ४० ॥ तव तेथें दुसरे दिवशीं । मंडळी मिळाली राउळाशी । तया मध्यें स्वसुख विलाशी । ज्ञानराशी सित्धनाथ ॥ ४१ ॥ जवळी मी शिष्य वाडिवाल । पुढें करुनी सर्वी भले । प्रश्न कराया आज्ञापिले । जोडुनी करकमळ पै ॥ ४२ ॥ ह्मणती श्रीस्वामीसी विनऊन । उत्धरावे समस्त जन । गुह्यागुह्य जें का ज्ञान । ते निरोपण व्हावें पै ॥ ४३ ॥ ऐशी सुचना करिता सकळी । सित्धस्वामीस विनवणी केली । प्रसन्न जाली गुरुमाउली । वृष्टी केली ज्ञानामृताची ॥ ४४ ॥ ते कोणते कैसे प्रश्न । केले स्वामीनीं निरोपण । ते सविस्तर होता वर्णन । निवे मन सर्वांचें ॥ ४५ ॥ अत्यादर पाहूनी श्रोत्यांचा । संवाद होतसे गुरुशिष्याचा । श्रवण करीता

असमर्थतीचा । लाभ सुखाचा होतसे पै ॥ ४६ ॥ आता पंचप्रश्न निरोत्तरें । उचंबळेल बोधसागर । श्रोती सावध असावें तरें । प्रेमभरें नमन सर्वा ॥ ४७ ॥

॥ श्रीसिद्धरामसमर्थ ॥ पंचप्रश्न प्रारंभ ॥

नमो ब्रह्म सच्चिदानंदा । अद्वयरूपा आनंदकंदा । तूंचि तूं चिद्विलासी आमोदा । दाविसी छंदा स्वलीळे ॥ १ ॥ तुझी लीळा ते भगवती । आनंदरूपिणी चिद्‌शक्ति । ग्रंथ उद्भवाची मूर्ति । आदि प्रकृति मूळमाया ॥ २ ॥ सद्गुरुकृपावरदान । तेणें स्वरूपीं चेववोन । न्हेले सकळ हि मिथ्याभान । मीतूंपण हरपलें ॥ ३ ॥ तेथें बोलणें चि खुंटलें । स्वरूपसागरा भरतें आलें । पूर्ण विंब प्रकाशलें । आत्मज्योती स्वयमेव ॥ ४ ॥ तो प्रकाश चराचरीं । भरोनी राहिला बाह्यांतरीं । वर्णितां शिणली वैखरी । वाच्या च्यारी कुंठीत ॥ ५ ॥ तो अनुभव बोलला कैसा । बोलका शिणला अपैसा । जया सुखें दाहीदिशा । कोंदोनी सरीश्या राहिल्या ॥ ६ ॥ परी श्रीगुरुसिद्धनाथ । कृपेनें पुरवी मनोरथ । अनिर्वचनाची मात । सांगे गुह्यार्थ राजारामीं ॥ ७ ॥ अनिर्वचनीय कैसें बोलावें । परी ते स्वांगें अनुभवावें । अनुभवोनी तेंचि व्हावें । लवणें लपावें तोयांत ॥ ८ ॥ अनुभवसमुद्र हेलावला । पूर्णबोधें उचंबळला । अंगप्रसांगे ऐक्याशी आला । ठाव मोडीला द्वैताचा ॥ ९ ॥ ऐसे सुखाचे समाजीं जाण । ऐक्याचें जें ऐक्य पूर्ण । होवोनि जालें समाधान । देहभान जेथें नाहीं ॥ १० ॥ वृत्ति ऐक्यरूप जाली । बोधसमाधी दृढावली । तेथे सत्‌शिष्यें विनंति केली । सद्गुरूपाउलीं विनउनी ॥ ११ ॥ जी जी स्वामी दयाघना । मज तृषीत च्यातकजीवना । कृपा करूनिया दीना । द्वैतभाना उडवावें ॥ १२ ॥ ऐकोनी शिष्याचा प्रश्न । सद्गुरू म्हणती धन्य धन्य । यया प्रश्नी समाधान । माझे मज जाण दाविलें ॥ १३ ॥ प्रसन्न होउनी सिद्धनाथ । म्हणती वद या यथार्थ । जे जे तुझे मनोरथ । ते ते सत्य पुरतील ॥ १४ ॥ ऐकोनी स्वामींचें वचन । शिष्य घाली साष्टांग

नमन । पंचप्रश्नाते विवेचन । सांगोनी मजन छेदावे ॥ १५ ॥ ते ते प्रश्न कोण कोण । मायेचे कैसें रूप जाण । कैसी माया होये निरसन। मी कोण भ्रांती पूर्ण मजला का ॥ १६ ॥ स्वरूप कोण तें बोलखावें । हे प्रश्न स्वामीनीं सांगावे । भवसमुद्री वारावें । ज्ञानें तारावें बैसोनी ॥ १७ ॥ ऐकूनि शिष्याचें मनोगत । सांगती तेव्हां सद्गुरूनाथ । तेथें ठेवोनिया चित्त । अतिगुह्यार्थ ऐकावा ॥ १८ ॥ कैसें मायेचें रूपडें । हें प्रथम ऐका निवाडें । सप्रेमें श्रवण उघडे। सर्वांगीं रोकडे करावे ॥ १९ ॥ मायेशीं रूप बोलणें । हे तो अबद्ध सर्वागुणें । तयाचें ऐक लक्षण । बोलाचें बोलणें परीयेशी ॥ २० ॥ पृथ्वी सगुण गुण गंध । घटादिविषय नानाविध । तैसे ब्रह्म निर्गुण शुद्ध । माया आमोद भ्रांति तेथें ॥ २१ ॥ उदकाभितरी वसे रस । तरंग तयाचा विलास । ब्रह्म ते शाश्वत पूर्णांश । माया लहरी त्यास केवि होये ॥ २२ ॥ जें अरूप निर्मळ । तेथें लहरी केवि विटाळ । माया आभास भरळ । केवि निर्मळा पै बोढे ॥ २३ ॥ ऊष्ण स्पर्श तो तेजासी । सूर्य लागे तयापाशी । तेव्हांचि उद्भव मृगजळाशी । जाय लयाशी दिनांती ॥ २४ ॥ तैसें मायेचें रूप । सूर्यास्तीं मृगजळाचा लोप । जेथें जळे ज्ञानदीप । तमआरोप केवि राहे ॥ २५ ॥ काष्ठामाजि वन्हि पेटला । काष्ठत्व तोवरी राहिला । जडत्व जाता विराला । सहजी शमला तेथेंचि ॥ २६ ॥ तैसे अज्ञाना दाहक ज्ञान । जोवरी सरे अज्ञान । तोवरी अहंकर्तृत्व ज्ञान । प्रघडे विज्ञान गर्भांतीं ॥ २७ ॥ तैसी माया स्वरूपी भासली । भास तोवरीच राहिली । निराभास होता गेली । जेवि साऊली पुरुषाची ॥ २८ ॥ छाया अन्यप्रकारे भासली । स्वयंप्रकाशें विलया गेली । पहा पा सूर्याची साउली । कवणें देखिली केधवा ॥ २९ ॥ पवनाआंगीं स्पर्शता असे । रूप सांगावे तें कैसें । मायाविलास भ्रामका दिसे । बोधे नासे भ्रम सारा ॥ ३० ॥ म्हणुनी मायेचें रूप । घटाचिमाजि कोंडला दीप । नासावया सकल्प । करणें विकल्प नलगे तो ॥ ३१ ॥

आकाशाचा शब्दगुण । गुणाशी माया प्रावर्ण । तंतू पटाशी कारण । गुणमई जाण ह्मणताती ॥ ३२ ॥ मुळींच नसतां कापूस । तरी कोण फरी ततूस । मग उत्पन्नता पटास । केवि येती ॥ ३३ ॥ कापूस चि आश्रय तंतूते । नाम ठेविले पटाते । तैसी गुणमयी भूताते । रचिले समस्त इणें पै ॥ ३४ ॥ ही तो मूळीच नाहीं माया । खरी असती न जाती क्या । आत्मबोधें नासावया । सर्वथा तया शक्ति नसती ॥ ३५ ॥ मूळींच येथें माया नाहीं । तेंव्हां रूप बोलणें काई । भ्रमे तरी विश्व पाही । मायाडोहीं बुडताती ॥ ३६ ॥ भवसमुद्र तो मायेचा । भरला मृगजळापरी साचा । येथें आश्रय तरायाचा । आत्मबोधाचा तो येक ॥ ३७ ॥ रूपाविण ती अरूप । तिचा घडला हा सकल्प । तेथें निश्चयाचा दीप । होये लोप मालवितां ॥ ३८ ॥ दीप जये स्थळीं गेला । अधार चि तेथें उरला । तैसे ब्रह्मभावे मायेला । विच्यार घडला तो ऐसा ॥ ३९ ॥ दीप तरी येकदेशी । जाय होये समयविशेषीं । परी जाणे येणे ब्रह्मासी । निश्चयेंशी बोलों चि नये ॥ ४० ॥ तेंव्हां आभास कैसा ह्मणावा । ज्याविणें जावें कवणीये ठाया । जेथें तेथें हा विसावा । पहाता बरवा सर्वांभूतीं ॥४१॥ रज्जूचे ठाई भासला सर्प । सर्पे सोडिला मा कंप । दोराळागी विकल्प । अथवा संकल्प हे नाहीं ॥ ४२ ॥ ब्रह्मी नाहीं मीतूंपण । तेथें कैचें मिथ्यामान । सत्यत्वाचा अभिमान । न स्फुरे जाण तेथें पै ॥ ४३ ॥ रज्जूसी सत्यत्वें पहातां । दोरी दिसे ते निश्चीता । अभावे- करुनी देखीता । सर्प तत्वता उठे चि ॥ ४४ ॥ एवं पहातेपणाचे भाव । द्विधारूप दिसती सर्व । रज्जूलागी अनुभव । दुजा नाहीं ॥ ४५ ॥ यापरी मायेचें रूप । जो जो उठे सकल्प । भिन्नाकारें विकल्प । करुनी पडप दाविततसे ॥ ४६ ॥ परी सत्यात्वरीच मिथ्यापण । या आश्रयाविण नुरे जाण । सेखीं येथें चि ऐक्य कारण । होये आपण जियेते ॥ ४७ ॥ ऐसें रूप सांगितलें । पुढें निरसन आरंभिलें । तेहि पाहिजे श्रवण केलें । श्रोते भले आदरेंसीं ॥ ४८ ॥

सदशिष्याचे मीस करून । श्रोत्यासी असे अमृतपावन । जेवि भगीरथें प्रार्थून । ज्यान्हवी आपण पै न्हेली ॥ ४९ ॥ स्वपितृकार्या आणिली। परी ते जगदोधारा राहिली । तैसी च हे कथा जाहाली । मुक्तिप्रद भली श्रोतियासी ॥ ५० ॥ पुढे दुसरा प्रकार । मायानिरसनीं सादर । ऐकावया शिष्यश्रोत्र । सिध सत्वर होउनी राहिले ॥ ५१ ॥ मूळीच माया नाहीं सत्य । तेथें निरसन केवि तथ्य । परी भ्रामकाचें चित्त । बोधोनि सत्य स्थीर करावें ॥ ५२ ॥ गगनीं गंधर्वनगरें दिसती । परी तीं गगना स्पर्शली नसतीं । गगन असे तीं येती जाती । जाणा निश्चिती यथाकाळें ॥ ५३ ॥ वायूचे वेगें वृक्ष हलला । वेग तेन्हांचि निघोनि गेला । डोल मात्र असे उरला । झाडांत संचला शाखायोगें ॥ ५४ ॥ सूर्य तपे ग्रीष्ममार्गी । उष्मा होये प्रहरनिशीं । सूर्य जाता अस्ताशीं । ताप जगाशी उरतसे ॥ ५५ ॥ तपन जातांचि ताप गेला । उष्मा कोठोनी राहिला । परी भास असे उरला । तप्तत्वाचा सगळा जगांत ॥ ५६ ॥ बोधें चि माया जाय दया । परी निर्सन करणें लागे तया । रात्री ताप शमावया । करीती उपाया व्यंजनादि ॥५७॥ भरतिये समुद्र भरे । वोहटीमाजी उतरे । जेथींचा तेथें स्थीरे । जाणा निर्धारें चिखल तो ॥५८॥ दंडे कुलाळचक्र फिरविलें । दंड काढतांहि फिरों लागलें । भ्रमत्व मात्र राहिलें । तैसें वर्तलें हें सर्व ॥ ५९ ॥ ऐसीये रीती कार्य घडलें । कर्तुत्व मात्र असे उरलें । बोधे मायाकार्य आटले । शरीर राहिले ह्मणुनी ॥ ६० ॥ करें जें जें निर्मिले कार्य । तें तें करेंचि विलया जाय । मनें निर्मिता जें होये । करें न होये लय त्याचा ॥ ६१ ॥ मनें चि कल्पना उठीली । ती मनें चि विलया गेली । माया आली आणि गेली । देही भाविली मनानें ॥ ६२ ॥ संसारवृक्ष थोर वाढला । शाखापल्लवें विस्तारला । मूळीं पाहातां तयाला । कल्पना मनाला तें बिज ॥ ६३ ॥ ते बिज शोधुनी पहाता । वृक्षबिजीं साम्यता । परी शाखापल्लवीं भिन्नता । उभारीली तत्वता व्यापरी ॥ ६४ ॥ मुळी बीज अंतीं बीज । सकळ जाहाले बिजाचें काज ।

मध्यें विस्तार वाढला सहज । तेंचि चोज ओळखावें ॥ ६५ ॥ बीज ते कल्पना देहीं । बहु गुण वाढली पाहीं । निरास होये तेचिसमईं । कल्पना ठाईं नासतसे ॥ ६६ ॥ कल्पना समुळ खुंटता । ते चि मायेची निरासता । मुख्य हे वर्म जाणता । निरास तत्वता मायेशी ॥ ६७ ॥ यापरी दोनी प्रश्नाते । सांगितले धरीजे चित्तें । मग उत्तरावया भयाते । करणें केउते आयास ॥ ६८ ॥ आतां तिसरा प्रश्न हा मी कवण । त्याचें ऐका समूळ लक्षण । जेणें तुटे भवबंधन । आत्मा निधान सापडे ॥ ६९ ॥ संसारीं नाडीले कैसें । जेणें लटीकें चि लाविलें पिसें । मी कुटुंबिया ऐसें । मानितो पाहीं ॥ ७० ॥ ऐसा जाला मायेचा प्रश्न । जेथें मायेचें निरसन । तिसरें मी माझें विवेचन । तें हि संपूर्ण ऐकावें ॥ ७१ ॥ ते पुढिले अध्याई । आत्मत्व भेटले पाहीं । सद्गुरु सिध्दा नमन पाई । तन्मय हृदईं अनन्यता ॥ ७२ ॥ श्रीगुरुसमर्थ कल्पद्रुम । पूर्ण करिती सकळ काम । राजारामीं लाधलें प्रेम । स्वात्मधर्म सिध्दरूपें ॥ ७३ ॥ भक्तमंजीरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । श्रीसिध्दआख्यानाते । अध्याय समाप्त नवा हा ॥७४॥ ॥ अध्याय ॥ ९ ॥ ओव्या येकून ॥ १२१ ॥ अष्टक ॥ १ ॥ संख्या ॥ ९ ॥ श्लोक ॥ १३ ॥ अनु० अ० ॥ १०६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय १०७

## — श्रीसिध्दस्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसिध्दरामसमर्थ ॥ जय सद्गुरुसिध्दमूर्ति । परब्रह्म अव्ययस्थिती । विदेवरी पादुनी भक्ति । निरंतर व्यक्तों तिष्ठतसे ॥ १ ॥ नामरूप करुनी धारण । नासाग्रीं दृष्टी पूर्ण । नटनाट्य ज्याचें गहन । न करवे वर्णन निगमादिका ॥ २ ॥ पादुरंग श्रीपरात्पर । परंज्योति प्रकाश थोर । परमात्मा परेश सुंदर । महाजा अपार गुण

ण्याचे ॥ ३ ॥ फरारा झळके ते कीर्तीचा । फरशधर हि शिणला साचा । फणी तो सहस्र वदनाचा । कुंद तयाचा न चले पै ॥ ४ ॥ वराडी शिवादिक मोहित प्रेमें । बैसले व्यासादिक स्तव्व नेम । बहूत श्रमले न कळे वर्म । मरव्रती कर्म न सुटे जीवा ॥ ५ ॥ भला धर्म हा चि येक । भजावा सदा रघुनायक । भवभय सरे सहजी देख । भरे सुख प्रेम अंतरीं ॥ ६ ॥ मायातीत मानुर्षीवेश । मनोरथ पुरवी श्रीसिध्देश । मानाभिमान जाय निःशेष । मनीं प्रकाशे निजात्मता ॥७॥ येक निश्चय असावा ह्रदईं । यम लागे त्याचे पाई । येकात्मता विलसे ठाई । येश गाई अखंडित ॥ ८ ॥ रविवौंशा रावणांतका । राजीवनैना रमानायका । राधिकाविलासा भक्तरक्षका । राहाशी निका पंढरीशी ॥ ९ ॥ त्वदात्म्य साधु जीवींचें जीवन । मारुति अवतार मुख्यप्राण । ते कथा तुज आवडे पूर्ण । करविशी वर्णन निजलीळें ॥१०॥ नवमोध्याई सद्गुरूसिध्दे । मायेचें निर्सन केलें प्रसिध्द । आतां शिष्याशी आत्मत्वशुध्द । दाविती बोध करूनी ॥११॥ गणेशशारदासद्गुरूमूर्ति । नमो त्रिगुणातीत आदि प्रकृति । तुझ्या प्रसादें वाचस्पती । वदे युक्ति आगमोक्त ॥ १२ ॥ तिसरे प्रश्नाचें लक्षण । मी कोण हे नोळखोन । भमला जीवदशे येऊन । तेंहि कारण परिसावें ॥ १३ ॥ ह्मणे मी ब्रह्मच्यारी गृहस्थ । अथवा सांगे वानप्रहस्थ । सन्याशी परमहंस बोलत । आश्रम वाणीत जगामाजी ॥ १४ ॥ हा तो आश्रमातीत । आश्रम स्वकर्मी असती रत । हा निष्कर्म गुणातीत । कर्मरहित अकर्मी ॥ १५ ॥ बळें चि ह्मणे मी पंडीत । शास्त्रमतें स्वीकारीत । नैय्याईक व्याकर्ण सिध्दांत । मीमांस वेदांत धर्मशास्त्री ॥ १६ ॥ जया वेदाचें करी पठण । तो वेदवक्ता असे निपूण । पदें क्रमे भाष्य संपूर्ण । जटा घन पल्लमादि ॥ १७ ॥ जया व्यापारातें करी । ते नाम आदरें धरी । भिक्षुक गृहस्थ व्यापारी । ह्मणुनी करी व्यवहारा ॥ १८ ॥ ऐसी ब्रह्मयोनीची अवस्था । क्षेत्रीयोनी माजि असतां । वर्णी नामाची विख्यातता । पूर्णनिपूणता क्षेत्रोकर्मीं मी ॥ १९ ॥ अमुक स्थानीचा रहिवाशी । पठणादिनाम विशेषी । रणरंगीं

उत्साहाशी । दाऊं जगाशी निजतेज ॥ २० ॥ मी खड्गधर शरचापधर । गदामुद्गलादि मुसळधर । नाना अस्त्रीं प्रयोग समग्र । जाणता वीर मी येक ॥ २१ ॥ ऐशियापरी क्षेत्रियोनीत । उद्भवोनी ह्मणे मी क्षेत्री निश्चीत । न जाणे चि गुह्यार्थ । कोण काढील सत्य मी ॥२२॥ वैश्ययोनींत होतां जनन । कर्में तयाचीं करून । क्रयविक्रयादि व्यवसाय पूर्ण । करी जाण संतोषें ॥ २३ ॥ मी वैश्य ह्मणवी जगीं । नाना विक्रयाचे संगीं । वाणी तो आपुला आंगीं । प्रौढी सांगीं जनात ॥ २४ ॥ शुद्र ह्मणुनी करी धंदा । कृशीकर्मादिक भेदा । लोकोपअर्चन समंधा । वर्ते सदा अखंड ॥ २५ ॥ ज्या ज्या योनीमाजी अवतरणे । त्या त्या भराते भरोन । मी तो चि ह्मणवोन । करी अर्चन तयाचे ॥ २६ ॥ परी नेणे चि मी कोण । शरीर अभिमानाते धरोन । वृळें अहंता बंधन । धारण करी ॥२७॥ हा नव्हे शरीर । नव्हे हा गुणप्रकार । हा सर्व साक्षी विश्वाकार । निर्गुण निराकार साक्षिभूत ॥२८॥ नव्हे स्थूळ ना सूक्ष्म । कारण महाकारण नेम । रक्त श्वेत आणि श्याम । नव्हे धाम अर्धमात्रा ॥ २९ ॥ तूं नव्हेसि त्रिकूट श्रीहाट । नव्हेसि गोल्हाट औटपीट । भ्रमर गुंफा तेहि स्पष्ट । ब्रह्मरंध्र श्रेष्ट नव्हेसि पाहि ॥ ३० ॥ लंबिका जिव्हादोहन । करितां न पावशी तूं जाण । नानाविध उपाय गहन । करीती क्षीण तुजसाठीं ॥ ३१ ॥ तू परब्रह्म सच्चिदानंद । गुणातीत अद्वयबोध । घडताती अनेकछंद । नानाविध तुझे सत्ते ॥ ३२ ॥ तो तूं परात्पर अव्योम । भूतजातीचे आहेशी धाम । सकळजीवाचे विश्राम । आत्माराम तूं चि तू ॥ ३३ ॥ तुझीये सत्ते शब्द आकाशीं । चळण वळण त्या वायोशीं । तपनता असे सूर्याशी । रस जळासी तुझेनि ॥ ३४ ॥ पृथ्वीसी क्षमा गंध गुण । हे तों तुझीयेसत्तेकरून । सकळसाक्षी चिद्घन । ब्रह्म परिपूर्ण तूं चि तूं ॥ ३५ ॥ तूं त्रैलोक्य उभविता । पाळण करूनि संव्हारिता । अनंत ब्रह्मांडें निर्मिता । न कळे तत्वता पार तुझा ॥ ३६ ॥ तो तूं नेणुनी आपणाते । वृथा सुखसी मोहमदिरेते । निर्मोह होउनी आपणाते । वोळखी निरूते सत्वर ॥३७॥

प्रकृतिपुरुषाचा भास । तो चि उद्भवविलास । तेथें मीपण हा अभ्यास । लाधला विशेष तुजलागि ॥ ३८ ॥ जागृतिमाजि जे असे । ते चि ते स्वप्नीं दीसे । तैसा लाहिलास अभ्यासे । शोधी यास गुरुसंगें ॥ ३९ ॥ स्वप्नापासुनी ज्यागृती जाण । स्वप्नासी मूळ ते कारण । सुपुप्तीस तुर्या आपण । प्रघट करी पूर्ण निजशक्ति ॥ ४० ॥ या अवस्था असती च्यार । परी न करी तयाचा विच्यार । ज्यागृतमाजी विढार । घेतले खरे मीपणानें ॥ ४१ ॥ स्वप्न अवस्थेचें मीपण । ज्यागृतीमाजी राहोन । विषय नाना भोगोन । न विटे चि जाण कधीं हि ॥ ४२ ॥ मीपणाचा ठाव पाहीं । सुपुप्तीमाजी कोठें नाहीं । तुर्या चवथी साक्षिणी देही । नेणती काही मीपणाशी ॥ ४३ ॥ तुर्या ती साक्षिणी येक । मीपण हे आले आगांतूक । सुपुप्तिविरहि स्वप्नीं देख । ज्यागृति निष्टंक राहिले ॥ ४४ ॥ स्वप्नामाजी जे भासले । तितुके चेईता लया गेले । मीपणाते कैसे राहिले । सांगिजे वहिले यथार्थ ॥ ४५ ॥ स्वप्नींचे ते स्वप्नीं जात । भास स्मृति मात्र उरत । तया भासाचि मोहाते । पाहिले निश्चांत जन सारे ॥ ४६ ॥ मीपणाविरहित असासि बा रे । ते तूं ओळखुनी पाहे खरे । उडवोनी देइ मोहतिमिरे । बोधसूर्येकरूनि ॥ ४७ ॥ यापरी तुजसी मीपण । जडेल असे उपाधीकरून । तया उपाधीचे खंडण । करूनि सांडणें निजसत्ते ॥ ४८ ॥ मग तुझा तूं चि पाही । कोण हे जाणवेल ठाईंचे ठाई । उपाधी जाता विश्व पाही । तूं चि विदेहि होसी पै ॥ ४९ ॥ यापरी मी कोण त्याचा शोध । उघडोनी दाविला पूर्ण बोध । तीन प्रकार हे शुध । दाविले प्रसीध्द निवडोनी ॥५०॥ मी कोण ऐसें होतां ज्ञान । सहजी गळे अज्ञान । याचें करीता शोधन । जाय अभिमान उठाउठी ॥ ५१ ॥ तिसरा प्रश्न समाप्त पाही । हा त्रिगुणासी लिप्त नाहीं । याचा साक्षी ज्ञाता देही । पाहुनी घेई आत्मदृष्टी ॥ ५२ ॥ इति श्रीसिध्दसार । तिसराप्रश्न मनोहर । सिध्दवाक्यबोधसूर्य । नाशी तिमिर शिष्याचे ॥ ५३ ॥

॥ त्रितियप्रश्न समाप्तः ॥

आता चवथेयाची वार्ता । ह्मणे मी भ्रमलों कां सर्वथा । याची दाखवा व्यवस्था । सद्गुरूनाथा कृपा करुनी ॥ ५४ ॥ स्वामी सांगती तत्वसार । त्याचा ऐका विच्यार । जेवि चंद्री तो चकोर । तेवि सादर परीसावे ॥ ५५ ॥ भ्रम याशी कोणे दाविला । आपुले अविच्यारें असे भ्रमला । तो निभ्रम होये वहिला । तत्वमस्यादि भला वाक्यानें ॥ ५६ ॥ व्याघ्रे उदकीं लक्षीले । तेथे दुसरेपणा पाहिलें । जाति अभिमानें नाडीले । बळे पाडिले त्या कूपीं ॥ ५७ ॥ मानसीं तया मारावें । आपणचि मेला स्वभावें । तैसें येथें तुझ्या जीवें । मानी ते ठावे नव्हे तुज ॥५८॥ नातरी श्वान जाण । आदरेशी श्वान पाहून । भुंक भुंकोनी सोडीला प्राण । श्वान हे विंदान नेणेचि ॥ ५९ ॥ कोणी येक पुरूष बरळ । आला पर्वताचे जवळ । शब्द करी उतावेळ । प्रतिशब्द तात्काळ होये तेथें ॥ ६० ॥ हे नेणोनी तो नर । पर्वत धुंडी समग्र । शब्द करी वारंवार । दुसरा नर दिसेना ॥ ६१ ॥ हा शब्द करीता भ्रमला । परी प्रतिशब्द नाहीं राहिला । येथें भ्रम असे जाला । हे नेणेंचि वहिला तो नरू ॥ ६२ ॥ यापरी तूं भ्रमलाशी । आपुलेयाते नेणशी । नाना योनी स्वीकारीशी । अहंता धरीसी ठांई ठांई ॥ ६३ ॥ चतुर्दळी आणि षट्दळी । भ्रमलाशी बारे दशदळी । द्वादशषोडशाची नव्हाळी । पाहुनी द्विदळी भ्रमलाशी ॥ ६४ ॥ या चक्रालागी पाहून । आविद्यागी स्वीकारून । वृथा तळमळिसी जाण । देई सोडून भ्रमाते ॥ ६५ ॥ गारुडिये इंद्रजाळ करून । प्रत्यक्ष सर्प दाखविला जाण । मोहोनिया सकळ जन । तयालागोन पाहाती ॥ ६६ ॥ सर्वांचि पाषाण घेऊन हाती । मोहर दावी लोकाप्रति । दृष्टीबधन ते निश्चिती । सत्य पहाती जन सकळ ॥ ६७ ॥ जरी ती खरी असती मोहर । तरी का हिंडे दारोदार । हा भ्रमचि साचार । पडला दुर्धर पहातीया ॥ ६८ ॥ तैसा तूं व्यर्थ भ्रमोन । माझें माझें म्हणसी जाण । तुझे तरी तुजअवळून । दूर कोण करूं शके ॥ ६९ ॥ माझे ह्मणसी हें कलत्र । मोहो धरीसी पाहुनी पुत्र । स्नेहें बोळविशी मित्र । परी ते स्वतंत्र नाहीं

कोणी ॥ ७० ॥ आपआपुला सांगाती । ही भ्रामक भ्रमें दिसती । तुझा तूंचि गा त्रिजगतीं । म्हणनी निश्चीती उरलाशी ॥ ७१ ॥ स्वप्नामाजी दिसे अंगना । आणि दिसे बहुतसेना । भोग भोगीतसे नाना । जागृती जाणा नाही कोण्ही ॥ ७२ ॥ स्वप्नामाजी पडे सुख । अथवा जे का उद्भवे दुःख । या दोहींचा हि लेख । सत्य देख पै नसे ॥ ७३ ॥ प्रबोधक्षणी दोन्ही जाती । भ्रम मात्र उरे चित्तीं । त्या भ्रमाचीही शांति । होये निश्चिती निज बोधें ॥ ७४ ॥ तो बोध श्रीगुरुविणे । नोव्हे कल्पांतीं प्राप्त जाण । म्हणुनी धरावे श्रीगुरुचरण । भ्रमबंधन जेथें नाहीं ॥ ७५ ॥ भ्रमाचें ऐक लक्षण । कुलाळचक्रवत असे जाण । तेवि माया यंत्रीं आरूढोन । भय पावशी जाण तत्वतें ॥ ७६ ॥ तरी माया बोलाप्रती । दूषण वाटे माझीये चित्तीं । ऐसी स्वामीस विनंती । करी निगुती शिष्य तेंव्हा ॥ ७७ ॥ म्हणे कुलाळचक्र येक-देशी । ऐक्यता केवि होये दृष्टांताशी । हे भुलवी सकळ जगाशी । ब्रह्मादिकांशी भ्रमवीत ॥ ७८ ॥ ऐकोनी शिष्याचें वचन । श्रीगुरु म्हणती जाण । शब्दीं लाऊनिया मन । सावधान ऐकावें ॥ ७९ ॥ ते जड जडासी भ्रमवी । हे मायाचक्र परम लाघवी । चक्रीं पाडुनी सृष्टी आवरी । ब्रह्मादिका डोलवी बळेंचि ॥ ८० ॥ जे जे चक्रीं आरूढले । ते ते महाभ्रमें भ्रमले । मग ते तैसेंचि राहिले । जन्म वरीले तयांनीं ॥ ८१ ॥ जयावरी दृष्टी दिधली । सद्गुरूनाथें कृपा केली । तयासीच मुक्ति फावली । हाता आली निजशक्ती ॥ ८२ ॥ तो कर मस्तकीं जयाचे जाला । तो मायाचक्रांतळीं उतला । जीव चि परी समान जाला । महेशेपी ॥ ८३ ॥ जयासी अन्य उपमा । कांहीं च नसे शिष्योत्तमा । धन्य तये येउनी जन्मा । सांडीली सीमा सर्व हि ॥ ८४ ॥ जन्म तयाचा सुफळ जाला । भ्रम तेथींचा तेथें राहिला । हा निभ्रम होउनी उरला । उद्धरी जगाला स्वबोळें ॥ ८५ ॥ ऐसिये भ्रमाची कारण । तुवी तुज अनोळखी होऊन । मुळीनी गेलासी जाण । तरी सत्य न होई आता ॥ ८६ ॥ बहुत जन्मे भ्रमलासी । सेखी आपणा नोळखेसी ।

तरी या उपायासी । करीता पावसी निजसुख ॥ ८७ ॥ यासी येक चि उपाय । सेविता सद्गुरूचे पाय । तरी पावोनिया सोय । सुगमोपाय तरणार्थे ॥ ८८ ॥ पहा पा नारद वाल्मीक । पराशर व्यास शुक । यांनीं वैकुंठनायक । सोईरा देख पै केला ॥ ८९ ॥ आणीक हि बहुत सज्ञान । निघोनी श्रीगुरूशी शरण । आत्मसाक्षात्कार पावोन । सुखी जाण पै जाले ॥ ९० ॥ हा श्रम सत्संगती । निरसोनी सांडी दुःखमती । मग तूंचि होसी त्रिजगती । ऐक्यनिती तुझेनी ॥ ९१ ॥ यापरी भ्रमाचें निरसन । चवथें जालें संपूर्ण । पुढें ऐका ब्रह्मनिरोपण । ते लक्षण अति गोड ॥ ९२ ॥ सद्गुरू सितपंकजभ्रमर । राजाराम अविकार । स्वामीवाक्य श्रुतिसार । श्रोते सुखभर परीसोत ॥ ९३ ॥

॥ चतुर्थप्रश्न संपूर्णमस्तु ॥

नमो आदि अविनाशा स्वयंज्योती । गुणातीत अव्ययमूर्ति । स्फुरद्रूप स्फुरे शक्ती । ते प्रकृति पै तुझी ॥ ९४ ॥ ब्रह्म पुसीलें तुंवा कैसें । ते सावध वा परीयेसे । जेणे तुटती मोहफासे । जीवा अनयासें ऐक्य होये ॥ ९५ ॥ ब्रह्म कठीण तरी सकळाधार । मृदु ते असे मनोहर । थोर तरी बहुत थोर । लहान ते घर अनु ज्यासी ॥ ९६ ॥ जे कां अत्यंत सुंदर । पाताळपणे रसाधार । भोक्ता भोग्य जे प्रकार । घडती साचार ज्यायोगें ॥ ९७ ॥ जे रक्त ना पिवळें । श्वेत ना सावळें । नवारंगाही वेगळें । सदा मळें तेंचि पै ॥ ९८ ॥ जे हालें न डोलें । जेथींचा तेथें संचलें । साक्षीपणें राहिलें । मासुनी भलें साक्षीत्वा ॥ ९९ ॥ ठावें नसे जे शब्दाशी । केवि येईल ते वाचेसी । बुध्दी जाली तेथें पिसी । अनुभवें अनुभवाशी ग्रासीलें ॥ १०० ॥ सकळ हि भूतजात । जियेमाजी सामावत । तयें मायेचा हि अंत । होये जयांत निजकोळें ॥ १ ॥ जे योगियांचें निजधन । सनकादीक [illegible] जाण । सकळ आनंदाचें स्थान । मना उन्मन होये जेथें ॥ २ ॥ [illegible] अनुभव शिवे पाहीं । घेवोनी निवाला असे देही । जो अग्रगण तापसा

हि । आदि पुजी पूजिजे ॥ ३ ॥ जें का मायेचें अधिष्ठान । येथेंचि जियेशी उपशमन । ममत्वाचें शोधन । भ्रमनिरसन ज्या स्थळीं ॥ ४ ॥ पहा पा च्यारीमुक्ती । जयाचिया वरपडा होती । तयाचिये माथा वस्ती । अखंड करीती ते योगी ॥ ५ ॥ तया योग्याचें समाधान । निःशब्दाचा शब्द पूर्ण । स्पर्शाचा स्पर्श जाण । अनुभवीती आपण अनुभवा ॥ ६ ॥ जे अरूपाचें रूपडे । रसाचें रसत्व गाढे । गंधाचें चहूंकडे । सुगंध प्रौढ न समाये ॥ ७ ॥ जे नाकळे इंद्रियाशीं । प्राप्त नोव्हे मनासी । जेथें बुधी फासावीसी । निश्चयेशी होउनी राहे ॥८॥ हे सद्गुरूवाचुनी । नकळे कवणालागुनी । म्हणूनिया विवेकजनी । सार शोधुनी पै ध्यावें ॥ ९ ॥ अनंत जन्माचें सुकृत । जयासभईं येक होत । तेव्हा चि स्फुरे सुचीते । शरण श्रीगुरूते जावया ॥११०॥ जावोनी सद्गुरूसी शरण । तेथें करावें आत्मशोधन । छेदोनी साडीती बंधन । जन्ममरण मग नाहीं ॥ ११ ॥ जन्ममरणाची वार्ता । सद्गुरू चि येक खुंटीता । त्याविणे ना सर्वथा । जिवा निश्चीता उपाय नाहीं ॥ १२ ॥ यासाठीं सर्वसाधनें । सांडूनिया सज्ञानें । ध्यावे सद्गुरूशी जाण । भवपार उतरणें तेणेंचि ॥ १३ ॥ या श्रीगुरूचरणासाठी । योगी हिंडती गिरीकपाटीं । प्राप्त नोव्हे हिंडतां सृष्टीं । भाग्यासाठी सापडती ॥ १४ ॥ हा भाव कवणें धरीला । सद्गुरु कवणासी प्राप्त जाला । तें हि सांगतो तुजला । शिष्या मला अवधारी ॥ १५ ॥ ब्रह्मयाते हंसरूपें करून । उद्धरीता जाला नारायण । सकळसंशय निरसोन । समाधान दिधले ॥ १६ ॥ नारदाशी हीन योनीपासुनी । उद्धरोनी केला अयोनी । मान्य जाहाला त्रिभुवनी । ख्याती पुराणी वाणीजे ॥ १७ ॥ सनकादिक तयाते । वर्णीता न वर्णवे निश्चित । मग तये माळ श्रुचिते । स्वलिळेते धरीलेसे ॥ १८ ॥ पहा पहा तो वाल्मीक कोण होता । परी सद्गुरूसी शरण जाता । आदि कवि तत्वता । होउनी सर्वथा पै ठेला ॥ १९ ॥ व्यास पराशरनंदन । ढोमरीपासाव पावलें जनन । परी तो स्वये चि भगवान । केले जाण सद्गुरूनी ॥ १२० ॥ अठरा पुराणे बरविलीं ।

उपनिषदें समग्र शोधिलीं । सारयात निवडीली । आत्मवस्तु भली ती येक ॥ २१ ॥ ते वस्तु श्रीगुरुराचुनी । प्राप्त नोव्हे गा त्रिभुवनीं । साधक हिंडता कष्टती अवनी । जयालागुनी अखंड ॥ २२ ॥ देवऋषी राजऋषी । पितृऋषी नरऋषी । ते हि झाले वा उदासी । आत्मसुखाशी पावावया ॥ २३ ॥ चहू युगातील भक्त सकळ । तया सुखा करीती तळमळ । आनंदाचा परीमळ । सित्थ स्नेहाळ दाखवी ॥ २४ ॥ गुरूपरंपरा अवताराशी । जीवन्मुक्त नित्यमुक्ताशी । शरण जाता स्वामीसी । निजभ्रांतीशी हरावया ॥ २५ ॥ मुक्तबध या दोघाप्रती । साक्षी येक चि त्रिजगती । जयाचे सत्ते भ्रांति निभ्रांति । होये निश्चीती जीवाते ॥ २६ ॥ भ्रांती जीव जाला । शबळ उपाधी ईश्वराला । उपाधीरहित होता जाला । चिन्मय उरला साक्षीपणें ॥ २७ ॥ आता सगुण सद्गुरूचें पूजन । निर्गुण करावें चिंतन । पूर्ण जयाचें व्यापकपण । राहीला व्यापून नमाते ॥ २८ ॥ अभ्यांतरीं आणि बाहीर । वेष्टुनी राहिला चराचर । उघडें चि जाण गा समोर । पाहे साचार चहूमार्गी ॥ २९ ॥ नाही तयाशी आडकाठी । भरोनि राहिला पाठीपोटीं । सद्गुरूमूर्ति गोमटी । घालीन मिठी चरणासी ॥ १३० ॥ आता श्रीगुरूचें पूजन । कवणीये रीती घडे जाण । मनाशी होये उन्मन । वाच्या गळून पै जाय ॥ ३१ ॥ श्रीस्वामिनी कृपा करावी । पुज्या दीनाची आंगिकारावी । हेचि विनंती मानावी । परीसावी विज्ञापना ॥ ३२ ॥ पूजा करू जयेकरून । तें तें तुझेची रूप जाण । तुझाविण न दिसे भिन्न । पूजकपण विसरलों ॥ ३३ ॥ विज्ञासी परीसोनी आवडी । ध्यावया पूजेची परवडी । आपण सामोग्री रोकडी । होवोनी फेडी साकडे ॥ ३४ ॥ प्रथम आवाहन केलें । तो विश्व भरुनी उरलें । स्नान घालावया जळ । नसे राहिलें जयातें ॥ ३५ ॥ सप्रेम जळधारा । नेत्री उठल्या येकसरा । तेणें स्नान करुणासागरा । घडलें परात्परा सित्धेशा ॥ ३६ ॥ त्रिगुणाचे करुनी आचरण । निर्वासनेचें परीधान । देउनी हृदयसिंह्हासन । वरी आपण स्वामी बैसले ॥३७॥ सुरतरूडुनी

सुवासीक । पुष्पें नवळ अधिका अधिक । शरीरीं कमळें अनेक । वाहिली देख गुरूनाथा ॥ ३८ ॥ विकारात्मक अहंतेते । जाळुनी समर्पिले धुपातें । नाहंप्रकाश दीपातें । उजळुनी स्वामीतें वोवाळिले ॥ ३९ ॥ नैवेद्य तो नानारस । मेळउनी केला सौरस । अविट वाढोनी पात्रास । सद्गुरू सावकाश जेविती ॥ १४० ॥ भोजन सेविल्यापाठीं । तृप्ती भरुनी राहे पोटीं । मग नावडे सेवनी दृष्टीं । पुष्टी तुष्टी होउनी राहे ॥ ४१ ॥ ऐसे सारुनी भोजन । केले शुध्दात्मरसें आचमन । तांबूल भक्तियुक्त पूर्ण । करीती ग्रहण सिध्दनाथ ॥ ४२ ॥ त्रयोदशगुण तांबूलातें । ऐकावे तुम्हि निरूते । नवविध नऊभक्तिते । मुक्ति निश्चीत ते च्यारी ॥ ४३ ॥ यापरी त्रयोदशगुण । तांबूलातें स्वीकारून । प्रसाद शिष्यास देऊन । निजमहिमान वाढविले ॥ ४४ ॥ मन जालें निःशेष । तोचि पर्यंक शेष । तये स्थानीं विश्वप्रकाश । पहुडे सावकाश अतिप्रिती ॥ ४५ ॥ तेथे निजेशी लागली नीज । पूर्णतेशी पूर्णता सहज । आत्मबुध्दीशी पातली सांज । ऐक्य-सेजेशी मिनली ॥ ४६ ॥ ऐसीये स्थळीं प्रेमळभक्त । नित्य असती अनुरक्त । तयाप्रति तो अनंत । सप्रेमयुक्त खेळवी ॥ ४७ ॥ भक्ताविण आणिक । तयाशी प्रिय नसे देख । तो सद्गुरू चिद्विलासिक । अगम्य अतर्क्य जो वेदा ॥ ४८ ॥ तो सुलभ भक्तीकरून । दासालागीं जाला जाण । सकळ वासना पुरवोन । आत्मदान देत असे ॥ ४९ ॥ या आत्मदानाची कहाणी । घेईजे कां ऐकिजे श्रवणीं । जगीं धन्य तोचि ज्ञानी । श्रीगुरुचरणीं प्रेम जया ॥ १५० ॥ वृत्ति समूळ विरे । आठवा अठव विसरे । स्वयें आत्मा वावरे । ऐक्य सपूरे यथोक्त ॥ ५१ ॥ हा अनुभव अनुभविता । शिष्यासी पातली ताटस्तता । तेणे निवारीली जडता । सबाह्य तत्वता पहातसे ॥ ५२ ॥ इंद्रियें व्यापारीं वर्तत । परी समाधी नाहीं मोडत । राजविद्येचा गुह्यार्थ । सार मतितार्थ दाविला ॥ ५३ ॥ सद्गुरुसिध्दनाथ कृपावंत । शिष्य केला हा सनाथ । दवडुनी मायेचा आवर्त । राजारामीं रत पै केले ॥ ५४ ॥ या प्रश्नातें श्रवण

फरीता । मानसीं होये कृतकृत्यता । अंतीं पावे सायोज्यता । सत्य निश्चिता निशाध्या ॥ ५५ ॥ याप्रकारें सद्गुरुसिध । मज दीनाशी करुनी बोध । दवडिला जन्ममृत्यु खेद । दाटला आनंद उचंबळुनी ॥ ५६ ॥ श्रोती पावोनी संतोष । नमन करीती श्रीस्वामीस । धन्य धन्य तो प्राप्त दिवस । सबाह्य विलसे निजरूप ॥५७॥ दशदिशान्याति दशमोध्याई । तें स्वसुख वर्णूं काई । अनन्यभावें श्रीसमपाई । नमन हृदई तादात्म्यता ॥ ५८ ॥ अकराव्यात येकीयेक । अभेदता प्रेमसुख । बोलविती स्वामी चोख । तें कौतुक अनिर्वाच्य ॥ ५९ ॥ सिधकृपा राजारामीं । वृत्ति निमग्न पादपद्मीं । मीतूपणा प्रासुनी ऊर्मी । निजात्मधर्मी सहजस्थीती ॥ १६० ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । स्वामीसिधचरीत्राते । अध्याय होत दहावा हा ॥ १६१ ॥ अध्याय ॥ १० ॥ अनु० अ० ॥ १०७ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभमस्तु ॥ ७ ॥



## अध्याय १०८

## — श्री सिद्धचरित्र —

( पुढें चालू )

श्रीगणेशायनम. ॥ श्रीराममनर्थ ॥ जयसद्गुरू स्वतसिधा । परमात्मया पुंडरीकवरदा । समचरण समपदा । सच्चिदानंदा श्रीनिवासा ॥ १ ॥ ललिततनू सुंदरश्यामा । तुलसीतुळसीप्रियोत्तमा । लज्या रक्षी श्रीरामा । लावी नेमा तव भजनीं ॥ २ ॥ विश्वनिवासा विश्वंभरा । वैकुंठवासी वारीजनेत्रा । वासुदेवा वैष्णवछत्रा । विमळगात्रा वेदविद्या ॥ ३ ॥ सतजीवन सगुणमूर्ति । सन्माळासुमनप्रीती । सुभद्र विलसे सहजस्थीती । सीतापति सुखराशी ॥ ४ ॥ षड्विकारनिर्दळपणा । षट्शास्त्रप्रतिपादना । षट्चक्रप्रभंजना । षड्रसेवना षट्कर्मा तू ॥ ५ ॥ शंभु शिवा शशांकभाळी । शरणांगतसंचित जाळी । शेषशयना

हृदयकमळीं । शोभली भली येकात्मता ॥ ६ ॥ हरीहरा नाहीं भेद । हा सुविध्यार वेदप्रसिध्द । हळधरा तुज हय प्रिय शुध्द । हूतांश सिध्द तूंचि पै ॥ ७ ॥ ळाळनपाळन करणें तुझा । ळवकर येई पुरूषोत्तमा । ळंघुनी भवार्णव पादपद्मा । ळिगटवी धर्मा स्वानुभवी ॥ ८ ॥ क्षराक्षरातीत राहाशी । क्षणक्षणा ध्याऊं तुजशी । क्षेत्रज्ञ स्वामीया जाणतोशी । क्षमी राशी अपराध ॥ ९ ॥ ककारादि क्षकारांत । स्तविता हरी सिध्दनाथ । अकरावा अध्याय आरंभीत । ते प्रिय होत अकरा रुद्रा ॥ १० ॥ अकरावा तो महारुद्र । अवतार रामदास प्रसिध्द । पुन्हा होउनी आणिक सिध्द । तारी विविध जन सारे ॥ ११ ॥ ज्ञानदेवें ज्ञानेश्वरी । तैसी च केली सिध्देश्वरी । पार्वती लक्ष्मी अंकावरी । अंखावरी ते विश्वांख ॥ १२ ॥ बाराशेबारांत । ज्ञानेश्वरी ते निश्चीत । सतराशे सतरांत । निर्माण होत सिध्देश्वरी ॥ १३ ॥ याची युक्ति हेचि पहाता । ज्ञानदेव श्रीविष्णु तत्वता । मारुतिरामदाससिध्दनाथा । शिव सर्वथा आपण ते ॥ १४ ॥ याकारणास्तव निर्धारें । समान शक घडला विध्यार । असो दशमोध्याई प्रकार । बोधिले प्रखर श्रीगुरुनीं ॥ १५ ॥ प्रश्न करीता शिष्यवत्से । पान्हावली गुरुमाय स्वच्छ । स्वानंदकरें स्पर्शोनी पुछे । तोपवी मछ जेवि पेय ॥ १६ ॥ आता अकराव्यांत हेचि कथन । उपासना प्रतिपादन । ज्ञानोर्मीचा ग्रास करून । करावे भजन दिननिशी ॥ १७ ॥ सिध्दध्याघन शिष्यातें । उपदेशिती हेचि निरुते । न सांडावे साधनातें । अभ्यासातें न विसंबी ॥ १८ ॥ शिवादिक महासिध्द । तेहि साधक ह्मणविती शुध्द । बापुडे जीव मतिमंद । धरीती स्फूंद जाणिवेचा ॥ १९ ॥ सांप्रदाइ सर्वत्र जना । हेचि सांगणें पुनःपुनः । पंढरीचा भजा राणा । ज्ञानाभिमाना सांडुनी ॥ २० ॥ गुरु चि सिध्द उपासना । राखा स्थीर तेथेंचि मना । श्रीराम प्रत्यक्ष तो चि जाणा । दावित खुणा निजभक्ता ॥ २१ ॥ तयेपाइं सकळ तीर्थें । व्यासादिकीं कथीले निश्चीत । याटणी घाळूं नये चित्त । ध्याइ सतत तो श्रीहरी ॥ २२ ॥ जया जैशी पाहिजे स्थीती । तैसा धरी तो चि व्यक्ति ।

श्रीराम माझा सीतापति । होउनी मूर्ति भेटला ॥ २३ ॥ ऐसे स्वामी सिध्दनाथ । सांप्रदायाशी बोध करीत । येकादशी आचरा व्रत । येकचित्तें जागरण करा ॥ २४ ॥ निस्पृह कीर्तन करावें । भिक्षा मागुनी जेवावें । पर अन्नाशी न जावें । तेणेंचि पोसावें कुटुंबातें ॥ २५ ॥ सकळ कर्मासी प्रायश्चित । स्मरावा चित्तीं भगवंत । उच्चारीता रामनामातें । हरे दुरीत निःशेष ॥ २६ ॥ तया नामा विक्रय करीता । पाप न जाय कोटिया तीर्था । पंचमहापातकी तत्वता । करुनी कथा द्रव्य घेणें ॥ २७ ॥ यासाठीं सिध्द सांप्रदाई । निष्काम कीर्तन करावें पाही । उणे तया न पडे कांहीं । माध्य घेई त्रिवाध्या ॥ २८ ॥ स्वइछ मार्गांत फिरऊनी झोळी । वास करावा श्रीदेउळीं । मिळे तेथें सहजी मडळी । कीर्तन राउळीं करावें ॥ २९ ॥ निघावें सहजी भजन करीत । येईल त्यांत असावें तृप्त । वाढवावा जगीं परमार्थ । विषईं विरक्त असोनी ॥ ३० ॥ अधिकार पाहुनी उपदेश द्यावा । संशय तयाचा समूळ हरावा । मागणेचा तगादा नसावा । अनुभव असावा दृढ मनीं ॥ ३१ ॥ नातरी आपण अज्ञान । शिष्य करी मूर्खपणें । दाराद्रव्यआसक्त मन । नर्क भोगणे तयासी ॥ ३२ ॥ स्त्रीविषय परम घातक । नातळावे कदा देख । निरंतर स्मरा रघुनायक । तेणें सुख सर्व ही ॥ ३३ ॥ भूतमात्रीं असावी दया । निंदका स्तवावें आधीं तया । अन्न द्यावें मळतया । असलिया चाडाळादि ॥ ३४ ॥ ध्यानधारणामुद्रासमाधी । येथें दृढ राहो बुध्दी । ऐसे सांगे कृपानिधी । दयाब्धी श्रीसिध्द ॥ ३५ ॥ गुरुपरंपरा रामभक्ती । रामनवमी करावी प्रीती । मेळउनी भिक्षा यथाशक्ती । उछाह निगुती करावा तो ॥ ३६ ॥ मारुतीचें दर्शन घ्यावें । सींदुर तया प्रिय स्वभावें । वस्त्र तयेशी श्रृंगारावें । मिरवावे प्रसादीक ॥ ३७ ॥ नातरी तो शुभ्रपट । शुध्दसत्व आहे चि श्रेष्ट । सिध्दसांप्रदाय करणें स्पष्ट । तरी हे वरील दृढवीं खुणा ॥ ३८ ॥ छळण कपणा न करावें । परीक्षुनी स्नेह करावें । ठाईंठाईं व दवावें । प्रेमळभावें भजन पै ॥ ३९ ॥

मठ करावे निस्पृहपणें । मोलें पूजा कदा न करणें । भिक्षा मागून अन्नदान । करावें भ्रमण सर्वत्र ॥ ४० ॥ ऐसी नीति सांगूनी सिध । सर्वत्र जनीं करुनी बोध । मागुती पंढरीसी येउनी शुध । आनंदकंद अवलोकिला ॥ ४१ ॥ अर्चन करुनी यथोक्त । कीर्तन करविले शिष्याहातें । मिळाले संत अवघे श्रोते । सिधनाथ श्रवण करीतो ॥ ४२ ॥ राजारामीं वंदुनी आज्ञा । नमन केलें श्रीरामचरणा । करुनी प्रथम नामस्मरणा । गर्जे वदन जयजयकारू ॥ ४३ ॥ पिंडब्रह्मांड येकात्मता । दश अवतार वदली कथा । तें वर्णन करावी ग्रंथा । आवडे चित्ता श्रोत्याचे ॥ ४४ ॥ याल्यागी सहजी लेखन करणे । तरी अवधान यावें पूर्ण । बोलविता रघुनंदन । मीतूंपण केचें तें ॥ ४५ ॥ च्यार युगे दहा अवतार । प्रतिदिनीं होती पाहातां विच्यार । ते सांगू सविस्तर । असावें स्थीर मानस पै ॥ ४६ ॥ च्यारी प्रहर च्यार युगें । अवतार धर्म तेणें चि योगें । कृतायुगी ध्यानप्रसंग । तेणें श्रीरंग संतोषतो ॥ ४७ ॥ तरी होतां चि प्रातःकाळ । ध्यान करीती साधु सकळ । सगुणनिर्गुण प्रांजळ । अधिकार सोज्वळ जैसा तो ॥ ४८ ॥ इतर जीव स्वकर्माचे । चिंतन करीती ते हि साचे । कर्मस्वरूपी भगवान स्वयेंच । ऐसें साचे वेद बोले ॥ ४९ ॥ याल्यागी सर्वी होतसें ध्यान । प्रथम प्रहर ते कृतयुग जाण । अवतार तेथें च्यार पूर्ण । पहावे मनें स्वदेहीं ॥ ५० ॥ प्रथम निद्रीस्थ मछाकृति । हातपाय उटता आकुंचन करीतां । कासव ते चि होये निश्चिती । वराहयुक्ति आंग मोडे ॥ ५१ ॥ दुर्गंधी मुखीं येत चि आहे । डुकर प्राणी आपण स्वयें । नृसिंह पुढे तो चि होये । वैसता ठाय शौच्याशी ॥ ५२ ॥ मळनिर्मोचन दैत्यहनन । नये पुढे कोणी जन । कृतयुगीचे अवतार जाण । च्यारी पूर्ण स्वदेही ॥ ५३ ॥ त्रेतायुग द्वितीय प्रहर । तीन तेथें होती अवतार । भिक्षा मागणें हा विच्यार । वामन साच्यार तो जाण ॥ ५४ ॥ भूतमात्रीं मागणें । घरांतील पदार्थ देणें । वामनरूप अवघे जन । अनुभव रूग सहजीं ते ॥ ५५ ॥ शस्त्रपाणी फरशधर ।

कपिलाची जिवनकळा ॥ ८७ ॥ कपिल गीतेंत तें वर्णन । तारकमंत्र जो का पूर्ण । तेरा अक्षरें गुत निरोपण । उपदेश खुग गीरजेशी ॥८८॥ ती अक्षरें प्रणवबीज । रामदास समर्थ सिध्दराम । हृदयभूमीके पेरीली सहज । विस्तार सहज तयाचा हा ॥ ८९ ॥ प्रति अक्षरी सहस्र येक । ग्रंथ निर्माण जाला चोख । संतरत्नन अलौकिक । गणीत देख सहस्र तेरा ॥ ९० ॥ तेरा प्रताप मेरा नही । वाच्य वाचक तो चि पाही । भरुनी उरला अंतरबाही । पंढरीठाई तिष्ठतसे ॥९१॥ दशदिशा व्यापुनी भरला । दशअंगुळे असे उरला । भावे पुंडलिके उभा केला । प्रत्यक्ष पाहीला गुरुपुत्रें ॥ ९२ ॥ निगुरुप्राणी ऐकुनी । आश्चर्य करीती आपुले मनी । वेदशास्त्रे पढुनी । प्रतिष्ठा जनी वृथा चि ते ॥ ९३ ॥ नाहीं जाणिले आपणाशी । बोळखिले नाहीं देवाशी । जाला त्या ध्यातुर्यासी । पृथ्वीशी भार तो ॥ ९४ ॥ गरुड परी आंधळा । ज्ञानाविण वैदिक भटा । बत्तीस लक्षणी अबला । सौभाग्याला ठाव नसे ॥ ९५ ॥ तैसे सकळ भक्तीविणे । जें जें करणें तो तो शीण । न जाणती तत्वज्ञान । धिग जिणें त्या नराचें ॥ ९६ ॥ यालागी सर्वी होउनी सिध्द । भजावा सद्गुरुस्वामीसिध्द । तेणें प्राप्त आत्मा शुध्द । अनुभव प्रसिध्द लोक त्रै ॥ ९७ ॥ जयाचे कृपे ग्रंथ जाला । ज्ञानसूर्यो ह्रदई उदेला । तया रविशी बारा कळा । जीवनकळा तेरावी ॥ ९८ ॥ बारा स्कंद भागवत । तेरावा श्रीभगवंत । तेरा सहस्र करविला ग्रंथ । तारक निश्चीत तेरा अक्षरीं ॥ ९९ ॥ बारा जोतिर्लिंगे पृथ्वीवरी । तेरावें श्रीपंढरपुरीं । प्रत्यक्ष उभे भीमातीरीं । बदली वैखरी आच्यार्याची ॥ १०० ॥ ते परब्रह्मलिंग सावळें ।

सांग । सर्वथा जिणें माझें व्यंग । अष्टांगयोग न होती ॥ ४ ॥ कर्मी पहातां न्यूनता सारी । नाहीं घडली सतत वारी । अभागी मी दुराचारी । कोण तारी मजला दीना ॥ ५ ॥ संत कृपेचे सागर । पाठीशी पडलों मी पामर । करीता तयांनी अंगीकार । अधिकार स्तवनाचा ॥ ६ ॥ सद्गुरु सिद्ध प्राप्त होता । हरली जन्ममरणाची चिंता । देखतद्वारा करविली कथा । पंढरीनाथा प्रिय जे ॥ ७ ॥ कलियुगीं कीर्तनधर्म । व्यासादिकीं वर्णिला नेम । म्हणुनी आरंभिलें हें चि कर्म । वर्णिल्या प्रेमें संतकथा ॥ ८ ॥ अनेक साधु पृथ्वीतळा । शोध तयांचा न लागे मला । कांहीं येक वर्णिल्या लीला । संतमेळा राहिला बहू ॥ ९ ॥ पुष्पें तुळसी बागांत अनंत । वहातां हरीसी तीं न सरत । मंथन करुनी तेवि ग्रंथ । श्रीरघुनाथ पुजीला तो ॥ ११० ॥ पुष्पवाटिका श्रीमंतांची । असंख्य फुलें गुंफीता तेथींची । माळ करीता सरती कैंची । घडली साची स्तुति तेवि ॥ ११ ॥ गुप्त प्रघट भगवद्भक्त । न लागे कवणा तयांचा अंत । श्रीभगवान स्वयें अनंत । वेद अनंत तो हि वदे ॥ १२ ॥ अनंत साधु अनंत लीळा । काय वदवेल मज दीनाला । जेथें शेष मौनावला । स्तब्ध राहिला सहस्रफणी ॥ १३ ॥ संतलीळामृतसागरा । प्राशन करणें न घडे सारा । बिंदुमात्र होईजे अमरा । या पामरा घडलें तेवि ॥ १४ ॥ कांहीं येक करितां स्तवन । संत दयाळु केले पावन । आत्मानुभव होउनी पूर्ण । वृत्ति निमग्न गुरुभजनीं ॥ १५ ॥ तो सद्गुरु स्वतसिध्द । रामदास अवतार प्रसिध्द । कल्याणपद दाउनी शुध्द । केले सिध्द संतभजनीं ॥ १६ ॥ तेणें त्रैलोक्य उजींवडे । ग्रंथ रचिला वडिकोंडें । भक्तमाळा गुंफोनी प्रौढ । पुजीला गरुड वहन जया ॥ १७ ॥ शकें सतराशे छप्पन्न । जयश्री श्रीरघुनंदन । सेवासर तोचि जयनाम पूर्ण । होतसे अर्पण सन्माळा ॥ १८ ॥ वर्षाऋतु मेघःशाम । पंढरीनिवास स्वसुखधाम । ज्यानकीवल्लभ सीताराम । वहा प्रेम अवतरे ॥ १९ ॥ श्रावणमास तो चि पहातां । उत्तम कृष्णपक्ष

सुन्याकातव्या घेणें करें । भाजीपणें छेदिती त्वरें । सातवा रघुवीर यज्ञभोक्ता ॥५६॥ तो यज्ञ कैसा ह्मणाल । प्राणाग्नीहोत्र आहे सकळ । भगवत्गीतेंत हरी बोलिले । ते निर्मळ श्रवण करा ॥ ५७ ॥ पंधरावे अध्याई । हात त्याची भगवान ह्मणे । वैश्वानर सर्व देहीं । जठरस्थ पाही वर्ततसे मी ॥ ५८ ॥ याकागी दुसरा प्रहर । त्रेतायुग तें चि निर्धार । आहुती घालिती नारीनर । वैश्वानर उदरस्थ तया ॥ ५९ ॥ द्वापार तो प्रहर तिसरा । विलास अर्चन कृष्णावतारा । तांबूलशय्या-विनोदप्रकारा । चवथे प्रहरा कलियुग ते ॥ ६० ॥ बौध्य अवतार शोभे तेथें । कीर्तन साजे तेव्हा निरुते । भूतमात्रीं कथा गात । रस्त्यांत बैसत घरोघरीं ॥ ६१ ॥ सेवटी कलंकी घोड्यावरील । वस्त फिरे कोतवाळ । तो वि युगात जाणिजे सकळ । नित्य केवळ अनुभवस्थीती ॥ ६२ ॥ आतां पंचभूतात्मक पंचपांडव । राजसूयज्ञ पहातां अपूर्व । याचा घेता स्वानुभव । सरे भव तात्काळिक ॥ ६३ ॥ संतत यज्ञ धर्माघरी । अधर्म टळो सर्वथा परी । लक्षभोजन घटागजरीं । ते कुसरी श्रवण करा ॥ ६४ ॥ व्यासोच्छिष्ट सकळ ग्रंथ । त्यांतील पत्रें सुनिश्चीत । त्या पत्रावळीतील अक्षर सीत । क्षर संतप्त तापत्रयी ॥ ६५ ॥ ते शुकयोगेंद्र ब्रह्मनिष्ट । सेविता सदा मुनिश्रेष्ट । अनुहत ध्वनी गजर स्पष्ट । अनुभवनिष्ट जाणती ते ॥ ६६ ॥ असो ऐसेपरी अनेक प्रकारें । कीर्तनीं वदविले अध्यात्म थोर । बिठेवरी शारंगधर । श्रोते समग्र डोलती पै ॥ ६७ ॥ पुढे सहाचहूघटकानंतर । लेखन करीता साधुचरीत्रें । मिळाले तेथें छत्रक नर । ह्मणती चमत्कार पाहूं या ॥ ६८ ॥ चंद्रभागेंत न भिजे ग्रंथ । तरी करविला पंढरीनाथें । ऐसे वदती येकमेकाते । पातले तेथे जळुजी ॥ ६९ ॥ तो महान-भगवद्भक्त । लोकत्रै परमविद्यात । ह्मणती चला देऊळांत । याचा ग्रंथ श्रीहरीपुढें ॥ ७० ॥ प्रसाद तुरा देवा जाण । संशय तुमचा जाईल पूर्ण । ऐकोनी छत्रकें तें वचन । केलें पठण देवापुढें ॥ ७१ ॥ मग तेथें काय उर्शार । भक्तप्रिय रुक्मिणीवर । साधुस्तवनीं प्रिती फार ।

तुरा सत्वर दिधला पै ॥ ७२ ॥ छळक जाले उज्वायमान । धन्य ते संतलीला पूर्ण । पदरीचे आपुले जाणुनी दीन । करविले वर्णन संतमालिके ॥ ७३ ॥ ती माळा अष्टोत्तरशतमणी । अष्टोत्तर अध्याय सुलक्षणी । प्रेमरज्जू वोविले गुणी । गुंफीले वाणि हस्तपद्में ॥ ७४ ॥ श्रीपांडुरंगा बुकामाळ । पंढरीसी अर्पिती जन सकळ । मुख्य द्रव्य हें चि केवळ । संतुष्ट घननीळ दोपदार्थी ॥ ७५ ॥ याळागीं ग्रंथमक्तमंजीरी । मालिका केली तेचि बरी । घेउनीया वाचे करी । कंठी साजीरी घालीतसे ॥ ७६ ॥ आता बुका ह्मणीजे सुगंध । ज्ञानप्रद जो मकरंद । वेदीं सार उपनिषध । ते प्रसिध्य रामगीता ॥ ७७ ॥ तयावरी टीका प्राकृत । करवितीळ स्वामी सिध्धनाथ । समर्पण कराया तो हेत । पुरविता अर्थ जगद्गुरू ॥ ७८ ॥ ग्रंथोक्त ते परीमळद्रव्य । श्रीविठ्ठली अर्पीन भव्य । संत करविती जरी काव्य । जेवि गव्य पवित्र ते ॥ ७९ ॥ परीसोनी हे विज्ञाप्ति । संतमंडळी आज्ञा करीती । वाचे राहो सरस्वती । ऐसें वदती सिध्धादि ॥ ८० ॥ तो निबिढ वेदांत । बोलविता पंढरीनाथ । बुका तो चि वाहूं त्याते । सांप्रत गळ्यांत घातिली माळ ॥ ८१ ॥ चतुर्दश भागवत । रामदासादि सकळ संत । मालिका सुशोभिवंत । सुगंध तेथें अर्थ विलसतसे ॥ ८२ ॥ त्या माळेचे मणी अष्टोत्तरशत । अध्याय तेचि जाणा निश्चीत । तेरा सहस्र जाला ग्रंथ । पुजिला रघुनाथ रमेश तो ॥ ८३ ॥ तेरा अक्षरी मंत्र । रामदासस्वामीचा तो पवित्र । तेणेचि योगे ग्रंथतंत्र । घडलें स्तोत्र तत्कृपेनें ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥

श्रीरामराज्यैश्वर्याभियुक्तं । रामेति वर्णद्वयमेव पूर्णम् ।
जयंच रामेण जयद्वयेन । रामेति जस्वाच पुनर्नजन्म ॥ १ ॥

ऐसा हा मंत्रराज । पूर्वजन्मीं प्राप्त सहज । उधरीला पदरज । करुनी चोज पाळिले ॥ ८५ ॥ सांप्रत अवतारी सिध्धनाथें । मेळविले निज अभिष्टाते । तारकमंत्र सांगुनी माते । केले सार्थ निजग्रंथीं ॥ ८६ ॥ तिही अक्षरे तेराची । जी का शिवहृदईंची । उपासना पार्वतीची ।

कपिलाची जियत्नकळा ॥ ८७ ॥ कपिल गीतेंत तें वर्णन । तारकमंत्र जो कां पूर्ण । तेरा अक्षरें गुप्त निरोपण । उपदेश खूण गौरजेशी ॥८८॥ तीं अक्षरें प्रणवबीज । रामदास समर्थ सिद्धराम । हृदयभूमीके पेरीली सहज । विस्तार सहज तयाचा हा ॥ ८९ ॥ प्रति अक्षरीं सहस्र येक । ग्रंथ निर्माण जाला चोख । संतस्तवन अलौकिक । गणीत देख सहस्र तेरा ॥ ९० ॥ तेरा प्रताप मेरा नहीं । वाच्य वाचक तो चि पाहीं । मरुनी उरला अंतरबाहीं । पंढरीठाईं तिष्ठतसे ॥९१॥ दशदिशा व्यापुनी भरला । दशअंगुळे असे उरला । भावें पुंडलिकें उभा केला । प्रत्यक्ष पाहीला गुरुपुत्रें ॥ ९२ ॥ *निगुरुप्राणी ऐकुनी ।* आश्चर्य करीती आपुले मनी । वेदशास्त्रें पढुनी । प्रतिष्ठा जनी वृथा चि ते ॥ ९३ ॥ नाहीं जाणिले आपणासी । बोळखिले नाहीं देवाशी । जाला त्या च्यातुर्यासी । पृथ्वीशी भार तो ॥ ९४ ॥ गरुड परी आंधळा । ज्ञानाविण वैदिक मला । बत्तीस लक्षणी अबला । सौभाग्याला ठाव नसे ॥ ९५ ॥ तैसे सकळ भक्तीविणे । जें जें करणें तो तो शीण । *न जाणती तत्त्वज्ञान । धिग जिणें त्या नराचें ॥ ९६ ॥* याकागी सर्वी होउनी सिद्ध । भजावा सद्गुरुस्वामीसिद्ध । तेणें प्राप्त आत्मा शुद्ध । अनुभव प्रसिद्ध लोक त्रै ॥ ९७ ॥ जयाचे कृपें ग्रंथ जाला । ज्ञानसुर्यो हृदई उदेला । तया रविशी बारा कळा । जीवनकळा तेरावी ॥ ९८ ॥ बारा स्कंद भागवत । तेरावा श्रीभगवंत । तेरा सहस्र करविला ग्रंथ । तारक निश्चीत तेरा अक्षरीं ॥ ९९ ॥ बारा जोतिर्लिंगे पृथ्वीवरी । तेरावें श्रीपंढरपुरीं । प्रत्यक्ष उभे भीमातीरीं । वदली वैखरी आन्यार्याची ॥ १०० ॥ ते परब्रह्मलिंग सावळें । *पुंडलिकें स्थापक केलें । तयाकंठी घालूं माळ । तेरा सोज्वळ सहस्रांची* ॥ १ ॥ स्वयंभू श्रीस्वयंप्रकाश । श्रीराम माझा रुक्मीणीविलास । जें जें बोलूं तें तें तयास । शोभतसे पांडुरंगा ॥ २ ॥ भक्तिप्रिय तो सर्वोत्तम । भक्तांचि तया आवडती नेम । याकागी भक्तस्तवनप्रेम । तोचि धर्म आरंभिला ॥ ३ ॥ न घडे भक्तिज्ञानवैराग्य । अर्चन न घडे कोणतें

सांग । सर्वथा जिणें माझें न्यंग । अष्टांगयोग न होती ॥ ४ ॥ कर्मी पहातां न्यूनता सारी । नाहीं घडली सतत वारी । अभागी मी दुराचारी । कोण तारी मजला दीना ॥ ५ ॥ संत कृपेचे सागर । पाठीशीं पडलों मी पामर । करीता तयांनीं अंगीकार । अधिकार स्तवनाचा ॥ ६ ॥ सद्गुरु सिद्ध प्राप्त होता । हरली जन्ममरणाची चिंता । लेखनद्वारा करविली कथा । पंढरीनाथा प्रिय जे ॥ ७ ॥ कलियुगीं कीर्तनधर्म । व्यासादिकीं वर्णिला नेम । म्हणुनी आरंभिलें हें चि कर्म । वर्णिल्या प्रेमें संतकथा ॥ ८ ॥ अनेक साधु पृथ्वीतळा । शोध तयांचा न लागे मला । कांहीं येक वर्णिल्या लीळा । संतमेळा राहिला बहू ॥ ९ ॥ पुष्पें तुळसी बागांत अनंत । वहातां हरीसी तीं न सरत । मंथन करुनी तेवि ग्रंथ । श्रीरघुनाथ पुजीला तो ॥ ११० ॥ पुष्पवटिका श्रीमंतांची । असंख्य फुलें गुंफीतां तेथींची । माळ करीतां सरती कैंची । घडली साची स्तुति तेवि ॥ ११ ॥ गुप्त प्रगट भगवद्भक्त । न लागे कवणा तयांचा अंत । श्रीभगवान स्वयें अनंत । वेद अनंत तो हि वदे ॥ १२ ॥ अनंत साधु अनंत लीळा । काय वदेल मज दीनाला । जेथें शेष मौनावला । स्तब्ध राहिला सहस्रफणी ॥ १३ ॥ संतलीलामृतसागरा । प्राशन करणें न घडे सारा । बिंदुमात्र होईजे अमरा । या पामरा घडलें तेवि ॥ १४ ॥ कांहीं येक करितां स्तवन । संत दयाळु केले पावन । आत्मानुभव होउनी पूर्ण । वृत्ति निमग्न गुरुभजनीं ॥ १५ ॥ तो सद्गुरु स्वतसिद्ध । रामदास अवतार प्रसिद्ध । कल्याणपद दाउनी शुद्ध । केले सिद्ध संतभजनीं ॥ १६ ॥ तेणें त्रैलोक्य उजीवडे । ग्रंथ रचिला घाडिकोडें । भक्तमाळा गुंफोनी प्रौढ । पुजीला गरुड वहन जया ॥ १७ ॥ शके सतरासें छपन्न । जयश्री श्रीरघुनंदन । संवत्सर तोचि जयनाम पूर्ण । होतसे अर्पण सन्माला ॥ १८ ॥ वर्षाऋतु मेघःशाम । पंढरीनिवास स्वसुखधाम । ध्यानकीवल्लभ सीताराम । पदा प्रेम भवतसे ॥ १९ ॥ श्रावणमास तो चि पहातां । उत्तम कृष्णपक्ष

तत्वता । पांडवादिकांचा पक्ष धरीतां । नुरवी चिंता श्रीकृष्ण ॥ १२० ॥ राम तोचि कृष्ण जाला । चंद्रवंश तो शोभला । चंद्रवार तो चि आला । रामचंद्राला पुजिता ग्रंथीं ॥ २१ ॥ ग्रंथसिध्दी तये दिवशीं । सर्व सिध्दांत प्रयोदशी । पुष्पनक्षत्रविद्यामाशी । अविदेशी केले दुरी ॥ २२ ॥ सिंव्हराशीस सूर्य येता । निलोमदृष्टी सहजी तत्वता । देवगुरु वृषभीं असता । तो सर्वथा वाचस्पती ॥२३॥ चंद्र दैवत मृगनक्षत्राचें । सोमवार तो चि साचे । वृषभ हवन श्रीशिवाचें । राशी ते च जाणिजे पै ॥ २४ ॥ मृगशीर्षाचा प्रथमचरण । बेलदेव नाम येक अर्पण । श्रावण सोमवार ह्मणून । बिल्व वहाणें पांडुरंगा ॥ २५ ॥ भक्तमंजिऱ्या भक्तितुलसींच्या । वाहिल्या सप्रेमें निजवाच्या । जिवलग हरी जीवाचा । पंढरींच्या रघोत्तमा ॥ २६ ॥ मृगनक्षत्र प्रथम चरण । वृषभराशीवरी जनन । ग्रंथ अर्पणीं तें पूर्ण । समचरण पुजीले पै ॥ २७ ॥ मातापितृ उभयकुळें । उध्दरीली श्रीविठ्ठलें । जाणुनी आपुले लडिवाळ । बोळविले संतस्तवना ॥ २८ ॥ संतकथा भक्तमंजीरी । माळा जे कां वर्णीली बरी । ते कंठीं घालितां हरी । वर मुन्हारी देतसे पै ॥ २९ ॥ जिये घरीं हा असे ग्रंथ । तेथें वसे मी पंढरीनाथ । पुरवीतसे इछित अर्थ । पूजन करीत धरुनी प्रीती ॥ १३० ॥ संतमंजीरी करीतां पठण । बाधूं न शके तया विघ्न । वाचितां मनीं कामना धरून । करीन पूर्ण मनोरथा ॥ ३१ ॥ श्रवणमननानिजध्यासें । हृदईं प्रगटे जगन्निवास । भक्तिज्ञान देऊन तयास । रक्षीतसे निजांगें ॥ ३२ ॥ सुदर्शन घेउनी स्वयें करीं । आली संकटें तीं निवारी । ऐसे वदला पंढरीविहारी । लील्याधारी पांडुरंग ॥ ३३ ॥ भक्त येश गाती जेथें । सदा सर्वदा वसे तेथें । नाहीं दुजे आह्मा दैवत । आण वहात श्रीविठ्ठल ॥ ३४ ॥ मद्‍आत्मा साधु ह्मणून । ठांईं ठांईं व्यासवचन । याकागी सर्वी जाणून खूण । करावे पालन ग्रंथाचें ॥ ३५ ॥ सिध्दचि उमा स्वानंदगामा । भुवनत्रईं ज्याची शोभा । विटेवरी सदा उभा । भक्त प्रभा तयाची ॥ ३६ ॥ सूर्यतेजें सूर्यांशीं । पहाणें घडे सर्वांशी । भक्तस्तवनें

भगवंताशी । श्रीरामाशी पूजीयेले ॥ ३७ ॥ श्रीरामदासस्वामीचे अकरा मारुती । अकरावा त्यांतील बाह्याप्रती । कृष्णातीर ते निश्चिती । त्या निकट विश्रांति विश्रामपुर ॥ ३८ ॥ श्रीरघुपतीचे जेथें स्थान । मठ विश्रामपूर विश्राम जाण । तये स्थळी ग्रंथ संपूर्ण । प्रसादेकरून श्रीसिध्याचे ॥ ३९ ॥

॥ आर्या ॥

श्रीसिध्यप्रसाद होता । होणें पडलें च साह्य भारतीला ।
कर्याले आज्ञा ह्मणुनी । पडला तेव्हां अखंड भार तिला ॥ १ ॥
सचरीताब्धीमधुनी । काढीयले विपद परम मुक्तमणी ।
भक्तीचा मेरुमणी । पोथी मंजीरी तसीच सूक्तगुणी ॥ २ ॥
राजारामीं जहाला । ग्रंथ हि तो भक्तमंजीरी पढता ।
सचरीतें गातां ते । सोडवितीं काळपंजरी पडतां ॥ ३ ॥
सचरितामृत प्यार । रसनारूपें स्वये चि अवतरती ।
ताराया भाविक जन । ग्रंथस्वरूपें भवाब्धितरी खरी ती ॥ ४ ॥

असो आर्य तोचि पंढरीराय । साधू तयाचें निजहृदय । येकात्मता श्रीगुरुवये । स्तवन अद्वय स्वतसिध्य ॥ ४० ॥ हे भक्तमंजीरी-तुळसीमाळा । घातिली श्रीविठ्ठला गळा । बुका वहाणे आतां भला । तो आगळा ग्रंथ पुढें ॥ ४१ ॥ रामायणाचें तें सार । शिवगिरजेचा आत्मविच्यार । वेदशास्त्राचे ते गव्हर । श्रीगुरुवर बोलविती ॥ ४२ ॥ तो चि बुका परीमळ । अनेक-द्रव्यपूजा सकळ । ग्रहण करीता श्रीघननीळ । जो विठ्ठल दाशरथी ॥ ४३ ॥ शोभली माळा भक्ततुळशींची । प्रसन्नमूर्ति श्रीविठ्ठलाची । होतसे पूजा समपदांची । देवता कुळीची श्रीराम हा ॥ ४४ ॥ मुख्य-प्राण श्रीमारुती । रामदासस्वामी सिध्यमूर्ति । तो माझा सद्गुरु जगतीं । अभेद रघुपति गुरुदेव ॥ ४५ ॥ तया कंठीं घालुनि माळ । पाईं ठिविलें सदा भाळ । तेणें जन्म जाला सुफळ । गेली तळमळ मनाची ॥ ४६ ॥ सिध्य समुचय भक्तवृंदा । अलंदीत नमन पदा । राजारामीं

रमटमी पदा । बोल्या प्रसित्घा श्रीरामगीतें ॥ ४७ ॥ श्रीगुरुसित्घ पंढरीनाथ । भक्तस्तवनीं स्तविला अनंत । तेरा सहस्र पूर्ण ग्रंथ । समर्पण होता तत् समपदीं ॥ ४८ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । श्रीसित्घचरीतावे । अध्याय समाप्त अकरावा ॥ ४९ ॥ ॥ आर्या ॥ ४ ॥ श्लोक ॥ १ ॥ अध्याय ॥ ११ ॥ अनुक्रमे अध्याय ॥ १०८ ॥ ग्रंथवोव्या येकूनसंख्या ॥ श्लोक एवंसंख्या ॥ अष्टके संख्या ॥ श्रीसित्घरखामी वोव्या संख्या ॥ एकूनसंख्या ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ शके ॥ १७७५ ॥ प्रमादीनामसंवत्सरे । माघशुध्य ॥ ७ ॥ सप्तमी मंदवासरे । मुकाम वाडी सांगली येथें पुस्तक समाप्त ॥ शुभंभवतु ॥ ॥ ध्यान ॥ श्रीराम श्रीराम श्रीराम श्रीराम श्रीराम श्रीराम श्रीराम ॥ श्रीराम श्रीसीतारामचंद्र प्रीा ॥ इति भक्तमंजीरीमाळाग्रंथ ॥ समाप्त ॥ श्रीसीताराम ॥



## अध्याय १०९

### — मेरु अध्याय —

### — रामा हरिदास —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय जगद्गुरु जगदोत्घारा । जळाब्धिवासा जानकीवरा । जनकप्रिया जान्हवीधारा । जघनकरा शोभसी तूं ॥ १ ॥ गोनामइंद्रियें तें गोकुळ । स्वानुभवी जाणती प्रेमळ । अवघा देवकीवृत्ति निर्मळ । देवकी प्रांजळ ते माता ॥ २ ॥ वासुदेव सर्वांभूतीं । ऐसी पूर्ण जेथें स्थिती । वसुदेव पिता तो निश्चीती । तेथे प्रघटती श्रीकृष्ण ॥३॥ अहंकारकंस वधावया । अवतार घेणें तया ठाया । युगायुगीं नीज आत्मया । स्थापावयाते धर्माते ॥ ४ ॥ जाणुनी स्वरूप हे यशवदा । ते चि स्फूर्ति श्रीयशवदा । वाढविले तयेनें मुकुंदा । गावोनी सदा यश वदनीं ॥ ५ ॥ नंद तो चि

निजानंद । पिता ह्मणवी त्या गोविंद । मनोवृत्ति गोपिका शुध । रमती छंदे श्रीकृष्णपदीं ॥ ६ ॥ अष्टधा प्रकृति अष्टनायका । अष्टमात्रा रुक्मीणी देखा । परमात्मा विठ्ठल सखा । क्रिडे अंका सोहंस्फिती ॥ ७ ॥ नऊ लक्ष गोपाळ नवविध भक्ति । मोहिला तेणें श्रीपती । अखंड खेळे दिवाराती । गोरस सेविती प्रेमळा ॥ ८ ॥ तत्वमसि महावाक्य । प्रबोधिले सकळ लोक । अवतरला श्रीवैकुंठनायक । धर्मस्थापक जगद्गुरु ॥ ९ ॥ असो पुंडलीकाचे भक्तिस्तव । पंढरीस आले रमाधव । संगे घेउनी गोपाळ सर्व । देवाधिदेव पांडुरंग ॥ १० ॥ सूर्यासवे जैसा किर्णे । कर्पुरी सुगंध ऐक्य पूर्ण । भक्तसहीत जगजीवन । शोभे आपण विटेवरी ॥ ११ ॥ ते ते संत अनेक स्थिती । जन्मले साधु वैष्णव क्षिती । भक्तिमंजीरीमालिकेप्रती । गुंफिले निश्चीती बहुतेक ॥ १२ ॥ तो ग्रंथ तेरा सहस्र जाला । मेरू पाहिजे त्या भाळेला । विनविता ऐसें श्रीविठ्ठला । सांगती कथेला भगवान स्वयें ॥ १३ ॥ श्रीमद्भागवतीं प्रेमळ । वर्णिला श्रीदामागोपाळ । अवतरला तो सोज्वळ । कथन निर्मळ तयाचें ॥ १४ ॥ संतमंजीरीमालिकेसी । मेरुचरीत्र हें तपासी । सुचविता ऐसें हृषीकेशी । जाला मानसीं आनंद ॥ १५ ॥ नारदक्षेत्र श्रीपदरी । उपमा देतां नाहीं सरी । वर्णितां ते वेद च्यारी । शीणली वैखरी शेषाची ॥ १६ ॥ भूवैकुंठ प्रत्यक्षता । जनन तेथें जया संता । समचरणीं ठेऊन माथा । वर्णिली कथा यथामती ॥ १७ ॥ श्रीपांडुरंगासन्निध । आरंभिलें कथन शुध । नमो वैष्णव अक्षवृंदें । लीला छंदे लिहितसे ती ॥ १८ ॥ सेवाधारी श्रीहरीचे । आवडती देवा का साचें । तयांत सौभाग्य कीर्तनाचें । हरिदास वाचे ह्मणती जया ॥ १९ ॥ कलीमध्ये कीर्तनधर्म । हाचि विधि मुख्य परम । तया वंशीं भक्तोत्तम । जन्मले श्रीदामगोपाळ ॥ २० ॥ वेदरूप वृक्षाठाईं । माध्यंदिनी शाखा पाही । भक्ति रसाळ फळ ते हि । पावले विदेही बहु जन्म ॥ २१ ॥ याज्ञवल्क्यादि ब्रह्मनिष्ट । यजुर्वेदी अवतार स्पष्ट । श्रीदामा योगनिष्ट । अवतरला श्रेष्ट तये कुळीं ॥ २२ ॥

स्वस्वरूपीं रममाण । तेंचि तया नामाभिधान । राम वदती सकळ जन । रमविता म्हणोनी श्रीविठ्ठला ॥ २३ ॥ गर्भीं ज्ञान शुकापरी । सोहंभावें भजन करी । काय तयाची वर्णू थोरी । पूर्ण अंतरीं येकात्मता ॥२४॥ प्रसूतकाळ होतांचि जाण । छोकरीला करी रूदन । परी सदा हास्यवदन । हृदईं ध्यान विठोबाचें ॥२५॥ मुलांमाजी खेळूं जातां । भगवत्पर खेळणें सर्वथा । मुळींचीं स्वये तूर्य अवस्था । कर्णे कथा निजळीले ॥२६॥ ऐशापरी बाळलीला । रामा हरीदास फरिता जाला । पुढे सवेचि व्रतबंध केला । वेद पढविला पित्यानें ॥ २७ ॥ सकळ शास्त्रें पारंगत । पुराणें तीं सर्व विदित । ज्याचा सखा पंढरीनाथ । काय तेथें वर्णावें ॥ २८ ॥ श्रीदाम्याचा जो अवतार । रामचंद्र नामे योगेश्वर । मागें पुढें सारंगधर । क्रीडे साचार ज्यापासीं ॥ २९ ॥ ऋणानबंधेंकरून । हरिदासाचें त्या जालें लग्न । जनरीती प्रपंच करणें । रुक्मीणीरमण परी अंतरीं ॥ ३० ॥ वांगीनामे ग्राम निर्मळ । तेथें गेले ते भक्त प्रेमळ । ग्रामस्थांनीं रहाविले । भजन ऐकीलें सर्वांनीं ॥ ३१ ॥ मोहित जाले भक्तवृंदे । नरनारी आबालवृद्ध । नित्य दर्शनें आल्हाद । वंदती पद दासाचें ॥ ३२ ॥ पुरोहित ब्राह्मण तुकभट । तोहि विद्वांस अतिश्रेष्ट । भजन करीं प्रेमनिष्ट । उभयता स्पष्ट येकात्मता ॥ ३३ ॥ कांहीं दिवस राहातां वांगींत । वतन प्राप्त जालें तेथें । पाटिलकीते अनुभवीत । हरिदास संत रामा ते ॥ ३४ ॥ रात्रंदिवस निजध्यास । ध्यानींमनीं पंढरीनिवास । निरंतर येणें वारीस । अतिहर्षें भजन करीत ॥ ३५ ॥ तुकंभटासहित येऊन । श्रीविठ्ठलाचें करिती पूजन । मागुतीं जावें निघून । उभयता जाण प्रेमळ पैं ॥ ३६ ॥ ऐसा क्रमितां कांहीं काळ । पुढें कारण कैसें जाहालें । पाहिजे ते श्रोतीं ऐकिलें । भक्तवछळ परमात्मा ॥ ३६ ॥ वर्षाऋतु श्रावण मास । पाणी आलें चंद्रभागेस । दर्शना पातले योगेश । रामा हरीदास द्विज तुकया ॥ ३८ ॥ तव तो येकादशीदिन । रात्र जाली घटका तीन । उतरावया नाहीं कवण । भरलें जीवन दोही थडी ॥ ३९ ॥

उद्विग्न, जाले उभयतां । नेम टळला कीं सर्वथा । ह्मणती आजि पंढरीनाथा । प्राण तळतां न ठेऊं पै ॥४०॥ तुज न पाहातां हृषिकेशी । नाहीं घडली येकादशी । आजी निष्ठुर जाहालासी । मोकलिसी निजदासा ॥ ४१ ॥ तरी आतां जाईल ब्रीद । अव्हेरितां मतिमंद । न देखतां श्रीसमपद । देह शुष्क अर्धु जळा ॥ ४२ ॥ खळखळा नेत्रीं अश्रु वाहाती । दीर्घस्वरें रुदन करिती । धाव घाली रमापति । ऐसें वदती अट्टहास्यें ॥ ४३ ॥ अभंग केले तये समई । अद्यापि संत गाती मही । करुणा मांडिली अत्यंत पाहीं । तेणें विठाई कळवळली ॥४४॥ सद्गद होता वैष्णववीर । मग तेथें कैचा उशीर । धांविन्नले रुक्मिणीवर । भवसागरनावाडी ॥ ४५ ॥ कैवर्तकाचा घेऊन वेश । आले स्वयें श्रीजगदीश । फाटकी चिंधी मस्तकास । ध्यान सुरस शोभतसे ॥४६॥ पितांबर टाकिला सोडून । लंगोटी घाली मनमोहन । रुक्मीणीनें हास्य-करून । पुसतसे जाण श्रीविठ्ठला ॥ ४७ ॥ ह्मणती स्वरा कोणती जाली । कोणी स्वामीची आठवण केली । विचित्र स्थिती अवलंबिली । कोपीन घातली हे वेळा ॥ ४८ ॥ जगद्व्यापक मनमोहन । सांगे तेव्हां करुणावचन । भक्त माझे देती प्राण । धावतो ह्मणून तयांकडे ॥ ४९ ॥ येकादशी आजिचा दिवस । पाणी आलें चंद्रभागेस । आंवेकरी नाहीं तयास । उतरावयासी लवलाहीं ॥ ५० ॥ नेमनिष्ट प्रेमळ भारी । रात्र जाली घटिका चारी । न आणितां अईलतीरीं । उदास शरीरीं जालेती ॥ ५१ ॥ जरी तयांनीं देह ठेविला । निज भीदासी कळंक लागला । म्हणोनी वेश हा धारण केला । आणावयाला तयासी ॥ ५२ ॥ ऐसें सांगुनी जगन्माते । देउळांतुनी निघाले अनंत । सांगड घेउनी स्कंधाते । पंढरीनाथ प्रघटला ॥ ५३ ॥ रामा हरिदास तुकंभट । पैलतीरीं भीमेनिकट । तेथें पातले श्रीवैकुंठ । धरुनी स्पष्ट वेश कोळ्याचा ॥ ५४ ॥ ह्मणती कोण तुह्मी येथें बैसला । येतसां काय पंढरीला । विठुकोळी ह्मणती मला । सत्वर चला येक जण ॥ ५५ ॥ माघुती नेईन दुसरयासी । ऐसें वदतां कृपाराशी । सद्गद जाले मानसीं ।

लागले सांगडीसी हरिदास ॥ ५६ ॥ तुकंमट तेथें राहिला । दृढ निश्चय तेणें केला । आजी न पाहतां श्रीपाऊला । अर्पीन जळा आपुली तनु ॥ ५७ ॥ असो सर्वसाक्षी आत्माराम । भक्तकाजकल्पद्रुम । निजभक्ताचें जाणुनी प्रेम । केलें कर्म अद्भुत पै ॥ ५८ ॥ श्रीदाम्याचा तो अवतार । रामाहरिदास निर्धार । सांगडीसी लाविले रमावरें । दीनोद्धारें ते समई ॥ ५९ ॥ न लागतां अर्धक्षण । उलंघन करविले गंगाजीवन । बोले भक्तासी कमलनयन । करुनी स्नान जा दर्शना ॥ ६० ॥ मग तो आनंद सांगणें किती । कोळ्यास हरिदास धन्य ह्मणती । सरळ पेटे लाविले जगती । आश्चर्य चित्तीं करिती पै ॥ ६१ ॥ असो स्नानविधी सारुन । महाद्वारासी साष्टांग नमून । प्रवेश करितां राउळीं जाण । देहमान कैचें मग ॥ ६२ ॥ अष्टभाव दाटले आंगीं । वृत्ति रंगली पांडुरंगीं । रामा हरिदास धन्य योगी । भवभंगी विनटले ते ॥ ६३ ॥ लगबगेसी जाउनी त्वरें । मस्तक ठेविला पायावर । प्रेमाश्रु गळतसे नीर । चरणांवर अभिषेक तो ॥ ६४ ॥ निर्वासना वसन सुंदर । नेसविला पीतांबर । त्रिगुणसत्र अर्पिलें बरें । उपवस्त्रें खरे मंजरी ती ॥ ६५ ॥ पृथ्वीतत्वाचें अष्टगंध । चंदन रेखिलें तेंचि शुध्द । अक्षता सुढाळ प्रसिध्द । अर्चिला सिध्दस्वामी तो ॥ ६६ ॥ सुमनें सुमनाची करुनी माळा । अर्पण केली श्रीविठ्ठला । सुगंध प्रेमबुका वाहिला । तुरा खोविला श्रीमस्तकीं ॥ ६७ ॥ सच्चिदानंद त्रिदळ । तेणें पुजीला जगत्पाळ । जाणीव ते चि तुळसीदळ । मंजुऱ्या सोज्वळ अर्पियेल्या ॥ ६८ ॥ ज्ञानाग्नी करून सिध्द । अहंकृति जाळिली प्रसिध्द । धूप तो चि जाला शुध्द । दीप निर्द्वंद्व स्वयंजोती ॥ ६९ ॥ नैवेद्य तो चि सर्वात्मता । अर्पण केले सहजीं तत्वता । त्रयोदशगुणीं तांबूल पहातां । दक्षणा सर्वथा श्रीफल ॥ ७० ॥ तेणें जन्म जाला सुफळ । कर्पुरार्ती विज्ञान निर्मळ । ओवाळीला श्रीघननीळ । ध्वनी प्रबळ मंत्रपुष्प ॥ ७१ ॥ आत्मनिवेदन नमन पूर्ण । प्रतिपाउलीं प्रदक्षणायज्ञ । अनन्यभावें करुणाघन । रुक्मीणीरमण प्रार्थियेला ॥ ७२ ॥ रामाहरिदासें ऐशापरी ।

अर्चियेला तो श्रीमुरारी । जो का तिष्टे विटेवरी । जगदोद्धारी परमात्मा ॥ ७३ ॥ सन्य घालुनी श्रीराऊळ । आले गरुडपाराजवळ । तो देखिला नेत्रकमळें । पुरोहित प्रेमळ तुकंभट तो ॥ ७४ ॥ परस्परें घडतां आलिंगन । वृत्तांत सांगितला पूर्ण । सांगड आणिली कोळ्यानें । आला घेउनी झडकरी ॥ ७५ ॥ पैसे धावया शोध करीता । ठिकाण न लागे त्याचा सर्वथा । विस्मय होउनी चित्ता । पडती उभयता भूमीवरी ॥ ७६ ॥ ह्मणती दयाळें विठाई । श्रमविले तुजला पाही । शोक करिता बहुत देहीं । शेषशाई भेट देती ॥ ७७ ॥ धन्य तयाची सुकृतरासी । जयाची आवड भगवत्पदासी । कोळी होऊन हृषिकेशी । आणिले दोघासी भीमेतून ॥ ७८ ॥ गिरीकपाट सेविती मुनि । हटयोगी अनेक ज्ञानी । तयासी दुर्लभ चक्रपाणी । सुलभ भक्तिनी तो हा विठो ॥ ७९ ॥ धन्य भाग्य त्या हरिदासाचें । आणि तुकंभट सद्विप्राचें । प्रत्यक्ष दैवत वेकुंठीचें । मोहित साचें जालें जया ॥ ८० ॥ सर्वकाळ भगवत्भजनी । देव केला जयानीं ऋणी । क्षणक्षणा जवळ येउनी । बैसे रुक्मीणीवल्लभ तो ॥ ८१ ॥ ह्मणे श्रीदाम्या प्रेमळ रामा । तुझे भजन आवडे आह्मा । विणा घेऊन निजधर्मा । नित्यनेमा आचरी तूं ॥ ८२ ॥ ऐसें वदतां मनमोहन । करुणाघन राधिकारमण । रामाहरिदास उभे राहून । करी नर्तन ते वेळां ॥ ८३ ॥ चरणीं बांधुनी जेर्ण चाळ । चिपळ्या घ्याव्या हातीं प्रांजळ । विणा वाजे तो मंजुळ । गायन प्रेमळ दासाचें ॥ ८४ ॥ श्रोतावक्ता ह्मणुनी हरी । उभे राहातां रंगसीळेवरी । देह भावा कैंचि उरी । संगे मुरारी नाचतसे ॥ ८५ ॥ ते अद्भुत पहावया भजन । ब्रह्मादिक येती धाऊन । सिवासी नावडे कैलासभुवन । राहिले येऊन श्रीपंढरी ॥ ८६ ॥ असो ऐसा भक्तचुडामणी । श्रीदाम्याचा अवतार जनी । रामचंद्र हरिदास जाले मेदिनी । धन्य जननी पिता तो ॥ ८७ ॥ पवित्र कुळ हरिदासाचे । वंशीं जनन त्या निजभक्ताचें । काय वर्णू वैष्णवाचें । वदन शेषाचे थकलें पै ॥ ८८ ॥ महाद्वारीं

नित्यभजन । रामचंद्र तो करितसे जाण । मागें पुढें जगजीवन । सयाद्य पूर्ण तिष्ठतसे ॥ ८९ ॥ क्षणयेक न पहातां राम । वेडा होय घनःशाम । रुक्मीणीसहित पूर्ण काम । जवळी प्रेमे बैसती ॥ ९० ॥ विठ्ठलीं रंगलें मानस । प्रपंचभान कैचें तयास । भजन करी रात्रंदिवस । रामाहरिदास धन्य ते ॥ ९१ ॥ पुढे कांहींकाळेंकरून । त्यासी गेली प्रवृत्ति जाण । निवृत्ति त्रो धरीली पूर्ण । कार्य कारण ते ऐका ॥ ९२ ॥ कोणे येके दिनीं रुक्मीणीसी । बोलतां स्वयें हृषिकेशी । संतान नसता हरिदासासी । भजनासी करील कवणु ॥९३॥ ऐसे जाणुनी रुक्मणी । दासाचिये आले जवळी । सांगती आपण वनमाळी । भजनकाळीं युक्तीनें ॥ ९४ ॥ म्हणती वारे निजभक्ता । विवाहा करुनी घेई आतां । तेणे घडेल साधकता । उभय सुतासी प्रसवसी तूं ॥ ९५ ॥ विद्वज्जन होतील पुत्र । भजन करिती सहजी पवित्र । वंशामध्यें अनेक सुपात्र । जन्मतीं नरनारी ते ॥ ९६ ॥ यालागी भक्तनिधाना । मान्य करी माझिया वचना । ऐसें बोलतां पंढरीराणा । हास्य वदना करी दास ॥ ९७ ॥ म्हणे दयाळे विठाबाई । अनन्यभाव तुझे पाई । उतारवय जाहले पाही । जाणसी सकळ हृदई तें ॥ ९८ ॥ द्रव्य किमपि नसे जवळा । कोण वधू देईल मजला । सर्वसाक्षी श्रीविठला । विनोद केला वाटतसे ॥ ९९ ॥ नेसावयासी नाहीं चिंधी । मागतो भिक्षा नित्य प्रसिध्धी । कायसी करणें लग्न सिध्धी । दयानिधि विश्वंभरा ॥ १०० ॥ मग नाटकी हरि तो घनसांवळा । विचित्र केली तेणें लीळा । यात्रेसी होता ब्राह्मण आला । यजुर्वेदी मला आत्मनिष्ट ॥ १ ॥ धन्य तयाची सुकृत-राशी । दर्शन दिधले जाऊन तयासी । कन्या द्यावी हरिदासासी । वैकुंठ-निवासी आज्ञापिती ॥ २ ॥ मग तो प्रेमळ गुरुभक्त । शोध करीत गेला देउळांत । रामाहरिदास महासंत । नमन तयाते केलें पै ॥ ३ ॥ म्हणे कन्या दान करितो तुझा । अंगिकारावे द्विजोत्तमा । संकोच न धरी मनोधर्मा । आज्ञा आला पांडुरंगाची ॥ ४ ॥ ऐकता ऐसें असमुत । सद्गद जाले रामसंत । आज्ञा प्रमाण सनकादिकांते ।

काय अनाथ मानव मी ॥ ५ ॥ मग यथोक्त त्या ब्राह्मणें । सोहळा केला समग्र जाण । अर्पण केलें कन्यारत्न । देऊन आंदण अनेक पै ॥ ६ ॥ कृतार्थ जाहलो वदून ऐसें । गेला स्वदेशा विप्र हर्षें । भगवत्कृपा जेथें असे । उणें नसे तयासी ॥ ७ ॥ रामचंद्र हरिदास वधूसहित । राउळामाजी भजन करीत । वस्त्रें अलंकार तयाते । अर्पिती समस्त क्षेत्रीचे ॥ ८ ॥ भगवान वदती हरिदासाते । आता जाई स्वगृहाते । वात्सल्य करुनी सदनाते । स्वस्त चित्तें राहीं तूं ॥९॥ पंचमहायज्ञ करुनी पूर्ण । देउळात येउनी करावे भजन । आज्ञा करिता जगजीवन । आचरती जाण तैसें चि ॥ ११० ॥ रात्रंदिवस तो चि धंदा । रंगलें मानस श्रीसमपदा । प्रपंचमान नसे कदा । श्रीगोविंदा आळविती ॥ ११ ॥ धन्य साधु ते योगेश । समर्थ रामा हरिदास । अखंड जवळी जगन्निवास । प्रेम विशेष जाणुनी ॥ १२ ॥ पुढें सवे चि दोन वर्षांनीं । ऋतुस्नात जाली पत्नी । सोहळा करविला देवांनीं । जाऊन स्वमीं ग्रामस्थाचे ॥ १३ ॥ यदुपति नामे प्रथम पुत्र । दुसरा कान्हया जाला सुपात्र । भक्तमालिके वर्णिले पवित्र । सुंदर चरित्र संतवर्ये ॥ १४ ॥ श्रीरंगनाथस्वामींनीं । कान्हयाहरिदास स्तविला वदनीं । धन्य कुळ पावन जनीं । भक्तशिरोमणी जन्मले ते ॥ १५ ॥ कीर्तन करिता तो कान्हया । प्रघट होणे देवराया । प्रेम सतत ज्याचे हृदया । असोनी काया विदेहस्थिती ॥१६॥ रामकृष्ण हरि गोविंद । निरंतर वाचे हाचि छंद । रंगलें मानस परमानंदें । कैचे द्वंद तयासी ॥१७॥ सर्वभूतीं पांडुरंग । गुरुकृपें ज्या अनुभव सांग । काव्य ज्याचें सुंदर अभंग । स्तविला अव्यंग परमात्मा ॥ १८ ॥ रामचंद्र हरिदास धन्य योगी । कान्हया सत्पुत्र ज्याचा जगीं । यदुपति दुसरा आत्मरंगीं । श्रीरंगीं विनटला जो ॥ १९ ॥ उभयतां सुपुत्र जाले जाणून । विचारीले पत्नीसी पूर्ण । म्हणे मजला सन्यास घेणें । दीक्षा धारण करितों पै ॥ १२० ॥ ती माउली पतिव्रता । अनुसया चि दुसरी पाहतां । अनुसरोनी पतिचित्ता । वर्तणें

सर्वथा उद्‌ग्राही ॥ २१ ॥ कायावाच्यामनेसहित । भ्रतारसेवे काळ सारीत । थुंकू जाता पसरी हात । काय तेथें वर्णावें ॥ २२ ॥ नाहीं ठाऊक दुसरें साधन । निरंतर पतिआज्ञा प्रमाण । सर्वभावें अनन्यशरण । हात जोडुनी उभी सदा ॥ २३ ॥ विषयस्फुरण कैचें आंगी । ज्ञानकळा ती प्रत्यक्ष जगीं । रामाहरिदासजींचे संगी । स्वसुखरंगीं क्रीडतसे ॥ २४ ॥ अमो स्त्रियेशीं विचारुन । सन्यास घेतला दासें पूर्ण । देहत्रय निरसोनी जाण । महाकारण सेविलें पैं ॥ २५ ॥ तुर्य अवस्था सतत जाशी । परि लीला दावी जगासी । अंतर्बाह्य ह्मपिकेशी । असिपदासी रमले जे ॥ २६ ॥ म्हणुनी नाम वयाचें रामा । ऋणी केले त्या श्रीरामा । जवळी विटेसे सहितरामा । नाहीं उपमा वाक्यासी ॥ २७ ॥ यतिरुपें स्वयें श्रीहरि । दीक्षा दिधली दासासी बरी । दाविलें तत्त्व चराचरीं । पंढरीविहारी तयानें ॥ २८ ॥ तो अनुभव अबोलणा । गुरुपुत्र जाणती खुणा । त्याचा सखा पंढरीराणा । तया ज्ञाना उणें कैचें ॥ २९ ॥ रामा हरिदास जाले यती । वाणली आंगीं सहजस्थिती । अखंडाकार रंगली वृत्ति । भजनस्फूर्ति अभेदता ॥ १३० ॥ जे जे प्राणी दृष्टीस पडती । दर्शनीं त्या उद्धरिती । नानाविधी काव्योक्ति । रुक्मिणीपति स्तवियेला ॥ ३१ ॥ सेवटीं समाधीकाळीं । अपूर्व गोष्टी होती जाली । ऐकतां ते श्रोतीं सकळीं । हृदयकमळीं हरिख वाटे ॥ ३२ ॥ सनकादिक नारदा सहित । आले स्वयें पंढरीनाथ । स्वदासीं समाधी देत । आनंद होत भक्तवृंदा ॥ ३३ ॥ अमर करिती पुष्पवृष्टी । पातले तेथें परमेष्ठी । गिरिजेसहित धूर्जटी । पहातां दृष्टी आनंद ॥ ३४ ॥ क्षेत्रांतील संत सारे । मिळाले सिष्ट नारीनर । वाद्यें वाजती अपार । अनुहतगजर धिंग तो ॥ ३५ ॥ दशमीकृष्ण आषाढमास । संवत्सरा नाम असे । । शके आठसे वर्षे नऊ ॥ ३६ ॥ प्रतिवर्षीं पुण्यतिथी । अन्नदान सर्वभूतीं । विद्वज्जन कीर्तन करिती । निरंतर इच्छिती प्रसादा ॥ ३७ ॥ सेवाधर्म अनुष्ठान । प्रदक्षणा

करिती जन । इच्छितकामना होउनी पूर्ण । जडे मन भगवत्पदीं ॥ ३८ ॥ हरिदासरामा पूर्णभक्त । आवडता प्रेमळ श्रीहरीते । याचलागी करविलें स्तवनाते । हृदयाते प्रगटून स्वयें ॥ ३९ ॥ भक्तमंजीरीमाळीकेसी । मेरुचरित्र हें नेमेसी । श्रवणपठणें दुरित नासी । तरी जनासी संतकथा ॥ १४० ॥ स्वतसिध महाराज रामदास । ग्रंथ करविता तो सिध्येश । राजारामीं रंगलें मानस । सन्माळेस वदविलें पै ॥ ४१ ॥ स्वरूपीं रमविता ह्मणोनि राम । विटेवरी तो पूर्णकाम । पांडुरंग मेघःशाम । पूजिला प्रेमें निजभावें ॥ ४२ ॥ भक्तरूपें तुळसीमाळा । अर्पण केली श्रीविठ्ठला । मस्तक ठेविलें पदकमळा । निवेदिला ग्रंथ पै ॥ १४३ ॥ भक्तमंजीरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । रामचंद्रहरिदासचरित्राते । अध्याय होत परिपूर्ण हा ॥ १४४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

॥ हें पुस्तक दिनकर विठ्ठल मराठे । यांणीं लिहविलें असे ॥

॥ श्रीरामचंद्ररामदासार्पणमस्तु ॥



ही प्रत सांगलीस मिळाली. नकल रा. श्रीधरपंत टिकले यांचेकडून करविली.

धुळें श्रावण शु. ७, १८३१